श्री

महापुरुष

# ब्रह्मेंद्रस्वामी धावडशीकर.

## ( चरित्र व पत्रव्यवहार. )

सत्पुरुषकथा अद्भुत रसदा ह्मणतों हिलाच सुरभी मी ।

—मोरोपंत.

हा ग्रंथ

दत्तात्रय बळवंत पारसनीस

ह्यांनीं तयार केला;

तो

**मुंबई येथें**

"निर्णयसागर" छापखान्यांत छापिला.

---

प्रकाशकः—

**बाबाजी सखाराम आणि कंपनी**

युसफ बिल्डिंग्ज, मुंबई.

---

किंमत २॥ रुपये.

पुणें येथील

डेक्कन व्हर्न्याक्युलर ट्रान्स्लेशन सोसायटी

ह्या संस्थेच्या विद्यमानें

# कै० रा. ब. सरदार गोपाळराव हरि देशमुख

ह्यांचें स्मारक.



जन्मः—इ० स० १८२३. मृत्युः—इ० स० १८९२.

## अभंग.

हरीभक्ति करी जन तारावया । स्वधर्मा विलया जाऊं नेदी ॥
जाऊं नेदी भक्ती जाऊं नेदी ज्ञान । अनुतापीं मन निरंतर ॥
निरंतर भाव सगुणीं भजन । येणें बहु जन उद्धरती ॥
उद्धरती जन करितां साधन । क्रियेचें बंधन आचरतां ॥
आचरतां साधू जना होय बोधू । लागतसे वेधू भक्तीभावें ॥
भक्तिभावें देव-प्रतिष्ठा पूजन । कथा निरूपण महोत्साव ॥
महोत्साव साधू भक्तींचें लक्षण । करी तिर्थाटन आदरेंसी ॥
आदरेंसी विधी करणें उपाधी । लोकांतें सद्‌बुद्धी लागावया ॥
लोकाचार करी तो जना उद्धरी । ज्ञाता अनाचारी कामा नये ॥
क्रियावंत साधू विरक्त विवेकी । तोचि तो लौकिकीं मान्य आहे ॥

रामदास.

# प्रस्तावना.

श्रीमत् परमहंस ब्रह्मेंद्रस्वामी हे थोर सत्पुरुष महाराष्ट्रांत अवतीर्ण होऊन त्यांनीं मराठी राज्याच्या अभ्युदयास उत्कृष्ट रीतीनें साहाय्य केलें; परंतु आजपर्यंत त्यांचें स्वतंत्र चरित्र किंवा पत्रव्यवहार ह्यांची चांगलीशी प्रसिद्धि झाली नाहीं. मराठ्यांचे इतिहासकार ग्रांटडफ साहेब ह्यांस, ब्रह्मेंद्रस्वामींचा व पेशव्यांचा अस्सल पत्रव्यवहार उपलब्ध झाला होता, ही गोष्ट त्यांच्या ग्रंथांतील कित्येक टीपांवरून सिद्ध होते. ग्रांटडफ साहेबांनीं ह्या पत्रव्यवहारासंबंधानें एके ठिकाणीं असे स्तुतिपर उद्गार काढिले आहेत कीं:–"बाजीरावांचीं व चिमणाजी आपांचीं पुष्कळ मनोरंजक पत्रें धावडशीकर स्वामी ह्यांच्या शिष्यवर्गाच्या वंशजांकडून मला कांहीं वेळ मिळालीं होतीं. हे स्वामी महाराष्ट्रामध्यें फार पूज्य सत्पुरुष होते. बाजीराव व चिमणाजी आपा ह्यांचे ते 'महापुरुष' ह्मणजे गुरुवर्य असून, त्यांचा त्यांवर पूर्ण विश्वास होता. बाजीराव पेशवे ह्यांनीं स्वामींस व चिमणाजी आपांस हीं पत्रें फार मोकळ्या मनानें लिहिलेलीं असून, त्यांत आपल्या आयुःक्रमांतील गोष्टी सविस्तर रीतीनें वर्णिल्या आहेत. त्यामुळें तीं अगदीं अमूल्य अशीं आहेत. ह्या पत्रांचें भाषांतर करून घेण्याची परवानगी मला मिळाली होती; परंतु त्यांच्या नकला करून घेण्याची परवानगी मला मिळाली नाहीं! हीं अस्सल पत्रें साताऱ्याजवळील धावडशीनामक खेडेगांवीं स्वामींच्या शिष्यवर्गाजवळ अद्यापि आहेत."*

---

* "Many interesting letters from BajeeRao and Chimnaji were lent to me by the descendants of the desciples of the Dawarsee Swamee. The Swamee was a much venerated person in the country, and was the Mahapooroosh of BajeeRao and his brother, and seems to have possessed their entire confidence. The Peishwa's letters to the Swamee, and to his brother, detail the actions of his life in a familiar manner, without disguise, and are quite invaluable. I was permitted to translate, but not to copy them. The originals continue in possession of the Swamee's desciples at Dawarsee, a village within a few miles of Satara."

ग्रांटडफ साहेबांच्या ह्या उल्लेखावरून, स्वामींचा व पेशव्यांचा 'अत्यंत मूल्यवान्' पत्रव्यवहार त्यांस उपलब्ध झाला होता, ह्यांत शंका नाहीं. ग्रांटडफ साहेब सातारा येथें छत्रपति प्रतापसिंह ह्यांचे दरबारीं इ० स० १८१८ पासून इ० स० १८२३ पर्यंत रेसिडेंटच्या हुद्यावर होते. त्या अवधींत त्यांनीं हीं पत्रें पाहिलीं होतीं. त्यानंतर सुमारें अर्ध शतकपर्यंत मराठ्यांच्या इतिहासाचा अथवा ब्रह्मेंद्रस्वामींच्या चरित्राचा मागमूसही नव्हता. पुढें इंग्रज सरकारच्या विद्यादानप्रसारामुळें इतिहासविषयाचें महत्त्व एतद्देशीयांस समजूं लागून, त्याविषयींची अभिरुचि व आस्था त्यांचे ठिकाणीं उत्पन्न झाली; व लवकर मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें—म्हणजे जुने कागदपत्र व बखरी—प्रसिद्ध करण्याचा उपक्रम "विविधज्ञानविस्तार" व "काव्येतिहाससंग्रह" ह्या दोन मासिकपुस्तकांच्या द्वारें सुरू झाला. ह्या उपक्रमामुळें ब्रह्मेंद्रस्वामींचीं दहावीस किरकोळ पत्रें व एक छोटीशी बखर मुद्रणयंत्रांतून प्रकाशित झाली; व ब्रह्मेंद्रस्वामींचें नांव व त्यांच्या चरित्राची अल्पशी माहिती हीं ऐतिहासिक जगास महशूर झालीं. ह्या सुमारास ह्मणजे इ० स० १८७९ सालीं, पुणें येथील दक्षिणाप्राइझ कमिटीच्या जाहिरातीवरून, रा० सा० नागेशराव विनायक बापट ह्यांनीं तयार केलेला "श्रीमंत थोरले बाजीरावसाहेब ह्यांचें चरित्र" नामक एक ऐतिहासिक ग्रंथ निर्माण झाला. ह्या ग्रंथामध्यें "महापुरुष" ह्या शिरोलेखाखालीं, ग्रंथकारांनीं, ग्रांटडफ साहेबांच्या इतिहासांतील तुटपुंज्या व अस्पष्ट माहितीच्या आधारें, ह्या स्वामींचें काल्पनिक परंतु हृदयंगम चित्र महाराष्ट्रवाचकांस सादर केलें. थोरल्या बाजीरावासारख्या प्रख्यात व पराक्रमी पुरुषाचे गुरु ह्या नात्यानें त्यांच्या चरित्रासंबंधानें सहज उत्पन्न होणारी जिज्ञासा, आणि साधुपुरुषांच्या रसाळ व प्रेमळ कथा श्रवण करण्याविषयींची स्वाभाविक आवड, ह्या दोन कारणांमुळें, रा० सा० बापट ह्यांचें "महापुरुषाचें" चटकदार वर्णन लोकांस फारच आवडलें; व त्या योगानें ह्या महापुरुषाचा महाराष्ट्रवाचकांस चांगलाच परिचय झाला. दक्षिणाप्राइझ कमिटीचे सेक्रेटरी रा० रा० रावजीशास्त्री गोडबोले ह्यांनीं, रा० सा० बापट ह्यांच्या ह्या "महापुरुषा"च्या वर्णनाविषयीं अभिप्राय देतांना, असें लिहिलें आहे कीं, "ह्या साधूच्या मठाचें आणि त्याच्या आसपासच्या स्थळाचें वर्णन या ग्रंथकर्त्यानें अतिशय मनोरंजक, मनांत ठसण्याजोगें आणि बोधपर असें केलें

आहे. ह्या प्रसंगाची त्याची भाषा आणि त्याचे विचार फारच शोभायमान दिसतात. या वर्णनांत असा कांहीं चमत्कार आहे कीं, हें वाचतांना अंतःकरणास महापूर येऊन तें ब्रह्मानंदांत पोहत आहे कीं काय असें वाटतें. ही हुबेहूब उभी केलेली तसबीर अगदीं साधी, भव्य, छानदार आणि मोठे थाटमाटाची आहे. या विद्वान् कारागिराचे परिश्रम या स्थळीं उत्तम सफळ झाले आहेत. **या वर्णनांत खोट्यानाट्या गप्पा, अतिशयोक्त्या किंवा मोठे रूपकालंकार वगैरे घातलेले नाहींत.** गुरूनें शिष्यास केलेला बोध अपूर्व वैराग्यजनक, संकलित आणि मनांत बाणून जाण्यासारखा आहे. तो अद्भुतरसानें ओतप्रोत भरला आहे. तरी हा उपदेश **अगदीं खरा आहे** असें मानून तो स्वीकारण्यास **मन अगदीं आशंकत नाहीं.** " (बाजीराव बल्लाळ पेशवे ह्यांचें चरित्र.)

ह्यावरून रा० सा० बापट ह्यांनीं लिहिलेलें "महापुरुषाचें" वर्णन अगदीं यथार्थ, साधार आणि सत्य आहे, व त्यांत "खोट्यानाट्या गप्पा" वगैरे कांहीं नाहींत, असा त्या वेळीं लोकसमज झाला होता, असें दिसून येतें. परंतु ऐतिहासिक सत्याच्या कसोटीस जर हें वर्णन आतां लाविलें, तर तें केवळ कल्पनादेवीच्या प्रसादाचें फळ आहे, असें निःपक्षपातबुद्धीनें पाहणारास तेव्हांच कळून येईल. रा० सा० बापट ह्यांना अस्सल कागदपत्र उपलब्ध न झाल्यामुळें, त्यांनीं दिलेलें ब्रह्मेंद्रस्वामीचें व त्यांच्या मठाचें वर्णन, वस्तुस्थितीहून अगदीं भिन्न असून, इतिहासदृष्ट्या त्यांत अनेक दोष झालेले आहेत. परंतु मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें उपलब्ध होण्यापूर्वीं हा ग्रंथ लिहिलेला आहे, एवढें लक्षांत ठेविलें म्हणजे ग्रंथकारास दूषण देण्याचें कारण राहत नाहीं. रा० सा० बापट ह्यांनीं ह्या भागाच्या शेवटीं, "हे सारे कागदपत्र गोळा करून त्यांचें एक पुस्तक करून, छापवून, राखून ठेवण्याचें श्रेय कोणी एकादा स्वदेशभक्त घेईल, तर त्याचे लोकांवर बहुत बहुत उपकार होतील." अशी सूचना केली आहे. ह्यावरून अस्सल कागदपत्र त्यांना मुळींच उपलब्ध झाले नव्हते, हें उघड होतें.

ग्रांटडफ साहेबांच्या इतिहासांत ब्रह्मेंद्रस्वामींच्या व पेशव्यांच्या पत्रव्यवहारांतील आलेले स्फुट उल्लेख, थोरले बाजीराव पेशवे ह्यांच्या चरित्रांतील "महापुरुषा"विषयींचे दोन भाग, आणि काव्येतिहाससंग्रहांतील पेशव्यांचीं स्वामींस

लिहिलेलीं दहावीस पत्रें, व ब्रह्मेंद्रस्वामींची छोटीशी बखर, इतकीच माहिती स्वामींसंबंधानें आजपर्यंत उपलब्ध झाली होती. ह्या अल्प साहित्यानें स्वामींच्या सुरस व गोड चरित्राची अस्पष्ट कल्पना वाचकांच्या नेत्रांसमोर येऊन, तत्संबंधानें बरीच लालसा उत्पन्न झाली. परंतु ती परिपूर्ण होण्याचा योग बरेच दिवस आला नाहीं. मध्यंतरीं रा० सा० बापट ह्यांनीं, बडोदें येथील "बालांकुर" मासिकपुस्तकामध्यें, स्वामींचें चरित्र त्यांच्या बखरीवरून प्रसिद्ध करण्याचा प्रयत्न केला होता; परंतु तो अस्सल कागदपत्रांच्या अभावामुळें जावा तसा सिद्धीस गेला नाहीं. येणेंप्रमाणें ह्या थोर सत्पुरुषाचें सविस्तर खरें चरित्र व अस्सल पत्रव्यवहार इतके दिवसपर्यंत उपलब्ध झाला नाहीं. परंतु तो योग सुदैवानें लौकरच प्राप्त झाला, ही अत्यंत संतोषाची गोष्ट होय.

इ० स० १८९५ सालीं ऐतिहासिक कागदपत्रांचा शोध करीत असतांना, सातारचे छत्रपति प्रतापसिंह महाराज ह्यांच्या दप्तरांत, धावडशी येथील पत्रव्यवहारांच्या बारनिशीचें एक पुस्तक उपलब्ध झालें. ह्यांत ग्रांटडफ साहेबांनीं आपल्या इतिहासांत ज्यांचा उल्लेख केला होता अशीं बहुतेक सर्व पत्रें, अस्सल-बरहुकूम नकलांच्या रूपानें, दाखल केलीं होतीं. हे प्रतापसिंह महाराज फार रसिक व विद्याव्यसनी असल्यामुळें ह्यांनीं मराठ्यांच्या ऐतिहासिक कागदपत्रांचा फार संग्रह केला होता. हे पेशवाई समाप्त झाल्यानंतर इ० स० १८१८ मध्यें सातारच्या गादीवर विराजमान झाले. ह्यांच्याच दरबारीं ग्रांटडफ साहेब इ० स० १८२३ पर्यंत रेसिडेंटाच्या हुद्यावर होते; व ह्यांनींच त्यांच्या इतिहासास उत्कृष्ट साहाय्य केलें होतें. ह्यांचा व तत्कालीन इंग्रज मुत्सद्दी एल्फिन्स्टन, मालकम, मनरो वगैरेंचा फार स्नेह होता. ह्यांच्या उत्तम गुणांची कीर्ति इंग्लंडमध्येंही जाऊन, त्यांना लंडन येथील रॉयल एशियाटिक सोसायटीचे 'ऑनररी मेंबर' हें सन्मानाचें पद प्राप्त झालें होतें. ह्यांनीं दिल्लीच्या बादशाहांचीं फारसीभाषेंतील पत्रें, ब्रह्मेंद्रस्वामींचीं पत्रें, आणि इतर महत्त्वाचे ऐतिहासिक लेख ह्यांचा संग्रह केला होता. ह्यावरून ह्यांची इतिहासप्रियता व विद्याभिरुचि व्यक्त होते; व त्याबद्दल त्यांचें अभिनंदन केल्यावांचून राहवत नाहीं. त्यांच्या संग्रहांतील ब्रह्मेंद्रस्वामींस लिहिलेलीं पेशव्यांचीं पत्रें वाचून, ग्रांटडफ साहेबांप्रमाणें आमचेंही मत, तीं "केवळ अमूल्य" आहेत, असेंच झालें; व तीं समग्र प्रसिद्ध

करून, हा हृदयंगम, प्रेमळ व भक्तिरसपूर्ण इतिहास महाराष्ट्रवाचकांस सादर करावा, अशी इच्छा उत्पन्न झाली.

हीं पत्रें उपलब्ध झाल्यानंतर, त्यांच्या अस्सल प्रती व स्वामींचा आणखीही पत्रव्यवहार कोठें उपलब्ध झाल्यास, हा मराठ्यांच्या इतिहासांतील अश्रुतपूर्व व मनोरंजक भाग समग्र रीतीनें व्यक्त होईल, म्हणून आणखीही शोध चालविला. तों सुदैवेंकरून धावडशी संस्थानांतील दप्तरांत थोडेबहुत कागद उपलब्ध झाले; व त्याच दप्तराचा बराच भाग पिंपरी येथें सुसाध्य झाला. त्याचप्रमाणें निरनिराळ्या कारणांनीं भिन्न भिन्न स्थळीं पसरलेल्या स्वामींच्या पत्रव्यवहाराचा शोध लागून, कित्येक विद्वान् व रसिक मित्रांच्या कृपासाहाय्यानें तो सर्व हस्तगत झाला. येणेंप्रमाणें पांच सहा वर्षांच्या अवधींत धावडशी संस्थानासंबंधानें एकंदर हजार दीडहजार कागद आह्मांस मिळाले. त्यांवरून स्वामींच्या चरित्राचें खरें स्वरूप व्यक्त होऊन, त्याच्या अपूर्वत्वानें मनास थक्क करून सोडिलें.

आजपर्यंत मराठ्यांच्या इतिहासासंबंधाचे जे कागदपत्र प्रसिद्ध झाले आहेत, त्यांवरून मराठ्यांच्या इतिहासाचा उत्तर भाग बराच सिद्ध झाला आहे; परंतु त्याच्या पूर्वभागाची अद्यापपर्यंत व्हावी तशी सिद्धता झालेली नाहीं. शिवाजी, संभाजी, राजाराम व शाहू ह्या चार छत्रपतींच्या बखरीवरून मराठ्यांच्या इतिहासाच्या पूर्वार्धाची ह्मणजे मराठी राज्याच्या संस्थापनेची व अभ्युदयाची सामान्य माहिती मिळते; परंतु तिची अस्सल कागदपत्रांच्या साहाय्यानें अद्यापि छान झालेली नाहीं. ह्याकरितां इ० स० १७५० ह्या सालापूर्वीच्या कागदपत्रांचा शोध जितका लागेल, तितकें फार इष्ट व आवश्यक आहे. कारण, इ० स० १७५० पासून पुढें–ह्मणजे शाहूच्या मृत्यूनंतर, पेशवाईची भरभराट झाली; व मराठ्यांच्या इतिहासास निराळें स्वरूप प्राप्त झालें. त्यापूर्वीचा इतिहास ह्मणजे छत्रपतींच्या कारकीर्दींचा इतिहास अत्यंत महत्त्वाचा असून, मराठी राज्याची संस्थापना व उत्कर्ष कसा झाला, हें त्यावरून उत्तम प्रकारें निदर्शनास येतें. ब्रह्मेंद्रस्वामींच्या पत्रव्यवहारानें इ० स० १७२८ पासून इ० स० १७४५ पर्यंतच्या अवधींतील मराठ्यांच्या खऱ्या इतिहासाचें बरेंच स्पष्टीकरण होऊन, त्या कालांत घडलेल्या राजकारणांची व इतर चळवळींची नीट संगति जुळण्यासारखी आहे. ह्मणून हा पत्रव्यवहार इतिहासदृष्ट्या अत्यंत महत्त्वाचा आहे असें ह्मटल्यावांचून

राहवत नाहीं. शिवाजीमहाराजांच्या वेळेस रामदासस्वामींनीं जें कार्य केलें, तेंच कार्य शाहू व बाजीराव ह्यांच्या कारकीर्दींत ब्रह्मेंद्रस्वामींनीं केलें, असें ह्मणण्यास कोणतीच हरकत नाहीं. परंतु इतिहासाच्या अभावामुळें ह्या लोकोत्तर राजकारणी सत्पुरुषाचें चरित्र व त्याच्या सत्कृतींची हकीकत अद्यापि लोकप्रसिद्ध झाली नाहीं, ही दुःखाची गोष्ट होय !

रामदासस्वामी व ब्रह्मेंद्रस्वामी ह्यांच्या चरित्रांचें अवलोकन केलें, तर मराठ्यांच्या इतिहासांत धर्माचें वर्चस्व राजावर विशेष असून, त्याच्याच जोरानें साम्राज्यसंस्थापना किंवा राष्ट्राभ्युदय अशा महनीय गोष्टी घडून येत असत असें दिसून येतें. हिंदुस्थानांत फार प्राचीनकालापासून 'ब्राह्मण' व 'क्षत्रिय' ह्या द्वयीची एकात्मकता असून पहिल्यानें धर्मोपदेश करावा, व दुसऱ्यानें धर्मरक्षण करावें, असा गुणकर्मविभागशः नियम चालत आल्यामुळें, ब्राह्मणाचें ह्मणजे धर्मोपदेशकाचें प्राधान्य क्षत्रियावर ह्मणजे राजावर विशेष असावें, हें साहाजिक आहे. त्यामुळेंच क्षत्रियाचें कुलगुरुत्व किंवा धर्मोपदेशकत्व ब्राह्मणाकडे जाऊन, त्याच्या मंत्रोपदेशानें चालण्याची प्रवृत्ति क्षत्रियानें स्वीकारली. त्यामुळें धर्माचा पगडा राजावर बसून, ज्याप्रमाणें शरीराच्या चलनवलनादि क्रिया बरोबर चालण्यास जीवनशक्तीची आवश्यकता असते, त्याप्रमाणें राज्यव्यवहार चालण्यास धर्माचीही आवश्यकता उत्पन्न झाली. अर्थात् धर्माच्या अनुषंगानें राज्य चालविण्याचा हिंदु राजांचा बाणा असल्यामुळें, त्यांच्या राज्यास 'धर्माचें राज्य' किंवा ' धर्मराज्य ' असें अभिधान प्राप्त झालें. अर्थात् 'धर्म' व 'राज्य' ह्यांचा हिंदुस्थानांत 'जीव' आणि 'शरीर' असा अन्योन्य संबंध जुळल्यामुळें, 'ब्राह्मण' व 'क्षत्रिय' ह्यांची एकात्मकता असावी हें अगदीं साहाजिक आहे. त्यामुळें हिंदुस्थानांतील ' धर्म ' व ' राज्य ' ह्यांचें–म्हणजे पर्यायेंकरून ब्राह्मण व क्षत्रिय ह्यांचें–तादात्म्य होऊन, त्यांच्यामध्यें अन्योन्य भक्ति व प्रेम दाखविणारी गुरुशिष्य संस्था निर्माण झाली. दशरथाचा वसिष्ठ, रामचंद्राचा विश्वामित्र, धर्मराजाचा धौम्य ह्या क्षत्रियांच्या कुलगुरूंची माहिती रामायण, महाभारत इत्यादि ग्रंथांत प्रसिद्ध आहे. ही कुलगुरूंची परंपरा हिंदुस्थानांतील प्रत्येक धर्मराज्यांत दृष्टीस पडते. विजयनगरच्या हिंदु साम्राज्याचे संस्थापक बुकराय व हकराय ह्यांचे गुरु सुप्रसिद्ध विद्यारण्यस्वामी हे होते. दक्षिणेंतील प्रख्यात विष्णुवर्धन राजाचे गुरु विशिष्टा-

द्वैतवादी श्री रामानुजाचार्य हे होते. बुंदेलखंडांतील छत्रसाल राजाचे गुरु प्राणनाथ प्रभु नामक एक सत्पुरुष होते. अशी ही धर्मोपदेशक राजगुरूंची नाममालिका हिंदुस्थानामध्यें सर्वत्र दृष्टीस पडते. ही पूर्वीची परंपरा मराठी राज्यामध्येंही कायम होती. शिवाजीमहाराजांचे सद्गुरु श्री समर्थ रामदास ह्यांनीं राज्यसंस्थापनेस शिवाजीमहाराजांस साहाय्य केलें. ह्या सत्पुरुषाचें चांगलें चरित्र अद्यापि प्रसिद्ध झालें नाहीं, ही अत्यंत दुःखाची गोष्ट आहे. "शिवदिग्विजय" बखरीच्या कर्त्यानें रामदासस्वामींविषयीं एके ठिकाणीं असें लिहिलें आहे कीं, " स्वामी केवळ वैराग्यशील, ज्ञानसंपन्न, आचारशील, न्यायनिष्ठुर, विचारशील, कर्मनिष्ठ, मननशील, सदाशुचिष्मंत, प्रत्ययशुद्ध, कुशाग्रमति, निजात्मबोध, भगवद्गुणानुवर्णनीं प्रीतिपुरस्सर परमउल्हास, हरिकीर्तनीं सदासर्वकाळ ध्यानस्थ, प्रपंचकार्यार्थीं उदास, रामभक्तीचा घोष, उदंड सत्चर्चा, अखंड ध्यानधारणा, प्रचंड सदाचारी, मार्तंडयंत्रतंत्रीं निरिच्छता, मोहाभिमानीं अलिप्तता, रामपूजनीं सावधता, कुश्चल कुनिंदा करणारांची धूर्तता, ग्रंथावलोकनीं बोधक्रम, चातुर्याविषयीं निपुणता, सर्व प्रयोजन विचार जाणता, असे अद्वितीय पुरुष भगवंताची साक्षात् विभूति जगदोद्धारार्थ निर्माण झाले." ह्या एका वाक्यावरूनच ह्या महात्म्याची योग्यता व्यक्त होते. अशा पुण्यपुरुषास शिवाजीमहाराजांनीं आपलें गुरुस्थान द्यावें, आणि " श्री सद्गुरुवर्य, श्री सकलतीर्थरूप, श्री कैवल्यधाम " अशा भक्तिरसपूर्ण विशेषणांनीं संबोधित जावें, ह्यांत आश्चर्य तें काय ? रामदासस्वामींनंतर मराठी राज्यांत सर्ववंद्य व सर्वप्रिय असे महापुरुष श्रीमत् परमहंस ब्रह्मेंद्रस्वामी हेच होत. रामदासस्वामींच्या नंतर हे कांहीं दिवसांनीं प्रकट झाले, ह्मणून हे रामदासस्वामींचा अवतार होत, असें भाविक लोक मानितात. रामदासस्वामींच्या कृपासाहाय्यानें मराठी राज्याची संस्थापना झाली, आणि ब्रह्मेंद्रस्वामींच्या कृपासाहाय्यानें मराठी राज्याचा अभ्युदय झाला, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. त्यामुळें ह्या दोन्हीं सत्पुरुषांचीं चरित्रें महत्त्वाचीं असून, त्यांत मराठ्यांच्या इतिहासाचें सर्व हृद्गत भरलें आहे. ह्मणून ह्या दोन चरित्रांस मराठ्यांच्या इतिहासांत आद्य स्थान देणें आवश्यक आहे.

मराठी राज्यांत रामदासस्वामी व ब्रह्मेंद्रस्वामी ह्या दोन महापुरुषांप्रमाणें आणखीही कित्येक साधुपुरुष अवतीर्ण झाले होते; व त्यांचा कमजास्त प्रमाणानें

मराठी राज्याशीं संबंध असून, त्याच्या उत्कर्षास त्यांचें अप्रत्यक्ष रीतीनें बहुत साहाय्य झालें आहे. मराठी राज्यामध्यें जेवढे ह्मणून थोर पुरुष निर्माण झाले, त्यांस उदयास आणण्यास, कोणीतरी सत्पुरुष कारणीभूत झालेला आहे. रामदासस्वामींखेरीज चिंचवडचे मोरया गोसावी, निगडीकर रंगनाथस्वामी, ब्रह्मनाळचे आनंदमूर्ति, वडगांवकर जयरामस्वामी, शिखर शिंगणापूरचे संतोषभारती गोसावी, केंजळचे केवळभारती गोसावी, पातोडचे देवभारती इत्यादि साधुसत्पुरुष प्रख्यात मराठे वीरांचे आणि मुत्सद्यांचे गुरु होते, व ही गुरुपरंपरा मराठी राज्य रसातळास जाईपर्यंत कायम होती. शेवटचे बाजीराव व बापू गोखले ह्यांचेही ठाकूरदास बावा ह्मणून महाराष्ट्रांतील एक प्रख्यात साधु व कीर्तनकार हे गुरु होते. परंतु कालमानानें ही गुरुपरंपरा मात्र कायम राहून तिच्यांतील अद्भुत् शक्ति तेवढी विलयास गेली. सत्पुरुषाच्या आशीर्वादाचा महिमा महाराष्ट्रीयांच्या मनावर इतका बिंबला कीं, ते वाटेल त्या साधूस भजूं लागले. इतिहासप्रसिद्ध पराक्रमशाली योद्धे महादजी शिंदे ह्यांचा गुरु बीड येथील शाह मनसूर ह्मणून एक अवलिया फकीर होता. त्यानें त्यांस "जा, तुला दिल्लीपर्यंत राज्य दिलें आहे" असा आशीर्वाद दिला होता. ह्या फकिरावर महादजींची इतकी भक्ति जडली होती कीं, त्यानीं त्याचा चेला हबीब शाह ह्यास सदैव आपल्या स्वारीमध्यें ठेविलें होतें, व त्याचें ते प्रत्यहीं दर्शन घेत असत. ह्या उदाहरणावरून हिंदुधर्माच्या अंगीं सात्विकपणा फार असल्यामुळें हिंदुलोकांचीं मनें कशीं भाविक व भक्तिपूर्ण बनलीं होतीं हें निदर्शनास येतें. तात्पर्य, ह्या गुरुपरंपरेचा इतिहास प्रसिद्ध झाला, तर महाराष्ट्रधर्माच्या खऱ्या स्वरूपाचें आविष्करण होऊन त्याचें खरें तत्त्व व्यक्त होईल. ह्या सर्व साधुमंडळीची माहिती जेथें जेथें त्यांचे मठ किंवा देवस्थानें आहेत, तेथें तेथें शोध केला असतां सांपडण्यासारखी आहे.

प्रस्तुत ग्रंथांत ब्रह्मेंद्रस्वामींचा महत्त्वाचा पत्रव्यवहार व त्यांचें संक्षिप्त चरित्र सादर केलें आहे. परंतु तेवढ्यानें स्वामींचें चरित्र अथवा पत्रव्यवहार परिपूर्ण झाला, असें मानितां यावयाचें नाहीं. स्वामींच्या चळवळी अनंत असून, त्यांच्या राजकारणांचा पसारा उत्तर हिंदुस्थानांतील धारानगरीपासून दक्षिणेंतील गुत्तीपर्यंत होता. त्यामुळें त्यांचीं पत्रें महाराष्ट्रांतील बहुतेक जहागीरदार व सरदार

लोक ह्यांच्या दप्तरांत सांपडण्यासारखीं आहेत. सांप्रत जे कागद उपलब्ध झाले आहेत, ते स्वामींच्या चरित्राचें स्वरूप व त्या काळांतील इतिहासाची बरोबर दिशा दाखविण्यापुरतेच असल्यामुळें, त्यांवरून व्यक्त होणारें स्वामींचें चरित्र सारांशरूपानें दिलें आहे; व उपलब्ध झालेल्या पत्रव्यवहारांपैकीं इ० स० १७४५ पर्यंतचीं—ह्मणजे स्वामींच्या कारकीर्दींतलीं ऐतिहासिक महत्त्वाचीं पत्रें स्वतंत्र रीतीनें दिलीं आहेत. सर्व पत्रव्यवहार संगतवार व शाबूद असा एके ठिकाणीं उपलब्ध न झाल्यामुळें, तो जसजसा मिळाला त्याप्रमाणें, त्याचे पुरवणीरूपानें दोन भाग करून, ते शेवटीं जोडिले आहेत. ह्याशिवाय स्वामीसंबंधाचीं किंवा स्वामींच्या राजकारणासंबंधाचीं जीं महत्त्वाचीं पत्रें उपलब्ध झालीं, तीं सर्व स्वामींच्या चरित्रांत दाखल केलीं आहेत; व होतां होईल तितकें करून, तें चरित्र अस्सल पत्रांच्या साहाय्यानें लिहिलें आहे. स्वामींचा सर्व अनुपलब्ध व अश्रुतपूर्व असा हा चरित्रवृत्तांत अप्रसिद्ध कागदपत्रांच्या साहाय्यानें तयार करावयाचा असल्यामुळें त्यांत कांहीं दोष राहण्याचा संभव आहे. तथापि त्याबद्दल उदार व मर्मज्ञ वाचक कृपा करून क्षमा करतील अशी आशा आहे. इतिहासरूपी इमारत तयार करण्यास प्रारंभ केला ह्मणजे एकदम ती भव्य, सालंकृत व नेत्राल्हादक अशी होणें शक्य नाहीं. तिचें सर्व साहित्य अनुकूल झालें ह्मणजे ती सर्वांगसुंदर होईल, हें सुज्ञ वाचकांस सांगावयास नकोच आहे.

ह्या पुस्तकांत प्रसिद्ध झालेल्या पत्रव्यवहाराच्या आधारें, मराठ्यांच्या इतिहासाविषयीं अभिमान व कळकळ बाळगणारे पार्शी गृहस्थ प्रो० करकरिया ह्यांनीं गेल्या वर्षीं ह्मणजे ता० ५ डिसेंबर १८९९ रोजीं, मुंबई येथील रॉयल एशियाटिक सोसायटीपुढें इंग्रजी भाषेमध्यें एक निबंध तयार करून वाचिला. त्याचा सारांश ता० १४ डिसेंबर इ० स० १८९९ च्या "Bombay Gazette" पत्रामध्यें प्रसिद्ध झाला आहे. ब्रह्मेंद्रस्वामींची ही अनुपलब्ध नवी व मनोरंजक माहिती ऐकून युरोपियन लोकांस फार संतोष झाला. "रॉयल एशियाटिक सोसायटी"चे सेक्रेटरी रेव्ह० मि० ग्रे व डा० म्याकडोनल्ड ह्यांनीं हा मनोरंजक पत्रव्यवहार प्रसिद्ध करण्याबद्दल विशेष उत्तेजन दिलें. ह्याबद्दल ह्या सर्वांचे उपकार मानल्यावांचून आमच्यानें राहवत नाहीं. ब्रह्मेंद्रस्वामींच्या ह्या पत्रव्यवहाराचें

ऐतिहासिक महत्त्व लक्षांत घेऊन, प्रो० करकरिया ह्यांनीं त्याचें विशेष कौतुक केलें, व "रॉयल एशियाटिक सोसायटी"च्या नजरेस हा विषय आणिला, ह्याबद्दल त्यांचेंही अभिनंदन करणें रास्त आहे.

ह्या ग्रंथाची सर्व सामग्री मिळवून देण्याचे कामीं व हा प्रसिद्ध करण्याचे कामीं आमच्या अनेक विद्वान्, रसिक, व इतिहासप्रिय मित्रांनीं साहाय्य केलें, ह्याबद्दल त्या सर्वांचे आभार प्रदर्शित करणें अवश्य आहे. किंबहुना, त्यांच्या कृपेनें, प्रोत्साहनानें, आणि सहानुभूतीनें हा ग्रंथ तयार झाला, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. तथापि त्यांतल्या त्यांत, धावडशी संस्थानचे वहिवाटदार श्री० रा० रा० गंगाधर भिकाजी भागवत, बडोदें येथील "सयाजीविजय" पत्राचे म्यानेजर रा० रा० अनंत नारायण शेखदार, पिंपरी येथील इनामदार श्री० रा० रा० कृष्णराव पांडुरंग ऊर्फ आपासाहेब भागवत, सातारच्या छत्रपतींचे माजी कारभारी रा० रा० आनंदराव बहिरव पिंगळे, व धावडशी संस्थानचे फडणीस रा० रा० दिनकर महादेव तांबे वगैरे सद्गृहस्थांचे व इंदूर येथील आमचे विद्वान् व इतिहासप्रिय मित्र श्री० सरदार माधवराव विनायकराव किबेसाहेब ह्यांचे बहुत बहुत उपकार आहेत, हें कृतज्ञ अंतःकरणानें येथें व्यक्त केल्यावांचून राहवत नाहीं. त्याचप्रमाणें, हें पुस्तक प्रकाशित करण्याचे कामीं, पुणें येथील डेक्कन व्हर्नाक्युलर सोसायटी व तिचे विद्वान् अध्यक्ष डा० रामकृष्ण गोपाळ भांडारकर व उपाध्यक्ष नामदार न्यायमूर्ति महादेव गोविंद रानडे व सेक्रेटरी रा० सा० आत्माराम विनायक पाटकर ह्यांनीं विशेष प्रोत्साहन दिलें, ह्याबद्दल त्यांचेही आभार प्रदर्शित करणें अवश्य आहे.

शेवटीं "निर्णयसागर" छापखान्याचे मालक व आमचे सुशील मित्र रा० रा० तुकाराम जावजी शेट ह्यांच्या कृपासाहाय्यानें हा ग्रंथ सुंदर रीतीनें छापला गेला, ह्याबद्दल त्यांचेही उपकार प्रदर्शित करून, ही अल्पशी प्रस्तावना येथें संपवितों.

मुंबई,<br>ता० १५-१२-१९००.

**दत्तात्रय बळवंत पारसनीस.**

# विषयानुक्रम.



---

## चित्र व हस्ताक्षरें.



---

**सूचनाः**—ह्या पुस्तकांतील ऐतिहासिक पत्रांमध्यें जेथें "राजश्री स्वामी" किंवा फक्त "राजश्री" असा उल्लेख आला असेल, तेथें "छत्रपति शाहू महाराज" असें समजावें; व जेथें नुसते "स्वामी" असा उल्लेख आला असेल तेथें "ब्रह्मेंद्रस्वामी" असें समजावें. 'परमहंसबावा', 'परशरामबावा', आणि 'भार्गवबावा' अशींही ब्रह्मेंद्रस्वामींचीं नांवें कित्येक पत्रांत आलेलीं आहेत. थोरले बाजीराव व चिमाजी आपा ह्यांचीं नांवें अनुक्रमें 'राऊ' अथवा 'राव' आणि 'आपा' अशीं लिहीत असत.

श्री

महापुरुष

# ब्रह्मेंद्रस्वामी धावडशीकर ह्यांचें चरित्र.

## भाग १ ला.

### पूर्ववृत्तांत.

सर्व महाराष्ट्रामध्यें "महापुरुष" ह्या नांवानें प्रसिद्ध असलेले सत्पुरुष व छत्रपति शाहु महाराज व थोरले बाजीराव पेशवे ह्यांचे गुरु श्रीमत् ब्रह्मेंद्रस्वामी ह्यांचें जन्मस्थान वऱ्हाडप्रांतामध्यें श्री गणपतीचे राजुरीनजीक दुधेवाडी ह्मणून एक लहानसें खेडें आहे तें होय. येथें महादेवभट नामक एक देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण राहत असे. त्यास उदरभरणार्थ इतर साधनें नसल्यामुळें तो दुधेवाडी व राजुरी ह्या गांवीं भिक्षुकी करून आपला चरितार्थ चालवीत असे. ह्याच्या पत्नीचें नांव उमाबाई असें होतें. ह्या उभयतांस बरेंच वय होई तोंपर्यंत संतति झाली नाहीं. पुढें महादेवभट ह्यांस वृद्धापकाळीं ह्मणजे सुमारें साठावे वर्षी एक पुत्ररत्न प्राप्त झालें. त्याचें नांव त्यांनीं विष्णु असें ठेविलें. विष्णूच्या जन्मतिथीची बरोबर माहिती उपलब्ध नाहीं, त्यामुळें ती देतां येत नाहीं. तथापि त्याचा जन्म इ० स० १६४९ ह्या वर्षाच्या सुमारास झाला असावा असें स्थूल प्रमाणांवरून मानण्यास हरकत नाहीं. विष्णूचें वय सात आठ वर्षांचें झाल्यानंतर त्याच्या आईबापांनीं भिक्षाटण करून थोडेंसें द्रव्य संपादन केलें व इ० स० १६५६ सालीं दुधेवाडी येथें विष्णूचें मौंजीबंधन

केलें. उपनयनसंस्कार झाल्यानंतर पुढें तीन चार वर्षे विष्णूनें आपल्या बापाजवळ वेदाभ्यास केला. त्या वेळीं त्याचें अल्पवय असूनही त्याची वेदविद्येमध्यें कुशाग्र बुद्धि व्यक्त झाली. महादेवभटजी व उमाबाई हीं उभयतां वृद्धदशेनें व दारिद्र्यानें अगदीं जर्जर झालीं होतीं, त्यामुळें त्यांस पुत्रसुखाचा लाभ फार दिवस घेतां आला नाहीं.

विष्णूचें अवघें बारा वर्षांचें वय असतां त्याचे आईबाप निवर्तले. त्यामुळें त्यावर दुर्धर प्रसंग येऊन तो अगदीं अनाथ झाला. अशा स्थितीमध्यें त्यास ऐहिक सुखाविषयीं विरक्तता उत्पन्न होऊन त्यानें आपल्या क्षणभंगुर आयुष्याचा व्यय ईश्वराच्या आराधनेमध्यें व परमार्थप्राप्तीच्या साधनामध्यें करावयाचा निश्चय केला. बालवयामध्यें ईश्वरभक्तीची लालसा उत्पन्न होऊन ऐहिक सुखास विन्मुख झालेले ध्रुव आणि प्रल्हाद ह्यांच्या कथा पुराणांतरीं प्रसिद्ध आहेतच. असो. विष्णूच्या कोमल मनाचा कल ईश्वरप्राप्तीकडे वळल्यावर त्यानें लगेच राजुरी येथील गणपतीचें महासिद्ध स्थान हेंच आपल्या आराधनेस पवित्र व योग्य स्थळ आहे असें समजून तेथें गमन केलें; आणि तेथें श्रीची आराधना सुरू केली. अन्न वर्ज्य केलें व फक्त फलाहार आणि गोमूत्रप्राशन ह्यांवर राहून अनुष्ठान चालविलें. संकष्टी चतुर्थीच्या दिवशीं अगदीं पहांटेस स्नानसंध्या व नित्यकर्म आटोपून सूर्योदयापासून चंद्रोदयापर्यंत श्री गणराजासन्निध एका पायावर उभें राहून जप करावा, व प्रतिवर्षीं श्रावण मासीं शुद्ध प्रतिपदेपासून भाद्रपद शुद्ध चतुर्थीपर्यंत एकांतीं एकासनीं समाधिस्थ बसावें, असा क्रम एक तपपर्यंत चालविला. ही एकनिष्ठ व निस्सीम भक्ति पाहून श्रीमंगलमूर्ति प्रसन्न झाले व त्यांनीं स्वप्नांत दृष्टांत देऊन "तुझी कार्यसिद्धि झाली. सर्वमान्य होशील. जे कल्पना चित्तीं धरिशील ते मत्प्रसादें सिद्ध होईल. अतःपर सेवेचा निकर्ष न करणें. ब्रह्मवृत्ति राहून सदैव माझें आराधन करीत जाणें" असें वरप्रदान दिलें. त्यामुळें विष्णूस परमानंद होऊन त्यानें आपलें अनुष्ठान समाप्त केलें व त्याची यथानुकूल्य सांगता केली. तदनंतर त्यास श्री काशीक्षेत्रीं जाऊन तेथील एखाद्या महापुरुषाचा समागम घडावा अशी इच्छा झाली. त्याप्रमाणें त्यानें श्रीची आज्ञा घेऊन काशीक्षेत्रीं गमन केलें. ही गोष्ट इ० स० १६६३ च्या सुमारास घडून आली.

ब्रह्मचारी व **ग**णेशभक्त **वि**ष्णुबावा हे **रा**जुरीहून निघून सात आठमहि-न्यांनीं परमपवित्र **का**शी क्षेत्रीं गेले. तेथील विविध यात्रा व देवदर्शनें करून ते कांहीं दिवस पुण्यसरिता **भा**गीरथी हिच्या तीरीं राहिले. तेथें त्यांस अनेक महासिद्ध सत्पुरुष व योगीजन ह्यांचा दर्शनलाभ झाला, आणि त्यांच्या सान्नि-ध्यानें त्यांस परमार्थविषयक व वेदांतपर उपदेशामृत यथेच्छ प्राशन करावयास सांपडलें. त्यामुळें त्यांच्या मनावर विलक्षण संस्कार होऊन चतुर्थाश्रम संपादन करावा आणि सद्गुरुचरणीं लीन व्हावें अशी इच्छा झाली. **का**शीमध्यें **ज्ञा**नेंद्र सरस्वतिनायक एक महाविद्वान् व वेदांतज्ञानपरिपूर्ण असे तपोनिधि अखिल यतिवृंदामध्यें श्रेष्ठ गणले जात असत. त्यांच्या ठिकाणीं **वि**ष्णुबावांची अत्यंत भक्ति जडली. त्यामुळें त्यांनीं त्यांच्यावर अनुग्रह करून त्यास परमहंस दीक्षा दिली आणि त्यास **ब्रह्मेंद्रस्वामी** असें नामाभिधान दिलें. चतुर्थाश्रम संपादन केल्यानंतर **ब्र**ह्मेंद्रस्वामींनीं कांहीं दिवस सद्गुरुसमागम करून त्यांपासून ब्रह्मज्ञान प्राप्त करून घेतलें. सद्गुरुवांचून ब्रह्मज्ञानाची खरी ओळख होत नाहीं. यास्तव अनेक साधुसंतांनीं सद्गुरुकृपेचा महिमा फार वर्णन केला आहे. श्री समर्थ **रा**मदासस्वामी ह्यांनीं दासबोधामध्यें ह्मटलें आहे:—

**"सद्गुरुविण ज्ञान कांहीं । सर्वथा होणार नाहीं ।**
**अज्ञान प्राणी प्रवाहीं । वाहतचि गेले ॥ १ ॥**
**जैसें नेत्रीं घालितां अंजन । पडे दृष्टीस निधान ।**
**तैसें सद्गुरुवचें ज्ञान । प्रकाश होय ॥ २ ॥**
**सद्गुरुविण जन्म निर्फळ । सद्गुरुविण दुःख सकळ ।**
**सद्गुरुविण तळमळ । जाणार नाहीं ॥ ३ ॥**
**असो, जयास मोक्ष व्हावा । तेणें सद्गुरु करावा ।**
**सद्गुरुविणें मोक्ष पावावा । हें कल्पांतीं न घडे ॥ ४ ॥**

**तु**काराम महाराजांनीं ह्मटलें आहे:—

**"सद्गुरुवांचोनी सांपडेना सोय । धरावे ते पाय आधीं त्याचे ॥"**

ह्याप्रमाणें **ब्र**ह्मेंद्रस्वामी ह्यांनीं श्री **ज्ञा**नेंद्रस्वामी नामक महासद्गुरूंची उपासना घेऊन ब्रह्मज्ञान प्राप्त करून घेतलें. अर्थात् लोहास परिसस्पर्श झाला ह्मणजे त्याचें सुवर्ण होतें किंवा **गं**गेस दुसरी नदी मिळाली ह्मणजे ती **गं**गारूप बनते

त्याप्रमाणें सद्गुरुप्राप्तीमुळें **ब्र**ह्मेंद्रस्वामी ह्यांची स्थिति होऊन ते शुद्ध ब्रह्मज्ञानाचे पूर्ण अधिकारी झाले; आणि श्री **स**मर्थांनीं ह्मटल्याप्रमाणेंचः—

**अंतरीं शुद्ध ब्रह्मज्ञान । बाह्य निष्ठेचें भजन ।**
**तेथें बहुत भक्तजन । विश्रांति पावती ॥ १ ॥**

ह्याप्रमाणें बहुत भक्तजनांच्या विश्रांतीचें मुख्यस्थान होऊन राहिले, हें पुढील चरित्रकथेवरून वाचकांच्या लक्षांत येईल. असो.

**का**शीक्षेत्रीं सद्गुरुमुखांतून ज्ञानप्राप्ति करून घेतल्यानंतर **ब्र**ह्मेंद्रस्वामी ह्यांनीं उत्तरमानस व दक्षिणमानस तीर्थयात्रा करण्याचा संकल्प केला. ते आपल्या गुरूंची आज्ञा घेऊन निरनिराळीं तीर्थें व सुप्रसिद्ध स्थळें अवलोकन करीत **ब**द्रीनारायणापर्यंत गेले. तेथील अप्रतिम सृष्टिसौंदर्य व अपूर्व स्थानमाहात्म्य पाहून त्यांस अत्यंत समाधान झालें. तदनंतर ते पुनः **वा**राणशीस परत आले व तेथें त्यांनीं आपल्या गुरूंचें मोठ्या भक्तिभावानें दर्शन घेतलें. नंतर कांहीं दिवस तेथें राहून दक्षिणमानस यात्रा करण्याच्या उद्देशानें त्यांनीं **का**शीक्षेत्राचा शेवटचा निरोप घेतला. तेथून ते श्री **ओ**ढ्या **ज**गन्नाथाकडे येऊन पूर्व किनाऱ्यानें श्री **रा**मेश्वर क्षेत्रीं गेले. **का**शीपासून **रा**मेश्वरापर्यंत सर्व तीर्थक्षेत्रादि पवित्र स्थळें अवलोकन करून ते **क**र्नाटक प्रांतांतून **म**[1]हाराष्ट्रदेशामध्यें श्री **कृ**ष्णातीरीं आले.

---

१. स्वामी सर्व तीर्थयात्रा संपवून महाराष्ट्रदेशांत आले त्या वेळीं सर्वत्र मोंगलाई अंमल असून राजारामाची बायको ताराबाई ही रांगणा किल्ल्यावर होती व सातारा वगैरे कांहीं किल्ले तिच्या ताब्यांत होते. कऱ्हाड, वाई आदि ठाणीं मोंगलांकडे होतीं. त्यामुळें स्वामींचें साताराप्रांतीं चित्त न रमून ते कोंकणांत चिपळूण प्रांतें गेले. तेथें बारा वर्षें गुप्त राहून नंतर ते प्रगट झाले. असें 'काव्येतिहाससंग्रहां'तील बखरीमध्यें लिहिलें आहे. परंतु स्वामींच्या हालचालींची याद उपलब्ध झाली आहे तिच्यावरून इ० स० १६९८ मध्यें तपश्चर्या करून स्वामी परशुरामीं प्रगट झाले असें दिसून येतें. त्यापूर्वीं बारा वर्षें ह्मणजे इ० स० १६८६ मध्यें स्वामी महाराष्ट्रदेशामध्यें येऊन गेले असावेत असें वाटतें. ह्या वेळीं बहुतेक मोंगली अंमल झाला असून राजाराम महाराज चंदी प्रांतास गेले होते. ह्या समयीं स्वामींचें राहणें महाराष्ट्र देशीं न व्हावें हें अगदीं साहजिक दिसतें. 'काव्येतिहाससंग्रह'कारांनीं ह्या स्वामींच्या प्रथम आगमनाचें वर्ष इ० स० १७०७ हें धरिलें आहे परंतु तें बरोबर जमत नाहीं.

येणेंप्रमाणें **हिं**दुस्थानांतील बराच प्रदेश पर्यटण केल्यामुळें स्वामींस देशस्थितीचें उत्कृष्ट ज्ञान झालें. प्रवासाच्या योगानें बहुविध तीर्थें, निरनिराळीं देवस्थानें, नानाप्रकारचे सृष्टिसौंदर्यालंकृत प्रदेश, विविध राज्यपद्धति, आणि निरनिराळे लोकाचार दृष्टीस पडून मनावर विशिष्ट संस्कार होतो व बुद्धीस प्रशस्तपणा प्राप्त होतो. तो सर्व **ब्र**ह्मेंद्रस्वामींस सहज झाला असेल ह्यांत आश्चर्य नाहीं.

स्वामींच्या तीर्थयात्रा संपून ते **सा**ताराप्रांतीं आले त्या वेळचा काळ स्वामींच्या टिपणावरून अदमासानें इ० स० १६८० नंतरचा असावा असें दिसतें. छत्रपति **सं**भाजीमहाराज ह्यांचा **औ**रंगजेब बादशाहानें वध केल्यानंतर **म**हाराष्ट्रामध्यें पुनः **मों**गलांचें वर्चस्व झालें. त्यामुळें **रा**जाराम महाराजांस **चं**दीस जाऊन, तेथून **म**हाराष्ट्रराज्यसूत्रें चालवून, **मों**गलांच्या ताब्यांतून स्वराज्य सोडविण्याचा यत्न करणें भाग पडलें. ह्या संकटप्रचुर कालामध्यें **ब्र**ह्मेंद्रस्वामी **सा**ताराप्रांतीं गुप्तरूपानें आले असावेत व त्यांना तेथील परिस्थिति निर्भयपणें वास करण्यास प्रतिकूल वाटली असावी असें दिसतें. त्यामुळें त्यांनीं सर्व देशस्थिति अवलोकन करून **स**ह्याद्रि उतरून **कों**कणप्रांतांत गमन केलें. नंतर ते **चि**पळुणाजवळ मौजे **पे**ढें नामक गांवीं श्री **प**रशुरामाचें प्राचीन व रम्य देवस्थान आहे तेथें आले. ह्या देवस्थानाच्या आसमंतात् दाट जंगल असून तें स्थान निवांत व निर्जन असें असल्यामुळें साधुजनांच्या तपश्चर्येस योग्य आहे असें त्यांस वाटलें. ह्या स्थानाच्या पश्चिमेस **धा**मणी **सो**नगांवच्या रानांत डोंगरामध्यें असलेली एक सुंदर गुंफा व तेथें अखंड वाहत असलेला पाण्याचा सुंदर झरा पाहून स्वामींनीं ती जागा पसंत केली, व तेथें कांहीं वर्षें तपश्चर्या करण्यांत घालविलीं. परंतु पुष्कळ दिवस स्वामींची विभूति कोणाच्या दृष्टीस पडली नाहीं.

मौजे **पे**ढें येथें राहणारा **बा**ळ गौळी नामक एक इसम आपलीं गुरें **धा**मणी **सो**नगांवच्या रानामध्यें नेऊन चारीत असे. तो स्वामींच्या गुंफेजवळ एके दिवशीं आकस्मिक गेला व दैववशात् त्यास स्वामींचें दर्शन झालें. स्वामींसारखा महातपस्वी साधु दृष्टीस पडल्यामुळें त्यास फार समाधान वाटलें व त्याची त्यांवर फार निष्ठा बसली. स्वामींनीं त्यास आपली माहिती कोणास सांगूं नये ह्मणून ताकीद केली. त्याप्रमाणें कित्येक दिवसपर्यंत त्यानें स्वामींच्या दर्शनाची

गोष्ट अगदीं गुप्त ठेविली होती. तो मात्र स्वतः नित्य स्वामींचें दर्शन घेऊन त्यांना कंदमुळें अर्पण करीत असे व गोमूत्र आणून प्राशनास देत असे. असा क्रम बरेच दिवस चालला. पुढें एके दिवशीं बाळ गौळ्यानें स्वामींस कांहीं अपक्क आम्रफळें आणून नजर केलीं. तीं स्वामींनीं एका खळीमध्यें पिकावयास घातलीं. दोनचार दिवसांनीं पुनः गौळी येतांच त्याच्या देखत तीं काढून पाहिलीं. तों त्या गवतामध्यें बसलेला एक प्रचंड सर्प स्वामींच्या हातास चावला. त्यामुळें त्यांच्या हातांतून रक्तस्राव होऊं लागला. बाळ गौळी अगदीं अज्ञान असल्यामुळें भयभीत होऊन पळून गेला. सर्पदंश झाल्यानंतर आतां हा गोसावी वांचणें कठीण असें त्यास वाटलें. ह्मणून दुसरे दिवशीं त्याची अवस्था काय झाली हें पाहण्याकरितां तो पुनः स्वामींच्या गुंफेजवळ आला. तों स्वामी नित्याप्रमाणें जप करीत बसलेले त्याच्या दृष्टीस पडले. तें पाहून त्यास सानंद आश्चर्य वाटलें, आणि त्यास हा गोसावी कोणी अलौकिक महापुरुष आहे असें वाटून तो त्यांच्या फार भजनीं लागला.

चिपळूण हें बंदर ह्या वेळीं जंजिऱ्याच्या हबशांचे ताब्यांत होतें. त्यांच्या तर्फेनें चिपळूणचा सुभा आवजी[1] बल्लाळ नामक गृहस्थाकडे होता व मीठबंदराचा हवाला बाळाजी[2] विश्वनाथ भट श्रीवर्धनकर ह्यांजकडे होता. ह्या उभय गृहस्थांस स्वामींचा महिमा श्रुत झाला. तेव्हां त्यांस स्वामींच्या दर्शनाची उत्कट इच्छा उत्पन्न होऊन त्यांनीं ह्या थोर सत्पुरुषाचें दर्शन घेतलें. स्वामींची विद्वत्ता, निस्पृहता व तपःसामर्थ्य अवलोकन करून आणि त्यांचें रसाळ व मोहक भाषण श्रवण करून आवजी बल्लाळ आणि बाळाजी विश्वनाथ ह्यांची त्यांच्या ठि-

---

१ आवजी बल्लाळ:—काव्येतिहाससंग्रहांतील बखरींत आबाजी बल्लाळ असें नांव दिलें आहे. परंतु सातारा ग्याझिटियरकरितां दिलेल्या हकीकतींत आवजी बल्लाळ हें नांव दिलें आहे. हेंच अधिक विश्वसनीय वाटतें. आवजी बल्लाळ कोणी प्रभु ज्ञातीचे गृहस्थ असावेत. हबशाच्या पदरीं प्रभु लोक फार होते.

२ बाळाजी विश्वनाथ:—हा श्रीवर्धनचा देशमुख असून त्याजकडे गोवेळे, बोरलई, मांडले आणि ह्मसले ह्या चार तर्पांचें कुळकरणाचें वतन होतें अशी माहिती मिळते. हें वतनाचें काम त्याचा भाऊ जानोजी विश्वनाथ हा पहात असे.

स्वामींनीं त्यास "चित्तांत कांहीं भय न धरणें. समुद्र तरणें आमची सहज वृत्ति असे. यांत कांहीं अगाध नाहीं." असें अभयवचन दिलें. खानानें स्वामींची समबुद्धि व थोरपणा पाहून त्यांचा फार गौरव केला. त्यांस किल्ल्यांतील राजवाड्यामध्यें नेलें; त्यांच्या सन्मानार्थ तोफांची सलामी दिली; आणि त्यांस बहुमूल्य वस्त्रें अर्पण केलीं. स्वामींनींही त्यास प्रसाद दिला. स्वामींच्या मनांतून पेढें व आंबडस हे दोन्ही गांव आपल्या देवस्थानास इनाम असले ह्मणजे श्रीची पूजा-अर्चा व उत्सव-महोत्सव निर्वेधपणें चालेल आणि मुसलमानांचा त्रास देवस्थानास पोहोंचणार नाहीं. ह्मणून त्यांनीं खानसाहेबांकडून दोन्ही गांवच्या इनाम सनदा करून घेतल्या. त्याचप्रमाणें देवस्थानाच्या इमारतीचा कारखाना चालू केला होता त्याची देखरेख करण्याकरितां बापूजीपंत तांबे ह्मणून एक कारकून मागून घेतला. ह्याप्रमाणें स्वामींनीं आपल्या सद्गुणप्रभावानें व सप्रेम वर्तनानें याकूदखान ह्यावर छाप बसवून आपलें इष्ट कार्य साधून घेतलें. ही हकीकत इ. स. १७०८ नंतर घडून आली.

ह्यानंतर एक वर्षानें बापूजीपंताची बहीण राधाबाई व तिचा पुत्र चिमणाजी कृष्ण भागवत हे स्वामींच्या सेवेस परशुराम येथें येऊन राहिले. चिमणाजी कृष्ण यांचे वडील कृष्णाजी बल्लाळ व त्यांचे बंधु नारो बल्लाळ हे मौजे सोनवडे तालुके संगमनेर येथील कुळकरणाचे वृत्तीवर नांदत होते. कृष्णाजीपंतास पुत्र एक, चिमणाजीपंत; व नारोपंतास पुत्र दोघे, संभाजीपंत व अंताजीपंत. कृष्णाजी बल्लाळ व नारो बल्लाळ ह्यांचा काळ झाल्यानंतर संभाजीपंत व अंताजीपंत ह्यांनीं विभक्त संसार केला. परंतु चिमणाजी कृष्ण यांस पोटशूळाची व्यथा निर्माण झाल्यामुळें ते फार त्रस्त झाले. तेव्हां त्यांची सापत्न माता राधाबाई हिनें धामापूर नजीक देवरुख येथें येऊन देवाची सेवा केली. तेथें तिला दृष्टांत झाल्यावरून ती चिमणाजीपंतास बरोबर घेऊन बापूजीपंताचे विद्यमानें परशुरामास गेली. तेथें उभयतांनीं श्री स्वामींचें दर्शन घेऊन त्यांची सेवा चालविली. चिमणाजीपंतांचें व बापूजीपंतांचें नातें आहे असें समजून स्वामींनीं त्यावर विशेष कृपा केली व त्याची पोटशूळाची व्यथा अगदीं नाहींशी केली. तदनंतर स्वामींनीं त्यांस आपल्या हाताखालीं घेऊन देवालयाचें काम काज सांगितलें व महिपतगडीं जाऊन शिवाजीमहा-

राजांचे कारकीर्दींचा चुना आणवून देवालयाचा कारखाना ज्यारीनें चालविला. स्वामी चतुर व मनुष्याची परीक्षा करण्यांत फार दक्ष असल्यामुळें त्यांनीं **चि**मणाजीपंताच्या प्रामाणिकपणाबद्दल व शुद्ध भावाबद्दल आपली खात्री करून घेतली आणि त्यास आपला आश्रय देऊन त्यास चार रुपये दरमहा करून आपल्या देवस्थानाच्या पोतदारीचें काम सांगितलें. **बा**पूजीपंत लिहिण्याच्या कामावर होते. त्यांस पांच रुपये दरमहा करून फडणिशीचें काम सांगितलें. नंतर त्यांनीं **चि**मणाजीपंतास **धों**डोपंत **स**प्रे ह्यांची कन्या देऊन लग्न केलें. ह्याप्रमाणें उभयतांवर प्रेम करून स्वामींनीं त्यांना नांवारूपास आणिलें. पुढें स्वामींचा कारखाना वाढत चालला व **बा**पूजीपंतांस काम फार पडूं लागलें. ह्मणून त्यांनीं, त्यांचे बंधु **धों**डो **भा**स्कर **तां**बे, **क**ल्याण प्रांतांतील हशमी सरदार **गौ**रोजी **ला**टे(?) ह्मणून होते त्यांचे पदरीं होता, त्यास आणवून चिटणिशीचें काम दिलें. ह्याप्रमाणें **बा**पूजीपंत, **चि**मणाजीपंत, व **धों**डोपंत असे त्रिवर्ग एकरूपें, एका मायेनें, स्वामींच्या सेवेंत तत्पर राहिले. स्वामींच्या देवस्थानाचा जसजसा उत्कर्ष होत चालला तसतसा स्वामींनीं ह्या त्रिवर्गाचा उत्कर्ष केला. हें पुढील वृत्तांतावरून समजून येईलच.

---

## भाग २ रा.



## कोंकणप्रांताचा त्याग
### आणि
### महाराष्ट्रदेशांत आगमन.

**ब्र**ह्मेंद्रस्वामी अरण्यामध्यें एकांत स्थानीं तपश्चर्या करीत बसण्याचें आपलें व्रत एकीकडे टेवून, प्रसिद्धपणें **प**रशुरामीं राहूं लागले; व देवालयाचा जीर्णोद्धार करावयाचा निश्चय करून तत्प्रीत्यर्थ द्रव्य व इनामगांव मिळविण्याचा यत्न करूं लागले; हें वाचून कोणास अशी शंका उत्पन्न होईल कीं, ही एवढी उपाधि स्वीकारण्याचें स्वामींस प्रयोजन काय? ह्याचें उत्तर स्वामींची स्वधर्म व स्वराज्य ह्यां-

वरील निस्सीम व अहेतुक भक्ति हीच होय. स्वामी श्री **प**रशुरामीं प्रगट झाले त्या वेळीं तेथील देवब्राह्मणांचा अगदीं उच्छेद झाला होता व यवनांच्या तापामुळें सर्व प्रजा फार त्रस्त झाली होती. ह्मणून स्वामींनीं देवालयाचा जीर्णोद्धार व जागोजाग श्रीची स्थापना करावयाचा हेतु धरून, द्रव्य व इनाम गांव मिळविण्याचा उद्योग आरंभिला. वस्तुतः स्वामी स्वतः निरिच्छ तपस्वी असल्यामुळें त्यांना कोणत्याही प्रकारें स्वार्थसाधनाची इच्छा नव्हती. परंतु त्यांचा अंतर्हेतु जगांतील कोणत्याही खऱ्या देशभक्ताप्रमाणें देशोद्धाराचा असल्यामुळें त्यांनीं श्री **रा**मदास स्वामींप्रमाणें अलिप्त राहून सर्व राजकारणें चालविलीं असें त्यांच्या चरित्रावरून दिसून येतें. श्रीची उपासना व भक्ति ह्यांचा 'दिगंत' प्रसार व्हावा व **म**हाराष्ट्रराज्याचा अभ्युदय होऊन सर्व देशबांधव सुखी व्हावेत असा स्वामींचा उच्च मनोरथ असल्यावांचून त्यांना राजकारणांत पडण्याचें दुसरें कोणतेंही कारण नव्हतें. ह्याच उच्च मनोरथास स्वामींनीं आपल्या हृदयांत जागा दिल्यामुळें **म**हाराष्ट्राचें अपरिमित कल्याण झालें ह्यांत शंका नाहीं. स्वामी राजकारणांत केव्हांपासून पडूं लागले व त्यांचा **म**हाराष्ट्रांतील मोठमोठ्या सरदारांशीं कसा व केव्हां परिचय झाला हें समजण्यास मार्ग नाहीं. तथापि स्वामी, **शि**वाजी, **सं**भाजी व **रा**जाराम ह्या तिन्ही **छ**त्रपतींच्या कारकीर्दीचे चांगले माहितगार होते व त्या वेळच्या सर्व घडामोडी त्यांस पूर्ण अवगत होत्या असें मानण्यास सबळ पुरावा आहे. त्यांच्या कित्येक पत्रांत **औ**रंगजेब, **शि**वाजी ह्यांचे उल्लेख आहेत, एवढेंच नव्हे तर **जा**वलीचे **चं**द्रराव **मो**रे व **मौ**नीबोवा गोसावी ह्यांचे दृष्टांतही दिलेले सांपडतात. **शा**हु महाराजांस त्यांनीं प्रसाद पाठविला व **बा**ळाजी **वि**श्वनाथ ह्यांस आशी-

१ स्वामींनीं रघोजी भोंसले ह्यांस लिहिलेल्या पत्रांत (लेखांक २९५ पहा) बापूजी भोंसले व संताजी भोंसले ह्यांस साह्याय्य केल्याची पूर्वींची हकीकत दिली आहे. ती वाचली ह्मणजे स्वामींचा महाराष्ट्राशीं फार जुना संबंध असला पाहिजे असें दिसून येतें. बापूजी भोंसले ह्यांस स्वामींनीं हबशाकडून सोडविल्याचा उल्लेख केला आहे तो खरा असावा. 'नागपूरकर भोंसल्यांचे कागदपत्र' लेखांक २ रा ह्यांत कोल्हटकरांची जी कैफियत आहे तींत बापूजीस हबशानें त्रास दिल्याचा उल्लेख आहे.

र्वाद देऊन प्रत्यक्ष प्रधानपद मिळवून दिलें. परंतु ह्यासंबंधाचे अस्सल पत्रव्यवहार अद्यापि उपलब्ध झाले नाहींत. त्यामुळें त्या कागदपत्रांच्या अभावीं ह्याबद्दलची मनोरंजक हकीकत विस्तृतपणें येथें देतां येत नाहीं.

स्वामींनीं **जं**जिऱ्याचा **ह**बशी **सिद्दी या**कूदखान ह्यास प्रसन्न करून त्याजकडून **पे**ढें व **आं**बडस हे दोन गांव इ० स० १७०८ नंतर मिळविले; तेव्हां स्वामींचा व **ह**बशांचा संबंध केव्हांपासून जडला ह्याची सरासरी अटकळ करितां येते. ह्यानंतर स्वामींचा व **प**रशुराम **त्रिं**बक **प्र**तिनिधि व **का**न्होजी **आं**ग्रे ह्यांचा परिचय झाला असावा. **कों**कणामध्यें **प्र**तिनिधि व **आं**ग्रे ह्यांचा अंमल अधिक असल्यामुळें स्वामींची व त्यांची ओळख होऊन त्यांची स्वामींवर भक्ति जडली असावी. स्वामींस वर निर्दिष्ट केलेले **पे**ढें व **आं**बडस हे दोन गांव **ह**बशाकडून इनाम मिळाले होते, ह्यांपैकीं मौजे **पे**ढें हा गांव **ह**बशाच्या अमलांत असल्यामुळें तो दरोबस्त इनाम मिळाला होता. परंतु **आं**बडस गांव अर्धा **म**हिपतगड तर्फेनें **प्र**तिनिधींच्या अमलांत असल्यामुळें तो स्वामींस अर्धा इनाम मिळाला होता. तो दरोबस्त इनाम करून घेण्याकरितां स्वामींनीं **प**रशुराम **त्रिं**बक **प्र**तिनिधि ह्यांस विनंति केली. त्याप्रमाणें **प्र**तिनिधींनीं स्वामींची योग्यता जाणून तो गांव **म**हिपतगड तर्फेनें इनाम करून दिला. पुढें स्वामींचा व **प्र**तिनिधींचा स्नेहसंबंध दृढतर होऊन, राजकारणप्रसंगांत त्यांनीं **प्र**तिनिधींस चांगलें साहाय्य केल्यामुळें, **प्र**तिनिधींनीं स्वामींस मौजे **डो**लें व **म**हाळुंगे तर्फ **पां**वस हे दोन्ही गांव **म**हिपतगडतर्फेनें **शा**हु महाराजांच्या मुद्रेनिशीं निमें इनाम करून दिलें[1]. ह्यावरून इ० स० १७१० पासून स्वामींचा **म**हाराष्ट्राच्या राजकारणांत

---

१ काव्येतिहाससंग्रहांतील ब्रह्मेंद्रस्वामींच्या चरित्रांत जी माहिती दिली आहे त्यावरून हे गांव परशुराम त्रिंबक प्रतिनिधि ह्यांनीं स्वामींस इनाम करून दिले असें दिसतें. परंतु 'सातारा ग्याझिटियर'करितां लिहिलेल्या माहितीमध्यें हे गांव शके १६४२ ह्मणजे इ० स० १७२० मध्यें इनाम दिले असें लिहिलें आहे. तो सन खरा मानिला तर ह्या वेळीं परशुराम त्रिंबक प्रतिनिधि हयात नसून त्यांचे पुत्र श्रीनिवास परशुराम हे असले पाहिजेत. परशुरामपंत ह्यांचा काल ता० २७ मे इ० स० १७१८ रोजीं झाला.

हळूहळू प्रवेश होत चालला व त्यांच्यावर छत्रपतींच्या प्रमुख सरदारांची निष्ठा बसूं लागली असें ह्मणण्यास हरकत नाहीं.

स्वामी इ० स० १७२० पूर्वीं वरघाटें कधीं आले होते किंवा नाहीं ह्याची विश्वसनीय माहिती मिळत नाहीं. तथापि त्यांचा व **शा**हु महाराजांचा चांगला परिचय असून पत्रव्यवहार देखील चालू असावा असा तर्क करण्यास जागा आहे. **बा**ळाजी **वि**श्वनाथ व **चि**मणाजी **दा**मोदर ह्या दोन प्रमुख **म**हाराष्ट्र-सरदारांचा व स्वामींचा पत्रव्यवहार होता हें तर निश्चित आहे. **बा**ळाजी **वि**-श्वनाथ ह्यांच्या ता० २८ एप्रिल इ० स० १७१५ च्या (लेखांक १९) पत्रा-वरून स्वामींची व त्यांची पैशाची देवघेव होती असें स्पष्ट दिसून येतें. **बा**-ळाजी **वि**श्वनाथ ह्यांस स्वामी द्रव्यद्वारें उत्कृष्ट मदत करीत असत, व त्यांस राजकारणप्रसंगीं वेळोवेळीं सल्ला मसलत देत असत हें निर्विवाद सिद्ध आहे. स्वामींनीं **चि**माजी **आ**पास लिहिलेल्या एका पत्रांत (लेखांक २८३) "**ना**ना माझा होता तो एकनिष्ठ होता. **स**य्यदांचा सल्ला झाला त्यामुळें इतकें अभीष्ट झालें. **दि**ल्लीची मसलत सुरू झाली." इत्यादि उद्गार काढिले आहेत. त्यावरून व वेळोवेळीं **बा**ळाजी **वि**श्वनाथ ह्यांच्या भक्तीविषयीं केलेल्या स्तुतीवरून **बा**-ळाजी **वि**श्वनाथाच्या कारकीर्दीतील **म**राठ्यांच्या राजकारणांत स्वामींचें वर्चस्व चांगलेंच असलें पाहिजे हें उघड होतें. **बा**ळाजी **वि**श्वनाथ ह्यांचें व स्वामींचें विशेष दळणवळण असल्यामुळें त्यांचे पुत्र **बा**जीराव व **चि**माजी **आ**पा ह्यांवर स्वामींची फार कृपा जडली असावी व त्यांनाही स्वामींची योग्यता कळल्यामुळें त्यांच्याविषयीं पूज्यबुद्धि उत्पन्न झाली असावी ह्यांत शंका नाहीं. **बा**ळाजी **वि**श्वनाथ **सा**सवड मुक्कामीं ता० २ एप्रिल इ० स० १७२० रोजीं मृत्यु पावले. नंतर त्यांचे वडील पुत्र **बा**जीराव ह्यांस **म**सूर मुक्कामीं ता० १७ एप्रिल इ० स० १७२० रोजीं पेशवेपदाचीं वस्त्रें मिळालीं. ह्या वेळचे स्वामींचे कागदपत्र उप-लब्ध झाले, तर **बा**जीरावांस प्रधानगिरीचीं वस्त्रें देण्यांतही स्वामींची **शा**हु महा-राजांजवळ शिफारस असावी असें दिसून येईल. परंतु अस्सल कागदपत्रांच्या अभावामुळें ह्या सर्व घडामोडींमधील स्वामींची चळवळ समजण्यास मार्ग नाहीं. तथापि ह्या प्रसंगास स्वामी **शा**हु महाराजांस भेटण्याकरितां मुद्दाम आले असा-वेत व त्यांच्या वज़नाचा चांगला उपयोग झाला असावा असें मानण्यास एक

आधार आहे. **धा**वडशी गांव स्वामींस सन इहिदे अशरीन ह्मणजे सन १७२०–२१ ह्या वर्षाच्या माघ शुद्ध नवमीस इनाम मिळाल्याचा अगदीं पहिला उल्लेख **धा**वडशी संस्थानच्या दप्तरांत सांपडतो. त्यावरून स्वामींनीं **शा**हु महाराजांची मर्जी प्रसन्न करून **बा**जीरावास पेशवाईचीं वस्त्रें मिळवून दिलीं व नंतर हें इनाम मिळविलें असावें असें दिसतें.

स्वामींचा कीर्तिनाद सर्व **कों**कणप्रांतामध्यें दुमदुमूं लागून **का**न्होजी **आं**ग्रे, **प्र**तिनिधि व **ह**बशी हे स्वामींची चरणसेवा मोठ्या भक्तीनें करूं लागले होते. त्यामुळें स्वामींचा कारखाना नांवारूपास येऊन श्री **प**रशुराम येथील देवालय, श्री **रे**णुकेचें देवालय, **ग**णपतीचें देवालय, **मा**रुतीचें देवालय, धर्मशाळा, पोंवळी, दीपमाळा, व मुख्य देवालयाचा सभामंडप इतकीं कामें पुरीं झालीं होतीं. श्री **प**रशुराम येथें ब्राह्मणांची वस्ती अगदीं नव्हती ती स्वामींच्या प्रयत्नानें विशेष होत चालली. **ह**बशाच्या दहशतीमुळें परागंदा झालेले देवाचे पुजारी देवासमीप येऊन राहिले. स्वामींनीं सर्व लोकांचा चरितार्थ यथायोग्य रीतीनें चालावा अशी तजवीज केली. देवास मिळालेल्या इनाम गांवांवर **बा**पूजीपंत, **चि**मणाजीपंत व **धों**डोपंत ह्यांचे नातेवाईक आणवून त्यांची योजना केली. **चि**मणाजीपंतांचे मामा **त्रिं**बक **कृ**ष्ण **मो**घे व चुलत बंधु **सं**भाजी **ना**रायण हे **सु**वर्णदुर्गास **आं**ग्रे ह्यांचे पदरीं चाकरीस होते. त्यांना चारचार रुपये दरमहा करून आपले पदरीं ठेविलें. **त्रिं**बक **कृ**ष्ण ह्यांची **गो**ठणें येथील कामावर योजना केली, व **सं**भाजी **ना**रायण ह्यांस **प**रशुरामीं श्रीसन्निध ठेविलें. नंतर त्यांचे बंधु **अं**ताजी **ना**रायण आले. त्यांस मौजे **आं**बडस येथें ठेविलें. तेथें स्वामींची बाग होती. तेथील देखरेख व जाबसाली कागदपत्रांची ने आण हीं कामें त्यांकडे सोपविलीं. ह्याप्रमाणें स्वामींचा कारखाना वाढत चालला.

---

१ धावडशीची अगदीं पहिली सनद आह्मांस उपलब्ध झाली नाहीं. ती उपलब्ध झाली असती ह्मणजे ह्या सनाची पक्की खातरी झाली असती. धावडशी ह्या गांवीं मूळ धावड लोकांची वस्ती असून तेथें पुढें स्वामींनींच गांव वसविला. स्वामी पूर्वी सातारा प्रांतीं आले ह्मणजे धावडशीनजीक मेरुलिंग नामक डोंगर आहे तेथें राहत असत. त्या स्थानास नजीक व छत्रपतीच्या राजधानीस जवळ असें पाहून हें धावडशी गांव स्वामींनीं पसंत केलें असावें.

श्री परशुराम येथील देवस्थानाची पूजाअर्चा महोत्सव मोठ्या थाटानें होऊं लागला. स्वामींच्या वार्षिक नियमाप्रमाणें त्यांची श्रावणमासची समाधि यथासांग होऊन समाप्तीचे दिवशीं मोठा समारंभ होऊं लागला. भाद्रपद शुद्ध चतुर्थीचे दिवशीं स्वामी आपल्या समाधिस्थानांतून बाहेर येत. त्या दिवशीं त्यांचें भक्तिभावानें दर्शन घेण्याकरितां आंग्रे व हबशी यांजकडील सरदार व केव्हां केव्हां खाशा स्वाऱ्या येत असत. त्या दिवशीं आंग्रे यांजकडील दोन तीनशें बरकंदाज व हबशी यांजकडील सिद्दी शिपाई स्वामींस बंदुकांची सलामी देत असत. नंतर स्वामींस पालखींत बसवून मोठ्या आनंदोत्सवानें श्री परशुरामीं देवासन्निध आणीत. नंतर तेथें कीर्तनादि उत्सव होऊन व दुसरे दिवशीं अन्नसंतर्पण होऊन समाधीची सांगता होत असे. आंग्रे व हबशी ह्यांचें नेहमीं वैर असे; परंतु ह्या उत्सवप्रसंगीं उभयतांचे लोक स्नेहभावानें वागून स्वामींचा प्रसाद घेण्यास सारखेच उत्सुक असत. ह्यावरून स्वामींनीं सर्व लोकांशीं प्रेमभावानें वागून त्यांचीं अंतःकरणें कशीं आकर्षित केलीं होतीं हें चांगलें व्यक्त होतें.

स्वामींचा व आंग्र्यांचा जो पत्रव्यवहार उपलब्ध झाला आहे त्यावरून कान्होजीचा व स्वामींचा फार जुना स्नेह असावा असें दिसून येतें. ह्या घराण्यावर स्वामींचा विशेष लोभ असल्यामुळें ह्या घराण्यांतील पुरुषांच्या हातून जीं राजकारणें झालीं, त्या सर्वांत स्वामींचें अल्पबहुत अंग होतें. ह्यासंबंधाची विस्तृत हकीकत स्वामींच्या राजकारणांच्या वर्णनांत दिली आहे. कान्होजी आंग्र्याच्या ता० ९ एप्रिल इ० स० १७२५ पत्रांवरून (ग्रं० ले० १७४) स्वामींचा श्री परशुराम येथील उत्सव त्या वेळपर्यंत उत्तम प्रकारें चालला असावा व स्वामी तोंपर्यंत बहुतेक कोंकणप्रांतांतच राहात असावेत असें दिसतें. परंतु ह्यापुढें स्वामी महाराष्ट्रांतील नाजूक राजकारणप्रसंगानिमित्त किंवा अन्य कारणास्तव, सातारा प्रांतीं विशेष येऊं जाऊं लागले असावेत. काव्येतिहाससंग्रहांतील बखरीमध्यें "सन खमस अशरीनांत श्रीस्वामी घांट चढोन साताऱ्यासी शाहु महाराज यांजकडे आले. राजश्रीस वर्तमान कळतांच सामोरे जाऊन, सन्मानेंकरून वाड्यांत आणून, पूजा करोन, तीन गांव मौजे धावडशी तर्फ परळी, मौजे वीरमाडें प्रांत कऱ्हाड व मौजे अनेवाडी तर्फ कुडाळ हे तीन गांव राजांनीं दरोबस्त कुलबाब कुलकानू इनाम देऊन राज-

पत्रें करून दिलीं. (पृ० १३)" असा मजकूर आहे. ह्यावरून सन खमस अशरीनांत ह्मणजे इ० स० १७२४–२५ ह्या सालीं, स्वामी सातारा प्रांतीं आले असें सिद्ध होतें. ह्यानंतर स्वामींनीं इ० स० १७२५–२६ सन सीत अशरीन मध्यें बाजीराव बल्लाळ पेशवे ह्यांचेकडून मौजे पिंपरी तर्फ कडेपठार हा गांव इनाम करून घेतला. राजशक ५२ ह्मणजे इ० स० १७२६ ह्या वर्षी श्रीमंत छत्रपति शाहु महाराज ह्यांनीं जोत्याजी केसरकर ह्यांस दिलेलें अस्सल आज्ञापत्र आह्मांस उपलब्ध झालें आहे. त्यावरून स्वामींकडे मराठ्यांच्या तर्फेनें इ० स० १७२६ मध्यें आठ गांव इनाम होते असें दिसतें. हें आज्ञापत्र येणेंप्रमाणें:—

"स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५२ विश्वावसूनाम संवत्सरे भाद्रपद बहुल त्रयोदशी गुरुवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शाहु छत्रपति स्वामी यांणीं राजमान्य राजश्री जोत्याजी केसरकर आा सरदेशमुखी यांणीं आज्ञा केली ऐसीजे:—श्री येथील महोत्सवास गांव कुलबाब कुलकानू देखील सरदेशमुखी स्वराज्य व मोंगलाई इनाम दिल्हे असेत. बितपशील:—

| कोंकण प्रांतें. | वरघांट प्रांतें. |
|---|---|
| १ मौजे माहुलंगें ताा पांवस | १ मौजे इडमिडें (वीरमाडें) |
| १ मौजे डोरलें ताा पांवस | १ मौजे अनेवाडी |
| १ मौजे कळंबुसी | १ मौजे पिंपरी |
| १ मौजे नायसी | १ मौजे धावडशी |
| ४ | ४ |

येणेंप्रमाणें आठ गांव दिल्हे असेत. तेथील सरदेशमुखीचा ऐवज होईल तो श्रीकडे पावेल. तुह्मीं सरदेशमुखीचा तगादा न करणें. खलेल न करणें.

---

१. ह्या गांवांचीं अस्सल इनामपत्रें आह्मांस उपलब्ध झालीं नाहींत त्यामुळें त्यांची बरोबर मित्ती देतां येत नाहीं. पिंपरी गांवाबद्दल विष्णु गोपाळ भागवत ह्यांनीं ता० १९ माहे मे इ० स० १८४९ सालीं दिलेल्या कैफियतीची नक्कल आह्मांस मिळाली आहे. तींत पिंपरीबद्दल बाजीराव पंडित प्रधान ह्यांनीं दिलेल्या ताकीदपत्राची तारीख छ २९ मोहरम सुरु सन सीत अशरीन ही दिली आहे. ह्यावरून त्याच समयास हा गांव मिळाला हें स्पष्ट आहे.

प्रतिवर्षी नूतन पत्राचा आक्षेप न करणें. या पत्राची प्रती लिहून घेऊन मुख्य पत्र भोगवटियास देणें. जाणिजे. बहुत काय लिहिणें." (मोर्तब.)

ह्या आज्ञापत्रांत हबशाकडून मिळालेल्या पेढें व आंबडस ह्या गांवांचा उल्लेख नसणें साहजिक आहे. कारण, तेथें मराठ्यांचा अंमल नव्हता. ह्या आज्ञा-पत्राच्या सालापासून म्हणजे इ० स० १७२६ पासून स्वामींच्या अस्सल कागद-पत्रांनीं सिद्ध झालेल्या चरित्रास सुरुवात होते. स्वामींनीं शाहु महाराजां-कडून मिळालेल्या धावडशी, अनेवाडी आणि वीरमाडें ह्या तिन्ही गांवीं अनु-क्रमें त्या गांवचेच रहिवासी बाळाजी हरि अंतुरकर, जानो महादेव जोशी आणि हरि टिळक असे तीन इसम देखरेख करण्याकरितां ठेविले. ह्यावरून स्वामींचे कोंकणांतील कारकून अद्यापि देशावर आले नव्हते असें दिसून येतें.

इ० स० १७२६ नंतर हबशी सिद्दी सात ह्याचा व स्वामींचा हत्तीच्या कारणामुळें तंटा उत्पन्न झाला व त्यामुळें स्वामींस कोंकणप्रांत त्याग करून देशावर येणें भाग पडलें. ती हकीकत येणेंप्रमाणें:–सिद्दी याकूदखान ह्याचा अंजनवेल ऊर्फ गोवळकोट येथील सुभेदार सिद्दी सात ह्यास सावनूर बंका-पूर येथील पठाणानें एक हत्ती बक्षीस दिला होता. परंतु तो परराज्यांतून सुरक्षितपणें अंजनवेलीस आणतां येईना. कारण, बंकापुराहून अंजनवेलपर्यंत मराठ्यांच्या चौक्या जागजागीं असल्यामुळें, त्यांच्या तडाक्यांतून मुसलमान पठाणाचा हत्ती सुटून येणें त्या वेळच्या स्थितीप्रमाणें अशक्य होतें. तेव्हां हबशी सिद्दी सात ह्यानें अशी युक्ति योजिली कीं, ब्रह्मेंद्रस्वामी ह्यांचें मराठीराज्यांत चांगलें वजन आहे व त्यांच्या शब्दाचा कोणी अनादर करणार नाहीं, त्या अर्थी त्यांस विनंति करून त्यांच्याकडूनच हत्ती आणविण्याची कांहीं तजवीज करावी. त्याप्रमाणें त्यानें स्वामींस पत्र पाठविलें कीं, "आपली आज्ञा सर्व राज्यांत मान्य आहे. यास्तव वरघाटें आपा जोशी पाठवून पंतप्रधान व पंत प्रतिनिधि ह्यांचीं दस्तकें आणवून द्यावीं." स्वामींनीं उत्तर पाठविलें कीं, "आह्मांस भि-क्षार्थ सावनूर प्रांतें जाणेंच आहे. तुमचे काय हत्ती असतील ते आमच्या समागमें येतील. कोणाच्या दस्तकाचें प्रयोजन नाहीं." ह्याप्रमाणें स्वामींनीं उत्तर पाठविल्यानंतर सिद्दी सात ह्यानें स्वामींच्या बरोबर हत्ती आणण्याकरितां मंडळीस ⁓ लोक पाठवून दिले.

स्वामी आपल्याबरोबर **दाद गुरव** कर्णेकरी, **अंताजी नारायण** कारकून, आणि **खंडोजी साळवी** निशाणवाला असा परिवार व **सिद्दी सात** यांजकडील दहा पठाण बरोबर घेऊन **सावनूर बंकापूर** येथें गेले. व तिकडील प्रांतांतील भिक्षाद्रव्य संपादन करून व **सावनूरकर पठाणाचा** हत्ती बरोबर घेऊन **विशाळगड** मार्गानें परत आले. त्यांस मध्यंतरीं **विशाळगडच्या** घांटामध्यें **प्रतिनिधींच्या** चौकीदारांनीं अटकाव केला. परंतु स्वामींनीं किल्ल्यावरील अधिकाऱ्यास पत्र पाठवून व सर्व हकीकत कळवून हत्ती नेण्याची परवानगी घेतली. **सिद्दी सात** ह्यानेंही **प्रतिनिधींस** अगोदर विनंतिपत्र पाठविलें होतें, त्यामुळें तेथें विशेष अडचण पडली नाहीं. तेथून निघाल्यानंतर घांट उतरून स्वामी हत्तीसहवर्त्तमान **कोंकणांत** आले. तों **कोंकणच्या** नाक्यावर **माखजन** येथें **आंग्रे** व **हबशी** ह्यांच्या चौक्या होत्या. तेथें दोहींकडील चौकीदारांमध्यें तंटा उपस्थित झाला. **आंग्रे** यांच्या लोकांनीं **जयगडची** मदत आणवून हत्ती आपल्या ताब्यांत घेतला आणि तो **जयगडास** पाठवून दिला. स्वामी स्नानसंध्येकरितां मागील मुक्कामावर राहिले, तों इकडे त्यांच्या पश्चात् असा घोंटाळा झाला. स्वामी **माखजनीं** येतात तों त्यांस हें वृत्त समजलें. तेव्हां त्यांनीं **जयगड** येथील हवालदाराकडे सामोपचाराचा निरोप पाठवून हत्ती परत मागितला. परंतु तो येण्याच्या आंतच, ही बातमी **हबशाकडील** लोकांनीं **अंजनवेलीस** पोहोंचविली, व सुभेदार **सिद्दी सात** ह्यांस असें कळविलें कीं, "गोसावी ह्यांनीं हत्ती समागमें आणून **माखजनचे** चौकीवर कज्जियाचें निमित्त करून हत्ती **आंग्रे** यांचे लोकांचे स्वाधीन केला."

**सिद्दी सात** ह्यास ही बातमी कळतांच त्याचा क्रोधाग्नि प्रज्वलित झाला. **सिद्दी सात** हा जातीचा **हबशी** असल्यामुळें हिंदूंविषयीं त्याचा अगोदर प्रेमभाव कमीच होता. परंतु **जंजिऱ्याचे बडेखान** ह्यांनीं स्वामींचा सत्कार करून त्यांच्याविषयीं अगत्यवाद धरल्यामुळें, सर्व **हबशी** लोकांस स्वामींविषयीं बाह्यात्कारें तरी पूज्यबुद्धि बाळगणें भाग पडलें होतें. त्याप्रमाणें **सिद्दी सात** ह्याची स्थिति होती. त्यास आपला बहुमानाचा हत्ती, स्वामींनीं चौकीदाराकडून तंट्याचें मिष करवून, आपल्या जातभाईस दिला; एवढी बातमी कळतांच, त्यास संताप उत्पन्न होऊन, त्यानें एकदम स्वामींच्या **परशुराम**

येथील देवस्थानावर दोन तीनशें लोकांनिशीं शिवरात्रीचे दिवशीं चाल केली. स्वामींचे देवालयाचा कारखाना व सर्व ब्राह्मणांचीं व कारकुनांचीं घरें लुटून जप्त केलीं; आणि लोकांस फार उपसर्ग देऊन देवस्थानाचा अगदीं विध्वंस केला. त्यामुळें सर्व ब्राह्मण भयभीत होऊन आपापले जीव घेऊन पळाले. स्वामींचे तीन इमानी नौकर **चि**मणाजीपंत, **बा**पूजीपंत आणि **ल**खमोजी **को**ठावळा हे मोठ्या धैर्यानें राहिले. परंतु **ह**बशी ह्यानें द्रव्यप्राप्तीकरितां त्यांची फार हालअपेष्टा करून त्यांना मरेमरेपर्यंत मार दिला.

हा वृत्तांत स्वामींस समजतांच स्वामींनीं **का**न्होजी **आं**ग्रे ह्यांस पत्र पाठविलें कीं, "तुमचे लोकांनीं आमचे समागमें हत्ती होता तो नेला. सबब **सि**द्दी **सा**त शामल याणें **प**रशुरामीं स्वारी पाठवून, देवब्राह्मणांचा उच्छेद करून, वस्तवानी जप्त करून, बंद धरून नेला. कारकुनांस मारहाण करीत आहे, तरी पत्रदर्शनीं **ज**यगडकरी यांस पत्र पाठवून हत्ती सोडून देववणें. हत्ती न सोडल्यास तुझें कल्याण होणार नाहीं." असें स्वामींचें पत्र जातांच, **का**न्होजी **आं**ग्रे ह्यांनीं **ज**यगडचे हवालदारास, पत्रदर्शनीं हत्ती स्वामींचे हवालीं करावा असा हुकूम पाठविला. त्याप्रमाणें त्यांनीं हत्ती स्वामींचे स्वाधीन केला.

हत्ती घेऊन स्वामी दोनचार दिवसांनीं **गो**वळकोट येथें आले व लगेच **सि**द्दी **सा**त ह्यास बोलावणें पाठवून हत्ती त्याचे स्वाधीन केला. तेव्हां **सि**द्दी **सा**त फार लाचार होऊन स्वामींस शरण गेला; व अविवेकानें केलेल्या अन्यायाबद्दल पश्चात्ताप पावून, "तकसीर माफ करावी" ह्मणून स्वामींची प्रार्थना करूं लागला. त्यानें **प**रशुराम येथील देवब्राह्मणांचा उच्छेद करून तें महास्थान अगदीं भ्रष्ट करून टाकिलें, ह्यामुळें स्वामींस अतिशय दुःख झालें होतें. त्यामुळें त्यांनीं, "तुझा हत्ती आह्मीं आणिला तो घेणें. तूं अविचार करून देवब्राह्मणांचा उच्छेद केलास. अतःपर तुझाही उच्छेद लवकरच होईल!" असा शाप देऊन ते **प**रशुरामास निघून गेले.

**प**रशुरामीं येतांच तेथें झालेला अनर्थ स्वामींच्या दृष्टीस पडला. तो पाहून स्वामींस अत्यंत दुःख झालें. सर्व देवालय खणून टाकिलें असून देवाच्या मूर्तीं फेंकून दिल्या आहेत, आणि **चि**मणाजीपंत, **बा**पूजीपंत वगैरे दोन तीन कारकूनमंडळीस मरेमरेतों मारल्यामुळें त्यांची कंठगत प्राण अशी स्थिति झाली आहे,

हा शोचनीय देखावा अवलोकन करितांच स्वामींच्या अंतःकरणांत अनिवार दुःखवेग उत्पन्न होऊन, ते झालेला वृत्तांत कळविण्याकरितां **दं**डा**रा**जपुरीस **सि**द्दी **या**कूदखान ह्याजकडे गेले, आणि तेथें बहुत क्रोधयुक्त शापोक्ति वदले. **सि**द्दी **या**कूदखान स्वामींचा भक्त असल्यामुळें त्यास **सि**द्दी **सा**त ह्याची वर्तणूक नापसंत होऊन, त्यानें स्वामींस विनंति केली कीं, "मजला न विचारितां हें कृत्य **सि**द्दी **सा**त ह्यानें केलें. त्याचें पारिपत्य करितों. जें नेलें असेल तें माघारें देववितों. स्वामींनीं स्वस्थ चित्त करावें. गुन्हा माफ करावा." ह्यावर स्वामी बोलिले कीं, "तुह्मी **ह**बसी लोक, बेइमान, अविचारी. तुमचे राज्यांत राहणार नाहीं. अतःपर तुमचें कल्याण नाहीं." ह्याप्रमाणें स्वामींचें भाषण ऐकून **खा**न ह्यानें **सि**द्दी **सा**त ह्यास मोठ्या जरबेनें असें पत्र लिहिलें कीं, "मुल्ला-गो-फकीर लोक यांचें बहुत प्रकारें आह्मी चालवीत आलों. पुढेंही ज्यादा चालवणें अवश्यक असतां, त्यांचे दरगियास स्वारी पाठवून, तसनस करून चीजवस्त नेली याचें कारण काय? उपरी देखतपत्र यांची **प**रशुरामींहून चीजवस्त, जराबाजरा सुतळीचा तोडा आदिकरून, झाडून माघारी देऊन, पावती घेऊन हुजूर पाठविणें. दिकत करून दिसगत केलियासी तुझा बळजा होणार नाहीं. तंगकरी देऊन पारिपत्य होईल." असें पत्र जातांच **सि**द्दी **सा**त ह्यानें झाडून सर्व चीजवस्त **प**रशुरामीं पाठवून दिली, आणि स्वामींनीं देवाकरितां रत्नजडित हिऱ्यांचीं तीन मूल्यवान् पदकें केलीं होतीं तीं मात्र **खा**नाकडे पाठवून दिलीं. **खा**नांनीं तीं स्वामींपुढें ठेविलीं. परंतु देवाचीं पदकें **य**वनानें आपल्या उपभोगार्थ नेलीं, तीं देवाच्या उपयोगाचीं नाहींत, असें सांगून स्वामींनीं तीं **खा**नास व त्याच्या पुत्रास बक्षीस दिलीं. ह्या पदकांची किंमत पंचवीस हजार रुपये होती. ह्याप्रमाणें स्वामींनीं **सि**द्दी **सा**त ह्याची खोड मोडून व देवाची बहुतेक चीजवस्त पुनः परत घेऊन **या**कूदखान ह्याचा निरोप घेतला. त्यानें झालेल्या अपराधाबद्दल स्वामींची विनयपूर्वक क्षमा मागितली व त्यांस **प**रशुराम येथील आपलें स्थान सोडून जाऊं नये ह्मणून आग्रहपूर्वक विनंति केली.

स्वामी श्री **प**रशुरामास आले, व तेथें पूर्ववत् देवस्थानची यथासांग स्थापना करूं लागले. परंतु **सि**द्दी **सा**त ह्यास **दं**डा**रा**जपुरी येथें झालेला प्रकार

असह्य होऊन व त्यांत स्वामींनीं आपली मानखंडणा केली असें वाटून, त्यानें स्वामींस अप्रत्यक्ष रीतीनें उपसर्ग देण्याचा क्रम आरंभिला. शामल दुष्टबुद्धि, बेइमान हें चित्तांत आणून व आतां परशुरामीं आपला निभाव लागणें कठीण आहे असें पाहून, स्वामीनीं शाहु महाराजांची भेट घेण्याकरितां व धावडशी येथील व्यवस्था पाहण्याकरितां महाराष्ट्रांत गमन करण्याचा संकल्प केला.

वर दिलेली हत्तीच्या भांडणाची हकीकत स्वामींची बहुतेक कारकीर्द प्रत्यक्ष पाहिलेले त्यांचे कारकून जगन्नाथ चिमणाजी भागवत ह्यांनीं स्वतः लिहिलेल्या बखरीच्या आधारानें लिहिली आहे. ही सर्व खरी असून ह्यासंबंधाचीं पत्रेंही आह्मांस धावडशी संस्थानच्या दप्तरांत सांपडलीं आहेत. हत्तीच्या कारणावरून सिद्दी सात ह्यानें श्री परशुराम येथील देवालयाचा माघ वद्य चतुर्दशीस ह्मणजे शिवरात्रीचे दिवशीं विध्वंस केला. ह्या मित्तीच्या अगोदर सिद्दी सात ह्यानें हत्तीबद्दल दस्तक देण्याविषयीं विशाळगड येथील प्रतिनिधीस लिहिलेलें पत्र आह्मांस उपलब्ध झालें आहे. तें येणेंप्रमाणें:—

"पंडित अजम अकरम गंगाधर कृष्ण दाम मोहबत हु

छ मोहिबान पन्हा मुखलिसान दस्तगाह अजी दिल एखलास सिद्दी सात सुभेदार सलाम बादज सलाम खैर अंज्याम सुहुर सन सबा इशरीन मिया व अलफ, अंकीं येथील खैरसल्ला जाणवून मोहिब आपली खैरसल्लीं कलमीं मरकूम करीत असिलें पाहिजे. दिगर मोहिबीं किताबत छ० ९ रबिलावलची मरसूल केली ते नेकसात वारीद होऊन खुषवख्ती बिशियार जाहली. सावनूर बंकापुराहून हत्ती व तहयेफे यावयाचा ऐसे. त्याचे दस्तकाबाबें व तिकडून आरामशीर येऊन पोहोंचावयाचे बाबें दोस्तीचे जागां मोहिबास कलमीं केलें होतें. त्याचा जबाब कलमीं केला कीं, "फिलबाल पनाळेयाचें दस्तक पाठविलें असे. पंडित अजम कृष्णाजी परशुराम प्रतिनिधि महाराजे यांचे मलाजमतेस गेले असत. तेथून महाराजे यांचेंही दस्तक व बाजेसरदारांचीं दस्तकें पाठवितील. मोहिबीं हत्ती आणावयास लोक रवाना करावयाचे ते केले पाहिजेत. येथें आल्यावर त्याजबराबर मुद्दाम माणसें देऊन रवानगी करून हत्ती आणवून रवाना करूं." ह्मणून कलमें केलें. तर येकिन आहे कीं दुतर्फा दोहीं ज्यादा दोस्तीचा तरीका चालत आहे तेथें हें कामसें काय आहे? आणखीही कितेक

कामांची सर्बराय मोहिब करतील. ऐसी दोस्तीचे जागां ईजानेबांस येकिन आहे. हल्लीं मोहिबीं कलमीं केलें यावरून हत्ती व तहिफे आणावयास येथून **कृ**ष्णाजी **न**रहरी व **सं**कराजी **ता**नप्रभू वगैरे लोकां व सोबत मोहिबीं दस्तकें पाठविलीं होतीं तीं देऊन मोहिबांनजीक रवाना केले आहेत. हे मोहिबांनजीक पोहों-चल्यावर मु[ख?]जबानी दोस्तीचे सकून आयां करितील, त्यावरून माल्हूम होईल. तर तवजेःकरून यांसोबत स्वारांचा दरया ठिकाणलग देऊन, तिकडून आरामसीर हत्ती घेऊन येत ते बात केली पाहिजे. दराज काय लिहिणें? प्यार मोहबत असों दिली पाहिजे. रवाना छ० २७ रबिलावल हे किताबत."

ह्या पत्राची मुसलमानी तारीख छ० २७ रबिलावल सन सबा अशरीन ह्मणजे ता० ११ माहे नोव्हेंबर इ० स० १७२६ ही आहे. ह्या पत्रावरून हत्तीची आख्यायिका अगदीं खरी आहे हें चांगलें सिद्ध [१]होतें.

स्वामी **पर**शुरामास येऊन व तेथील छिन्नविछिन्न प्रकार पाहून नंतर **दंडा-राज**पुरीस **सिद्दी याकू**दखान ह्याच्या भेटीस गेले. तेथून **सिद्दी सात** ह्यास तंबी देववून व देवाची मालमिळकत परत मिळविण्याची व्यवस्था करून ते **गो**-

---

१. स्वामी महाराष्ट्रांत येऊन धावडशी येथें राहिल्यानंतर जंजिऱ्याच्या हब-शांनीं त्यांस परशुरामीं येऊन राहण्याबद्दल अनेक पत्रें पाठविलीं व त्यांची परोप-रीनें विनवणी केली, हें स्वामींच्या व हबशाच्या पुढें झालेल्या पत्रव्यवहारावरून दिसून येतें. (लेखांक २४०–२५३ पहा). स्वामीही त्यांच्याशीं गोडीगुलाबीनें वागून आपला कार्यभाग साधून घेत असत. कारण, स्वामींचा संबंध तिकडे असल्यामुळें त्यांस हरहमेशा त्यांच्याकडून त्रास पोहोंचण्याची भीति असे. मराठ्यांचीं व हबशांचीं जीं राजकारणें घडून आलीं त्या सर्वांमध्यें स्वामींचें बरेंच अंग असे. अशाच राजकारणनिमित्तानें स्वामींनीं नारो विठ्ठल प्रभु नांवाच्या कोंकणांतील मुत्सद्यास एक पत्र लिहिलें आहे. तें इ० स० १७३१ मधलें असावें असें वाटतें. ह्या पत्रामध्यें स्वामींनीं गायकवाडाकडील कांहीं मज-कूर लिहिला असून पुढें हबशासंबंधाचा मजकूर लिहिला आहे. त्यांत हत्तीच्या भांडणाचा उल्लेख करून त्याचें थोडक्यांत सिंहावलोकन केलें आहे. ह्या एका पत्रा-वरून आह्मीं वर दिलेल्या हकीकतीस उत्तम पुष्टि मिळते. ह्मणून हें पत्र जसेंच्या तसेंच येथें दिलें आहे:—

## श्री भार्गवराम.

श्रीमत् परमहंस स्वामी यांहीं:—

सहस्रायु चिरंजीव नारो विठ्ठल प्रभु यांसी आज्ञा केली ऐसीजे:–तुह्मीं पत्र पाठविलें प्रविष्ट होऊन लिहिलें वर्तमान विदित जाहलें. अद्यापि दमाजी गायकवाड या करवीं तुमचें बरें केलें नाहीं, आणि तुमची इतकी निष्ठा बैसावयासी कारण काय? चिपळूणचें सविस्तर वर्तमान लिहोन पाठविलें. तर आह्मीं कांहीं तुह्मांस सांगितलें नाहीं, आणि तुह्मीं स्वत:च लिहोन पाठविलें. येणेंकरून आमची तुह्मांस पोटतिडीक आहे ऐसें दिसोन आलें. रुद्राजी कर्ता आहे. तो घरींहून फिरोन येईल. ज्येष्ठमासीं येतों ह्मणून कबूल केलें आहे. तो आलियाउपरी त्यासी सोनगडास पाठवूं. तों दमाजी गायकवाडही सोनगडीं येतील. तुमच्या कामास चुकणार नाहींत. दरबारची बोली छत्रपति बोलिले तें लिहिलें. तर फार उत्तम. दाभाड्याचा मजकूर लिहोन पाठविला. तर होणारास उपाय नाहीं. वासनेसारिखें फळ प्राप्त होतें. दोन तीन वर्षें कोठें पर्यटणास गेलों नाहीं. खर्च तो अनिवार. कारखाने चालिले पाहिजेत. याकरितां बाजीराव आले ह्मणजे पुढें स्वारीस जाणार. तुह्मीं कोंकणचे कामांत मन घातलेंत. उत्तम जाहलें. परंतु वकिलाजवळ बोली करून येणेंप्रमाणें करून आणविलें तरीच आह्मी मान्य असों. नाहींतर आह्मांस तरी अगत्य काय? पेढें, आंबडस, नायसी, कळंबुसी इतके चार गांव दरोबस्त कुलबाब कुलकानू खानानें आह्मांस परवाने करून देऊन सुदामत चालविले. त्याच प्रकारें ताजे परवाने पेढें, आंबडस व नायसी कळंबुसी ह्या चारी गांवचे परवाने कुलबाब कुलकानू दरोबस्त द्यावे. सिद्दी सुरूर उंदेरीस किल्लेदार होता. तेव्हां आमचा दुवा घेतली. मग तख्त जंजिरा जाहला. मग तो आमचें फारसें चालवावयासी लागला. तिनी गांव दिले. कळंबुसीच्या सनदा जाहल्या. शिक्के करावे तों सिद्दी सात यांणीं अंदेशा सांगोन पाठविली. त्यावरून सनदा राहिल्या. आह्मीं वरघांटें आलों. तर हल्लीं चौ गांवच्या सनदा आणून द्याव्या. सिद्दी साद याणें आह्मांस हत्तीस पाठविलें. आह्मी हत्तीस जाऊन हत्ती आणिला. तो हत्ती आंगरे यांणीं आह्मांपासून नेला. फिरोन मागती आंगरे याकडून हत्ती आणून सिद्दी साद यासी दिला. ते समयीं

ठण्यास गेले. तेथें **कान्होजी आंग्र्या**ची भेट घेऊन ते **गोमांतक** प्रांतांत गेले. व तेथून **कोल्हापूर** मार्गानें फाल्गुन महिन्याच्या वद्य पक्षांत **धावडशीस** आले. स्वामी ह्या वेळीं **गोमांतकां**त कोणत्या उद्देशानें गेले हें समजत नाहीं. **धावडशीस** आल्यानंतर स्वामींची व **शाहु** महाराजांची फाल्गुन वद्य ९ रोज बुधवार ह्मणजे ता० ६ मार्च इ० स० १७२७ ह्या दिवशीं भेट झाली. ह्या भेटीचें वर्णन स्वामींनीं **कान्होजी आंग्र्या**च्या पत्रांत लिहिलें आहे (लेखांक २०१). त्यावरून **शाहु** महाराजांची स्वामींविषयीं सप्रेम भक्ति होती असें दिसून येतें. ह्या वेळीं स्वामींनीं **शाहु** महाराजांजवळ आपला सर्व वृत्तांत निवेदन केला असावा. तो ऐकून महाराजांनीं **महाराष्ट्रां**त राहण्याबद्दल स्वामींचें मन वळविलें असावें असें अनुमान होतें.

स्वामी ज्येष्ठ मासीं पुनः **परशुरामा**स आले. परंतु त्यांस **सिद्दी सात** ह्याचें वर्तन सौम्य व सरळपणाचें न वाटून, उलट फार भयंकर दिसूं लागलें. तेव्हां त्यांनीं आपली कारकूनमंडळी व त्यांचीं कुटुंबें **धावडशीस** पाठविण्याची व्यवस्था केली; व आपण एकटेच **परशुरामीं** राहून देवाच्या दागदागिन्यांची

---

आमचे बारा हजार रुपये व वानीवस्त देवळीहून नेली व कितेकांस कष्टी केलें. आणखी कितेक आह्मांवर तुफानें घेतलीं. हें वर्तमान खानास कळतांच त्यास पत्र पाठवून नशेध करून आमची वानीवस्त फिरोन दिली. ऐसें खानानें आमचें चालविलें. आह्मांस खानानें पत्र पाठविलें जे, 'हुजूर मुलाखत येणें. आणखी दोन गांव दुसरे देतों.' त्यास आह्मांस जावयासी अनुकूल पडलें नाहीं. जर जातों तर दोन गांव देतेच. ते कांहीं चुकतेना. बरें, गत गोष्ट गेली! हल्लीं आमची कोठी परशुरामीं होती. ती हबशी यांणीं नेली. भात खंडी १० व नागली खंडी १० वगैरा गेले. देवाचा नगारा व भांडीं (तोफा) २ व दरवाजा थोरला नेला आहे तो फिरोन द्यावा. भार्गव कोंकणचा राजा. श्रीपतराव उदंड यत्न करून चिट्या घालीत. त्यासी नये ह्मणून सांगितलें. सिद्दी साद बोलिला जे, "जर वेढा मराठ्यांचा उठला तर बारा गांव इनाम देतों, व पहिलेंपरिस अधिक देवाचें चालवूं." ऐसें बोलिला. लोकांस पुसोन पाहणें. एवढें काम जाहल्यावर मग भेटीस येणें. वकिलास भेटीस आणितां तर त्याचें प्रयोजन भेटीचें काय? लिहिल्याप्रमाणें मान्य केलें तर आह्मी मान्य असों. हे आज्ञा.

व इनामगांवाची वगैरे काय तजवीज करावी ह्याचा विचार करूं लागले. इकडे **सि**द्दी **सा**त ह्यानें स्वामींनीं आपली मंडळी देशावर पाठविली हें पाहून, त्यांना व त्यांच्या देवस्थानास अधिक अधिक पीडा देण्यास प्रारंभ केला. स्वामींची कारकूनमंडळी देशावर निघून गेली ह्मणून इतर ब्राह्मण अगदीं भयभीत झाले, व तेही पळून जाऊं लागले. तेव्हां **सि**द्दी **सा**त ह्यानें त्यांस **अं**जनवेलीस बोलावून त्यांना छ० १६ रबिलावल समान अशरीन ह्मणजे ता० १९ नोव्हेंबर १७२७ रोजीं एक अभयपत्र लिहून दिलें. तें येणेंप्रमाणेंः—

"हे कौलनामा अज सुभा मामले **दा**भोळ व प्र॥ **रा**जापूर ता०...... भटब्राह्मण वगैराऱ्यांनीं कसबें **चि**पळूण सुहुर सन समान अशरीन मया व अलफ बादे कौलनामा ऐसाजेः—तुमचे बाबें **स**दाशिवभट **अ**ग्निहोत्री व **आ**पा **जो**शी व **वी**रेश्वरभट व **गो**पाळभट **थ**त्ते व **म**हादेऊभट **ग**णफुले साकीन कसबे **चि**पळूण सुभा किल्ले **अं**जणवेली मुकामीं येऊन अर्ज केला कीं, **गो**सावी मु॥ **प**रशुराम यांणीं आपले कारकून घांटावरी घालविले; वगैरा रयतही घालविली आहे. यामुळें भटब्राह्मण वगैरा रयत कसबे मजकूरची व **पे**ठें मजकूराची शकदील होऊन तजावजा जाली आहे. जरी साहेब मेहरबान होऊन कौल मऱ्हामत केला तरी भटब्राह्मण वगैरा रयत कसबे मजकूरची व **पे**ठें मजकूरची जागाचे जागा सुखरूप राहून कीर्दीमामुरी करील. ह्मणून अर्ज केला. त्यावरून खातिरेस आणून, मामुरीवर नजर देऊन, तुह्मांस कौल सादर केला असे. तरी तुह्मीं कोणे बाबें शक न धरितां बेशकपणीं कसबे मजकुरीं व **पे**ठें मजकुरीं खुशाल राहणें. **गो**सावी यांनीं साल गुदस्तां आपले कारकुनांस घांटावर जावयाबद्दल दस्तकें घेतलीं आहेत. त्यास ...(साल गुदस्ता) गेले नाहीं. सालमजकुरीं गेले. त्यांचे कारकून गेले तर गेले! अगर गोसावी आहे. मन मानेल तेथें जाईल! त्याचें काय आहे? याच सबबीनें तुह्मीं तजावजा होऊन बेदिल व्हावें ऐसें नाहीं. तुह्मीं कसबे मजकुरीं व **पे**ठें मजकुरीं बेशकपणें खुशाल राहाणें. कोण्हे बाबें शक अंदेशा न धरणें. दरिबा हे कौल असे. र॥ छ १६ रबिलाखर".

ह्यावरून **सि**द्दी **सा**त स्वामींविषयीं किती बेफिकीरपणानें वागत होता हें दिसून येतें. "गोसावी आहे. मन मानेल तेथें जाईल! त्याचें काय आहे"

हे शब्द किती उर्मटपणाचे आहेत हें चतुर वाचकांस सांगावयास नकोच. ह्याच शब्दांवरून त्याचें व स्वामींचें बिलकुल रहस्य राहिलें नसावें हें अगदीं स्पष्ट दिसून येतें.

**प**रशुरामाहून स्वामींची कारकूनमंडळी निघून गेल्यानंतर **पे**ढें येथें राहिलेल्या स्वामींच्या लोकांस **सिद्दी सा**त ह्यानें नानाप्रकारानें त्रास देण्यास सुरुवात केली. **सिद्दी सा**त हा **या**कूदखानाचा ताबेदार असल्यामुळें व त्याचें व स्वामींचें चांगलें रहस्य असल्यामुळें त्याला प्रत्यक्ष कांहीं करितां येईना. ह्मणून त्यानें **पे**ढें येथें **हु**सेन[1] नांवाचा एक **मु**लाणा उभा करून त्याजकडून स्वामींचा विश्वासू ब्राह्मण **बा**पू **जो**शी ह्यास घसघस लाविली. हा स्वामींच्या आश्रयानें **पे**ढें येथें शेतें भातें करीत असे. त्याच्या शेतावर **मु**लाण्याकडून हक सांगून त्यास **अं**जनवेली सुभ्यास पकडून नेलें व त्यास दहा रुपये दंड करून त्याजकडून एक बळजबरीनें कतबा लिहून घेतला. तो येणेंप्रमाणेंः—

**हु**

“ अज सुभा मामले **दा**भोळ व प्रांत **रा**जापूर दमहम **बा**पू **जो**शी साकीन मौजे **पे**ढें तर्फ **चि**पळूण सु॥ समान अशरीन मीया व अलफ कारणें साहेबाचे बंदगीस लिहून दिला कतबा ऐसाजेः— **मु**लना **हु**सेन **पे**ढेंकर यांचीं शेतें मशिदीचीं **पे**ढें यांत असत. त्यापैकीं एक दोन शेतें कमीनाखालीं कुणबावेयास कमाविसीस आहेत. त्यास हल्लीं **मु**लना **हु**सेन सुभा येऊन जाहिर केलें कीं, मशिदीचीं शेतें जोरावारीनें **बा**पू **जो**शी खातो. यापासीं आपण शेतें सोडून देणें ह्मणून बोलत होतों. परंतु शेतें न सोडी. ऐसें जाहीर केलें. त्याबद्दल कमीनास सुभा आणून हकीकत पुशिली. तरी आपण कांहीं **पे**ढें याचा

---

१. मुलना हुसेन पेढेंकर हा मुसलमान इसम परशुराम येथील हिंदुलोकांस स्वामी वरघाटें आल्यानंतरही वारंवार उपद्रव देत असे. स्वामींनीं ह्याबद्दल पुनः सिद्दी सात यांजकडे तक्रार नेली होती असें लेखांक २४९ वरून दिसून येतें. सिद्दी सात ह्यानें, तो “खपती, दिवाणा, बेशौर” ह्मणजे अगदीं वेडा आहे अशा अर्थाचे उद्गार काढून, स्वामींचें समाधान केलें आहे. परंतु हा सर्व लाघवी प्रकार असावा असें वाटतें.

मिरासदार खोत नव्हे. वरकड सारे कुणबावेकरी तैसा आपण. शेतें कुणबाव्यानें करितों. **मु**लना यांणीं कांहीं आपणास शेतें मशिदीचीं सोडून देणें ऐसें मुजाहिम जाहलें नाहीं. जर शेतें मशिदीचीं सोडून देणें ऐसें होईल तरी आपण तींच शेतें कशास करितों? कुणबावा करणें तेव्हां दुसरीं शेतें करितों. आंमा **मु**लना यांणीं हटकिलें नाहीं. मशिदीचीं शेतें सोडून देणें ऐसें याणीं हटकिलें, आणि आपण जोरावारीनें शेतें करितों, ऐसा शाबीद होऊन आपणावर खेरें जाहलें तर आपण सरकारची गुन्हेगारी रुपये ४०० चारशें देईन. हा लिहून दिला कतबा. सही छ० २१ साबान.

शाबिदी.

| **ये**साजी **सू**र्याजी **च**व्हाण **कों**कणराव **दे**साई मामले **ह**मजाबाद. १. | **ब**हिरोबा **ना**ईक पोतदार. सुभा १. ” |
|---|---|

ह्याप्रमाणें स्वामींस अनंत प्रकारें त्रास पोहोंचूं लागला. त्यांतच पाथरवटासंबंधानें **रा**जपुरीचे थोरले **खा**न ह्यांचा व स्वामींचा कांहीं बेबनाव झाला. तेव्हां **ह**बशांच्या राज्यांत राहणें आतां योग्य नाहीं असें वाटून, त्यांनीं श्रीमंत **बा**जीराव **पे**शवे ह्यांस एक यादी पाठविली. ह्या यादीमध्यें त्यांनीं **ह**बशाच्या उपसर्गाचें वर्णन लिहिलें आहे. तें वाचून त्या वेळच्या स्थितीचें चित्र डोळ्यांपुढें मूर्तिमंत उभें राहतें. ही यादी फारच महत्त्वाची आहे. ती येणेंप्रमाणें:—

“ यादी दास्तन.

गतवर्षी हत्तीमुळें गर्गशा आह्मांवर **सि**द्दी **सा**द याणें करून श्रीस्थळीं उपद्रव दिला. तो तुह्मांस परस्परें विदित झालाच आहे. त्या दिवसापासून आह्मांजवळ घसघस लावून आजिवर कष्टी करीतच आहे. हल्लीं गांवामध्यें **मु**लना **पे**ढेंकर यास शिखवून, त्याणें **बा**पू जोशी यांसीं घसघस ‘आपलीं शेतें भातें वतनीं तुम्ही करितां हे आपली द्या. नाहीं तर सुभा चला.’ असें सांगून, आपण **अं**जनवेलीस जाऊन **बा**पू **जो**शी यांस दहा रुपये मसाला करून देऊन मनसुभी आरंभिली जे, ‘**मु**लनाचीं शेतें वतनीं तुह्मीं कां करितां?’ **बा**पू **जो**शी बोलिला जे, ‘हें शेतें पुरातन आपलीं आहेत.’ त्याजवर कतबा लिहून घेतला! आणि मनसुभी लटकी करून **बा**पू **जो**शी याणें कतबा लिहून दिला आहे. त्याजवळ रुपये चारशें मागतो. आह्मांस पत्र लिहिलें आहे जे, ‘तुह्मी घडींघडीं

राजपुरीस आमचे चुकल्या लिहून आह्मांस नशेदपत्रें आणितां. याजकरितां हुजूर पत्र लिहिलेंत ह्मणजे आपणास बोल नाहीं!' ऐसें दबविलें. व 'चारशें रुपये बापू जोशी गुन्हेगारी देईल. नाहीं तर तुह्मीं देणें. नाहीं तर भेटीस अंजणवेलीस येणें'. ऐसें म्हणतो. ऐशास त्याचे भेटीस आह्मांस जाणें नाहीं. अनादर करील. गांव तो धास्तीनें वोस पडत चालला! ब्राम्हण दहावीस आहेत. ते जाऊं म्हणतात. मुलनास गांवची खोती दिली. आह्मांदेखत वेटबेगार गांवची नेतो. हें आह्मीं कैसें सोसावें? याजकरितां आम्ही श्रीस्थळीं राहावें ऐसें नाहीं! टाकावें तर एक प्रकार दिसतें. यास काय करावें? राहावें कीं निघोन वरतें यावें तें लिहिलें पाहिजे. तुम्हीं सांगाल त्याप्रमाणें वर्तणूक करूं.

भाद्रपद मासीं राजपुरीहून याकूदखान यांणीं आह्मांस पत्र घरोबानें लिहिलें जे, "आपलें घुमटाचें काम होणें आहे. तरी आपणास चाळीस पन्नास पाथरवट चाकर आणून पाठवणें." त्यास आम्ही लिहिलें जें, "गतवर्षी बाजीरायाकडून पाथरवट आणिले होतेत. त्यांस रजा न द्या, (तेव्हां) पळोन गेले. ह्मणून धरून आणून अडकविलेत. याजकरितां खालें कोणी न येत. त्यास त्याचा परिहार लिहोन, जातील तेव्हां सुखरूप जावे म्हणून अभय...पाठविलें. तें वरून आम्हीं सातारा पाथरवटाचे यत्नास माणसें पाठविलीं. त्रिंबकजी साळकर यास सांगोन पाठविलें. त्यांपैकीं एक मल्हारजी पाथरवट राजपुरीस जाऊन बोलीचाली करून, त्याचा कौल घेऊन, दोनशें रुपये अंजणवेलीस रुपयांची चिठी आम्हांकडे पांचशें रुपये देणें ऐसा कागद घेऊन आला. दोनशें अंजणवेलीचे रुपये व तीनशें आम्हांकडील येणेंप्रमाणें पांचशें रुपये घेऊन जाऊन पंचवीस पाथरवट घेऊन देवळीं आला. आह्मीं त्यांस सांगितलें जे, "तुमचे चित्तास येईल तरी जाणें. न ये चित्तास तर रुपये परतून देणें." त्यास रुपये वांटून घेतले. जायास मान्य झाले. त्यांचे आम्ही सर्फराजी करून बरोबर माणसें देऊन रवाना राजपुरीस केलें. तेथें त्यांणीं मन माने त्या तैनाता मागितल्या. ते मान्य न करीत. माघारे जा म्हणत. शेवट पंधरा दिवस राहोन खानांहीं महिना केला. तो कबूल करून कामावर लागले. दुसरे वांटणी रुपये चारपांचशें घेतले. ऐसें बाधवत केलें. चाकरी तो झाली नाहीं. आणि आम्हांस ह्मणतात घेऊन जा. तर त्याचे रुपये पावले ते मागणार. ते कोणीं द्यावे? पाथरवटांजवळ

कांहीं नाहीं. आणि येथें सातारा त्याचे बापभाऊ आहेत ते म्हणतात: " आमचे पाथरवट आणा; नाहीं तर आम्हीं महाराजांजवळ सांगोन तुमचे गांवी कौल पाडूं." यास आमचा अन्याय काय? पुढें पाथरवट कैसे येतात? याची तजवीज काय करावी? आमचा तो यत्न नाहीं! तुम्ही इलाज लिहून कराल कीं काय? नाहीं तर कलमाह (?) यास लिहिलें तर कांहीं त्याचे बद्दल होईल कीं काय तें लिहिलें पाहिजे.

येणेंप्रमाणें चित्तांत आणून आह्मीं पुढें काय करावें तें लिहिलें पाहिजे. कांहीं सुचत नाहीं! आजीवर श्रीजवळ मागत होतों जे, बाजीरायाचे पदरीं यश पडावें आणि आम्हांस त्यांणीं सुखी श्रीस्थळीं राहावें ऐसें करतील. श्रीनें यश दिलें. आतां याचा उपराळा होऊन आमचें राहणें होत असेल तर करावें. नाहीं तरी काय तें लिहिलें पाहिजे ".

वरील पत्र पाठविल्यानंतर बाजीराव पेशवे ह्यांजकडून स्वामींस कोंकणप्रांत सोडून देशावर येण्याबद्दल उत्तर आलें. नंतर स्वामी श्री परशुराम येथील देवस्थानाची नीट व्यवस्था करून व तेथें आपल्या वतीनें गणेश बल्लाळ तां[illegible] नामक एक कारकून ठेवून साताराप्रांतीं गेले. देवाची सर्व चीजवस्त त्यांनीं आंग्रे ह्यांचे ताब्यांतील रसाळगड किल्ल्याचा सुभेदार संभाजी शिंदे ह्याजवळ ठेविली. ह्या सुभेदाराची स्वामींवर फार निष्ठा होती. धावडशीस गेल्यानंतर स्वामींचा ह्या सुभेदाराशीं एकसारखा पत्रव्यवहार चालत असे. एवढेंच नव्हे तर धावडशीहून देवाकरितां मिळेल तें भिक्षाद्रव्य व इनाम गांवाचा वसूल स्वामी त्याकडेच पाठवीत असत. गोठणें व परशुराम येथील देवस्थानावर देखरेख ठेवणें, कोंकणांतील स्वामींच्या गांवांचा वसूल घेणें व त्यांची व्यवस्था करणें, आणि आंग्रे व हबशी ह्यांच्या कडील बातमी पोहोंचविणें

---

१. पाथरवटासंबंधानें स्वामींचा व हबशाचा पत्रव्यवहार ह्या पूर्वीं झाला होता असें लेखांक २५३ वरून दिसतें. ह्या लेखांकाची तारीख छ० २९ माहे मोहरम सन ९ जुलूस ह्मणजे ता० ५ सप्टेंबर इ० स० १७२७ आहे. ह्या वरून हा पाथरवटासंबंधाचा त्रास स्वामींस केव्हां झाला हें कळून येतें. ह्या नंतर एक दोन महिन्यांनीं ही यादी स्वामींनीं बाजीराव पेशवे ह्यांस पाठविली असावी.

हीं कामें **संभाजी शिंदे** ह्यांजकडे सोपविलेलीं असत. येणेंप्रमाणें **कों**कणांतील व्यवस्था आटोपून व **कों**कणांतील आपले प्रिय मित्र **कान्होजी आंग्रे** ह्यांचा निरोप घेऊन स्वामी देशावर येण्यास निघाले. **कान्होजी आंग्रे** व स्वामी ह्यांचा पुष्कळ वर्षांचा स्नेहसंबंध असल्यामुळें त्यांची परस्परांवर फार भक्ति जडली होती. स्वामींसारखा महात्मा **आंग्रे** ह्यांस वारंवार हितमंत्र सांगावयास व संकटप्रसंगीं धीर द्यावयास असल्यामुळें, त्यांचा वियोग **आंग्रे** ह्यांस दुस्सह वाटावा हें अगदीं साहजिक आहे. **आंग्रे** ह्यांजकडे स्वामींचें बरेंच द्रव्य येणें होतें. त्याच्या व्याजाचा हिशेब त्यांस मिळाला नव्हता. तो द्यावा व **आंग्र्यां**च्या लोकांनीं हत्ती अडविल्यामुळें स्वामींचें झालेलें पंचवीस हजारांचें नुकसान, **आंग्रे** ह्यांनीं देवास एखादें गांव इनाम देऊन, त्या रूपानें भरून काढावें अशी स्वामींची इच्छा होती. त्याप्रमाणें स्वामींनीं **आंग्रे** ह्यांस पत्र पाठवून ' पूर्व ऋणानुबंधसंबंधेंकरून **कों**कणांत येणें जाहलें, व तुह्मांकडेस तुलसीदल आहे तें नकदी तुह्मांकडेस आहेच. ( त्याचा ) व्याजाचा हिशेब येणें व हत्तीमुळें पंचवीस हजार रुपये पडिले ( ह्याकरितां ) **गोटणें** श्रीस द्यावें. " असा आशय कळविला. त्यावर **कान्होजी आंग्रे** ह्यांनीं विनोदानें असें उत्तर पाठविलें कीं, " ऋणानुबंधेंकरूनच अवघे पदार्थ घडतात. ते गोष्टीचे सामान्यपक्ष असतील त्यांनीं सुखदुःख न मानावें. आणि स्वामी तो परमहंस, सुखदुःखातीत स्वामी असतां, क्षणक्षणा, फलाण्यानें फलाणें जाहलें, हत्तीमुळें फलाणें गेलें, याप्रकारें लिहून पाठवितात याचा विचार काय ? हा मोह मनुष्यास न व्हावा. यास्तव याविशीं कितेक श्रुतिस्मृति प्रवर्तल्या आहेत.

> **ऋणानुबंधिनः सर्वे पशुपत्निसुतादयः।**
> **ऋणक्षये क्षयं यांति का तत्र प्रतिवेदना ॥ १ ॥**

इत्यादिक शास्त्रार्थावरून कोणाचें काय गेलें व कोणीं नेलें ? या उपरी स्वामींस उचित नाहीं कीं, जाहले गोष्टीची क्षीत मानून लिहून पाठवावें. सर्व गोष्टीस भगवदिच्छा प्रमाण असे. वरकड, इकडेस तुलसीदल आहे त्याच्या व्याजाचा अर्थ लिहिला, तरी ऐसे विचार तोंडींच असत नाहींत. आमचें कांहीं लिहिलें पुसलें स्वामींजवळ असलें तरी आह्मीं व्याज देऊं; अन्यथा एक टकाहि व्याज देणार नाहीं. आम्हांजवळून प्रतिवर्षीं स्वामींस पावतें त्याचा आजतागायत

हिशेब करून स्वामीकडेस बाकी निघेल तें स्वामींस कळलीच आहे. **गो**ठ-ण्याचा मजकूर तरी, भटास दिली ओसरी तों भट पाय पसरी, हा लेख जाहला. असो. स्वामीपेक्षां आम्हास विशेष काय आहे? **गो**ठण्याची सनद पाठविली आहे."

ह्याप्रमाणें **का**न्होजी **आं**ग्रे ह्यांनीं स्वामींस विनोदाचें उत्तर लिहून **गो**ठणें गांवाची सनद पाठवून दिली. ही सनद आम्हांस मिळाली नाहीं. तथापि **का**न्होजी **आं**ग्रे ह्यांनीं **गो**ठणें गांव श्रीमत् **प**रमहंस **गो**सावी यांस सु॥ सन तिस्सा अशरीन मया व अलफ छ० २८ सफर रोजीं इनाम दिल्याबद्दलचा उल्लेख **प्र**तापजी **का**ळे नामजाद जंजिरे **वि**जयदुर्ग ह्यास लिहिलेल्या एका ताकीद-पत्रांत आहे. त्यावरून वरील पत्र व गांवची सनद हीं ता० २२ सप्टंबर इ० स० १७२८ ह्या एकाच तारखेचीं आहेत असें दिसून येतें; व **गो**ठणें गांव स्वामींस इ० स० १७२८ च्या अगोदर मिळालें नाहीं हें सिद्ध होतें.

स्वामींनीं देशावर येंत वेळीं **का**न्होजी **आं**ग्र्याचा निरोप घेतला, व त्याजकडून **का**न्होजी **भों**सले व **ना**रायणभट (हे प्रसिद्ध **ना**रायण **दी**क्षित कायगांवकर असावेत) ह्यांस पत्रें घेतलीं. स्वामी इकडे येण्यास निघाले, त्या वेळीं **का**न्होजी **आं**ग्रे ह्यानें "स्वामींनीं ते प्रांतीं जावून **सर्व जनांचा उद्धार करून** पुन्हां आगमनाचा विचारही अविलंबेंच केला पाहिजे" म्हणून आपली इच्छा प्रदर्शित केली. त्यावरून स्वामींविषयीं **आं**ग्र्याची भक्ति व स्वामींचा

---

१. 'ग्रंथमाला'–'मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें.' लेखांक १७९ ह्यामध्यें हें पत्र प्रसिद्ध झालें आहे. स्वामींचा व आंग्र्याचा जो दृढतर संबंध होता, त्यावरून ह्यांतील मजकूर विनोदाचा असावा असें वाटतें. स्वामीसारख्या अंतर्यामी पूर्ण वैराग्य बाणलेल्या पुरुषास कान्होजी आंग्र्यानें वेदांत शिकवावा असा अर्थ नव्हता. कारण स्वामींचा जो लोभ होता तो स्वतःकरितां नसून केवळ जगाच्या कल्याणाकरितां होता हें उघड आहे. तेव्हां हा विनोदाचाच प्रकार असला पाहिजे. तसा प्रकार नसता तर शेवटीं "स्वामीपेक्षां आम्हांस विशेष काय आहे?" असें म्हणून गोठण्याची सनद कान्होजीनें पाठविली नसती. विनोदाचा प्रकार नसेल तर कदाचित् रागानें किंवा त्रासानेंही तसें लिहिणें संभवनीय असूं शकेल.

महाराष्ट्रांत येण्याचा मुख्य उद्देश उत्तम प्रकारें दिसून येतो. अर्थात् हबशांच्या त्रासामुळें स्वामींनीं कोंकणप्रांत सोडला असें जरी बाह्यात्कारें प्रसिद्ध झालें, तरी स्वामींचा इकडे येण्याचा मुख्य हेतु अत्यंत पवित्र अशा देशकल्याणाचा होता ह्यांत तिळमात्र शंका नाहीं. जगाचा उद्धार हें ज्यांचें मुख्य व्रत, त्यांचा परोपकारावांचून दुसरा हेतु काय असणार? तुकाराम महाराजांनीं म्हटलेंच आहेः—

**जगाच्या कल्याणा, संतांच्या विभूती, देह कष्टवीति, उपकारें. ॥**

---

# भाग ३ रा.

## महाराष्ट्र-जन-चित्ताकर्षण.

ब्रह्मेंद्रस्वामी इ० स० १७२८ मध्यें कोंकणांतून महाराष्ट्रप्रांतीं आल्यानंतर साताऱ्यानजीक धावडशी येथें राहूं लागले. शाहु महाराजांनीं त्यांस धावडशी, अनेवाडी व वीरमाडें अशीं तीन गांवें पूर्वीं इनाम करून दिलीं होतीं. त्यांपैकीं धावडशी हें गांव निसर्गतःच शांत व रम्य असें असल्यामुळें तेंच स्वामींनीं आपल्या राहण्याचें मुख्य ठिकाण केलें. येथें स्वामींनीं एक वाडा, एक भव्य तलाव आणि एक लहानसें देवालय बांधिलें; व त्यानजीकच फुलझाडें वगैरे लावण्यास सुरुवात केली. स्वामी धावडशीस आले त्या वेळीं त्यांचा महिमा सर्व जनसमाजास श्रुत झालेला नव्हता. फक्त छत्रपति शाहु महाराज व त्यांच्या राण्या ह्या, स्वामींच्या ठिकाणीं दृढभक्ति ठेवून, त्यांच्या चरणीं सदैव लीन असत. स्वामींची योग्यता व महत्त्व सामान्य जनांस न कळल्यामुळें प्रथम प्रथम स्वामींस बराच उपद्रव झाला. धावडशी, अनेवाडी व वीरमाडें येथें स्वामींनीं अनुक्रमें चिमणाजी कृष्ण, संभाजी नारायण, आणि अंताजी नारायण भागवत हे कारकून गांवच्या व्यवस्थेकरितां ठेविले होते. परंतु त्यांना गांवकरी लोक जुमानीत नसत. एवढेंच नव्हे, तर ह्या प्रांताचे सुभेदार बाबाजी शिवदेव, यमाजी शिवदेव व भवानी शंकर हे देखील, स्वामी कोणीतरी गोसावी आहे असें समजून, त्यांच्या गांवास उपद्रव करीत असत. तेव्हां स्वामींनीं शाहु महाराजांकडे तक्रार नेली कीं, "हबशाच्या

त्रासामुळें **कों**कणप्रांताचा त्याग करून इकडे आलों, तों येथेंही अनिवार उपद्रव पोहोंचतो. ह्याकरितां आपलें राहणें येथें होत नाहीं." त्यावर **शा**हु महाराजांनीं स्वामींचें समाधान करून असें उत्तर पाठविलें कीं, "**य**माजी **शि**वदेव व **भ**वानी **शं**कर यांस स्वमुखें रुबरु आज्ञा करणें ते केली. याउपरी त्यांकडून कांहीं उपसर्ग होणार नाहीं. स्वामींनीं चित्त स्वस्थ करावें. उदासीनता सर्वथा न आणावी. स्वामींपेक्षां दुसरें अधिकोत्तर आहे असें नाहीं. स्वामी देवालयें, वापी, कूप, तटाकें, झाडझाडोरा लावितात, हे कीर्ति अक्षय करीजेती. यपेक्षां उत्तम काय आहे? आह्मांस या गोष्टीचा बहुतसा संतोष आहे" (लेखांक १). ह्याप्रमाणें स्वामींस **शा**हु महाराजांचें आश्वासन मिळाल्यानंतर स्वामींनीं **धा**वडशी, **अ**नेवाडी व **वी**रमाडें ह्या गांवीं देवालयें, विहिरी, तलाव, वगैरे बांधण्यास आणि जागोजाग फुलझाडें व फळझाडें लावण्यास सुरुवात केली. स्वामींस फलपुष्पांचा इतका नाद होता कीं सांगतां सोय नाहीं. किंबहुना, ह्या फलपुष्पांच्या प्रसादानें त्यांनीं **म**राठी साम्राज्याचा भव्य प्रासाद तयार करविला, असें ह्मटलें असतां क्वचितच अतिशयोक्ति होईल. स्वामींनीं जेथें जें उत्तम फुलझाड किंवा उत्तम फळझाड असेल, तेथून तें हरप्रयत्नानें आणवून, **धा**वडशी येथें सुंदर बगीचा तयार केला. त्यामुळें **धा**वडशी गांवास अतिशय रमणीयत्व प्राप्त होऊन तेथें जाणारास समाधान वाटूं लागलें. **शा**हु महाराज, त्यांच्या राण्या व सरदार हे स्वामींच्या दर्शनासाठीं वारंवार **धा**वडशीस जाऊं लागले. तेथील स्वामींचा पवित्र व स्वच्छ मठ, सुंदर व भव्य तलाव आणि रमणीय व मनोहर पुष्पवाटिका पाहून, कोणासही सकृद्दर्शनींच संतोष वाटूं लागला. नुसत्या परिस्थितींतच सर्व हृत्ताप दूर होण्यासारखी जेथें शक्ति, तेथें प्रत्यक्ष स्वामींच्या पुण्यदेहाचें दर्शन व त्यांच्या अमृततुल्य प्रसादवचनांचा लाभ झाल्यानंतर, तेथें मनुष्यमात्राच्या चित्तास परमानंद वाटून तें स्वामींच्या चरणकमलीं मिलिंदायमान व्हावें ह्यांत आश्चर्य तें काय? असो.

स्वामी कांहीं दिवस **म**हाराष्ट्रप्रांतीं प्रसिद्ध झाले नाहींत. परंतु हळू हळू त्यांच्या कीर्तीचा प्रसार **म**हाराष्ट्रमंडळांत होऊं लागला; व त्या वेळचे लहान मोठे सरदार स्वामींच्या दर्शनाची, त्यांच्या सदुपदेशाची, व त्यांच्या आशीर्वादाची, मोठ्या

भक्तिभावानें अपेक्षा करूं लागले. छत्रपति शाहु महाराज व त्यांचे पट्ट प्रधान बाजीराव पेशवे हे स्वामींच्या अर्थ्या वचनांत वागून त्यांच्या सदुपदेशानें चालूं लागले. त्यामुळें त्यांस मोठमोठ्या राज्यकारणांत यश प्राप्त होऊन मराठी राज्याचा अभ्युदय होऊं लागला. त्या योगानें त्यांची स्वामींच्या ठायीं अधिक अधिक निष्ठा जडत चालली, व त्यांस स्वामींच्या आशीर्वादाचा महिमा फार वाटूं लागला. स्वपराक्रमानें आपला भाग्योदय करूं इच्छिणारा प्रत्येक मराठा वीर स्वामींच्या चरणीं आपलें मस्तक ठेवून, त्यांचा आशीर्वाद व प्रसाद घेतल्यावांचून एक पाऊलही पुढें टाकिनासा झाला. तात्पर्य, सर्व राजकारणांच्या यशःसिद्धीचें द्वार हे स्वामी महाराज आहेत, अशी त्या वेळच्या सर्व महाराष्ट्रमंडळाची पूर्ण खात्री होऊन, जो तो स्वामींच्या चरणाकडे मोठ्या भक्तीनें धांव घेऊं लागला. ह्यावरून स्वामींच्या ठिकाणीं सर्व महाराष्ट्रमंडळाचें चित्त हरण करण्यासारखे कांहीं अलौकिक सद्गुण व लोकोत्तर कर्तृत्वशक्ति हीं असलीं पाहिजेत हें आपोआपच सिद्ध होतें. तात्पर्य, धावडशीस आल्यानंतर स्वामींची कीर्ति सर्व महाराष्ट्रांत पसरून सर्व लोकांस स्वामींचा वेध लागला. श्रीसमर्थांनीं ह्मटलें आहे:—

**कार्यकर्ता कीर्तिवंत । त्यास जाणती समस्त ॥**
**कार्यकर्ता तो झांकेना । वेध लावी विश्वजना ॥**

असो. स्वामींचा महिमा येणेंप्रमाणें पसरत चालल्यानंतर त्यांच्या भेटीस राजश्री छत्रपति शाहु महाराजांपासून तों लहानशा शिलेदारापर्यंत सर्व मंडळी येऊं लागली. भेटीसमयीं प्रत्येकाच्या योग्यतेप्रमाणें त्याचा आदर करून त्यास मेजवानी व पोषाख देण्याचा क्रम स्वामींनीं ठेविला होता. स्वामींविषयीं सर्व मराठे सरदारांची निस्सीम भक्ति असल्यामुळें त्यांच्याकडून होणारा गौरव त्यांस अत्यंत भूषणावह वाटत असे. स्वामींचा खजिना व चीजवस्त सर्व रसाळगड येथें संभाजी शिंदे नामजाद ह्यांच्या जवळ होती, हें मागें सांगितलेंच आहे. ती स्वामी अशा भेटीच्या प्रसंगीं तिकडून आणवीत असत. संभाजी शिंदे ह्यांचीं बरींच पत्रें उपलब्ध झालीं आहेत. त्यांत स्वामींचे सेवक कमळोजी वाघमारे ह्याजबरोबर, जरी सफेत फुलांचे जांदणी दुपेटे व साधे शेले, गोविंद केशव ह्याजबरोबर ८६ सनगे, व केदारजी डोंगरराव ह्याजबरोबर मेजवानीकरितां रुप्याचीं भांडीं पाठविल्याचे वारंवार उल्लेख सांपडतात. त्याचप्रमाणें चंदन,

कृष्णागर वगैरे सुगंधी द्रव्यें व रोख रुपये नेल्याचेही दाखले आहेत. **सं**भाजी **शिं**दे हे इ० स० १७३४ मध्यें मृत्यु पावले व त्यांचे जागीं **ता**न्हाजी **ना**ईक **चा**ळके ह्यांची नेमणूक झाली. नंतर स्वामींनीं **र**साळगडाहून आपला ऐवज **धा**वडशीस नेला. तो येणेंप्रमाणें होताः—

| नगद रुपये | मोहरा | होन | पुतळ्या |
|---|---|---|---|
| ६६१५ | १५६ | २१ | ५७ |

ह्यापुढें स्वामींचा **कों**कणांतील देण्याघेण्याचा संबंध बहुतेक कमी होऊन त्यांचा सर्व व्यवहार **म**हाराष्ट्रांतच होऊं लागला.

**शा**हु महाराज व त्यांच्या राण्या **स**कवारबाई, **स**गुणाबाई, व **वि**रुबाई ह्यांनीं स्वामींचा विशेष अगत्यवाद धरिला. यामुळें स्वामींचीही त्यांच्यावर विशेष कृपा होऊन परस्पर प्रेम जडलें. त्यामुळें स्वामींस छत्रपतींची मर्जी प्रसन्न पाहून त्यांच्याकडून वाटेल तें कार्य करून घेतां येऊं लागलें. अर्थात् **शा**हु महाराजांस कोणतीही गोष्ट कळविण्यास व त्यांजकडून वाटेल तें कार्य करून घेण्यास स्वामी समर्थ आहेत असें पाहतांच, सर्व सरदार स्वामींच्या द्वारां तिकडे जाऊं लागले. **शा**हु महाराजांची कोणावर अवकृपा झाली तर ती युक्तीनें दूर करण्यास, किंवा एखाद्या राजकारणांत कोणास योग्य सल्ला मसलत देण्यास, किंवा एखाद्याची छत्रपतीजवळ शिफारस करण्यास, स्वामी हें एक उत्कृष्ट साधनच होऊन राहिलें. स्वामी स्वतः स्वार्थनिरपेक्ष, स्पष्टवादी आणि स्वराज्यहितचिंतक असल्यामुळें त्यांचें **शा**हु महाराजांवर विशेष वजन पडून, त्यांच्या एका शब्दानें वाटेल तें कार्य होऊं लागलें. त्यामुळें सर्व लहान मोठे मराठे सरदार स्वामींच्या विचारानें आपलीं राजकारणें करूं लागले. स्वामी अगोदर तपस्वी, वरदी, सत्पुरुष, ह्यामुळें त्यांच्याविषयीं भाविक जनांस स्वाभाविकपणेंच पूज्यबुद्धि वाटत असे. त्यांतून त्यांचा छत्रपतींशीं अशा प्रकारचा सन्निकट संबंध असल्यामुळें, त्यांना स्वामींचा कृपाप्रसाद, आत्मकल्याणास, ऐहिक व पारमार्थिक ह्या दोन्ही दृष्टींनीं, अत्यंत अवश्यक वाटूं लागावा हें साहजिक आहे. ह्या कारणास्तव **पे**शवे, **प्र**तिनिधि, **स**चीव, **शिं**दे, **हो**ळकर, **प**वार, **जा**धवराव, **पु**रंधरे, **आं**ग्रे आदिकरून मोठमोठे सरदार व इतर सर्व सामान्य लोक स्वामींच्या चर-

णांचें दर्शन घेऊं लागले व त्यांचें चरणरज ह्मणवूं लागले. स्वामींची सर्वांवर पराकाष्ठेची प्रीति असून ते त्यांच्या बरोबर फार प्रेमळ अंतःकरणानें वागत असत. त्यामुळें सर्व सरदार आपल्या सुखदुःखाच्या हृद्गत गोष्टी स्वामींजवळ मोकळ्या मनानें सांगून, त्यांचें निराकरण स्वामी सांगतील त्या मार्गानें करीत असत. स्वामींसही मनुष्यास राजी राखून, त्याच्या पोटांत शिरून, त्याशीं मवाळ भाषण करून, त्याचें अंतःकरण वेधून घेऊन, त्याजकडून महत्कार्य करून घेण्याची विलक्षण हातोटी साधली होती. त्यामुळें सर्व लहान मोठे सरदार स्वामींचे निस्सीम भक्त बनून एकसमयावच्छेदेंकरून स्वराज्याभिवृद्धीच्या कामास लागले. त्याचा परिणाम, शाहु महाराजांच्या कारकीर्दीत, मराठी साम्राज्याचा आसेतुहिमाचल झालेला विस्तार हाच होय.

इ० स० १७२८ पासून इ० स० १७४५ पर्यंत, महाराष्ट्रांत जीं जीं राजकारणें झालीं, त्या सर्वांत स्वामींचें अप्रत्यक्षरीतीनें कांहींतरी अंग होतें, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. ह्या सर्व राजकारणांचें खरें व पूर्ण स्वरूप दाखविणारे कागदपत्र उपलब्ध नसल्यामुळें त्यांचें विस्तारेंकरून विवरण करितां येत नाहीं. तथापि बहुतेक सरदारांस नांवारूपास आणण्यास, त्यांची शिफारस करण्यास, त्यांच्या शौर्याचा गौरव करण्यास, त्यांना प्रोत्साहन देण्यास, व त्यांची योग्य कामावर योजना करण्यास स्वामीच बहुतेक अंशीं कारण असत. स्वामींचा संबंध नुसता महत्त्वाच्या राजकारणांतच नव्हे, परंतु अगदीं घरगुती सामान्य गोष्टींतही दिसून येतो. स्वामींवर पुरुषांप्रमाणें बायकांचीही फार भक्ति असे. त्यामुळें मराठे सरदारांच्या बायकाही आपल्या मुलांस स्वामींनीं आशीर्वाद देऊन त्यांचें कल्याण करावें असें इच्छीत असत. बाळाजी विश्वनाथाची बायको राधाबाई, मल्हारराव होळकराची बायको गौतमाबाई, पिलाजी जाधवरावाची आई हंसाई, रघोजी भोसल्याची आई काशीबाई, मानाजी आंग्र्याची आई मथुराबाई, इत्यादि वीरपत्न्या व वीरमाता स्वामींशीं अत्यंत घरोब्यानें व भक्तिभावानें पत्रव्यवहार करीत असत, व आपल्या मुलांचें कल्याण करण्याकरितां स्वामींचा आशीर्वाद रात्रंदिवस चिंतित असत, असें त्यांच्या अनेक पत्रांवरून दिसून होतें. अर्थात् सर्व महाराष्ट्रास स्वकीय मानून त्यांच्याशीं स्वामी एकरूप झाले होते ह्यांत शंका नाहीं. उदारचरित असे जे साधु पुरुष असतात ते

अयं निजः परो वेति गणना लघुचेतसां ।
उदारचरितानां तु वसुधैव कुटुंबकम् ॥ १ ॥

ह्या नियमाप्रमाणें हा माझा किंवा हा परका असा क्षुद्र भेद न बाळगतां सर्व वसुधा हेंच आपलें कुटुंब असें मानितात. असाच प्रकार स्वामींचा, निदान महाराष्ट्रासंबंधानें तरी, पुष्कळ अंशीं होता, असें ह्मटलें असतां क्वचितच अतिशयोक्ति होईल.

इ० स० १७२८ मध्यें स्वामी वरघाटें आल्यानंतर, त्यांनीं सर्व महाराष्ट्रीयांचीं अंतःकरणें आपल्या अलौकिक शक्तीनें आकर्षित करण्यास कसा प्रारंभ केला हें विस्तारेंकरून सांगण्याची विशेष आवश्यकता नाहीं. त्यांचीं जीं पत्रें उपलब्ध झालीं आहेत, तेवढ्यांवरून त्यांचें चित्र डोळ्यांपुढें पूर्णपणें उभें राहतें. बाजीराव ह्यांस पेशवाईचीं वस्त्रें मिळवून देण्यास स्वामींचें किती साहाय्य झालें हें सांगण्यास स्पष्ट पुरावा नाहीं. तथापि शाहु महाराजांजवळ त्यांची वारंवार शिफारस करून त्यांचे उत्तम गुण छत्रपतींच्या नजरेपुढें आणण्यास स्वामी किती तत्पर असत हें दाखविण्यास सबळ पुरावा आहे. शाहु महाराजांची व ब्रह्मेंद्रस्वामी ह्यांची धावडशी येथें इ० स० १७३४ मध्यें जी भेट झाली, त्या भेटीमध्यें "राजश्रीजवळ तुमची फारशी शिफारस केली. कित्येक तुमच्या स्वहिताच्या गोष्टी सांगितल्या" ह्मणून स्वामींनीं बाजीरावांस पत्र लिहिलें. त्याचें उत्तर लिहितांना बाजीराव पेशव्यांनीं भक्तिभावानें लिहिलें कीं, "मायबाप देवधर्म स्वामींचे पाय. न्यूनपूर्ण सर्व स्वामींचें. आह्मी स्वामींचे चरणांकित. सर्व चिंता स्वामींस आहे. तेथें आमची शिफारस व बऱ्याच्या गोष्टी सांगितल्याचें अपूर्व काय? आमची निष्ठा त्रिकर्णपुरस्सर स्वामींच्या पायापाशीं आहे. तेथें विस्तार आह्मीं काय लिहावा" (लेखांक २९). ह्यावरून स्वामींनीं बाजीरावांस कसें साहाय्य केलें ह्याची कल्पना करितां येते. बाजीरावांचीं अत्यंत प्रेमळ भावानें लिहिलेलीं व भक्तिरसानें पूर्ण उचंबळलेलीं अशीं जीं अनेक पत्रें उपलब्ध झालीं आहेत, तीं पाहिलीं ह्मणजे त्यांची स्वामींवरील पराकाष्ठेची निष्ठा व त्यांच्या अलौकिक कर्तृत्वशक्तीविषयीं पूर्ण भरंवसा दिसून येतो.

स्वामींनीं स्वदेशकल्याणार्थ आपलें गुप्त स्वरूप एकीकडे ठेवून राजकारणांत ज्या वेळीं प्रवेश केला, त्या वेळेपासून संसारी मनुष्याची वृत्ति धारण केली. आणि देवाच्या भिक्षेच्या निमित्तानें सर्व सरदारांकडून कांहीं द्रव्य घेण्याचा क्रम आरं-

भिला. प्रत्येकास आशीर्वाद द्यावा व त्याचें कार्य सिद्धीस गेलें ह्मणजे श्री भार्गवाच्या नांवानें त्याजकडून यथाशक्ति द्रव्य घ्यावें, हा स्वामींचा वर्तनक्रम असल्यामुळें त्यांच्या सर्व पत्रांमध्यें द्रव्याचा उल्लेख दृष्टीस पडतो. परंतु हें द्रव्य-संपादन कोणत्याही स्वार्थबुद्धीनें केलेलें नसून, केवळ लोकोपयोगासाठीं व देशकार्यासाठीं होतें, हें वाचकांनीं पूर्ण लक्षांत ठेविलें पाहिजे. ह्या भिक्षाद्रव्यानें स्वामींनीं महाराष्ट्रामध्यें अनेक सार्वजनिक उपयोगाचीं कामें केलीं; आणि अनेक सरदारांस आणि छत्रपति व पेशवे ह्यांस संकटप्रसंगीं उत्कृष्ट साहाय्य करून त्यांच्या स्वराज्यवृद्धीच्या सत्कार्यांत येणाऱ्या अडचणी नाहींशा केल्या. आंग्रे ह्यांस स्वामींनीं कोंकणांत असतांनाच द्रव्यसाहाय्य केल्याचे उल्लेख त्यांच्या पत्रांत आहेत. त्यावरून हा द्रव्यसंपादनाचा क्रम स्वामींनीं परशुरामीं प्रकट झाल्यापासून सुरू केला असावा असें दिसतें. ह्या द्रव्याच्या जोरावर त्यांनीं मोठमोठीं सार्वजनिक कामें केलीं, गरीब लोकांस मदत केली, सरदार लोकांस खूष केलें; इतकेंच नव्हे तर राजकीय मोहिमाही सिद्धीस नेल्या. ही गोष्ट सामान्य नव्हे! लोकांकडून भिक्षाद्रव्य संपादन करून त्याचा इतका सत्कारणीं विनियोग करण्यास देखील चातुर्य व शहाणपण लागतें. तें स्वामींच्या ठिकाणीं पूर्ण होतें असें मानण्यास कांहीं हरकत नाहीं. स्वामींचें कर्ज महाराष्ट्रांतील बहुतेक प्रमुख सरदारांकडे होतेंच, परंतु पेशव्यांकडे लाखों रुपयांनीं मोजतां येईल इतकें कर्ज होतें. पेशव्यांस निरनिराळ्या मोहिमांमध्यें मनस्वी खर्च लागत असे व त्यामुळें ते कर्जानें अगदीं ग्रस्त होत असत. त्या वेळीं त्यांना स्वामींवांचून दुसरा कोणी साहाय्यकारी नसे. बाजीराव पेशवे ह्यांचीं कर्जासंबंधाचीं जीं पत्रें आहेत, तीं वाचून पाहिलीं ह्मणजे कोणाचेंही हृदय द्रवून गेल्यावांचून राहत नाहीं. बाजीराव एका पत्रांत स्वामींस लिहितात कीं, "आह्मांस कर्जानें बुडविलें! एवढे गोष्टीकरितां प्राण जाता तरी बरें होतें!! विष खाऊन मरावें इतकेंच, किंवा स्वामींचे पाय धरून बसावें इतकाच पदार्थ उरला आहे! दरबारीं सर्व साहित्य आमचें करणार सर्व आपल्यास विदितच आहे. तरी स्वामींस कृपा येईल तरी आह्मी कर्जापासून मुक्त होऊं. लोकांचे नरकवासापासून दूर होऊं तो पदार्थ करावा. तरीच मज बाळकावर पूर्ण कृपा आहे" (लेखांक ३०). दुसऱ्या एका पत्रामध्यें तर बाजीरावांनीं अगदीं वैतागून जाऊन स्वामींस लिहिलें आहे

कीं, "आतां नित्य उठोन कर्जदारांचे पायां पडावें! शिलेदारांचे पायां पडतां पडतां कपाळ छिनत चाललें!! आतां हीं सुखें आह्मांस नकोत. तुह्मी या आणि आपला कारभार सांभाळा. अगर टाकून द्या ह्मणाल तरी टाकोन उठोन येतों. वरकड, तुह्मीं आपल्या पैशासाठीं लिहिलें, तरी स्वामीनें कांहीं चिंता न करावी. आमचा जीव आहे तों पैकियाची काय चिंता आहे? कोणे समयीं पाहिजे तें आह्मांसही मिळतें. पैका पावता करूंच. आतां प्रस्तुत तो आमचा जीवच आहे. येथें येऊन घेणें, अगर तेथें बोलावशील तरी सर्व संग टाकून येतों. तुह्मीं थोर देव. तुह्मांस वचनास धरावें. तें वचन खरें न झालें ह्मणून आह्मीं लेंकरांनीं तुमची रड तुह्मांपाशीं रडावी, आणि रडतियाची अशी तुह्मी पुसोन परिणाम त्याचा कराल तो कराल. तुमचें झाड लाविलें तोडाल तरी आतां तोडा. वाढवाल तरी वाढवा. या गोष्टीस नादर कोण आहे? तुमचे दबावणीस आह्मी कां भिऊं? मारशील तरी तूंच बावा मारशील. यांतही कीर्ति तुझीच आहे. आणि आह्मां लेंकराचे लडिवाळ चालवून कीर्तिरूप होशील तरी तूंच होशील." (लेखांक ३२). ह्यावरून द्रव्यसंबंधानें **बा**जीराव अतिशय पेचांत आल्यामुळें स्वामींची कशी मनधरणी करीत होते हें व्यक्त होतें. हीं सर्व पत्रें मूळापासून शेवटपर्यंत खुद्द **बा**जीराव **पे**शवे ह्यांच्या हातचीं आहेत; व त्यांत सर्व हद्गत अगदीं मोकळ्या मनानें वर्णिलें आहे.

**बा**जीराव **पे**शवे ह्यांच्या पत्रांत **"तुमचें झाड लाविलें, तोडाल तरी आतां तोडा. वाढवाल तरी वाढवा."** हा जो मुख्य भाव आहे तोच बहुतेक **म**राठे सरदारांच्या पत्रांतही दिसून येतो. त्यावरून, पर्यायानें, स्वामींच्या आशीर्वादानें किंवा कृपाप्रसादानें सर्व **म**राठे सरदार उदय पावले, व त्यांच्या हृदयांत स्वधर्माभिमान व स्वदेशभक्ति ह्या दोन गुणांची ज्योती प्रज्वलित होऊन **म**राठी साम्राज्याचा अभ्युदय झाला, असें ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं. स्वामींनीं **म**राठे सरदारांचीं मनें आकर्षित करून त्यांच्या ठिकाणीं स्वपराक्रम व्यक्त करण्याची कशी प्रेरणा केली, व त्यांच्याकडून महत्कार्यें कशीं सिद्धीस नेलीं ह्याची कल्पना, त्यांच्या सर्व पत्रव्यवहाराचें सूक्ष्मदृष्टीनें परिशीलन केल्यास, सहज होण्यासारखी आहे. तथापि, ती अधिक रीतीनें मनांत बिंबण्याकरितां त्यांच्या कांहीं प्रमुख राजकारणांचा वृत्तांत पुढील भागांत सादर केला आहे.

---

# भाग ४ था.

## आंग्रे व हबशी ह्यांजकडील राजकारणें.

ब्रह्मेंद्रस्वामी महाराष्ट्रप्रांतांत आल्यानंतर त्यांच्या अनुसंधानानें जीं राजकारणें घडून आलीं, त्यांत हबशी व आंग्रे ह्यांजकडील राजकारणें प्रमुख होत असें मानावयास हरकत नाहीं. कोंकणप्रांतांत हबशानें देवब्राह्मणांचा उच्छेद करून एकसारखा उपद्रव मांडिला होता; तेव्हां त्याचें पारिपत्य होऊन महाराष्ट्रधर्माचें मुख्य व्रत जें गोब्राह्मणप्रतिपालन व प्रजासंरक्षण तें सिद्धीस जावें हा स्वामींचा मुख्य हेतु होता. त्याप्रमाणें त्यांनीं महाराष्ट्रांत आल्यानंतर शाहु महाराजांची मर्जी प्रसन्न करून, त्यांच्याकडून हबशांच्या प्रांतावर स्वारी करवून, त्याचें निर्मूलन करण्याचा संकल्प करविला. आजपर्यंत प्रसिद्ध झालेल्या मराठ्यांच्या इतिहासामध्यें ह्या राजकारणांची बरोबर माहिती दिलेली नाहीं, व त्यांत स्वामींचा संबंध किती होता ह्याचा तर मुळींच उल्लेख नाहीं. परंतु, ह्या राजकारणासंबंधानें जो अस्सल पत्रव्यवहार उपलब्ध झाला आहे, त्यावरून, त्यांत स्वामींचा पुढाकार मुख्यत्वेंकरून असून, त्याचीं सर्व सूत्रें त्यांच्याच तंत्रानें चालत होतीं असें ह्मणण्यास प्रत्यवाय नाहीं. सिद्दी सात ह्यानें श्री परशुराम येथें जो अनर्थ केला, त्याबद्दल त्याचा उच्छेद लवकरच होईल ह्मणून स्वामींनीं अभिशाप दिला होता. तो महाराष्ट्रांत येऊन स्वामींनीं सिद्धीस नेला, हें ह्या राजकारणांचें पर्यवसान आहे. ह्मणून ह्या संबंधाची संक्षिप्त हकीकत ह्या भागामध्यें द्यावयाचें योजिलें आहे.

कोंकणप्रांतामध्यें हबशी व कान्होजी आंग्रे ह्यांचा अंमल होता. इ० स० १६९० मध्यें रायगड घेतल्यानंतर औरंगजेबानें तो किल्ला व अंजनवेल व सिंधुदुर्ग हे रत्नागिरी जिल्ह्यापैकीं दोन तालुके त्या वेळचा हबशांचा मुख्य अधिपति सिद्दी कासीम ह्यास बक्षीस दिले होते. पुढें राजाराम महाराज चंदीस गेल्यानंतर सर्व कोंकणप्रांतामधील मराठ्यांचा अंमल कमजोर झाला. त्या वेळीं हबशानें आपलें पाऊल पुढें टाकण्यास सुरुवात केली. तेव्हां राजाराम महाराजांनीं कान्होजी आंग्रे ह्या प्रमुख सरदाराकडे सर्व कोंकणप्रांताची व्यवस्था सोंप-

विली. हा सरदार शूर असल्यामुळें त्यानें हबशास दाबांत ठेवून कोंकणप्रांतांतील मराठ्यांच्या सत्तेचें चांगलें संरक्षण केलें. परंतु पुढें त्याचें प्राबल्य विशेष वाढून तो ताराबाईच्या पक्षास वश झाला व सर्व कोंकणप्रांत बळकावून बसला. तेव्हां त्याचें पारिपत्य करून त्यास आपल्या ताब्यांत आणण्याकरितां, शाहु महाराजांनीं इ० स० १७१३ मध्यें, आपले प्रधान बहिरोपंत पिंगळे ह्यांस कोंकणांत पाठविलें. परंतु कान्होजी आंग्रे ह्यानें त्यांचा पराभव करून त्यांसच कैद केलें. नंतर शाहु महाराजांनीं बाळाजी विश्वनाथ ह्यांची त्या कामावर योजना केली. त्यांनीं आंग्र्याची पराक्रमशक्ति व सैन्यबल पाहून, त्याशीं युद्ध करण्याच्या भरीस न पडतां, सलोख्यानें कार्यभाग साधून घेतला. आंग्र्यास दहा किल्ले व सोळा महाल सरंजामादाखल देऊन, त्यास 'सरखेल' हा किताब व मराठ्यांच्या आरमारांचा मुख्याधिकार दिला; आणि त्यास शाहु महाराजांच्या पक्षास वळवून घेतलें. ह्या तहामध्यें हबशांचा कांहीं प्रांत मराठ्यांकडे आला. त्यामुळें त्यांचें व आंग्र्याचें युद्ध सुरू झालें. तेव्हां बाळाजी विश्वनाथ ह्यांनीं आंग्र्याच्या साहाय्यास जाऊन हबशांशीं ता० ३० जानेवारी इ० स० १७१५ रोजीं तह केला. ह्यानंतर बरींच वर्षें हबशांनीं कांहीं गडबड केल्याचें दिसत नाहीं. हबशांचा मुख्य अधिकारी याकूबखान सिद्दी सुरूर हा स्वतः भला माणूस होता; व आंग्र्याचाही त्यांजवर चांगला दाब होता. त्यामुळें त्यांचा व मराठ्यांचा फारसा विग्रह झाला नाहीं. परंतु पुढें सिद्दी सात नामक हबशी सरदार प्रबल होऊन त्यानें हिंदुलोकांसीं वैर संपादिलें, व आंग्र्यासही वारंवार त्रास देण्यास सुरूवात केली. तेव्हां मराठ्यांस त्याचा समाचार घेणें भाग पडलें. कान्होजी आंग्रे एवढा प्रबल सरदार, परंतु त्यासही आपलीं स्थळें जतन करण्याकरितां शाहु महाराजांची मदत मागण्याचा प्रसंग आला. छ० १ जिल्हेज सबा अशरीन मया व अलफ (इ० स० १७२६) रोजीं कान्होजी आंग्रे ह्यास शाहु महाराजांनीं जें पत्र पाठविलें आहे त्यावरून शामलाचा उपद्रव बराच सुरू झाला होता असें दिसतें. हें पत्र येणेंप्रमाणें:—

"राजश्री कान्होजी आंग्रे सरखेल यांस पत्र जे, तुह्मांकडे दरमाहाचे सन खंमस व सन सीत दुसाला बाराहजार रुपये येणें. त्यास तुह्मांकडे हुजुरून माणसें पाठविलीं. त्यास तुह्मीं लिहिलें कीं, शामल व वरकड शत्रंचा उपद्रव

बहुत आहे. हुजुरून साहित्य गनिमास नतीजा पाठवावयाचें होत नाहीं. स्वामींनीं आपले स्थळरक्षणास दुसरा पाठवून आपणांस मामल्यापासून मुक्त करावें ह्मणून विशदर्थ लिहिलें. तर स्थळें स्वामींचीं; साहित्य करणें जरूर. तुह्मांसारखें एकनिष्ठ सेवक, कार्यकर्ते, आजतागाईत श्रमसाहस करून स्थळें रक्षिलीं. पुढें तुमचा भरंवसा आहे. दसऱ्याकारणें स्वामी तुह्मांस हुजूर बोलावतील. जें साहित्य फौजेचें लागेल, स्वामी करून देतील. आपलें समाधान असों देणें. ·दरमाहेच्या ऐवजाकरितां लोकांचा गवगवा झाला आहे; तरी दुसाला ऐवज चोवीस हजार रुपये पाठवून देणें. हुजूर दोन हजार स्वार व कारखाने पांच हजार माणूस बारा महिने सेवा करितात, त्यांचा ऐवज पत्रदर्शनीं पाठविणें."

ह्या पत्रांत लिहिल्याप्रमाणें दसऱ्यास **शा**हु महाराजांची व **का**न्होजी **आं**ग्र्याची भेट झाली. परंतु ह्यापुढें **का**न्होजी **आं**ग्र्याकडून **ह**बशांचा पराभव झाल्याचें दिसून येत नाहीं. **सि**द्दी **सा**त हा दिवसेंदिवस अधिक अधिक बळावत चालला, व तो **म**राठ्यांच्या प्रांतास जास्त जास्त उपसर्ग देऊं लागला. सबा अशरीन ह्याच वर्षाच्या माघ महिन्यांत त्यानें हत्तीच्या निमित्तानें दंगा करून श्री **प**रशुराम येथील देवालयाचा विध्वंस केला. त्याबद्दलची साद्यंत हकीकत दुसऱ्या भागांत दिलीच आहे. ह्यानंतर स्वामी **ह**बशांच्या त्रासामुळें घांटावर आले. पुढें **का**न्होजी **आं**ग्रे ह्यांची प्रकृति दिवसेंदिवस बिघडत जाऊन ते इ० स० १७२९ च्या जून (जिल्हेज) महिन्यामध्यें मृत्यु पावले. **का**न्होजीस **से**खोजी, **सं**भाजी, **मा**नाजी, **ये**साजी व **तु**ळाजी असे पांच मुलगे होते. त्यांपैकीं वडील पुत्र **से**खोजी ह्यास **शा**हु महाराजांनीं छ० ५ मोहरम सन सल्लासीन (ता० २१ जुलई इ० स० १७२९) ह्या दिवशीं सरखेलपदाचीं वस्त्रें दिलीं व **का**न्होजीकडे जो मुलूख व जे किल्ले होते ते त्याच्या ताब्यांत दिले. **आं**ग्रे ह्यांच्या घराण्याशीं स्वामींचा पूर्वीपासून स्नेहसंबंध असल्यामुळें त्यांनीं **से**खोजीस वस्त्रें मिळवून देण्याचे कामीं मदत केली. **से**खोजीची स्वामींवर चांगली भक्ति असून त्यांचा पुष्कळ पत्रव्यवहार चालत असे.

**का**न्होजी **आं**ग्रे ह्याचा **ह**बशांवर चांगला दाब होता, तो त्याच्या मृत्यूमुळें कमी झाला. त्यामुळें ते मोकळे होऊन अधिकच बेफाम झाले; व **कों**कणप्रां-

तास अतिशय उपसर्ग देऊन, **मरा**ठ्यांच्या ताब्यांतील मुलुखांतूनही वसूल बळज-
बरीनें घेऊं लागले. तेव्हां, **ब्र**ह्मेंद्रस्वामींनीं **शा**हु महाराजांच्या विचारें **से**खोजी **आं**ग्र्याचें साहाय्य घेऊन **ह**बशांवर स्वारी करविण्याची मसलत उभारली. **म**-
राठ्यांचे इतिहासकार क्याप्टन **ग्रां**ट **ड**फसाहेब किंवा **म**राठी बखरीकार ह्यांनीं ह्या
स्वारीची हकीकत अगदीं त्रोटक व विसंगत दिली आहे; किंबहुना **ग्रां**ट **ड**फ
साहेबांस ही गुप्त मसलत मुळींच समजली नाहीं, असें ह्मटलें तरी चालेल.[१]
इ० स० १७३० पासून इ० स० १७३६ पर्यंत हें **ह**बशी-प्रकरण चाललें होतें;
व ह्याचे सूत्रचालक **ब्र**ह्मेंद्रस्वामी हे होते, असें उपलब्ध झालेल्या अस्सल पत्रव्य-
वहारावरून व्यक्त होतें.

इ० स० १७२९ ह्या वर्षाच्या अखेरीस **बा**जीराव **बुं**देलखंडांतील व **उ**त्तर **हिं**दुस्थानांतील राजकारणांत गुंतल्यामुळें, **शा**हु महाराजांनीं **ह**बशांच्या मसल-
तीवर **श्री**निवास **प**रशुराम **प्र**तिनिधि, **जि**वाजी **खं**डेराव **चि**टणीस, वगैरे
मंडळींची योजना केली. त्यांनीं **शे**ख **या**कूब ऊर्फ **शे**खजी ह्या नांवाचा

---

१ ह्या हबशी-प्रकरणाची हकीकत ग्रांटडफ साहेबांस बरोबर न समजल्या-
मुळें, अस्सल पत्रें मिळूनही त्यांचा उपयोग त्यांस करितां आला नाहीं. त्यांनीं
अवघ्या दोनतीन पृष्ठांत ह्या सहा वर्षें चाललेल्या प्रकरणाचा गोषवारा दिला आहे!
पत्रांच्या तारखा न समजल्यामुळें ते अगदीं बुचकळ्यांत पडून त्यांचा फार गों-
धळ उडाला आहे!! ह्याबद्दल त्यांनीं टीपेमधें स्पष्ट लिहिलें आहे कीं, "In
parts where I have only Mahratta authority, I am seldom
quite certain of my dates, as many of the original letters
have only the date of the week, and of the Moon." Page 233.
अर्थात् ज्यास पत्रांच्या तारखा बरोबर समजल्या नाहींत, त्याला ह्या प्रकरणाचा
नीट उलगडा करितां येणार नाहीं हें साहजिक आहे. ह्या कारणास्तव ग्रांटडफ
साहेबांचें हें प्रकरण फार अपूर्ण व त्रोटक झालें आहे. आह्मांस जी थोडीबहुत
नवीन माहिती उपलब्ध झाली, तेवढी ह्या भागांत सादर करून, हबशी-प्रकर-
णाचें खरें स्वरूप व्यक्त करण्याचा प्रयत्न केला आहे. तथापि ह्या सहा वर्षें
चाललेल्या राजकारणाची सर्व गुंतागुंत पुष्कळ कागदपत्र मिळाल्यावांचून नीट
उकलली जाणार नाहीं व त्याचा शिस्तवार इतिहास समजणार नाहीं.

हबशांचा एक पराक्रमी सरदार वश करून, त्याच्या मार्फतीनें, सर्व हबसाण मराठ्यांच्या राज्यास जोडण्याचा विचार केला. शेखजी हा जातीचा कोळी असून पुढें मुसलमान झाला होता; परंतु त्याच्या पराक्रमामुळें त्याजवर जंजिऱ्याचे खान सिद्दी सुरूर ह्यांची फार मेहेरबानी जडली होती. त्यास मराठ्यांच्या सर्व आरमाराचें आधिपत्य, हबशांच्या ताब्यांतील सर्व मुलुखाची सुभेदारी, कित्येक किल्ले व इनाम गांवें, आणि पेणपासून कोल्हापूरपर्यंत तळकोंकणांतील सरगोंडपणाचा हक्क बहाल करून, आणि त्याच्या बंधूस रायगडची किल्लेदारी व सैन्यांतील लोकांस एकलक्ष रुपये बक्षिसीदाखल देण्याचें मान्य करून, प्रतिनिधिप्रभृतींनीं विजय संपादन करण्याचा प्रयत्न चालविला होता. ब्रह्मेंद्रस्वामींचे परशुरामचे कारकून गणेश बल्लाळ ह्यांच्या ता० १९ आगष्ट इ० स० १७३० पत्रावरून (ग्रं० ले० ३३०) प्रतिनिधि हबशांच्या प्रांतांत उतरले होते, व सिद्दी सात ह्यांची काशीबंदरावर भेट घेऊन व त्यास घोडा नजर करून त्याशीं सलोखा करण्याच्या विचारांत होते असें दिसतें. आंग्रे हे हबशांच्या विरुद्ध असल्यामुळें त्यास घालवून द्यावें, म्हणजे मी राजदर्शनास येऊन तुमच्याशीं तह करितों, असा सिद्दी सात ह्याचा मतलब होता. परंतु त्यांत खरेपणाचा भाव मुळींच नव्हता. त्यामुळें पुढें कांहींतरी अनर्थ ओढवणार असें उघड दिसत होतें. त्यामुळें स्वामींच्या कारकुनानें 'दिवस पुढें सुधे दिसत नाहींत' असे उद्गार काढिले आहेत.

सेखोजी आंग्रे हा राजनिष्ठ असून मराठी राज्याची सेवा आपल्या हातून व्हावी व हबशांचें प्राबल्य कमी व्हावें असें इच्छिणारा इमानी सेवक होता. ह्याच्या पदरीं बकाजी नाईक महाडीक नांवाचा एक शूर सरदार होता. त्यानें हबशास अंजनवेल, गोवळकोट ह्या बाजूनें पुर्ता शह देऊन जेर केलें होतें. त्यामुळें त्याचा वेढा उठवून आलेला प्रसंग टाळावा ह्या हेतूनें, सिद्दी सात ह्यानें प्रतिनिधींशीं गोड गोड गोष्टी चालविल्या होत्या. प्रतिनिधींस त्याचा मतलब न समजून त्यांनीं आंग्र्याच्या लोकांस बरोबर साहाय्य केलें नाहीं.

१. ग्रंथमाला—'मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें' लेखांक ३०५ ह्या पत्रांत, मथुराबाई आंग्रे हिनें प्रतिनिधींनीं सिद्दी सात ह्यांशीं सलोख्याचें बोलणें लावून बकाजी नाईकाचा कसा विरस केला, ह्याची साद्यंत हकीकत ब्रह्मेंद्र स्वामींस लिहिली

त्यामुळें **म**राठ्यांच्या सैन्यांत फूट पडून **ह**बशांस **प्र**तिनिधींवर उलट खाण्यास जोर सांपडला. इ० स० १७३२ पर्यंत **प्र**तिनिधि **चि**पळुणांत असतांना **ह**बशांनीं **गो**वळकोट घेऊन **म**राठ्यांची फार नाचक्की केली. तेव्हां **प्र**तिनिधींनीं **शा**हु महाराजांकडे मदत पाठविण्याबद्दल एकसारखा तगादा लाविला. **शा**हु-महाराजांनीं **चि**माजीआपांस **प्र**तिनिधींच्या मदतीस सैन्य पाठविण्याबद्दल अनेक वेळां आज्ञापत्रें पाठविलीं; परंतु त्यांजकडून वेळेवर मदत गेली नाहीं. त्यामुळें **शा**हु महाराजांनीं त्यांजवर संतापून जाऊन, "तुह्मी जर मदतीस गेलां नाहीं, तर मी स्वतः जाईन."[१] असें खरमरीत पत्र लिहिलें. तेव्हां त्यांनीं

---

आहे. ती अत्यंत महत्त्वाची आहे. त्यापैकीं थोडासा उतारा मासल्याकरितां येथें देतों. बकाजी नाईक ह्यांनीं "सिद्दी साद सारा गनीम हटी मारून काढून, किल्ल्यांत घालविला. तों श्रीपतराव श्रीस्थळीं येऊन, आपले नजरेनें युद्ध पाहिलें. त्या उपर जयगडीहून भांडें आलें व जमाव आला. गोवळकोटास मूर्चे देऊन जागा घ्यावा, तों राजश्री प्रतिनिधि यांहीं गोवळकोटास अनुसंधान लाविलें. बकाजी नाईक यांची व प्रतिनिधींच्या भेटी जाहल्या. तों मजकूर प्रतिनिधीनें घातला कीं, गनीम सुलाखें करून घेतों, तुह्मांस भांडावयासी प्रयोजन नाहीं. या उपरीं बकाजी नाईक याहीं बोली केली कीं, अंजनवेलीस तुह्मीं जावें, तों जागा घ्यावा, गोवळकोट आह्मी घेतों. ते कबूल करीत ना. त्याकडील अनुसंधान चाललें. सिद्दी सादाची भेटी जाहली. त्यास, प्रतिनिधि बकाजी नाईक यांसी ह्मणत कीं, तुह्मीं आह्मीं गनीम घेऊं. जागा सचंतर हातीं देत नाहीं. त्यावरून पाहतां जागा आपण जेर करावा, मेहनत करून यशास पात्र ते होणार, आपणास प्राप्तांश नाहीं. हा प्रसंग जाहलियासी तेथें राहून काय करणें असे? तशाहीमध्यें राहिल्यास, सुलाखें कार्य दिसगतीवर गेलें. इ० इ०" ह्यावरून प्रतिनिधींनीं आंग्र्यांच्या सेनापतीस नाखूष करण्यांत मोठी चूक केली हें दिसून येतें. मराठे सरदारांतील परस्परांविषयींचा अंतर्गत मत्सर व द्वेषभाव ह्या वेळेपासून वसत होताच. तो शाहु महाराजांच्या दराऱ्यामुळें कांहींसा दबला जाई. परंतु ज्या वेळीं तो डोकें वर उचली, त्या वेळीं मराठ्यांच्या हितास हानिकारक झाल्यावांचून राहत नसे.

१ ग्रांटडफ साहेबांनीं ह्या शाहूच्या अस्सल पत्रांचा आपल्या इतिहासांत आ-

**पि**लाजी **जा**धवराव ह्यांची शेवटीं योजना केली. परंतु त्यांच्या जाण्याचा विशेष उपयोग न होतां **प्र**तिनिधींस हताश होऊन परत येणें भाग पडलें.

इकडे **ह**बशांचें पारिपत्य झालें नाहीं हें पाहून **ब्र**ह्मेंद्रस्वामींस फार वाईट वाटलें. त्यांनीं **शा**हु, **बा**जीराव, आणि **आं**ग्रे ह्यांच्याकडे एकसारखीं संधानें लावून त्यांना **ह**बशांचीं स्थळें हस्तगत करण्याबद्दल प्रोत्साहन दिलें. **बा**जीराव **नि**जामउल्मुलकाकडून येऊन, तसेंच तांतडीनें, ता० २६ मे इ० स० १७३३ मध्यें, **रा**जपुरीकडे गेले. तिकडे जाण्यापूर्वी त्यांनीं **से**खोजी **आं**ग्रे ह्यास वैशाख वद्य दशमीस **पा**ल मुकामीं भेटीस बोलाविलें. त्या वेळीं **से**खोजी **आं**ग्रे ह्यांनीं **बा**जीरावांस जें पत्र पाठविलें तें विशेष महत्त्वाचें आहे. तें येणेंप्रमाणें:—

"राजश्री **बा**जीराव **पं**डित प्रधान दाजी गोसावी यांसः—

सकलगुणालंकरण अखंडित लक्ष्मी-अलंकृत राजमान्य राजश्री स्नेहांकित **से**खोजी **आं**ग्रे सरखेल रामराम विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लेखन केलें पाहिजे. विशेष. आपण पत्र पाठविलें तें प्रसिद्ध होऊन लेखनार्थ अवगत जाहला. "वैशाख वद्य दशमीस स्वार होऊन **पा**लीस येतों. आपण दशमीस **पा**लीस यावें. आपली आमची भेटी होऊन कर्तव्य तें केलें जाईल. सारांश, आह्मी जातच आहों. तुह्मी न याल तेव्हां चाकरीस अंतराय केलासा **रा**जश्रीचे चित्तांत येऊन गुम्हाणा मात्र राहील. या गोष्टींत उचित नाहीं." ह्मणोन विशदें लेख केला. ऐसियास आपण **कों**कणचे मसलतेस यावें; आह्मी हरोळी करावी; देशदुर्गे हस्तगत करावीं; याजपेक्षां दुसरें अधिकोत्तर काय? परंतु येथील **जं**जिरियांच्या लोकांप्र॥(?) आपण माहीतच आहेत व जमावाचा पोख्ता विचार असावा एतद्विषयींचा अर्थ आपणास कळावा. याच अर्थे राजश्री **खं**डो **चि**मणाजी यांस मुखतां सांगोन पाठविलें आहे. त्याजवरून कळलेंच असेल. मंगळवारीं राजश्री **म**हादाजी **कृ**ष्ण व चिरंजीव **मा**नाजी **आं**गरे यांची

---

धार देऊन तें धावडशीकर स्वामीच्या दप्तरांतून मिळालें असें टीपेमध्यें लिहिलें आहे व अशींच आणखी शाहूचीं व पेशव्यांच्या मुतालिकांचीं अस्सल पत्रें उपलब्ध झाल्याचें लिहिलें आहे. ह्यांपैकीं बहुतेक पत्रें आह्मांस उपलब्ध झालीं. परंतु हें चिमाजीआपास लिहिलेलें खरमरीत पत्र अद्यापि सांपडलें नाहीं! त्यामुळें तेवढ्यापुरता ग्रांटडफवर हवाला ठेवणें भाग आहे.

रवानगी करूं. वरकड राजश्री **बा**ळाजीपंत यांच्या लिहिल्यावरून कळेल. सारांश तीर्थरूपामागें आह्मांस आपण वडील. जे गोष्टीनें आपले व आमचे पदरीं गुम्हाणा न ये, ते गोष्टी केली पाहिजे. जाणिजे. रवाना छ २५ माहे जिल्काद. बहुत काय लिहिणें हे विनंति. (मोर्तबसुद)." ह्यानंतर **से**खोजी **आं**ग्रे व **बा**जीराव **पे**शवे ह्यांची भेट झाली व उभयतांच्या संमतीनें **शाम**लांवर चाल करून त्यांस नेस्तनाबूद करण्याचा विचार टरला.

ह्या दरम्यान स्वामींची जी चळवळ चालली होती ती फारच मौजेची होती. स्वामींनीं **का**न्होजी **आं**ग्रे ह्यांची पत्नी **म**थुराबाई हिजला पत्र पाठवून असें लिहिलें कीं, "राजश्री **ब**काजी **ना**ईक यांची रवानगी **अं**जनवेल **गो**वळकोटचे मसलतीस केली आहां. त्यास, **ह**नमंताचा गौरव **र**घुनाथें करून त्याचे हस्तें **लं**का घेतली, त्याप्रमाणें **ब**काजी नाईकाचा गौरव करून, लोकांस देणें देऊन, दोनी स्थळें सत्वर घेतलीं तर बरें वाटतें. नाहींतरी हळू हळू खालीं समाधीस येऊं" (ग्रं० ले० ३०५). म्हणजे हीं दोन्हीं स्थळें स्वराज्यांत झालीं म्हणजे श्री **प**रशुरामीं जाण्याचा स्वामींचा विचार होता. परंतु **प्र**तिनिधींच्या चुकीमुळें तसें घडून आलें नाहीं; म्हणून स्वामी **कों**कणांत समाधीस गेले नाहींत. त्यांनीं **म**हाराष्ट्रांत राहूनच **गो**वळकोट व **अं**जनवेल हीं स्थळें **म**राठ्यांस हस्तगत होतील असा यत्न आरंभिला.

**म**राठ्यांचें सैन्य **जं**जिऱ्यास येण्यापूर्वी तेथें राज्यक्रांतीचा प्रकार घडून आला. त्याची थोडी हकीकत सांगणें जरूर आहे. इ० स० १७३३ च्या फेब्रुवारी महिन्यांत **जं**जिऱ्याचे खान **सि**द्दी **सु**रूर हे मृत्यु पावले. ह्यांस आठ मुलगे होते. त्यांपैकीं वडील मुलगा **सि**द्दी **अ**बदुल्ला हा बापाच्या वेळेपासूनच राज्यकारभार पाहात होता व तोच गादीचा खरा अधिकारी होता. त्यास, खानसाहेबांचें प्रेत दहन करण्यासाठीं किल्ल्यांतून बाहेर आणल्यानंतर, त्याच रात्रीं, **सि**द्दी **सं**बूल नामक **ह**बशानें ठार मारिलें; व सर्व राज्यकारभार आपल्या हातीं घेऊन त्याचा धाकटा भाऊ **सि**द्दी **ह**सन ह्यास नांवाचा अधिकारी केलें. ही गोष्ट खानसाहेबांचा दुसरा मुलगा **सि**द्दी **अ**बदुल **र**हिमान ह्यास समजतांच, त्यानें **म**राठ्यांस वश झालेल्या **शे**ख **या**कूब ऊर्फ **शे**खजी नामक इसमास आपल्या पक्षास अनुकूल करून घेतलें; व त्याच्या मार्फत **बा**जीराव **पे**शवे ह्यांज-

कडे संधान बांधून, जंजिऱ्याची गादी मिळविण्याचा प्रयत्न चालविला. पेशव्यांस ही संधि महत्त्वाची वाटून त्यांनीं त्यास हाताशीं घेतलें; आणि इ० स० १७३३ च्या मे महिन्यापासून दिसेंबरपर्यंत, राजपुरीस शह देऊन, जंजिरा हस्तगत करण्याची खटपट चालविली.

इ० स० १७३३ च्या वैशाख महिन्यांत, बाजीराव, प्रतिनिधि व फत्तेसिंग भोसले ह्यांनीं आपलें सैन्य कोंकणांत येऊन पोहोंचल्यावर, शेखजीच्या गुप्त मसलतीनें, कोंकणांतील मुख्य मुख्य स्थळें हस्तगत करण्याचा क्रम चालविला. ता० २५ मे इ० स० १७३३ रोजीं मंडणगडकिल्ला घेतला व बिरवाडीपासून निजामपुरापर्यंतच्या गांवावर अंमल बसविला. पुढें प्रतिनिधींनीं माघारें उलटून, ता० ८ जून इ० स० १७३३ रोजीं, रायगड सर केला; व महाडावर मोर्चे लावून तेंही काबीज केलें. येणेंप्रमाणें उत्तर कोंकणांतील स्थळें हस्तगत करून तेथें मराठ्यांचा अंमल बसविण्याचें काम प्रतिनिधि व फत्तेसिंग भोंसले ह्यांनीं चालविलें. इकडे बाजीराव पेशवे ह्यांनीं जंजिऱ्यास वेढा देऊन हबशी लोकांस जेर करण्याचा दृढ संकल्प केला; आणि खुषकीवरून मोर्चे लावून जंजिऱ्यावर तोफांचा एकसारखा भडिमार चालविला. दुसरीकडून मानाजी आंग्रे ह्यांनीं पाण्यांतून मार चालविला. तथापि जंजिरा-राजपुरी ही फार बळकट जागा असल्यामुळें व हबशी लोकांचा जमाव दांडगा असल्यामुळें कांहीं दिवसपर्यंत त्यांनीं बिलकूल दाद दिली नाहीं. परंतु पुढें त्यांच्यानें मराठ्यांपुढें टिकाव धरवेना. तेव्हां त्यांनीं इंग्रज व सुरतेचा हबशी सरदार सिद्दी मसूद ह्यांची मदत मागून, एका बाजूनें आंग्रे व एका बाजूनें बाजीराव ह्यांच्या सैन्याचा नाश करण्याचा विचार केला. सुरतेहून सिद्दी मसूद हा हबशांच्या मदतीस येत आहे असें समजतांच, ता० ७ जुलई इ० स० १७३३ रोजीं, शाहु महाराजांनीं दमाजी गायकवाड व उमाबाई दाभाडे ह्यांना खास दस्तकाचें पत्र पाठवून असें कळविलें कीं, "राजपुरीकर हबशी अमर्यादेनें वर्तों लागला. कोंकणप्रांतें उत्पात आरंभिला. त्यास शासन केल्याविना देवब्राह्मण स्वस्थळीं राहत नाहींत. ऐसें जाणोन स्वामींनीं चिरंजीव राजश्री फत्तेसिंग भोंसले व राजश्री श्रीनिवासपंडित प्रतिनिधि व राजश्री बाजीराव पंडित प्रधान यांस आज्ञा करून हबशांवरी मोहिम करविली. रायगड आदिकरून कोंकणांतील

गडकोट हबशियांकडे होते ते हस्तगत केले. मुलूख कबज केला. राहतां एक जंजिरा व आणखी दोन चार स्थळें राहिलीं आहेत. त्यांचीही तरतूद कर्तव्य ते करीजेत आहे. ऐशियास हबशाकडील सिद्दी मसूद सुरतेस आहे; तो जमाव करून जलमार्गें जंजिरेयाचे कुमकेस येणार ह्मणून वर्तमान विदित झालें. तरी हबशी दुष्ट. त्याचें निर्मूल करावें हें स्वामींस परम आवश्यक. स्वामींचे आज्ञेप्रमाणें त्रिवर्ग सायास करणें तसा करीत आहेत. स्वामींचे पुण्य-प्रतापेंकरून योजिला मनसबा सिद्धीस पावतच आहे. जंजिरेकर हबशी या-मध्यें अवसान राहिलें नाहीं. परंतु सुरतेहून सिद्दी मसूद याचा बेत जंजि-रेयाचे कुमकेस न यावें ऐसें करावें लागतें. यास्तव आज्ञापत्र सादर केलें असे. दुष्टाचा निःपात होऊन स्वामींचें राज्य अभिवृद्धीस पावावें हें तुह्मांस आवश्य-कच आहे. याकरितां सुरतेचा मोंगल फौजदार व कोटचा किल्लेदार असेल त्यांस ताकीद करून पत्रें पाठविणें, आणि सिद्दी मसूद याची कुमक जंजिरेयास न पोंहचे ऐसें करणें. या वेळीं सिद्दी मसुदास हस्तगत करावयाचीही तरतूद करणें."



ह्याप्रमाणें शाहु महाराजांचें पत्र गेल्यानंतर दमाजी गायकवाड व उमाबाई दाभाडे ह्यांनीं सिद्दी मसूद ह्यास अडकवून ठेवण्याचा तावडतोब प्रयत्न के-ल्याचें दिसत नाहीं. इकडे प्रतिनिधि अंजनवेलपर्यंत पोहोंचले व तेथें शह देऊन बसले; व बाजीराव जंजिरा दाबांत आणण्याचा अधिक अधिक प्रयत्न करूं लागले. तेव्हां अशा वेळीं सिद्दी मसूद सुरतेहून आल्यास त्यांच्या मन-सब्यास पेंच पडेल असें समजून, शाहु महाराजांनीं दमाजी गायकवाडास ता० १२ आगष्ट रोजीं पुनः पत्र पाठविलें. त्यानंतर सिद्दी मसूद जंजिऱ्याकडे आल्याचें दिसत नाहीं.

सिद्दी मसूद ह्याचें जंजिरेकर हबशांस साहाय्य मिळालें नाहीं; परंतु इंग्रजांचें साहाय्य मिळेल कीं काय अशी मराठ्यांस फार भीति होती. म्हणून बाजीराव पेशवे ह्यांनीं, इंग्रजांच्या मुंबईच्या अधिकाऱ्यांकडे अत्यंत स्नेहभावदर्शक व स्तुति-पर पत्रें पाठवून, त्यांस अनुकूल करून घेण्याचा प्रयत्न चालविला. एवढेंच नव्हे, तर राजापुरास इंग्रजांचे वकील लोदर आणि डिकिन्सन नामक दोन गृहस्थ होते.

त्यांची मर्जी संपादन करण्याकरिता आपल्याकडील एक भला माणूस त्यांच्याकडे पाठविला[१]. इकडे **शाहु** महाराजांनीं, **सेखोजी आंग्रे** ह्यास ता० १ सप्टेंबर इ० स० १७३३ रोजीं पत्र पाठवून असें कळविलें कीं, **उंदेरीचा** किल्ला **शाम**लानें **इंग्रजांस** विकत दिला असेल तर तो पैसे देऊन आपण घ्यावा व **इंग्रजांस** कोलावणें[२] माफ करून त्यांशीं सख्य संपादावें. तात्पर्य, **इंग्रजांची** मदत **हबशांस** होऊं देऊं नये असा **बाजीराव** व **शाहु** महाराज ह्यांचा बेत होता. तो **सेखोजी आंग्र्याच्या** मार्फत सिद्धीस जाण्याचा संभवही होता. परंतु दुर्दैवानें **सेखोजी आंग्रे** लवकरच मृत्यु पावला, त्यामुळें तो बेत विसकटला. **सेखोजीच्या** मृत्यु-नंतर **संभाजी आंग्रे** व **मानाजी आंग्रे** ह्या बंधुद्वयामध्यें विरोध उत्पन्न झाला, व त्यामुळें **जंजिऱ्यांच्या** मसलतीस बराच पेंच पडला[३].

---

1 "The first Wars and Treaties of the Western Presidency."
—*Bombay Quarterly Review.*

२ कोलावण:—मराठ्यांच्या राज्यांतून जाण्याबद्दलचा परदेशीयांवरील कर.

३ संभाजी आंग्रे व मानाजी आंग्रे ह्यांच्या कलहामुळें मराठ्यांचें किती व कसें नुकसान झालें हें येथें सांगणें अप्रस्तुत होईल. परंतु त्यांच्या कलहांत इंग्रजांचें हित अंतर्भूत असल्यामुळें त्यांनीं त्यास पुष्टि दिली असें इंग्रज लेख-कांच्या लेखांवरून दिसून येतें. ह्या वेळच्या आंग्रे व हबशी ह्यांच्या सत्तेसं-बंधानें लिहितांना मि० अंडरसन ह्यांनीं लिहिलें आहे:—

" But the Siddees' prosperous days had passed; their power was on the wane, and of little assistance to the English in combatting the more formidable Angrias. So serious were the injuries inflicted by those pirates, and so heavy the expense of fitting out ships to protect trade, that the Company were prevented from making their usual investments, and in their alarm even began to anticipate an extinction of their commerce in Western India. Emboldened by success, and looking for support from the Raja of Satara, the Angrias aspired to bring all the Siddees' territories under their subjection, and possess themselves of every port on the coast between Bombay and Goa. Nor, in all probability, would their efforts

ह्यानंतर **जं**जिरा लवकर हस्तगत होत नाहीं असें पाहून, **बा**जीराव **पे**शवे ह्यांनीं, दुसरे महत्त्वाचे राजकीय मनसबे साधण्याकरितां, **जं**जिऱ्याचा वेढा उठविण्याचा विचार केला. ह्याच संधीस **सि**द्दी **अ**ब्दुल **र**हिमान हा तह करण्यास सिद्ध झाला. ह्मणून त्याच्याशीं तहाचीं कलमें ठरवून **बा**जीराव ता० ११ डिसेंबर इ० स० १७३३ मध्यें **सा**ताऱ्यास गेले. **सि**द्दी **र**हिमान ह्याच्या हातीं मुळींच सत्ता नसल्यामुळें व **सि**द्दी **सा**त प्रभृति जे **ह**बशांचे प्रमुख सरदार होते त्यांची गर्वतृष्णा कमी न झाल्यामुळें, हा तह पुढें दोन वर्षेपर्यंत अमलांत आला नाहीं.[1]

**बा**जीराव **पे**शवे **सा**ताऱ्यास गेल्यानंतर **प्र**तिनिधि, **भो**सले, **आं**ग्रे वगैरे सरदारांनीं **ह**बशांच्या ताब्यांतील **अं**जनवेल, **गो**वळकोट वगैरे मजबूत जागा घेण्याचा एकसारखा प्रयत्न चालविला होता; व **शा**हु महाराजांकडूनही त्यांस

have been fruitless, if family dissensions, which so often thwart the best-matured designs of Native powers, had not intervened. Manajee and Sumbhajee became estranged from each other, to the great satisfaction of the President and Council, who at once resolved to foment their disputes. With that view, they sent to Colaba, Captain Inchbird, who had become better acquainted with the customs and languages of the Natives than all his contemporaries, and was in consequence the favourite diplomatist of the day. His instructions were simple; he was directed to assist Manajee with money and military stores, and "to take all opportunities of spiriting him up to carry on his resentments against his brother."

—*Bombay Quarterly Review.*

१ हा तह मेजर टी. बी. जर्व्हिस ह्यांनीं आपल्या 'कोंकणवर्णन' पुस्तकांत दिला आहे. त्याची तारीख छ २ साबान सुहुरसन ११३३ ह्मणजे ता० ६ फेब्रुवारी इ० स० १७३३ ही दिली आहे. परंतु ती संशयात्मक दिसते. ह्या तहानें तळें, घोसाळें, निजामपूर, गोरेगांव, बिरवाडी आणि गोंवळे अर्धें असे ५॥ महाल पेशव्यांकडे आले.

वारंवार मदत येत होती. **अं**जनवेल, **गो**वळकोट इकडे **प्र**तिनिधि, **फ**त्ते-सिंग **भो**सले, आणि **मा**नाजी **आं**ग्रे ह्यांची व शत्रूची एकसारखी झटापट चालली होती. त्यांच्याशीं झुंज करण्याची शक्ति न राहिल्यामुळें, **म**हाड वगैरे **म**राठ्यांच्या ताब्यांतील प्रांतास उपसर्ग देऊन तिकडे हूल उठवावी व **म**राठ्यांची फळी फोडावी असा **शा**मलाकडील सरदारांनीं बूट काढिला. तथापि **शा**हु महाराजांनीं **उ**दाजी **प**वार, **दे**वराव **मे**घश्याम, **ह**रि **मो**रेश्वर **रा**जाज्ञा, **शे**ख **मि**रा **वा**ईकर, **बा**जी **भि**वराव वगैरे निवडक लोक पाठवून त्यांच्याकडून **शा**मलांचें पारिपत्य होईल अशी तजवीज होती. त्यांच्या व **शा**मलांच्या बऱ्याच लहान मोठ्या चकमकी झाल्या. परंतु **म**राठ्यांचा जमाव व दारूगोळा कमी असल्यामुळें आणि **अं**जनवेलीकडून **इं**ग्रज व **फि**रंगी ह्यांचें साहाय्य **ह**बशीलोकांस विशेष पोहोंचत असल्यामुळें, शत्रूचा पुरता मोड होईना. त्यामुळें **अं**जनवेल **गो**वळकोट इकडे शत्रूस जबरदस्त शह देणें **म**राठ्यांस अवश्य वाटूं लागलें. ह्मणून **शा**हु महाराजांनीं **सं**भाजी **आं**ग्र्यास पत्र पाठवून, त्यास ताबडतोब **अं**जनवेलीस जाऊन शत्रूस जबरदस्त शह देण्याबद्दल आज्ञा केली. परंतु **मा**नाजी **आं**ग्रे व **सं**भाजी **आं**ग्रे ह्यांच्यामध्यें रहस्य नसल्यामुळें त्याच्या हातून जितक्या प्रामाणिकपणानें स्वामिसेवा व्हावी तितक्या प्रमाणानें ती झाली नाहीं !

**म**हाडच्या बाजूस असलेल्या सैन्यापैकीं प्रमुख सरदार **ह**रि **मो**रेश्वर **रा**जाज्ञा ह्यांनीं ह्या संधीस लिहिलेलें छ० ९ रमजान रविवार (ता० ३ जानेवारी इ० स० १७३४)चें एक पत्र आह्मांस उपलब्ध झालें आहे. त्यावरून ह्या वेळच्या **म**राठी सैन्याच्या स्थितीची चांगली कल्पना करितां येते. हें पत्र येणेंप्रमाणें:—

"श्रीमंत महाराज राजश्री छत्रपति स्वामींचे सेवेसीः—

विनंति सेवक **ह**रि **मो**रेश्वर **रा**जाज्ञा कृतानेक विज्ञापना. तागाईत छ० ९ रमजान रविवार मुकाम **ला**डवळ नजीक **म**हाड महाराजांच्या कृपावलोकनें करून सेवकाचें व फौजेचें वर्तमान यथास्थित असे. विज्ञापना. जासुदाबरोबर आज्ञापत्र सादर केलें तें पावोन सनाथ जाहलों. पत्रीं आज्ञा कीं, "**म**हाडचा कोट घ्यावा हें स्वामींस जरूर आहे; तर **म**हाडास मोर्चेबंदी करून नाकें असतील तेथें तोफा जोडून कोट जेर करणें. सावधपणें मनसबा करून स्थल हस्तगत करणें. राजश्री **ब**काजी **मा**हडिक याजवळून **र**साळगड, **मं**डणगड व

**सु**वर्णदुर्ग येथील तोफा आणून जोडणें. मशारनिल्हे माहीत आहेत. त्यांच्या अनुमतें विचार कर्तव्य तो करून कार्यसिद्धि करणें. यांच्या विचारें नाकें असतील तेथें तोफा जोडून, प्रयत्न करून, स्थल हस्तगत करणें." ह्मणून आज्ञा केली. ऐशास आज्ञेप्रमाणें वर्तणूक करून महाराजांच्या पुण्यप्रतापेंकरून स्थल हस्तगत करीतच आहों. परंतु **अं**जनवेलीकडे मातबर फौज उतरून जबरदस्त शह द्यावा. तेव्हां **शा**मलास पायबंद बसेल. आणि येथें **म**हाडासच चहुंकडून मोर्चेबंदी करावी, व तोफा पंधरा शेर सोळा शेर पक्के गोळ्यांच्या, पांच सहा नाके आहेत तेथें जोडून मार द्यावा. त्याचें सर्व साहित्य दारूगोळ्यांची पोख्ती बेगमी करून चौगीर्द मार द्यावा तेव्हां शत्रू आयास येतील, आणि स्थळ हस्तगत होईल. ऐशास राजश्री **व**काजी **म**हाडिक यांजकडून तोफा आणवणें ह्मणोन आज्ञा केली. त्यावरून आह्मीं मशारनिल्हेस बोलावून आणून, राजश्री **प**वार व अजम **शे**खमिरा व आह्मीं बसोन विचार केला. तोफांविशीं बहुतांप्रकारें मशारनिल्हेस सांगितलें. परंतु तोफांचें साहित्य त्यांजकडून होतां दिसत नाहीं. जो जमाव घेऊन आह्मांजवळ आले, त्याहून जास्ती जमाव अगर तोफांचें साहित्य त्यांस येत नाहीं. येविशीं मशारनिल्हे यांनीं सेवेसीं विनंतिपत्र लिहिलें आहे, त्याजवरून विदित होईल. आधीं तोफा पाहिजेत; तेव्हां पुढें मनसब करावा. तोफा जोडून मार दिल्याखेरीज गनीम आयास येत नाहीं. तोफा जरूर पाहिजेत. तर वरकड साहित्य जैसें महाराजांनीं केलें, तैसेंच तोफांची तरतूद हरप्रकारीं साहेबीं करून पांच सहा तोफा जबरदस्त पाठविल्या पाहिजेत. महाराजांशिवाय तोफा पोंहचत नाहीं. तरी तोफा पांच सहा व दारूगोळे सत्वर पोंहचत ती गोष्ट केली पाहिजे. भांडी जोडावी. तेथील बेहबुदीबद्दल बरकंदाज पाहिजेत. तर कांहीं परदेशी व कांहीं कानडे प्यादे ऐसे एकहजार बरकंदाज पाठविले पाहिजेत. व जेजाला शें सवाशें व बाण दीडशें व दारूगोळीची विपुल बेगमी करून पाठवावी; व मोर्चेबंदीच्या कामावरी कारीगर पाहिजेत. तर बेलदार दोनशें व सुतार पंचवीस व लोहार दुकानें दहा व पाथरवट दहा व तबेलदार दहा येणेंप्रमाणें पाठविले पाहिजेत. सर्व साहित्य सत्वर केलें पाहिजे. दिवसेंदिवस गनीम बळकटी करितो. त्याचा उपमर्द सत्वर होय ऐसें करणार महाराज धनी समर्थ आहेत. तिकडे मातबर फौज घांटाखालीं पाठवून **अं**जनवेलीस वेढा

देऊन जबरदस्त शह पोंहचे ऐसें केलें पाहिजे. **अं**जनवेलीस सत्वर शह पोंह-चून पायबंद गनिमास बसला ह्मणजे आयास येईल, आणि महाराजांचा बोल-बाला होईल. तर **अं**जनवेलीस फौजा पाठवून लिहिल्याप्रमाणें इकडील बेगमी करून सत्वर पाठविली पाहिजे. **ब**काजी **म**हाडिक यांनीं महाराजांस विनंति-पत्र लिहिलें आहे. त्यांत सांवळें गोंधळें करून लिहिलें आहे. परंतु त्यांच्यानें भांडीं येत नाहींत. महाराजांनीं राजश्री **सं**भाजी **आं**ग्रे यांजकडे हुजरे पाठ-वून भांडीं देविलीं पाहिजेत. भांड्यांखेरीज कांहीं होत नाहीं. भांडीं थोरलीं असावीं. तर भांड्यांची बेगमी केली पाहिजे. महाराजांनीं भांडीं देविलीं पाहि-जेत. **म**हाडास चोहोंकडून मोर्चे पाहिजेत. त्यास एक मोर्चास पांच हजार माणूस पाहिजे. याविशीं महाराजांनीं आज्ञा करावयाची ते केली पाहिजे. येथें सारे आह्मीं किती आहों हें महाराजांस दखल आहे. तर जो हुकूम करणें तो महाराजांनीं केला पाहिजे. भांड्यांस गोळे लोखंडी पाहिजेत. तर तेंही सा-हित्य केलें पाहिजे. सेवेसीं श्रुत होय ही विज्ञापना."

ह्या पत्रामध्यें "मातबर फौज घांटाखालीं पाठवून **अं**जनवेलीस वेढा देऊन जबरदस्त शह पोंहचे ऐसें केलें पाहिजे. **अं**जनवेलीस सत्वर शह पोंहचवून गनिमास पायबंद बसला ह्मणजे तो आयास येईल" हा मुद्दा मुख्य असल्यामुळें **शा**हु महाराजांनीं त्याप्रमाणें **सं**भाजी **आं**ग्रे ह्यांस अविलंबें तिकडे जाण्याब-द्दल पत्र पाठविलें. त्याचें उत्तर **सं**भाजी **आं**ग्रे ह्यांनीं ता० १० फेब्रुवारी इ० स० १७३४ रोजीं पाठविलें आहे. तें येणेंप्रमाणें:—

"श्रीमंत महाराज छत्रपति स्वामींचे सेवेसीः—

विनंति सेवक **सं**भाजी **आं**ग्रे कृतानेक विज्ञापना येथील कुशल तागाईत माघ वद्य चतुर्थी रविवार पावेतों स्वामींचे कृपावलोकनेंकरून वर्तमान यथास्थित असे विशेष. स्वामींनीं आज्ञापत्रें दोनचार पाठविलीं, तीं मस्तकीं वंदून संतोषा-वह आनंद झाला. स्वामींनीं आज्ञा केली कीं, जमावानिसीं येऊन **अं**जन-वेली **गो**वळकोट या स्थलांस शह देणें. मदतीस फौज पाठविली जाईल. कोणे ठिकाणीं फौजेस सामील करावी ह्मणोन आज्ञापिलें. आज्ञेप्रमाणें खुषकीच्या जमावाची व आरमाराची तयारी करून, माघ शुद्ध पंचमी इंदुवारीं, जंजिरें **वि**जयदुर्गाहून स्वार होऊन **खा**रापाटणावरून **ज**यगडीं आल्यावर, महारा-

जांचे सेवेसी विनंतिपत्रें लिहून **राघो नारायण** व **त्रिंबक विष्णु** याची रवानगी करितों; आणि फौजेची रवानगी करणार स्वामी धनी आहेत. **शाम**लाकडील मनसबा स्वामींनीं चित्तावरी धरून दुष्टावरी स्वामींची अवकृपा जाहली आहे. स्वामींच्या तेजाचे प्रभावेंकरून **शाम**लास दंड होईल. स्वामींचे पुण्याचा प्रभाव अगाध आहे. **शाम**लावरी मोहीम स्वामींची झाली. याउपरी सर्व साहित्य करावें लागलें. वरघांटीहून दाणा गल्ला देखील कोटा येतील, तरीच लष्करचे फौजेची बेगमी होईल. अन्यथा बेगमी होत नाहीं. मुलकांत गल्ला-दाण्याची तंगचाई आहे. त्या जागां जाऊन बसावें तेव्हां खातरनिशा करून उठावें, ऐसा दृढ विचार स्वामींनीं केला आहे. **इंग्रज** व **फिरंगी** यांचा बंद करावा ह्मणजे **अंजनवेली**चे खाडींत आरमार जाऊन सामान पावेल. आणि खुषकी व जलमार्गें दोहींकडून पायबंद जाहलियानें काम होईल. येविसीं पेशजीं सविस्तर अर्थ लिहून विनंतिपत्र पाठविलें आहे. त्यावरून विदित जाहलें असेल. शत्रूचे पक्ष नाना उपाय करून छेदावे, तेव्हां आशा जागां विलगोन बरजोर नतीजा देऊन कार्यसिद्धि करावी. मागें फौजा येऊन लोक मनसबा निरर्थक जाहला. दुहीमुळें काम फसावून गेलें. **इंग्रजां**चा मोठा शह आहे. ये गोष्टीचा अर्थ स्वामींनीं बरा चित्तांत आणून, एखादा मातबर माणूस त्याजकडे जाऊन, आरमारास त्याचा शह नव्हे ऐसा विचार स्वामींनीं केला, तरी मोठें कार्य होईल. सेवकास सूचित अर्थ विदित व्हावा ह्मणून लिहून पाठविला आहे. पारपत्य करणार स्वामी धनी आहेत. सेवक आज्ञेप्रमाणें जमावानिशीं येतो. स्वामींची सेवा वडिलांनीं केली, त्यामागें सेवकानें जीवेंभावें श्रमसायास करून निष्ठेनें सेवा करावी, आणि आपला जगनामोश करून घ्यावा, हाच निजध्यास आहे. दुसरा अर्थ सेवकाचे चित्तीं किमपि नाहीं. या उपरी विलंब न लावितां सिताबीनें येतों. सेवेसी विदित जाहलें पाहिजे हे विज्ञापना."

ह्या पत्रावरून **इंग्रजां**चें प्राबल्य **अंजनवेली**स अधिक असून त्यांचें व **फिरंगी** यांचें **हबशी**लोकांस पाठबळ चांगलें होतें असें दिसतें. ह्याचें कारण **माना-जी**चें व **इंग्रजां**चें वांकडें आलें असल्यामुळें, त्यांनीं ता० ५ दिसेंबर इ० स० १७३२ रोजीं **हबशा**शीं गुप्त तह केला होता. तेव्हां कोणीकडून तरी हीं दोन

स्थळें हस्तगत करून घेण्याकरितां, इंग्रजास अनुकूल करून घेण्याची शाहु महाराजांस व सर्व मराठे मुत्सद्दयांस अत्यंत आवश्यकता वाटणें साहजिक आहे.

अशा नाजुक प्रसंगीं, ब्रह्मेंद्रस्वामी ह्यांनीं इंग्रजांकडे कांहीं अनुसंधान लावून, त्यांची शामलास मदत होऊं नये, अशी खटपट चालविली होती. लेखांक ९ ह्या पत्रामध्यें शाहु महाराजांची राणी सखवारबाई इजला स्वामींनीं "इंग्रेज बंद करावयास आपण ममईस जावें कीं काय" म्हणून प्रश्न विचारला आहे. त्याचें उत्तर राणीनें, "स्वतःच जाण्याचें प्रयोजन नाहीं, परंतु कार्य होईल असा विचार करावा. आणि जेणेंकरून इंग्रेज बंद होऊन शामलास मदत न करी, आपणांस सल्रख राखे तें करावें." असें लिहिलें आहे. लेखांक १० मध्यें "इंग्रजांची व स्वामींची मैत्री" असल्याबद्दलचा उल्लेख असून, "मैत्रीकीमुळें इंग्रजांस सांगून शामलाची मदत न करीत तो अर्थ केला पाहिजे" म्हणजे स्वामींस गांव देऊं, असें सखवारबाईनें स्वामींस अभिवचन दिलें आहे. अशाच प्रकारचा उल्लेख लेखांक १०२ ह्याही पत्रांत आहे. लेखांक २८० ह्या पत्रांत स्वामींनीं, अंजनवेलीस मराठ्यांचे हातून बरोबर मदत होत नाहीं असें पाहून, चिमाजी आपांस, "चहोंकडून सामान न ये! तेव्हां अंजनवेली जेर होऊन आपोआप टाकून पळतील!" अशा अर्थाचा औपरोधिक मजकूर लिहिला आहे. ह्या सर्वांवरून स्वामींची मूर्ति ह्या हबशांच्या राजकारणप्रसंगांत स्वस्थ बसलेली नसून, गुप्तरूपानें अनेक मसलती करीत होती, व नानातऱ्हेचीं सूत्रें फिरवीत होती, असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं.

मराठ्यांनीं सिद्दी साताकडे कांहीं संधान करून त्यास वश करण्याचाही प्रयत्न चालविला होता. छत्रपतींच्या दप्तरांत सिद्दी सातासंबंधाचें एक पत्र सांपडलें आहे, त्यावरून ह्या म्हणण्यास पुष्टि येते.[1] हें पत्र येणेंप्रमाणें:—

"सेवेसी विज्ञापना. महाराजांस सिद्दी सात याचे कागद दाऊद चौपदार

---

१ ह्या मसलतींत स्वामींचेंहीं अंग असावें असें पृष्ठ २५ मधील टीपेमध्यें दिलेल्या नारो विठ्ठल प्रभूच्या पत्रांतील शेवटच्या मजकुरावरून दिसून येतें. त्यांत सिद्दी सातानें स्वामींच्या देवास १२ इनाम गांव देण्याचें कबूल करून मराठ्यांचा वेढा उठविण्याबद्दलचें बोलणें चालविल्याचा उल्लेख आहे.

याजबरोबर आहेत. त्यास महाराजांचा जोर त्यावर आहे. महाराजांनीं पैरवी करून **सिद्दी सात** यासी हाताखालीं घालून आपलेंही कार्य करून घ्यावें. ऐसा त्याजवरीही उपकार करावा. त्याजमध्यें उत्तम आहे. महाराजांनीं विचारें करून कार्य करून घ्यावें. **अं**जनवेल, **गो**वळकोट इकडे फौज रवाना करावी, आणि दुरून शह देऊन **सिद्दी सात** याला हाताखालीं घेतला पाहिजे. केवळ मोर्चेबंदी करूनच अतिशय केल्यापेक्षां सल्ल्यानें होतां सल्ले घेतल्यानें बरें होय. महाराज थोर आहेत. कार्य करून घ्यावें. **अं**जनवेल, **गो**वळकोट इकडे महाराज फौज पाठवितील. त्यास आधीं **गो**वळकोटच्या गळां पडों नये. **अं**जनवेल याच्या गळां पडावें. **अं**जनवेल आली ह्मणजे **गो**-वळकोट आला. महाराजांनीं फौज रवाना करावी. तिला आधीं मुलूक लुटावयासी सांगावें. मुलूक लुटावयास आठ दिवस लागतील. तोंपर्यंत महाराजांनीं **सिद्दी सात** याचे कागदींपत्रीं कार्य करून घेतलें पाहिजे. मोर्चेबंदीपेक्षां दोहींकडेस कागदींपत्रीं कार्य उत्तम होईल. यामध्यें महाराज धनी आहेत. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना. तोफांखेरीज काम होत नाहीं. तोफा पांच सहा पक्के पंधरा शेर सोळा शेर ऐशा गोळ्यांच्या असाव्या. तरी महाराजांनीं तोफांची तरतूद केली पाहिजे. तोफांखेरीज खर्च होयास संकट आहे. तोफांची तरतूद केली पाहिजे. सेवेसी श्रुत होय ही विज्ञापना."

ह्या पत्राच्या संदर्भावरून हें पत्र इ० स० १७३४ च्या जानेवारी महिन्यांतीलच असावें असें दिसतें. ह्या पत्राप्रमाणें **सिद्दी सात म**राठ्यांस अनुकूल झाल्याची माहिती मिळत नाहीं. तथापि त्याच्या एकंदर वर्तनावरून त्यानें स्वार्थ साधण्यासाठीं कांहीं **म**राठे सरदारांस नादीं लावून त्यांशीं सलोखाचें बोलणें लाविलें असावें असें वाटतें. ह्यानंतर एकवर्षपर्यंत—ह्मणजे फेब्रुवारी इ० स० १७३४ पासून इ० स० १७३५ च्या जानेवारीपर्यंत—**म**राठ्यांच्या व **ह**बशांच्या चळवळींची नीटसी माहिती समजत नाहीं. परंतु **अं**जनवेल **गो**वळकोट ह्या बळकट जागा सर करण्याचा त्यांचा एकसारखा प्रयत्न चालला असावा, व **इं**ग्रज, **फि**रंगी, ह्यांस अनुकूल करून घेण्याकरितां अनेक उपाय चालले असावेत, असें अनुमान करिता येतें. शेवटीं, इ० स० १७३५ च्या जानेवारी महिन्यांत **म**राठ्यांस यश येऊन माघ शुद्ध द्वितीया रोज बुधवार ह्या दिवशीं **अं**जनवेली त्यांच्या हस्तगत झाली

व त्यांच्या हेतूप्रमाणें तेथें त्यांचा विजयध्वज फडकूं लागला. हें आनंदकारक वर्तमान सखवारबाई राणीनें स्वामींस मोठ्या तांतडीनें कळविलें आहे ( लेखांक २१ ). ह्यावरून स्वामींच्या प्रयत्नाचें सार्थक झालें असावें असें मानण्यास हरकत नाहीं.

अंजनवेल सर केल्यानंतर कांहीं दिवस हबशीप्रकरण विझलें होतें. परंतु पुढें सिद्दी सात पुनः मराठ्यांच्या अमलास खलेल करूं लागला. तेव्हां चिमाजीआपा ह्यांनीं कोंकणांत स्वारी करून त्यास नतीजा दिला. सिद्दी सात ह्याची व चिमाजीआपा ह्यांची, मुक्काम चऱ्हई नजीक रेवास येथें, मोठी लढाई झाली. तींत हा प्रबल हबशी सरदार ता० १९ एप्रिल इ० स० १७३६ रोजीं ठार मारला गेला. अर्थात् सिद्दी सातासारखा दुष्ट, हिंदुधर्मद्वेष्टा व महाप्रमत्त असा हबशांचा पुढारी मृत्युमुखीं पडल्यामुळें त्यांच्या पक्षाचा अगदीं कमजोर झाला. नंतर त्यांनीं मराठ्यांशीं कायमचा तह करून त्यांचें सख्य संपादन केलें.

सिद्दी सात हा केवळ एक दैत्य होता. त्याचा पराभव चिमाजी आपांनीं फार शौर्यानें केला. ह्मणून ब्रह्मेंद्रस्वामींनीं व शाहु महाराजांनीं त्यांचें फार फार अभिनंदन केलें. फत्तेसिंग भोसले व जिवाजी खंडेराव चिटणीस ह्यांनीं महाराजांच्या आज्ञेवरून चिमाजीआपांस संतोषप्रदर्शक गौरवाचीं पत्रें पाठविलीं आहेत. तीं वाचून त्या वेळीं मराठे सरदारांचीं अंतःकरणें विजयानंदानें कशीं भरून गेलीं होतीं ह्याची चांगली कल्पना करितां येते. फत्तेसिंग भोंसले ह्यांनीं लिहिलें आहे कीं, "रेवसावरी सिद्दी सात यांशीं युद्धप्रसंग जाला. ते समयीं युद्ध तुंबळ होऊन हबशी याचे हजार माणूस कापून काढिले, व सिद्दी सात खासा ठार जाहला, ऐसें वर्तमान लिहिलें. त्यावरून राजश्री स्वामी बहुतसे खुशाल जाले. तुह्मीं महत्कृत्य केलें. सिद्दी सात ह्मणजे केवळ हबशी. सिद्दी यांचा मुख्यच होता. तो तुमच्या हातें पराभवातें पावला. थोरसें यश तुह्मीं जोडिलें. राजश्री बाजीराव प्रधान तिकडे गेले. मागें तुह्मीं बरी शिकस्त करून हबशी बुडविला. हबशांचा मूळ कंदच उपटून टाकिला ! चहूंकडे लौकिक विशेषात्कारें जोडिला. तुमची निष्ठा, राजश्रींच्या पायाशीं एकनिष्ठतेनें सेवा करावी ऐसीच आहे. तदनुरूप मोठेंसें यश तुमचे पदरीं पडिलें. सामान्य गोष्ट जाहली नाहीं. आह्मांस बहुत समाधान जाहलें." ह्याचप्रमाणें

**जि**वाजी **खं**डेराव **चि**टणीस ह्यांनींही, "नौबत वाजविली. खुशाली केली. **सि**द्दी **सा**तासारिखा गनीम मारिला. हें कर्म सामान्य न केलें." असा वारंवार स्तुतिवाद करून, महाराजांनीं दिलेलीं सन्मानाचीं वस्त्रें, हिरेजडित पदक, मोत्यांची कंठी, व रत्नखचित तरवार इत्यादि बहुमानाचे वस्त्रालंकार **चि**माजी आपांस अर्पण केले. "अमृतं स्वामिगौरवम्" ह्या न्यायानें **चि**माजी आपांस हे सन्मान स्वीकारण्यांत किती संतोष झाला असेल, व ह्या अमृततुल्य वाग्रसानें त्यांच्या हृदयांतील वीरश्रीस किती प्रोत्साहन मिळालें असेल, ह्याची कल्पना करण्याचें काम रसिक वाचकांकडे सोंपविणें योग्य आहे.

ह्या सर्व यशाचें वृत्त श्रवण करून **ब्र**ह्मेंद्रस्वामींच्या हृदयांत आनंदाच्या लहरी उत्पन्न झाल्या असतील ह्यांत आश्चर्य नाहीं. ह्या वेळचें स्वामींचें अस्सल पत्र उपलब्ध नाहीं. तथापि, ह्याच वेळीं **चि**माजीआपांस लिहिलेल्या एका पत्रांत त्यांनीं, "**ह**णमंतासारखें यश तुह्मांस आलें. पुढें **श्री** अहद **रामेश्वर** तहद **दि**ल्ली यश देईल. तुह्मीं वर्तमान लिहिलें व चिरंजीव **बा**जीरावांचीं पत्रें आलीं हें संतोषाचें वर्तमान ऐकोन, **जैसी हणमंताचे गळां रघुवीरें रत्नांची माळ घातली, तैशीं यशाचीं पत्रें पाठविलीं. तुह्मी रामरूप जाहले.**"(लेखांक २८१) म्हणून जे उद्गार काढिले आहेत, तेच स्वामींच्या आनंदातिशयाचे उत्तम निदर्शक होत ह्यांत शंका नाहीं. ह्याच पत्रांत स्वामी लिहितात कीं, "जरी दहा कोटी फौज घेऊन **को**कणांत जातेत तरी ऐसें यश **को**कणचें न येतें; ऐसें पुर्तें आपले ठायीं समजणें. **रा**वणासारखा दैत्य मारला!" ह्यावरून ह्या **ह**बशांच्या राजकारणांत स्वामींच्या आशीर्वादाचा प्रतापमहिमा कांहीं अलौकिकच असला पाहिजे असें त्या वेळच्या भाविक जनांस वाटूं लागावें व त्यांची स्वामींवर अधिक अधिक श्रद्धा बसावी हें अगदीं साहजिक आहे.

---

# भाग ५ वा.

## वसईची मोहीम.

**ब्र**ह्मेंद्रस्वामी ह्यांनीं स्वधर्मसंरक्षणार्थ व स्वजनकल्याणार्थ जीं महत्त्वाचीं राजकारणें चालविलीं, त्यांपैकीं **जं**जिऱ्याच्या **ह**बशीप्रकरणाची संक्षिप्त परंतु खरी हकीकत मागील भागांत दिली आहे. ह्या प्रकरणाप्रमाणेंच दुसरें प्रकरण **व**सईची मोहीम ही होय. ह्या मोहिमीमध्यें **ब्र**ह्मेंद्रस्वामी ह्यांचें अंग विशेष असून ती त्यांच्या सूत्रचालनानें व प्रोत्साहनानें यशस्वी झाली, असें मानण्यास कोणतीच हरकत नाहीं. परंतु, ह्याही राजकारणाचें खरें स्वरूप परदेशीय इतिहासकारास चांगलेंसें अवगत न झाल्यामुळें, **म**राठ्यांच्या इतिहासांत त्याचें व्हावें तसें आविष्करण झालेंलें नाहीं. ह्याकरितां, ह्या मोहिमीचा संक्षिप्त वृत्तांत अस्सल कागदपत्रांच्या आधारांनिशीं येथें सादर करितों. ह्मणजे, ह्या महत्त्वाच्या राजकारणांत स्वधर्मरक्षणाचा पवित्र हेतु किती अंतर्भूत होता व तो स्वामींनीं कसा सिद्धीस नेला, ह्याची खरी कल्पना वाचकांस करितां येईल.

**पो**र्तुगीज ह्मणजे **फि**रंगी लोक हे **हिं**दुस्थानांत व्यापार करण्याच्या उद्देशानें इ० स० १४९७ मध्यें प्रथम **का**लिकोट येथें आले. त्यांचा प्रमुख सरदार **वा**स्को दि **गा**मा ह्याची व **का**लिकोटच्या राजाची भेट होऊन त्याला तेथें आश्रय मिळाला. नंतर त्यांनीं तेथून एक एक पाऊल पुढें टाकीत **गो**मांतकांत प्रवेश केला, व तो प्रांत **का**बीज करून **गो**वें येथें इ० स० १५१० मध्यें आपली राजधानी स्थापन केली. त्यांचा पहिला गव्हरनर-जनरल **आ**लफान्सो **अ**लबुकर्क हा होय. हा इ० स० १५१५ मध्यें मृत्यु पावला. त्यानंतर त्यांची सत्ता समुद्रकिनाऱ्यानें उत्तरेस वाढत गेली, व त्यांनीं **गु**जराथचा बादशाहा **ब**हादुरशाहा ह्याजकडून इ० स० १५३३ मध्यें **व**सई घेतली. इ० स० १६६४ मध्यें **पो**र्तुगीज लोकांचें चांगलेंच प्राबल्य होऊन **मुं**बईकिनाऱ्याचा सर्व भाग त्यांच्या ताब्यांत आला होता. परंतु त्यापुढें **यु**रोपमधून इतर राष्ट्रांतील अनेक प्रतिस्पर्धी मंडळ्या व्यापाराकरितां **हिं**दुस्थानांत आल्यामुळें त्यांचें माहात्म्य विशेष वाढलें नाहीं. ह्याच समयास **म**हाराष्ट्रराज्यसत्तेचा अभ्युदय होऊन **क**ल्याण **भि**वंडी

वगैरे प्रांत **म**राठ्यांच्या ताब्यांत आला व **फि**रंगी लोकांस आपल्या सत्तेचा विस्तार करण्यास मुळींच अवकाश सांपडला नाहीं. तथापि त्यांनीं **सा**ष्टी प्रांतास पुष्कळ उपसर्ग देऊन **हिं**दुधर्माचा विध्वंस करण्याचा एक सारखा सपाटा चालविला होता. त्या योगानें तेथील **हिं**दुप्रजा अगदीं त्रस्त होऊन गेली होती.

**सा**ष्टीच्या बखरीमध्यें **पो**र्तुगीज लोकांच्या जुलमामुळें **हिं**दुलोकांची कशी दीन स्थिति झाली होती ह्याचें फार हृदयद्रावक वर्णन दिलें आहे. तें येणेंप्रमाणेंः–"**ठा**णें ह्मणजे **बि**म्बस्थान. हें राज्य **फि**रंगी ह्यांनीं घेऊन कुबुद्धि धरिली. जमीनदारांचीं वतनें बुडविलीं. गांवाचे गांव घेऊन बाटविले. किरिस्ताव केले. **सा**सष्ट गांवचे व **आ**गर **व**सईचे बहुतेक लोक धरून बाटविले. घरांत कोणी नसलें तर पोरें नेऊन बाटवावीं. असा उपद्रव **म**हाराष्ट्रांत मांडिला. कोणी **द**क्षिणेंत पळून गेले. क्रियाकर्मांतराचा लोप झाला. देवधर्म बुडाला. प्रांतांतील तीर्थे क्षेत्रें सर्व लोपलीं. देवालयें फोडून साफ केलीं. **फि**रंगी यानें आपलीं देवळें बांधिलीं. **फि**रंगीधर्म चालवायास लागले. ब्राह्मणास मुलखांत फिरण्याची बंदी झाली. कोणी कांहीं व्रतें, उद्यापनें, होम वगैरे आरंभिलीं ह्मणजे त्यांचें घर वेढलें. शेजारी पाजारी त्या घरांत सांपडले ह्मणजे त्यांसही धरून न्यावें. उत्सव वगैरे चोरून जीव वांचवून करूं लागले. असा अनर्थ मांडिला." इ० इ०. अशा रीतीनें **पो**र्तुगीज लोकांनीं त्राहि त्राहि केल्यामुळें सर्व **हिं**दुलोक **म**राठी साम्राज्याच्या अधिपतींस शरण जाऊन स्वसंरक्षणाचा प्रयत्न करूं लागले असतील ह्यांत आश्चर्य नाहीं.

**सा**ष्टीच्या बखरीवरून असें दिसून येतें कीं, छत्रपति **सं**भाजी महाराजांच्या कारकीर्दीपासून हा धर्मछल चालू होता. त्या वेळींच **पा**ठारे जातीचे **हिं**दुलोक **पो**र्तुगीज लोकांच्या उपद्रवामुळें त्रासून जाऊन **के**ळव्यास येऊन राहिले. नंतर तेथून **अ**णजुरास आले. त्यांचे पुढारी **गं**गाजी नाईक ह्मणून एक गृहस्थ होते. त्यांनीं **सं**भाजी महाराजांकडे संधान लाविलें. परंतु **सं**भाजीच्या कारकीर्दीत मोंगलांची सरशी होऊन सर्व **म**राठी राज्य विस्कळित झालें, त्यामुळें **म**हाराष्ट्रधर्मरक्षणाचें कार्य सिद्धीस गेलें नाहीं. पुढें **गं**गाजी नाईक ह्यांनीं

---

१ साष्टीची बखर–काव्येतिहाससंग्रह. पृष्ठ १.

कुलाब्यास सेखोजी आंग्र्याकडे जाऊन, पोर्तुगीज लोकांचा मुलूख सर करावा व स्वधर्माचें रक्षण करावें, म्हणून गुप्त रीतीनें प्रयत्न चालविला. परंतु ती बातमी फिरंगी ह्यांस पोहोंचून त्यांनीं गंगाजी नाईकांस कैद केलें, व त्याजपासून दंड घेऊन त्यास सोडून दिलें. गंगाजी नाईकांप्रमाणेंच त्यांचे बंधु बुबाजी नाईक ह्यांनीं पंढरपुरास जाऊन तेथून देहूकर साधु तुकाराम ह्यांचे चिरंजीव नारायणबोवा गोसावी ह्यांचे मार्फत खंडेराव दाभाडे सेनापति ह्यांचेकडे कांहीं संधान बांधिलें. सेनापति बहुत खुष झाले व त्यांनीं, नारायणबोवांच्या समक्ष, विठोबाचे देवालयांत, असें मान्य केलें कीं, "जर तुमचा मुलूख आह्मांस मिळाला तर तुमचें सर्व साहित्य आह्मी करूं. तुमचीं वतनें चालू होतील. परंतु आमचे नांवें निशाण मात्र चालवावें. वरकड जमीनदारी व आमचा अंमल तुह्मींच चालवावा." ह्या नंतर बुबाजी नाईक परत कोंकणांत गेले, व त्यांनीं आपल्या बंधूस सविस्तर वर्तमान निवेदन केलें.

ह्याच वर्षीं—ह्मणजे इ० स० १७२० मध्यें, बाजीराव पेशवे ह्यांचे मेहुणे रामचंद्र महादेव जोशी चासकर ह्यांनीं कल्याणप्रांताचा निंमा अंमल घेतला व कल्याण येथें पेशव्यांचें ठाणें बसविलें. खुद्द मराठ्यांचा सुभा कल्याणास स्थापन झाल्यामुळें, गंगाजी नाईक वगैरे मंडळींस सेनापति दाभाडे ह्यांच्या फौजेची मदत घेण्याची अवश्यकता राहिली नाहीं. त्यांनीं चिंचवडचे श्री देव गोसावी ह्यांच्या मार्फत, कल्याणचे सुभेदार रामचंद्र महादेव ह्यांच्याशीं, फिरंगी लोकांच्या राजकारणाचें बोलणें लाविलें. त्यांनीं त्यांची एकांतीं भेट घेतली; आणि पेशव्यांच्या शिकेकट्यारीची आणभाक घेऊन आपला सर्व वृत्तांत निवेदन केला. "आमचा प्रांत आमची मायभूमि. तिचा जो राजा आहे तो दुष्ट आहे. त्यानें आमचीं वतनें बुडविलीं. मुलखाचा देवधर्म बुडविला. आमचे लोक बाटविले. असा उपद्रव करीत आहे ह्मणून आपलेपाशीं आलों" असें मोठ्या दीनवाणीनें सांगितलें. तेव्हां रामचंद्रपंतांस त्यांची दया आली, व त्यांनीं पेशव्यांच्या मार्फत त्यांच्या दुःखाचा परिहार करून त्यांचें इष्टकार्य सिद्धीस नेऊं, असें अभिवचन दिलें. नंतर गंगाजी नाईकांनीं आपले साथीदार लोक रामचंद्रपंतांस भेटवून, ठाणें, वसई, धारावी वगैरे ठिकाणच्या

गुप्त वाटा व दर्यांचे लाग साधून मराठ्यांच्या सैन्यास वाटेल ती मदत देण्याचें वचन प्रमाण केलें. तात्पर्य, सर्वांनीं मिळून हिंदुधर्मावर आलेलें संकट निवारण्याचा प्रयत्न चालविला. परंतु हा कार्यभाग रामचंद्र महादेव ह्यांचे हातून सिद्धीस गेल्याचें दिसत नाहीं.

सल्लास अशरीन (इ० स० १७२२–२३) ह्या वर्षी गंगाजी नाईक, बुबाजी नाईक, मुरारजी नाईक, शिवाजी नाईक आणि नारायणजी नाईक साळोंखी ज्ञात पाठारे हे मुद्दाम साताऱ्यास गेले, व तेथें त्यांनीं छत्रपति, बाजीराव व चिमाजी आपा ह्यांचें दर्शन घेऊन आपली सर्व हकीकत निवेदन केली. आणि "आपण पुरातन वसईप्रांताचे वतनदार आहों. त्यास वसईप्रांत फिरंगी याकडे आहे. त्याणें देवस्थानें व तीर्थे यांचा व महाराष्ट्रधर्म याचा लोप केला. हिंदुलोक भ्रष्टावून क्षार केले. आपण पुरातन वतनदार, देशनाडगौडपणाचें वतन होतें. त्यास, फिरंगी याकडे तो प्रांत जाहलियापासून वतन चालों देत नाहीं. याजमुळें आपण कुटुंबसहवर्तमान त्या प्रांतांतून येऊन कल्याणप्रांतीं प्रस्तुत राहिलों. वसईप्रांताची हकीकत व आपलें वृत्त निवेदन करून त्या प्रांतीं साहेबीं मसलत करून, प्रांत मजकूर सर करून देवस्थापना करून स्वधर्मस्थापना होय ते गोष्ट करावी; व आपलें वतन आपणास करून द्यावें." अशी विनंति केली. आणखी "त्या प्रांतींचे कोट किल्ले व जंजिरे वसई व कोट ठाणें या जागांचे लाग, माग, व खाडियांचे उतार व मार्ग वाटांस आपण माहीत आहों. व ठाणें वसईकोटाचे लाग आपले स्वाधीन आहेत." ते साधून देऊन मराठ्यांच्या सैन्यास तो प्रांत मिळवून देऊं असें कबूल केलें. शाहु महाराजांनीं व पेशव्यांनीं त्यांची विनंति ऐकून घेतली व त्यांचें संकट निवारण करण्याचेंही वचन दिलें. परंतु इतर अनेक राजकीय मनसब्यांमुळें त्यांना ह्या मसलतींत लवकर लक्ष घालण्यास अवधि सांपडली नाहीं. तथापि गंगाजी नाईक प्रभृति मंडळींनीं प्रतिवर्षी पेशव्यांस भेटून फिरंग्याचा मनसबा हातीं घेण्याबद्दल त्यांना एकसारखा तगादा चालविला होता.

गंगाजी नाईक प्रभृति पाठारे मंडळींनीं पेशव्यांच्याकडे संधान बांधिलें होतें

त्याप्रमाणें **अं**ताजी[१] **र**घुनाथ व **राम**चंद्र **र**घुनाथ **का**वळे देसाई व देशपांडे **व**सई वगैरे प्रांत **फि**रंगाण, ह्यांनींही **पे**शव्यांकडे जाऊन हें स्वधर्मसंरक्षणाचें महत्कार्य सिद्धीस नेण्याबद्दल त्यांचें मन वळविण्याचा प्रयत्न चालविला होता. **बा**जीराव **ब**ल्लाळ यांनीं छ १९ रजब सु॥ सल्लालीन मया व अलफ (ता० २८ जानेवारी इ० स० १७३०) रोजीं **राम**चंद्र **र**घुनाथ ह्यांस पत्र लिहून "आमचेही चित्तीं हाच हेत आहे कीं कार्य करावें. अशा निमित्तें रा० **अं**ताजीपंतास जें सांगणें तें सांगितलें आहे. तुह्मीं आपली खात्री निशा करून कार्य साधणें. तुमचें ऊर्जित करूं." असें अभिवचन दिलें. **चि**माजी आपांनीं, **अं**ताजी **र**घुनाथ ह्यांस छ २२ साबान (ता० १ मार्च इ० स० १७३०) रोजीं लिहिलेल्या पत्रांत, "अवघा प्रसंग सत्य भासून कर्तव्य असेल ऐशीच आज्ञा करावी. नाहींतर दुराशेंत गुंतावें सारिखें नाहीं ह्मणून लिहिलें; ऐशियास अवघा प्रसंग तुह्मीं प्रत्ययास आणून दिल्हा आहे. त्यास अनृत काय निमित्त भासेल? अवघा प्रसंग सत्यच आहे व कार्यही कर्तव्य आहेच आहे. तुह्मीं चित्तांत संशय आणावा असा अर्थ नाहीं." असे उद्गार काढिले आहेत. ह्यावरून **पे**शव्यांस हा मनसबा हातीं घेण्याची इच्छा होती, हें उघड आहे. ह्यानंतर **बा**जीराव **पे**शवे ह्यांनीं **शा**हु महाराजांची भेट घेऊन ह्या मसलतीवर **पि**लाजी

१ अंताजी रघुनाथ ह्यांच्यावर पोर्तुगीज लोकांनीं फारच जुलूम केला होता. त्यांचीं वतनें वगैरे जप्त करून व त्यांस 'इनक्विझिशन' मध्यें आणून, त्यांस कडक शासन करण्याचा प्रयत्न केला होता. बाजीराव पेशव्यांनीं मुंबईचे गव्हरनर जॉन हॉर्न ह्यांचे मार्फत पोर्तुगीज लोकांकडे त्यांच्याबद्दल रदबदली केली; पण तिचा उपयोग झाला नाहीं. ह्मणून ते फिरंग्यांच्या हद्दींतून निसटून मराठ्यांस येऊन मिळाले होते. चिमाजी आपांच्या एका पत्रांत "तुह्मी फिरंगी यांचे परम शत्रु आहां. हें फिरंगी यास फारच असह्य. ह्यास्तव तुह्मी फिरंगी याचे सरहद्देपासून चहूं पांचा कोसावर राहवें" असा उल्लेख आढळतो. ही अंताजी रघुनाथ ह्यांचीं पत्रें व माहिती आमचे मित्र व प्रसिद्ध कवि रा. रा. गंगाधर रामकृष्ण मोगरे ह्यांनीं दिली.

**जा**धवराव ह्यांस रवाना केलें. व आपले मेहुणे **कृ**ष्णराव **म**हादेव[१] ह्यास त्यांच्या मदतीस पाठविलें. **पि**लाजी **जा**धवराव ह्यांनीं **गं**गाजी नाईक व **अं**ताजी **र**घुनाथ ह्यांच्या साहाय्यानें **कां**ब्यास वेढा घातला. खाडींत उड्या घालून **फि**रंग्यांचे मचवे घेतले. त्या मचव्यांवर त्यांस दारूगोळा व बारा तोफा सांपडल्या. त्याच तोफा लावून त्यांनीं मोठ्या पराक्रमानें माडी फोडिली व **फि**रंग्यांचा नाश करून त्यांचा अगदीं पराभव केला. तदनंतर त्यांची व **फि**रंग्यांची ता० २७ फेब्रुवारी इ० स० १७३१ रोजीं **म**नोहर येथें लढाई झाली. तींत **म**राठ्यांची सरशी होऊन **पो**र्तुगीज लोकांचा पराभव झाला. नंतर **म**राठे व **पो**र्तुगीज ह्या उभयतांमध्यें तहाचें बोलणें सुरू होऊन कांहीं दिवस हें युद्ध बंद राहिलें.

इ० स० १७३२ पर्यंत **पो**र्तुगीज लोकांचा मुख्य प्रतिनिधि **सा**लडाना डा **गा**मा (Saldanha da Gama ) हा होता. हा इ० स० १७३२ च्या जानेवारी महिन्यांत **लि**स्बनास गेला, व त्याच्या जागीं **कॉं**डे डि **सां**डोमिल (Conde de Sandomil) ह्याची नेमणूक झाली. तो ता० ५ आक्टोबर रोजीं **गो**व्यास येऊन दाखल झाला. त्याचें हिंदुलोकांविषयीं अतिशय वाईट मत असल्यामुळें त्यानें **हिं**दुस्थानांत येतांच **सां**वतवाडीचे **रा**मचंद्र **सां**वत **भों**सले ह्यांच्याशीं युद्ध सुरू केलें, व सर्व हिंदु लोकांशीं क्रूरपणानें वागून आपला करडा अंमल गाजविण्यास प्रारंभ केला. अर्थात् मुख्य अधिपतींचा असा कल पाहतांच **व**सई वगैरे ठिकाणचे **पो**र्तुगीज अधिकारी हिंदुप्रजेवर जुलूम करूं लागले. इ० स० १७३४ मध्यें **दा**म लुई **बो**तेलो ( Dom Luiz Botelho ) नामक सेनापति **व**सईप्रांताच्या बंदोबस्तावर नेमिला होता. त्यानें **आं**ग्रे वगैरे **म**राठ्यांच्या हल्लयापासून **फि**रंग्यांच्या बंदरांचें संरक्षण करण्याकरितां नवीन जहाजें बांधण्याचा विचार केला. त्यांच्या खर्चाकरितां त्यानें कोळी

---

१ हे रामचंद्र महादेव ह्यांचे बंधु. हे रामचंद्र महादेव मरण पावल्यानंतर कल्याणचे सुभेदार झाले. छ १४ रबिलाखर सन इहिदे सलासीन ह्मणजे ता० १६ आक्टोबर इ० स० १७३० रोजीं लिहिलेल्या बाजीरावांच्या पत्रांत ह्यांस मामलत दिल्याचा उल्लेख आहे. त्यावरून इ० स० १७३० सालीं रामचंद्र महादेव मृत्यु पावले असें दिसतें.

लोकांवर जबरदस्त कर बसवून तो जुलुमानें घेण्यास सुरुवात केली.[१] त्यामुळें ते लोक अगदीं असंतुष्ट व बेदिल झाले. त्याचप्रमाणें इतर **हिं**दुलोकही **पोर्तु**गीज लोकांच्या नानाप्रकारच्या जुलुमांस अगदीं त्रासून गेले होते. त्यामुळें सर्वांस ह्या धर्मछलापासून केव्हां मुक्त होऊं असें होऊन गेलें.

ह्या सुमारास **म**राठ्यांचें सर्व लक्ष **ह**बशांच्या राजकारणांत गुंतल्यामुळें त्यांना हा **फि**रंग्याचा मनसबा कांहीं दिवस हातीं घेतां आला नाहीं. परंतु पुढें **ह**बशीप्रकरण संपल्यानंतर, **पे**शव्यांनीं **मा**नाजी **आं**ग्रे व **सं**भाजी **आं**ग्रे ह्या उभय बंधूंमधील वैरभाव नाहींसा करण्याचा प्रथम प्रयत्न केला. ह्या वैरभावामुळें **फि**रंगी लोकांस व **ह**बशांस कोणाचा तरी पक्ष घेऊन **म**राठ्यांच्या प्रांतांत ढवळाढवळ करण्यास फार संधि सांपडत असे. त्यामुळें त्यांना प्रथम हें गृहछिद्र बंद करणें अगदीं आवश्यक झालें. **मा**नाजी **आं**ग्रे ह्यानें प्रथम **पो**र्तुगीज लोकांचें साहाय्य घेऊन **कु**लाबा घेतला. तेव्हां **सं**भाजीनें त्याचें पारिपत्य करण्याकरितां त्यावर स्वारी केली. नंतर **मा**नाजीनें **पे**शव्यांची मदत घेऊन स्वसंरक्षणाचा प्रयत्न चालविला. **मा**नाजी **पे**शव्यांस मिळाला हें पाहून **पो**र्तुगीज लोकांचें त्यांचें वांकडें आलें, व त्यांनीं कांहीं वेळ **सं**भाजीची बाजू स्वीकारून **मा**नाजीशीं युद्ध चालविलें. तेव्हां **बा**जीराव **पे**शवे ह्यांनीं **शं**कराजी **के**शव व **खं**डेजी **मा**णकर वगैरे लोकांस त्यांचे मदतीस पाठविलें. ह्या लोकांची व **फि**रंगी ह्यांची ता० २ जानेवारी इ० स० १७३५ रोजीं बरीच चक-

---

१ ही हकीकत मि० फ्रेडरिक चार्लस डानव्हर्स ह्यांच्या "The Portuguese in India." ह्या पुस्तकाच्या आधारें दिली आहे. त्यामध्यें डाम लुई बोतेलो ह्यानें कोळ्यांवर जो कर बसविला, त्याबद्दल पुढील वाक्यें लिहिलेलीं आहेत:—

"His first project was to construct a fleet of small vessels for the defence of the coast against the depredations and insults of the Angria.........To this end he demanded a heavy tribute from these same fishermen in order to provide the necessary funds. The demand was, however, considered an act of great injustice by the fishermen, and the collection of the tax had, in many cases, to be carried out by means of force." Page 401., Vol. II.

मक उडाली. ह्या संबंधाचें **पे**शव्यांचें एक पत्र उपलब्ध झालें आहे. तें येणेंप्रमाणें:—

"अखंडित लक्ष्मीअलंकृत राजमान्य राजश्री **शं**कराजी **के**शव
गोसावी यांसी:—

सेवक **बा**जीराव **ब**ल्लाळ प्रधान नमस्कार सु॥ खंमस सल्लासीन मया अलफ. तुह्मीं पत्र छ० १९ साबानचें पाठविलें, तें छ० २२ साबानीं प्रविष्ट जाहलें. छ० १८ साबानीं **फि**रंगी यांचे लोक राजश्री **मा**नाजी **आं**ग्रे यांचे मोर्चावरी निघाले होते. याजकरितां मशारनिल्हे व राजश्री **खं**डोजी **मा**णकर व सारे लोक एकत्र बोलावून मशिदीस वेढा घालून, मोर्चा त्यांनीं दिला होता तो चोपावा या विचारें गेले. मेढीयाचा दरवाजा तोडिला. **फि**रंगी यांनीं मार सीमेपरता केला. लोक जखमी फार जाहले व कांहीं ठार जाहले. मार न सोसे. मग निघाले. जखमी यांची याद आलाहिदा पाठविली असे. ह्मणोन लिहिलें तें कळलें. लोकांनीं कष्ट मेहनत फार केली. शाबास! तुह्मीं सर्वांचीं समाधानें करणें. दारू व गोळा **क**ल्याणाहून पाठवायाविषयीं राजश्री **वा**सुदेव **जो**शी यांस लिहिलें आहे. व आह्मी येथून दारुगोळा **लिं**बाजीपंत याजबरोबर रवाना केलाच आहे. आणखीही पाठवून देतों. जाणिजे. छ० २३ साबान. आज्ञाप्रमाण."

ह्यानंतर **बा**जीराव ता० ४ फेब्रुवारी इ० स० १७३५ रोजीं स्वतः **कु**लाब्यास गेले; व **कु**लाबा, **रा**जमाची, **खां**देरी वगैरे किल्ले हस्तगत करून व **सं**भाजीस नतीजा पोहोंचवून ता० ३ एप्रिल इ० स० १७३५ रोजीं परत आले. ह्यापुढें **सं**भाजीही **म**राठ्यांशीं स्नेह करण्यास तयार झाला. तेव्हां **बा**जीराव **पे**शवे ह्यांनीं **शा**हु महाराजांच्या आज्ञेनें त्याच्याशीं तह ठरवून **मा**नाजीस **कु**लाबा व 'वजारत माब' हा किताब दिला; व **सं**भाजीस सुवर्णदुर्ग व 'सरखेल' हें पद दिलें. परंतु त्यामुळें **पो**र्तुगीज लोकांच्या मनांतील डाव कमी न होतां, उलट तो अधिक वाढला; व त्यांनीं **मा**नाजीचा सूड उगविण्याचें मिष करून **म**राठ्यांशीं युद्ध आरंभिलें. **सं**भाजीनें बाह्यात्कारें जरी **मा**नाजीशीं सख्य जोडिलें, तरी त्याचा नाश करण्याची दुर्बुद्धि त्याच्या मनांतून नष्ट झाली नव्हती. त्यामुळें त्याच्या बोलण्यांत किंवा वर्तनांत

खरा भाग बिलकूल राहिला नव्हता. **पो**र्तुगीज, **इं**ग्रज, व **पे**शवे ह्यांच्याशीं जशी संधि पडेल त्याप्रमाणेंच तो वागत असे. **सिद्दी सा**ताचें युद्ध होऊन **म**राठ्यांची सरशी झाल्यानंतर त्यानें **बा**जीरावास जें पत्र लिहिलें आहे, त्यांत इतकी साखर पेरिली आहे व इतका घरोबा दाखविला आहे कीं सांगतां सोय नाहीं. हें पत्र वाचलें ह्मणजे **सं**भाजी **आं**ग्रे ह्याचा स्वभाव मायावी व कपटप्रचुर असावा असें सहज अनुमान होतें. हें पत्र मनोरंजक व महत्त्वाचें असल्यामुळें येथें सादर केल्यावांचून आमच्यानें राहवत नाहीं.

"राजश्री **बा**जीराव **पं**डित प्रधान दाजी गोसावी यांसः—

७ सकल गुणालंकरण अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्ने॥ **सं**भाजी **आं**गरे सरखेल रामराम विनंति. उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लेखन केलें पाहिजे. विशेष. आपण उत्तर प्रांताहून स्वारीहून आले, हें श्रवण होऊन संतोष जाहला. सर्वदा पत्र पाठवून परामर्ष करावा हें वडीलपणास उचित आहे. वरकड वडिल वडिलांचा भाऊपणा अकृत्रिमतेनें चालोन गेला. त्यामागें तीर्थरूप राजश्री **से**खोजीबाबाचा व आपला भाऊपणा विशेषच चालिला होता. परंतु श्रीनें त्यांस दिवस थोडके केले. त्यामागें आपण भाऊ उभयतां, तिसरा आपला बंधु, ऐसाच वडिलोपार्जित स्नेह चालावा. त्यास कालवशेंकरून आम्हांपासून अंतराय जाहला किंवा आपणाकडून जाहला, कित्येक संकल्पविकल्प वाढोन गेले, त्यांचें परिमार्जन होऊन पूर्ववत्प्रमाणें भाऊपणा चालोन एकाविचारें वर्तावें याजकरितां आपण शपथपूर्वक पत्रें पाठविलीं कीं, एकवेळ आपली आमची भेट व्हावी. भेट जाहाल्यावर जे जे किल्मिष उभयपक्षीं वाढले आहेत ते दूर होऊन, चित्तास चित्त मेळवून, दोनी मनसबे एकच ऐसें लक्षून, भाऊपणा दिवसेंदिवस वडिलांपासून चालिला त्याप्रमाणें, किंबहुना अधिकोत्तर चालावा ऐसाच हेत चित्ताचा होता. त्यास आपली स्वारी उत्तरेस जाहली तेव्हां तो योग एकीकडे राहिला. अलीकडे राजश्री **चि**माजी पंडित यांची स्वारी **कु**लाबाप्रांतीं **सिद्दी साद** याजवरी जाहली. त्यास श्री कृपेनें नतीजा देऊन माघारे फिरले. तेव्हां **आ**पांनीं एक कारकून पाठविला, आणि भाऊपणाच्या ममतेच्या कित्येक गोष्टी सांगोन पाठविल्या. त्यावरून आह्मीं **आ**पांस प्रत्योत्तरें लेहून राजश्री **नारो का**शी यांस पाठविलें. त्यांचे समागमें

रा० **चि**तो **कृ**ष्ण यांस **आ**पांनीं पाठविलें. बेलभाकर पाठविली. त्यावरून संतोष होऊन समाधान जाहलें. त्याप्रमाणें आह्मी बेलभाकर पाठविली. ऐशास आजिपर्यंत नानाप्रकारें घालमेली घालून आपल्या व आमच्या चित्तास विपर्यास घातला होता तो दूर होऊन, आपण उभयतां बंधु तैसे तिसरा ऐसें आम्हांस लक्षून, **कों**कणप्रांतींचे गडकोट आपले, वरघाटीचा मनसबा आमचा, ऐसी एक बात करून भाऊपणें चालावें. सर्व संपदा आहे हे आपली आहे. याउपरी आह्मी दुसरा विचार चित्तांत आणीत नाहीं. मुख्य गोष्ट आपली आमची एकवेळ त्रिवर्गाची भेट दसरामानीं व्हावी. भेटीनंतर सर्व मनोरथ पूर्ण होतील. जें आम्हांस संकट तें आपण दूर करावें. आपणांस अगत्य तें आह्मीं करावें. तेथें दुसरा विचार असेल तरी श्री **का**नोबाची व खासे यांचे पायांची शपत आहे. रंगाच्या मोटा बांधणें नाहीं. **रा**व, आपण आम्हांस जैसे **से**खोजीबावा तैसे. आपण आह्मी रागावलों तरीं क्षमा करावी. दुसरियाचें न ऐकावें. **से**खोजीबावास आम्हीं रागेजोन नानाप्रकारें बोलत होतों, कीं नव्हतों तें आपणास विदित आहे. वडीलपण जेथें आहे त्यांणीं चार तुटीच्या गोष्टी घेऊन भाऊपणाचे जातीनें चालवावें ऐसें श्रीनें सामर्थ्य दिलें आहे. परिहार कोठपावेतों त्याहावा. जसें आपण तैसें आम्हांस लक्षून चित्ताची सोज्वलता करून चित्तापासून भेटीचा योग कोणे कोणे महिन्यांत होईल येविशींचा सिद्धांत करून लेहून पाठवावा. **सु**वर्णदुर्गी अगर **र**सालगडीं दोनी स्थळें आहेत, यांत जेथें आपले विचारास येईल तेथें होईल. राजश्री **आ**पांनीं चित्तावरी गोष्टी धरिली आहे ती सांगतील. ह्याप्रमाणें ममतापूर्वक उत्तर पाठवावें. लक्ष पत्राचे जागा हें पत्र मानून चित्तांतील किल्मिष दूर करून भेटी द्यावी. आम्हीं आपले चित्तापासून लेहून पाठविलें आहे. आपल्या खेरीज दुसरा विचार नाहीं. याउपरी वडीलपणास येईल तें करावें. आपण आह्मांस वडील आहेत. बुद्धिवाद वरचेवरी आज्ञा करीत जावी. जैसा **पां**डवांचा अभिमान श्री **कृ**ष्णानें धरून **कौ**रवांस नतीजा देऊन **ह**स्तनापुरीं स्थापना केली, याप्रमाणें आपल्यास करावें लागेल. आपण जे गोष्टी सांगतील ती आह्मांस प्रमाण आहे. राजश्री **र**घुनाथजी आपणाजवळ जाऊन राहिले आहेत. त्यास अपेशी आहे. खाशाजवळ होते त्यास खाशास व **ना**रोपंतास मूठ मारून दिवंगत केलें. त्यामागें रा० **से**खोजीबावांस तीच गत केली.

असा अपेशी आहे. त्यास आपण ठेवावें हें आमचे विचारास येत नाहीं. वर्षा दोन वर्षांनीं आपणास अनुभव येईल. आमचा चाकर आह्मीं मारिला कुटिला तरी चाकर. ज्यांणीं आपल्या बाईकांस उदक घालून गेला तो आपणास कामास काय येईल ? बाईका टाकून जावें कीं काय ? आपण थोर आहेत. हा अर्थ आपल्या ध्यानीं येऊन गेलाच आहे. आपल्या कार्यास पुरुषलोक जो येईल तो मतलबाकरितां हातीं घ्यावा. परंतु आमचा चाकर आपण न ठेवावा. आमचा आम्हांकडे पाठवावा. ते गोष्ट आपले विचारास येणार नाहीं. परंतु लिहिलें आहे. या उपरी ज्यांणीं ज्यांणीं कल्पना वाढविल्या आहेत, त्या दूर करून भेटीचा लाभ दिला पाहिजे. उभयतांचे जोडीखेरीज आह्मांस दुसरी जोडी विशेष आहे ऐसें नाहीं. मनोमन साक्ष आहे. उत्तराचा मार्ग लक्षितों. जाणिजे. रवाना छ १२ माहे रबिलावल. बहुत काय लिहिणें. कृपा असों दिली पाहिजे हे विनंति."

वरील पत्र वाचलें ह्मणजे **सं**भाजी **आं**ग्रे हा **बा**जीरावाशीं व त्यांचा स्नेही **मा**नाजी **आं**ग्रे ह्याशीं दुष्टभाव धरील अशी कल्पनाही करवणार नाहीं. परंतु इ० स० १७३७ मध्यें त्यानें **पो**र्तुगीज लोकांस अनुकूल करून **कु**लाब्यावर पुनः स्वारी केली, व **मा**नाजीशीं युद्ध आरंभिलें. हें वर्तमान **पे**शव्यांस कळ-तांच त्यांनीं **कों**कणांत उतरून **फि**रंगी व **सं**भाजी ह्यांना मागें हटविलें; व **मा**नाजीचें संकट नाहींसें करून त्याजकडून, **शा**हु महाराजांस ७००० रुपये रोख खंडणी व ३००० रुपयांच्या परदेशीय कलाकुसरीच्या जिनसा प्रतिवर्षी नजर देण्याचा ठराव करून केला."

**बा**जीराव **पे**शवे ह्यांनीं **फि**रंगी लोकांचा पराभव केल्यामुळें त्यांस अधिक

---

१ मानाजी व संभाजी आंग्रे ह्यांच्या वादाची भानगड बरोबर समजण्यास पुष्कळ कागदपत्र उपलब्ध झाले पाहिजेत. त्यावांचून त्यांतील सर्व गोष्टी बरोबर समजणार नाहींत. ह्यांच्या भांडणामुळें मराठ्यांच्या सत्तेचें फार नुकसान झा-लेलें आहे. वर दिलेली त्रोटक माहिती ग्रांटडफ, डानव्हर्स, लो वगैरे इंग्रजी ग्रंथ व कांहीं अस्सल कागद ह्यांच्या आधारानें दिली आहे. त्यावरून ह्या भांडणाचें फक्त ठोकळ स्वरूप लक्षांत येईल.

त्वेष उत्पन्न झाला व त्यांनीं मराठ्यांशीं प्रत्यक्ष युद्ध आरंभिलें. इ० स० १७३७ मध्यें त्यांनीं आपल्या ताब्यांतील कोटकिल्ले खंबीर करण्याचें व दारूगोळ्याची पोक्त बेगमी करण्याचें काम जोरानें चालविलें. ठाण्याचा किल्ला बांधण्याचें काम त्यांनीं इ० स० १७३४ पासून चालविलें होतें. परंतु तें अद्यापि पुरें झालें नाहीं. ह्मणून ते हिंदुलोकांची वेठ धरून त्यांच्याकडून जुलुमानें काम घेऊं लागले. त्यांचा धर्मसंबंधानें परोपरीनें अगोदरपासून छल चालला होताच. तशांत लोकांवर हा असह्य जुलूम होऊं लागल्यामुळें त्यांना फिरंग्याच्या पारतंत्र्यांतून केव्हां मुक्त होऊं असें वाटूं लागलें, व त्यांच्या पुढाऱ्यांनीं पेशव्यांना स्वसैन्यानिशीं साष्टीप्रांतावर चालून येण्याबद्दल विशेष आग्रहाची विनंति केली.[१] अर्थात् हिंदुलोकांचा अशा रीतीनें छल होत आहे असें पाहून, पेश-

---

१ पोर्तुगीज लोकांच्या जुलुमाबद्दल इंग्रज ग्रंथकार कांहीं विशेष मजकूर लिहीत नाहींत. तथापि त्यांच्या अस्पष्ट व त्रोटक माहितींत देखील त्याबद्दल पुरावा सांपडतो. डानव्हर्स साहेबांच्या इतिहासांत, ठाण्याचा किल्ला तयार होण्यास विलंब लागला व त्यामुळें लोक त्रासून जाऊन मराठ्यांचें राज्य बरें असें ह्मणूं लागले, असा अगदीं स्वच्छ उल्लेख आहे:–

"This delay caused great discontent to the people of that town, besides which those employed in its erection were unpaid and unfed. The latter were at last driven to such desperation that they invited the Mahrattas to take possession of the island of Salsette, preferring the rule of those barbarians to their present persecutions and oppressions."—*The Portuguese in India. Vol. II. Page 402.*

ह्या उताऱ्यांत "barbarians" हा शब्द साहेबमहसुफांनीं मराठ्यांस लाविलेला आहे हें वाचकांच्या ध्यानांत येईलच. अर्थात् 'रानटी' मराठ्यांची सत्ता पत्करली पण हा पोर्तुगीज लोकांचा छल व जुलूम नको, अशी साष्टी प्रांतांतल्या लोकांची स्थिति झाली होती, असें इंग्रज इतिहासकार देखील कबूल करितात. त्या अर्थीं ह्या छलाचें व जुलुमाचें स्वरूप फार भयंकर असलें पाहिजे असें मानणें भाग पडतें. व ह्यावरून मराठी कागदपत्रांतून किंवा बखरींतून ह्या संबंधानें दिलेलें वर्णन केवळ अतिशयोक्तीचें आहे असें ह्मणवत नाहीं!

त्यांनीं ह्या राजकारणांत मन घातलें व स्वधर्मसंरक्षणार्थ **फि**रंग्यावरील मोहिम हातीं घेतली, असें ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं.

**पो**र्तुगीज लोकांनीं **सा**ष्टीप्रांतांत इतका कहर उडवून दिला व हिंदुप्रजेस त्राहि त्राहि केलें ही गोष्ट **ब्र**ह्मेंद्रस्वामींस केव्हां समजली, व त्यांनीं ह्या धर्मसंरक्षणाच्या कामांत केव्हां लक्ष घातलें, हें बरोबर समजण्यास कागदपत्रांचा अस्सल पुरावा अद्यापि उपलब्ध झालेला नाहीं. तथापि ज्याअर्थीं **शा**हु महाराज, **बा**जीराव व **चि**माजी आपा ह्यांचें सर्व लक्ष तिकडे लागून, त्यांना आपले धर्मरक्षणाचें ब्रीद पाळण्याकरितां ह्या राजकारणाचा अगत्यवाद धरणें भाग पडलें, त्याअर्थीं स्वामींसारख्या स्वधर्मसंरक्षणार्थ अवतीर्ण झालेल्या महात्म्यास त्याचा वृत्तांत प्रथमपासून अवगत असावा असें मानण्यास जागा सांपडते. **चि**माजी आपा ह्यांचें छ० १० जिल्हेज (ता० ३१ मार्च इ० स० १७३७) चें पत्र (लेखांक ४७) उपलब्ध झालें आहे. त्यावरून इ० स० १७३७ ह्यावर्षापासून ह्या **फि**रंगीप्रकरणामध्यें स्वामींच्या आशीर्वादाचा प्रवेश झाला होता हें अस्सल पुराव्यानेंच सिद्ध होत आहे. ह्या पत्रांत **चि**माजी आपांनीं "स्वामींच्या आशीर्वादेंकरून" **पु**ण्याहून स्वार होऊन **ठा**णें हस्तगत केल्याची बातमी स्वामींस कळविली आहे, व पुढील कार्य "जें होणें तें स्वामींच्या आशीर्वादें होईल" असें लिहिलें आहे. तेव्हां येथून स्वामींच्या मसलतीस उघड उघड प्रारंभ झाला असें ह्मणण्यास हरकत नाहीं.

**चि**माजी आपा ह्यांनीं इ० स० १७३७ च्या मार्च महिन्यांत **फि**रंग्यावरील मसलतीस सुरुवात केली व मोठ्या पराक्रमानें त्यांच्याशीं अनेक युद्धप्रसंग करून त्यांचा पराभव केला. ह्या मोहिमेमध्यें मार्च महिन्यापासून जुलई महिन्यापर्यंत **चि**माजी आपा व त्यांच्या हाताखालील रणशूर **म**राठे सरदार ह्यांनीं **ठा**णें, **बे**लापूर, **वे**सावें, **वा**नरें, आणि **सा**ष्टी इतक्या **पो**र्तुगीज लोकांच्या बळकट जागा सर केल्या, व त्यांना अगदीं जेरीस आणिलें. **सा**ष्टीसारखी बळकट जागा **म**राठ्यांनीं ता० २७ मार्च इ० स० १७३७ रोजीं फत्ते केली, त्यामुळें **पो**र्तुगीज लोकांचा अतिशय हिरमोड झाला. त्यांचा सेनापति **अं**टिनियो **का**र्डिम (Antinio Cardim) ह्यानें **म**राठ्यांच्या सैन्याबरोबर एकसारखी टक्कर दिली. परंतु शेवटीं त्याचा **म**राठ्यांच्या शौर्यापुढें कांहीं उपाय **न**

चालून त्यास माघार घेणें भाग पडलें. ह्या झुंजामध्यें **पो**र्तुगीज लोकांचे बरेच लोक जाया झाले. त्यांची सर्व युद्धसामुग्री संपून गेली व द्रव्याचीही तूट पडली. तेव्हां **अं**टिनियो **का**र्डिम ह्यानें हताश होउन आपल्या जागेचा राजीनामा दिला. नंतर त्याचे जागीं **पे**ड्रो डी **मे**लो (Pedro-de-mello) ह्याची नेमणूक झाली.

**पो**र्तुगीज लोकांस जेर करून **सा**ष्टीप्रांत काबीज केल्यानंतर, पावसाळ्यास सुरुवात होतांच, **चि**माजी आपा हे, **शं**कराजी **के**शव, **खं**डोजी **मा**णकर इत्यादि रणशूर लोकांस भरपूर सैन्यानिशीं तेथें बंदोबस्तास ठेवून, ता० १ जुलै इ० स० १७३७ रोजीं **पु**ण्यास परत आले. तों तिकडे शत्रूनें पुनः उचल खाल्ली. पावसाळा संपतांच **गो**व्याहून मदत आणून **फि**रंग्यांनीं **व**सईचा अधिक बंदोबस्त चालविला. डी **मे**लो हा नवीन दमाचा सेनापति असल्यामुळें तो **म**राठ्यांची खोड मोडण्याचा संकल्प करून युद्धाची सिद्धता करूं लागला. त्यानें इ० स० १७३७ च्या आक्टोबर महिन्यांत **खां**देरीवर आपलें आरमार आणून **म**राठ्यांच्या **के**ळवें, **मा**हीम वगैरे ठिकाणच्या लोकांस शह दिला. तेव्हां त्याचें व **म**राठी सैन्याचें युद्ध पुनः सुरू झालें. **बा**जीराव **पे**शवे ह्यांनीं **रा**मचंद्र **ह**रि **प**टवर्धन ह्या शूर सरदाराच्या हाताखालीं कांहीं सरदार व ३२५० लोक देऊन त्यांस **के**ळवें **मा**हीम सर करण्याकरितां पाठविलें. परंतु **शं**कराजी **के**शव ह्यानें अगोदरच कच खाल्ल्यामुळें **म**राठ्यांच्या सैन्यांत थोडी गडबड झाली.[१]

---

१ शंकराजी केशव हा रणशूर योद्धा होता. ह्यानें पुढें वसईच्या वेढ्याच्या वेळीं फारच उत्कृष्ट कामगिरी बजाविली. परंतु ह्या समयीं त्यानें असा कच कां खाल्ला तें समजत नाहीं! मराठ्यांच्या पक्षामध्यें ठाणें सर केल्यानंतर कांहीं रुसवारुसव झाली व अंताजी रघुनाथ वगैरे साष्टी प्रांतांतील मराठ्यांची पक्षाभिमानी मंडळी नाखुष झाली असें आणखी एका पत्रावरूनही दिसून येतें. हें पत्र खंडोजी माणकर ह्यानें छ २ रबिलाखर ह्मणजे ता० १९ जुलई इ० स० १७३७ रोजीं लिहिलेलें आहे. तें येणेंप्रमाणें:–

"श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेसीः–

आज्ञाधारक खंडोजी माणकर चरणावर मस्तक ठेवून साष्टांग दंडवत. विज्ञापना तागाईत छ २ रबिलाखर पावेतों स्वामींच्या कृपावलोकनेंकरून वर्तमान

ह्या वेळीं **बा**जीराव **पे**शव्यांनीं **रा**मचंद्र **ह**रीस एक फार जोरदार पत्र लिहिलें आहे. त्यांत जे कोणी **म**राठ्यांचे सरदार इमानानें चाकरी करणार नाहींत व पळून जातील, त्यांना पकडून आणून त्यांचीं डोचकीं मारावीं असें साफ फर्माविलें आहे. ह्यापत्रावरून **बा**जीराव **पे**शवे कसे इरेस पेटले होते हें चांगलें दिसून येतें. हें पत्र येणेंप्रमाणें:—

"अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य राजश्री **रा**मचंद्र हरी
गोसावी यांसीः—

सेवक **बा**जीराव **ब**ल्लाळ प्रधान नमस्कार. सु॥ समान सलासीन मया व अलफ. **फि**रंगी यांचें आरमार **खां**देरीच्या बाऱ्यावरीं आलें. हे खबर **अ**-णजूरकर यांनीं राजश्री **शं**कराजी **के**शव यांस लिहिली. त्यावरून त्यांनीं सला-बत खाऊन **के**ळवें **मा**हीम येथील लोक उठवून माघारे नेले. गनीमाची सलाबत वाढविली. ऐशियास **व**सई, **अ**रनाळा आदिकरून लोकांचें सामान जसें तसें नाहीं. नामांकित माणूस किती आणि गनीमाची सलाबत खातात ! यावरून त्यांचे व त्यांजवळील लोकांचे मर्दुमीच्या तारीफा काय कराव्या ? असो. न व्हावें तें झालें ! अतःपर गनीमावरी सलाबत चढवून **के**ळवें **मा**हीम हीं स्थळें जबरदस्तीनें घेतलीं, तरीच त्या लोकांची व सरदारांची शाबास. नाहीं तरी

---

यथास्थित असे. विशेष. रा० अंताजी रघुनाथ यांहीं पूर्वींपासून सेवा चाकरी केली. फिरंगाणच्या मनसुब्यामुळें हैरानपेरोशान जाहले. ठाणें घ्यावें ह्मणून सेवकास रवाना केलें. तेव्हां अंताजी रघुनाथ व अणजूरकर व उलेकर बरोबर दिले. त्यांत तिघांनीं आंव ह्मणावा तैसा धरिला. सेवकानें तिघांस हातीं धरून, यद्यपि एकाचे हातून कार्य जाहलें तर एकाचे हातून कार्यसिद्धता करावी. याचप्रमाणें तिघांनीं आंव धरून कार्यसिद्धता स्वामींचे पुण्यप्रतापेंकरून जाहली. त्यास अंताजीपंताची वाजवी गोष्ट कोणी न ऐकत. यास्तव आपले जागीं श्रमी होऊन घरीं बसले आहेत. सांप्रत स्वामी पुण्यास आले ह्मणोन दर्शनास आले आहेत.......हे इतकेंच इच्छितात कीं, धण्याचे पुण्यप्रतापें फिरंगाण सुटावें. ह्मणजे आपलें वतन सुटेल. हा हेत स्वामींचे प्रतापें सिद्धीस पावेल. संदेह नाहीं. परंतु यांचा अव्हेर न होई तो अर्थ करणार स्वामी धणी समर्थ आहेत. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना."

पैका खाऊन नाचीज होतो ! असो. तुह्मांस रवाना केलें तें सांगून रवाना केलें. पायेचा जमाव साहाशें माणूस व कल्याणचे आरब एकशें चौपन्न व धोंडो व्यंकाजी याजबरावरील एक हजार व वाघोजीराव खानविलकर व पदाजी करके मिळून पांचशें व शंकराजी केशव याजकडील जुन्या भरण्यापैकीं एक हजार एकूण साडेबत्तीसशें माणूस केळवें माहीमच्या कार्यभागास तुह्मांकडे नेमिलें आहे. सरदारही तुमचेच तावीन आहेत. राजश्री महादाजी केशव यांनीं शंकराजीपंताजवळ जावें. वरकड सरदारांनीं तुमचे आज्ञेप्रमाणें वर्तावें. ऐसें कित्येक राजश्री शंकराजी केशव यांस फजीत करून लिहिलें आहे. तरी तुह्मीं सदरहू साडेबत्तीसशें माणसांनिशीं केळवें माहीमास लगट करून दोन्ही स्थलें हस्तगत करणें. मराठे, कानडे, परदेशी लोक आहेत. त्यास झुंझ भांडणाचे प्रसंगीं कित्येक माणूस सलाबत खाऊन पळून जातात याजमुळें कैद सलाबत होते. ऐसीयास लाखोलाख रुपये खर्च करून लोकांस द्यावे, आणि प्रसंगीं पळ काढितील त्या पाजींचा मुलाहिजा काय ? जे दालीची शरम धरून साहेबकाम करितील त्यांचें ऊर्जित करीतच आहों. पळून जातील त्यांचा मुलाहिजा काय निमित्य करावा ? ज्या ज्या वाटा पळून जावयाच्या आहेत तेथें चौक्या ठेऊन, पळतील त्यांस धरून परिच्छिन्न डोचकीं मारणें. सरदार अगर प्यादा न ह्मणणें. विना एकाददुसरा सरदार अगर परदेशी कानडे मारल्याविना माणूस भय धरून वर्तणार नाहीं. यास्तव हेंच परवानगी जाणून पळ्याचें पारपत्य करणें. रामचंद्रपंतास लाख रुपये खर्च होतात. या गोष्टीची कळकळ आणि इरे सर्वांहीं धरिली तरीच खावंदाचें काम होऊन सलावत चढेल. नाहींतरी पैका खर्चला तितका व्यर्थ आहे ! असो. तुह्मांस विस्तार लिहावा सारिखा नाहीं. येथील मर्जी तुह्मांस ठावकी आहे. तेथीलही प्रसंग पाहिलाच असेल. जातीनसीं व जमेतीनसीं रात्रंदिवस कस्त करून केळवें माहीम हीं दोन्हीं स्थळें हस्तगत करणें. फिरंगी याच्या लोकांनीं वारें घेतलें आहे. तुह्मांवरही तोंड टाकितील. त्यांस जपून एकवेळ कापून काढणें. ह्मणजे तेही बलखुद राहतील. जाणीजे छ० २६ रजब."

ह्या वीर्योत्साहक पत्रानें रामचंद्र हरीसारख्या बाणेदार वीरास तेव्हांच स्फुरण चढलें; व त्यानें तावडतोब माहिमास मोर्चे लावून फिरंग्यास पादाक्रांत

करण्याचा निश्चय केला. रामचंद्र हरीची व पोर्तुगीज सेनापति पेड्रो डी मेलो ह्याच्या सैन्याची माहीम येथें जी चकमक उडाली, तिचा वीररसात्मक वृत्तांत कल्याणचे सुभेदार वासुदेव जोशी व रघुनाथ हरी ह्यांनीं ता० २४ नोव्हेंबर इ० स० १७३७ रोजीं लिहिलेल्या एका पत्रांत इत्थंभूत वर्णिला आहे. तो सुदैवेंकरून उपलब्ध झाल्यामुळें तोच अस्सल बरहुकूम येथें सादर करितों.

"श्रीमंत आपा स्वामींचे सेवेसीः—

पोष्य वासुदेव जोशी व रघुनाथ हरी कृ० सा० नमस्कार अनुक्रमें दंडवत विनंति. उपरी येथील कुशल ता॥ छ १२ रमजान जाणोन स्वकीय लेखन आज्ञा केली पाहिजे. विशेषः–रा० रा० रामचंद्र हरि व माहादाजी केशव यांणीं माहिमास मोर्चे लाविले होते. त्याज (?) होऊन पुढें सलाबत कुचे चर खणून मोर्चे कोटाखालीं भिडविले होते. हें सविस्तर पूर्वी लिहिलें आहे. त्याजवरून विदित जाहलेंच असेल. गनीम इंग्रज फिरंगी व हबशी ऐसे एकत्र होऊन, दोन तीन दिवसां शंभर गलबतें भरून, मदत माहीम केळवें येथील कोटामध्यें गेले. गनीम भारी जाहला, याजकरितां येथून राउताचा व लोकांचा उपराळा करावयाचा तो करीतच होतों. माहिमास मोर्चे उत्तरेकडे लागले होते. दक्षिणेकडे केळवें आहे तें आंग मोकळें होतें. तिकडे रोजबरोज गनीम चार पांचसें माणूसपर्यंत बाहेर पडत असे. त्याजवर मोर्च्यावरून लोक व राऊत धाऊन जात. त्यांची यांची झीटपीट होतांच गनीम कोटामध्यें जाय. आपले लोक फिरोन येत. त्याजउपर छ ९ रमजानीं एकादशीस केळवियाकडील तर्फेस सात आठसें माणूस निघाले. त्याजवर रा० रामचंद्रपंत राऊतांचे जमावानिशीं चालोन गेले. गनीमाकडील पंचवीस तीस माणूस मारिले. याजकडील एक राऊत पडिला. एक दोन घोडीं जखमी जाहलीं. गनीम आश्रियास गेला. राऊत फिरोन मोर्च्यावर आले. इतकें वर्तमान ते दिवसीं जाहलें. त्याजउपरी काल छ ११ रमजानीं दोन प्रहरा जाहलें. मोर्च्यावरील कांहीं लोक जेवण्यास गेले होते आणि मोर्चे कोटानजीक भिडले होते. गनीमानें संधी पाहून दीड हजार दोन हजार माणूस निघोन मोर्च्यावर चालून घेतलें. एकेच वेळेस तीहीं मोर्च्यांवर हल्ला केला. खबरदार होऊन बरेसे झुंजले. परंतु गनीम भारी. कोटावरून तोफांचा मार जबरदस्त केला. मोर्च्यावर गनीम

आला. त्याणें हुके व हात गरनाळा व बरखंदाजीचा मार बहुत जबरदस्त केला. तेणेंकरून मोर्चे जळण्यास लागले. लोकांनीं बाहेर निघोन हत्यार करावें तरी गनीम भारी. याजकरितां मोर्चे बुर्जासारिखे घातले होते. त्यास कवाड एक होतें. तें सलाबत कुचे चर खटला होता त्यांतून जावें यावें असें होतें. तोंड गनीमानें धरिलें. लोकांस बाहेर निघोन हत्यार करावयास जागा नाहीं. ऐसें जाहलें. तेव्हां मोर्च्याचा उपराळा करावा ह्मणून रा० **रा**मचंद्रपंत व **अ**मर-सिंग **शि**र्के वगैरे दहा पंधरा राउतांनीं घोडीं घातलीं. त्यांणीं गनीमाकडील दहा पंधरा माणूस मारिले. रा० **रा**मचंद्रपंतांनीं खुद्द दोघे ठार केले. आणि गनीम फिरविला. ते प्रसंगीं रा० **रा**मचंद्रपंतांस उजव्या हातावर स्तनाचे वरती चार बोटें पट्टयाखालीं गोळी लागोन मोहरा चुकोन पार होऊन गेली. हातीं तरवार होती तिचा झटका बसोन हाड नादावलें आहे. हातची तरवार झटका बसोन गळोन पडली. तेणेंकरून पायांच्या गुडघ्यास लागली आहे. ऐसें होतांच मशारनिल्हे फिरले. याउपरांत गनीमानें सोखी करून मोर्चे का-बीज केले. आमचे लोकांचा धर सुटोन निघाले. राजश्री **मा**हादाजी **के**शव व **वा**घोजीराव **खा**नविलकर (?) व **रा**जबाराव **बु**रोडकर व **चिं**तो **शि**वदेव व **ज**नार्दन **ह**री व **ग**णेश **ह**री कारकून दिं॥ **मा**हादाजी **के**शव व **धों**डोपंत **वि**ठ्ठल **शि**वदेव याचा भाचेजावई, वगैरे लोक ऐसे मोर्च्यांत होते. त्यांस निघावयास फुरसत न जाहली. तेथेंच झुंजोन कामास आले. व **रा**घोजीराव **खा**नविलकर याजकडील **भा**ऊबंद देखील आपण एकेच जागां कामास आले. आणखी लोक कामास आले. त्यांची अद्यापि गणती सांपडली नाहीं. अज-मासें दोनसें माणूस कामास आले व जखमी शंभरांपर्यंत आहेत. लोक मोर्चे सोडून बाहेर निघाले. गनीम फार. रा० **मा**हादाजी **के**शव कामास आले. रा० **रा**मचंद्रपंतांस जखम लागली. लोकांनीं धर सोडिला. याजकरितां पालखी पाठऊन रा० **रा**मचंद्रपंत व अवघी फौज येथें आणिली. अवघ्यांचा शोध घेऊन हजीरी मनास आणून सविस्तर मागाहून लेहून पाठऊं. होणार गोष्ट ती जाहली त्यास उपाय नाहीं. आह्मीं **शि**रगांवची व **मा**हीमची (अशा) दोन फौजा एकत्र करून येथील मोर्चे काबीज केले आहेत. गनीम हांवभरू जाहला आहे. आह्मीं येथून धर सोडिला तरी अवघेच जागा धर सुटेल.

याजनिमित्त आह्मी येथें खबरदार राहिलों आहों. गनीम हांवभरू जाहला आहे. याजकरितां येथील मदतीस एका दो दिवसांत येईल असा दिसतो. आलाच तर गनीमास ठेचगा देतों. आह्मांजवळ सामान ह्मणावें तरी दोनी फौजा मिळोन साडेतीन हजार माणूस सात आठशें पर्यंत राऊत आहेत. आजपर्यंत दोन तीनशें माणूस पळाले. दोन अडीचशें माणूस कामास आले. लोकांस रोजमुरा अद्याप पावला नाहीं. दोन महिने चढले. ऐशा चारी गोष्टी या प्रसंगीं जाहाल्या. याजमुळें लोकांनीं धर सोडिला आहे. ऐसें असोन लोकांचें समाधान करून, अवघ्यास दिलदिलासा देऊन येथील मोर्चे काईम करोन, एकवेळ गनीमास बरासा नतीजा द्यावा हे उमेद धरोन राहिलों आहों. स्वामींचे पुण्येंकरून जें होणें तें होईल. राजश्री **शं**कराजी **के**शव यांस लेहून जंजिरे **अ**र्नाळा व **ब**हादुरपुरा येथील खबरदारी करणें. तेप्रमाणें रा० **खं**डोजी **मा**णकर यांस लिहोन **धा**रावी व **ठा**णें, व रा० **द**त्ताजी **मो**रेश्वर यांस लेहून **आ**शेरीचे मोर्च्याची खबरदारी व रा० **ना**रायण **जो**शी यास लेहून किल्ले **बे**लापुर, व रा० **ब**रवाजी **ता**कपीर यास लेहून **क**ल्याण **भि**वडी येथील खबरदारी करावीशी आहे. परंतु गनीमानें आपले जागियाची मजबुदी करून दोन हजार स्वारीस निघाला आहे. आरमाराचा गनीम हांवभरू जाहला आहे. याजमुळें आपले लोकांनीं जागचेजागा दहशत खादली आहे. त्यास स्वामींचा उपराळा जाहलियाविना लोकांस अवसान चढोन गनीमास नतीजा पोंहचत नाहीं. आणि आजपर्यंत केलें कर्म व्यर्थ होतें. तरी स्वामींनीं सहस्र कामें टाकून, जरूर जाणोन, राऊत व हशम पाठवून तेथील स्थलांचा उपराळा होय ते गोष्ट केली पाहिजे. **ब**हादरपुरा येथील मोर्च्यावर एकवेळ गनीम तोंड देईल. याजकरितां तेथील उपराळियास दोन चारशें राऊत व एक मातबर सरदार अथवा राजश्री **दु**र्जनसिंग पाठवून तेथील उपराळा अति त्वरेनें केला पाहिजे. राजश्री **शं**कराजीपंताकडे येथूनही राऊत शंभर पाठवितों. राजश्री **रा**याकडील वर्तमान आपणास आलेंच असेल. तरी स्वामींनीं **खा**नदेशांत न राहावें. **ना**सिकप्रांतीं यावें. ऐसा विचार जाहला असिला तरी स्वामींनीं अविलंबें **ना**सिकप्रांतें आलें पाहिजे. तेथें आलियास तिकडील शह चुकतो ऐसें नाहीं. आणि इकडील उपराळा होईल. या

प्रांतींचें वर्तमान स्वामींस कळेल. स्वामींचा उपराळा या प्रांतीं वरचेवर होईल. व दमणप्रांतीं आजपर्यंत आमची स्वारी गेली नाहीं. याजकरितां त्या प्रांतीं स्वारी पाठवून, मुलूख मारून, ताराज करून, गुरुढोरें कुळेंडाळें धरून आणावीं. तेणेंकरून शह बसोन गनीमाचा ओढा तिकडे पडेल. इतक्या गोष्टी स्वामींचें येणें नासिकप्रांतीं जाहलियास होतील. तर अगत्य स्वामींनीं नासिकप्रांतीं आलें पाहिजे. आह्मांजवळ सामान गनीमापुरतें आहेच. तथापि लोकांत अवसान राहिलें नाहीं; आणि जबरदस्तीनें शत्रूचें तोंड फोडल्याविना गनीमावर इभ्रत बसोन आपले माणसास तेज चढत नाहीं. यास्तव, फौज भारीच या प्रांतीं पाठवावी. मुलकाचा सत्यानाश दमणप्रांतीं करावा. तारापुरचे आश्रयास माहिम मनोर वगैरा प्र॥ याचे कित्येक गांव गेले आहेत. जुजबी रयेत आसपास मात्र आहे. तिचें संरक्षण करून वरकड दमणप्रांत वगैरा मारून ताराज करावा. एखादे जागा गनीम गांठून कापून काढावा ह्मणजे आपली सलाबत वाढेल. विदित जाहलें पाहिजे. हे विज्ञापना."

रामचंद्र हरीची व फिरंग्याची ही लढाई चालली असतांना चिमाजी आपा व बाजीराव निजामाशीं युद्ध करण्याकरितां खानदेशांतून उत्तरेकडे जात होते. त्यांस हें वासुदेव जोशांचें पत्र पावतांच, त्यांनीं मल्हारजी होळकर व राणोजी शिंदे ह्यांचे हाताखालीं सैन्य देऊन त्यांस त्यांच्या मदतीस पाठविलें.

पोर्तुगीज सेनापति पेड्रो डि मेलो ह्यानें मराठ्यांकडून साष्टी, व ठाणें ह्या जागा परत घेण्याचा पक्का निश्चय केला, व आपल्या सैन्याची कडेकोट तयारी चालविली. लिस्बन येथून त्याच्या मदतीकरितां दोन लढाऊ जहाजें आलीं; व गोंव्याच्या गव्हरनराकडूनही कांहीं निवडक लोक व दारुगोळा येऊन पोहोंचला. तेव्हां त्यानें ठाण्यावर हल्ला करून ती जागा पहिल्यानें सर करण्याकरितां, तिकडे ता० ४ दिसेंबर रोजीं, आठ गलबतें व तीस फत्तेमाऱ्या ह्यांसह कूच केलें. ता० ६ रोजीं ठाण्यास पोहोंचतांच त्यानें प्रथम पाणबुरजावर मार केला. गरनाळीचे गोळे बुरजावर टाकिले. दोन दिवसपर्यंत गोळ्यांची एकसारखी वृष्टि केली. ह्या समयीं मल्हारजी होळकर प्रभृति मराठे वीरांनीं मोठ्या शौर्यानें त्याचा मारा सहन करून त्याशीं लगट केला, व त्याचा पराभव करून त्यास

यमसदनीं पाठविलें[१]. **पे**ड्रो डि **मे**लो हा मृत्यु पावतांच **फि**रंगी सैन्याची अ-गदीं दाणादाण झाली व त्यानें **व**सईकडे पळ काढिला. नंतर **मा**र्टिनो डा **सि**ल्वेरा डि **मे**नेझेस (Martino da Silveira de Menezes) ह्यानें मुख्य सेनापतीचीं वस्त्रें घेतलीं व तो **म**राठ्यांशीं युद्ध करण्यास सिद्ध झाला.

**पे**ड्रो डि **मे**लो मृत्यु पावल्यानंतर **चि**माजी आपांस विशेष स्फुरण चढलें. त्यांनीं **रा**णोजी **शिं**दे, **म**ल्हारराव **हो**ळकर, **बा**जी **भि**वराव, **रा**मचंद्र **ह**री, **य**-शवंतराव **प**वार, **वि**ट्ठल **शि**वदेव वगैरे निवडक सरदार बरोबर घेऊन सैन्याची उत्कृष्ट व्यवस्था केली; आणि **मा**हिम, **के**ळवें, **ता**रापूर, **शि**रगांव, **डा**हाणू, **ना**रगोळ, **ख**तळवाड वगैरे शत्रूकडील जागा ओळीनें फत्ते करण्यास सुरुवात केली. **ता**रापूर येथें **चि**माजी आपांचें व **फि**रंगी लोकांचें फार निकराचें युद्ध झालें. त्याचें साद्यंत वर्णन खुद्द **चि**माजी आपांनीं **बा**जीरावांस लिहिलें आहे. (लेखांक ४९ पहा). तें वाचलें असतां **म**राठ्यांच्या मर्दुमकीचें मूर्ति-मंत चित्र डोळ्यांपुढें उभें राहतें. असो. येणेंप्रमाणें **फि**रंगी ह्याचा चोहों-कडून पराभव करून **चि**माजी आपांनीं **व**सईखेरीज सर्व जागा पादाक्रांत केल्या. नंतर **व**सईवर लगट करून तीही घेण्याचा संकल्प केला.

**म**राठ्यांच्या इतिहासामध्यें, अतुल पराक्रम, अचाट साहस, अलौकिक तेज, अद्वितीय रणोत्साह आणि अपार स्वाभिमान हे गुण व्यक्त करणारे जे कांहीं युद्धप्रसंग प्रसिद्ध आहेत, त्यांमध्यें **व**सईचा रणसंग्राम हा अग्रस्थानीं गणण्यासा-रखा आहे ह्यांत शंका नाहीं. **फि**रंगी लोकांनीं हिंदुधर्माचा व हिंदुप्रजेचा अत्यंत छळ केला, ह्मणून संतप्त झालेले निस्सीम स्वधर्माभिमानी **म**हाराष्ट्रवीर एकत्र होऊन दृढ निश्चयानें शत्रूस जिंकण्याकरितां **व**सईवर चढाई करून गेले; व तेथें मोठ्या आवेशानें तीन महिनेपर्यंत सतत अग्निगोलांचा भयंकर वर्षाव होत असतांही वेढा देऊन बसले; आणि अखेर आपल्या बाहुबलानें शत्रूस पा-

१ क्याप्टन ग्रांटडफसाहेब ह्यांनीं ह्या ठाण्याच्या लढाईत पोर्तुगीज सेनापति Don Antonio Frois हा योद्धा शौर्यानें लढून समरांगणामध्यें पतन पावला असें लिहिलें आहे. परंतु ही चूक असावी. ह्या वेळीं Pedro de Mello हा सेनापति होता व तो मारला गेला.

दाक्रांत करून वसईवर आपला स्वधर्मसंरक्षणाचा बाणा दाखविणारा भगवा झेंडा फडकविण्यास समर्थ झाले; तो वीररसानें ओतप्रोत भरलेला वृत्तांत ऐकून ज्याचें अंतःकरण आनंदानें व कौतुकानें थक्क होणार नाहीं असा मनुष्य विरळा. ह्या सर्व रणसंगराचें साद्यंत वृत्त मराठ्यांचे वीरशिरोमणी चिमाजी आपा ह्यांनीं स्वतःच वर्णिलें आहे. तें लेखांक ५३ ह्यामध्यें सादर केलें आहे. त्यापेक्षां अधिक सत्य, सविस्तर, व सरस वृत्तांत कोठेंही मिळणें अशक्य असल्यामुळें तोच वाचण्याची तारीफ करण्यावांचून दुसरा मार्ग नाहीं. हा वृत्तांत वाचला ह्मणजे मराठ्यांचें अभिनंदनीय शौर्य व पोर्तुगीज लोकांचें वर्णनीय रणकौशल्य ह्यांचें मूर्तिमंत चित्र नेत्रापुढें उभें राहतें. चिमाजी आपांनीं आपल्या पत्रांत "फिरंगी यांणीं मर्दुमी शिपाईगिरी ह्मणावी तशी केली" असे आनंदभरानें उद्गार काढून पोर्तुगीज लोकांच्या शौर्याची फार प्रशंसा केली आहे; व

**अरिच्याहि सद्गुणांतें प्रेमें वाखाणितात सुज्ञानी ॥**

ह्या मयूरकवीच्या सदुक्तीप्रमाणें आपलें सौजन्य व चित्तौदार्य पूर्णपणें प्रकट केलें आहे. त्याचप्रमाणें इंग्रज व पोर्तुगीज लोकांनींही मराठ्यांच्या शक्तिप्रभावाचें, युद्धनैपुण्याचें आणि धैर्यातिशयाचें योग्य अभिनंदन करून आपली रसिकता व्यक्त केली आहे.[१]

वसईच्या युद्धांत पोर्तुगीज लोकांचा प्रमुख सेनापति सिल्व्हेरा डि मेनेझेस हा मृत्यु पावला, व त्यांचे ८०० लोक पतन पावले. तेव्हां त्यांचा दुय्यम सेनापति डिसोझा पेरिरा ह्यानें चिमाजी आपांस शरण जाऊन तहाचें बोलणें लाविलें. चिमाजी आपांनीं ता० १६ मे इ० स० १७३९ रोजीं त्याच्या सर्व अटी कबूल करून फिरंगी लोकांस शस्त्रांनिशीं व त्यांच्या मालमिळकतीनिशीं सुरक्षितपणें वसईपार जाऊं दिलें. ह्या तहाच्या कलमांमध्यें, जे ख्रिस्ती लोक वसईंत

---

१ ग्रांटडफ साहेबांनीं "This remarkable siege, the most vigorous ever prosecuted by Mahrattas" असे उद्गार काढिले आहेत. मि० अंडरसन ह्यांनीं "The siege was carried on with such extraordinary vigour, skill, and perseverance, as perhaps Mahrattas have in no other instance displayed." असें मत दिलें आहे. असेच इतर ठिकाणींही तत्संबंधाचे अनेक स्तुतिपर उद्गार दृष्टीस पडतात.

राहतील त्यांना त्यांच्या धर्माप्रमाणें राहूं दिलें जाईल, आणि त्यांच्या तीन प्रार्थनामंदिरांचें (Churches) संरक्षण केलें जाईल, अशीं दोन कलमें होतीं. तींही चिमाजी आपांनीं उत्तम रीतीनें पाळलीं.[१]

येणेंप्रमाणें मराठ्यांस अद्वितीय यश प्राप्त झाल्यानंतर, त्यांनीं फिरंगी लोकांच्या जुलमामुळें परागंदा झालेल्या सर्व लोकांस अभय देऊन, त्यांच्याकडून साष्टी प्रांतांत वसाहत करविली. गंगाजी नाईक वगैरे अणजूरकर मंडळींस व अंताजी रघुनाथ वगैरे ब्राह्मण मंडळींस त्यांचीं पूर्वीचीं वतनें व वृत्त्या इनाम करून दिल्या. सारांश, वसईप्रांतामध्यें स्वराज्य झाल्यामुळें स्वधर्मस्थापना होऊन पूर्ववत् प्रमाणें "देवधर्मादिक" चालूं लागले. तेणेंकरून सर्व प्रजा संतोष पावली. अशा रीतीनें धर्मरक्षणार्थ हातीं घेतलेल्या ह्या वसईप्रकरणाचा गोड शेवट झाला.

वर सांगितलेलें वसईचें राजकारण सिद्धीस नेऊन स्वधर्मप्रतिपालनाचें काम चिमाजी आपांनीं उत्तम रीतीनें तडीस नेलें; परंतु त्याचें पुष्कळ श्रेय ब्रह्मेंद्रस्वामींसच दिलें पाहिजे. ह्या राजकारणामध्यें स्वामींचें प्रधानांग असून त्यांनीं आपल्या प्रोत्साहक व निग्रही वाणीनें चिमाजी आपा व इतर मराठे सरदार ह्यांस विलक्षण उत्तेजन दिलें. त्यामुळें त्यांचीं भक्तिपूर्ण हृदयें वीररसानें उचंबळून जाऊन त्यांच्या हातून हें महत्कार्य घडून आलें, असें ह्मटलें असतां तें अप्रयोजक होणार नाहीं. ह्या मोहिमेसंबंधाचीं एकंदर चौदा पत्रें उपलब्ध झालीं आहेत.[२] त्या सर्वांवरून तींत प्रथमपासून स्वामींचा अनुग्रह, त्यांचा आशीर्वाद, आणि त्यांचा सदुपदेश प्रधानत्वेंकरून प्रवर्तत होता, असें स्पष्टपणें दिसून येतें.

---

१ मराठी बखरीमध्येंच ह्याबद्दल चिमाजी आपांची स्तुति केलेली नसून इंग्रज इतिहासकारांचाही त्यास स्पष्ट पुरावा आहे. डानव्हर्स साहेब लिहितात:— "On the departure of the Portuguese from Bassein, the Mahrattas took possession of that place, and testimony is borne to the fact that they *faithfully observed* all the conditions of the capitulations, permitting all who wished to remain in peace." Page 412.

२ लेखांक ३७, ३९, ४०, ४७, ४९, ५०, ५१, ५२, ५३, ५४, ५८, ११९, १२०, २९१ पहा.

एवढेंच नव्हे तर ह्या महापुरुषाच्या कृपासाहाय्यामुळेंच हा बिकट मनसबा पार पडला असें प्रांजलपणें कबूल करणें भाग पडतें. लेखांक ११९ ह्या पत्रामध्यें **बा**जीरावांनीं लिहिलें आहेः—"स्वामींचा कोप **फि**रंगी यावरी जाहला असतां त्याचें बरें होईल हें सर्वथा घडणारें नाहीं. आपण साक्षात् ईश्वर—अवतार. जें चित्तांत स्वामींच्या येतें व मुखेंकरून वक्तृत्व होतें, तें घडून येतेंच येतें. **व**सई हस्तगत होईल ह्मणून स्वामीं बोलिले आहेत. तदनुरूप **व**सई हस्तगत होईल ह्यांत संदेह नाहीं. व आह्मांस सर्व भरंवसा स्वामींचे आशीर्वादाचा. त्यास, आशीर्वाद आमचे मस्तकीं व कृपाही विशेष. तेणेंकरून जें करूं तें सिद्धीस पावेल." लेखांक ५१ ह्या पत्रांत **चि**माजी आपा लिहितातः—"स्वामींनीं कृपा करून अभयउत्तरें देऊन **व**सई दिली ह्मणून आज्ञा केली, तेव्हां **व**सई दिलीच. स्वामींचें अभय पूर्ण चित्तांत धरून आज्ञेप्रमाणें शरीरद्वारां साहस करणें तें आह्मी सर्वही करीत असों. तरी **व**सईवर स्वामींचा ध्वजारोहण करण्यास स्वामी समर्थ आहेत." पुनः लेखांक ५२ ह्या पत्रांत, "**व**सई स्वामींचे आशीर्वादें फत्ते झाली. श्रीचे सुदर्शन धर्मद्वेष्टे यांचे मस्तकीं वज्रप्रहार होऊन **टो**पीकर म्लानत्व पावले. अन्यथा **व**सई सही न होती. **फि**रंगी आगीचा पुतळा होता. स्वामींचे कर्तृत्वास पार नाहीं! स्वामींचा महिमा स्वामी जाणत." असें लिहून, लेखांक ५४ ह्यामध्यें, "**व**सई फत्ते जाहली यावरून स्वामींनीं मजला कित्येक कृपाउत्तरें गौरवून, **दा**शरथी आदिकरून साक्ष-उपसाक्ष देऊन आज्ञा दिली; तर सर्व सामर्थ्य स्वामींचे आशीर्वादाचें. **व**सई दिल्ही, दिल्ही, हीं उत्तरें त्रिवार स्वामींनीं लेख केलीं, व स्वामींनीं **पा**टसास मज दर्शन दिलें, तेथेंही **व**सईविशीं अभय दिलें. तदनुरूप स्वामींनीं **व**सईवर सुदर्शन प्रेरून धर्मद्वेष्टे यांचा निःपात केला. येरवीं **व**सई सई होती असें [नवतें] व **टो**पीकर अग्निरूप होते. यांच्या सर्व शक्ति कुंठित करणें हा प्रताप स्वामींचा. आम्हां मानवी लोकांचें हें कृत्य नव्हे. श्री **र**घुनाथ [यांणीं] वानरांहस्तें समुद्रीं पाषाण तरवून, **लं**केशादि **त्रि**कुटाचळाचें मर्दन केलें, तैसेंच श्री**कृ**ष्णें यादवांहस्तें म्लेंच्छादि दैत्यांचें निर्दळण केलें, त्याचप्रकारें पाश्चात्यांचें उपमर्दन स्वामींनीं करून **व**सईत ध्वजारोहण केलें. स्वामी मूर्तिमंत ईश्वररूप आहेत. स्वामींचा प्रताप कर्तृत्व वर्णावयास आमची बुद्धि नाहीं. प्रापंचिक विचारें स्वामींनीं मज

महत्त्व देऊन आज्ञा दिली तर हें सर्व भूषण स्वामींचें आहे." असें भक्तिभावाचे प्रेमळ व कृतज्ञतादर्शक उद्गार काढिले आहेत. ह्यावरून वसईच्या राजकारणांत स्वामींच्या आशीर्वादाचा अतर्क्य प्रभाव मराठ्यांच्या यशप्राप्तीस किती कारण झाला, ह्याची चांगली कल्पना पेशव्यांच्याच पत्रांवरून वाचकांस सहज करितां येईल.

स्वामींनीं हें राजकारण सिद्धीस नेण्याकरितां कसकशीं सूत्रें फिरविलीं हें समजण्यास मार्ग नाहीं; तथापि त्यांनीं त्यांत यश मिळविण्याचा पूर्ण संकल्प केला होता असें त्यांच्याच पत्रावरून दिसून येतें. लेखांक २९१ ह्या पत्रांत स्वामींनीं ह्या राजकारणास अनुलक्षून असें लिहिलें आहे कीं, "वसई न आली तर या राज्यांत राहिल त्याचें संन्यासपण लटकें." अर्थात् इतका दृढ संकल्प करून जी मसलत हातीं घेतली, तींत यशप्राप्ति खात्रीनें व्हावी ह्यांत आश्चर्य तें काय? तात्पर्य, स्वामींचे निश्चयाचें बळ व स्वजनकल्याणाची उत्कट इच्छा, आणि पेशव्यांची अपार भक्ति व तत्प्रेरित शौर्यशक्ति ह्या सर्व गोष्टी महाराष्ट्रराज्यसत्तेच्या अभ्युदयास कारणीभूत झालेल्या असून, त्यांचें मनन इतिहासशास्त्रवेत्त्यास अत्यंत आल्हाददायक होईल ह्यांत शंका नाहीं. राष्ट्रोन्नतीची स्फूर्ति उत्पन्न करण्यास स्वधर्माभिमान कारण होतो. ह्याकरितां असे धर्मजागृति करणारे सत्पुरुष हेच राष्ट्राचे खरे कल्याणकर्त्ते होत असें ह्मणण्यास हरकत नाहीं. असे माहात्मे सर्व लोकांस वंदनपात्र व्हावेत व साक्षात् ईश्वराचे अवतार वाटावेत ह्यांत कांहीं नवल नाहीं. हे राष्ट्रांत निर्माण होणें हें केवळ परमेश्वरी कृपेचें फळ–ईश्वरी देणें–होय. श्रीसमर्थ रामदासस्वामी ह्यांनीं ह्मटलें आहे:—

**धर्मस्थापनेचे नर । ते ईश्वराचे अवतार ।**
**झाले आहेत पुढें होणार । देणें ईश्वराचें ॥ १ ॥**
**उत्तम गुणांचा ग्राहक । तर्क तीक्ष्ण विवेक ।**
**धर्मस्थापना पुण्यश्लोक । देणें ईश्वराचें ॥ २ ॥**

---

# भाग ६ वा.

## स्वामींच्या कांहीं विशेष गोष्टी.

परमहंस **ब्रम्हेंद्रस्वामी** ह्यांचा उपलब्ध झालेला पत्रव्यवहार ह्या पुस्तकांत स्वतंत्र रीतीनें दिला आहे. त्यावरून त्यांच्या राजकीय व सामाजिक उलाढालींची सर्व हकीकत कळण्यासारखी आहेच. तथापि, त्यांच्या स्वभावाचें व वर्तनक्रमाचें खरें स्वरूप कळण्याकरितां, त्यांच्या कांहीं विशेष गोष्टी, सारांशरूपानें, अस्सल पत्रांच्या आधारानिशीं, ह्या भागांत सादर करावयाचें योजिलें आहे. त्यांवरून स्वामींच्या खऱ्या जीवनचरित्राची रसिक वाचकांस थोडक्यांत चांगली कल्पना करितां येईल, व **मयूरकवीनें** म्हटल्याप्रमाणें:-

**सत्पुरुषकथा अद्भुत रसदा ह्मणतो हिलाच सुरभी मी ॥**

किंवा **वामनपंडितांनीं** म्हटल्याप्रमाणें-

**चरित्रें साधूंचीं अकपट विशुद्धेंचि असती ॥**

अशा प्रकारच्या साधुचरित्रांतील सौरस्य गुणाचा त्यांत पुष्कळ अंश दृष्टीस पडेल अशी आशा करण्यास हरकत नाहीं.

## स्वामींचा अत्युच्च मनोरथ.

स्वामींच्या हृदयांत स्वधर्म व स्वराज्य ह्यांची अभिवृद्धि होऊन स्वजनकल्याण व्हावें, हा अत्यंत पवित्र हेतु पूर्णपणें वसत होता. लौकिकजनास त्यांच्या स्वभावाचे बहुविध आविर्भाव दिसत होते; परंतु त्या सर्वांचा उगम ह्या उन्नत हेतूपासून होता, हें खचित आहे. कोठें हृष्ट, कोठें रुष्ट, कोठें प्रेमळ, कोठें कठोर, कोठें नम्र, कोठें उग्र असे त्यांच्या वर्तनाचे नाना प्रकार दृष्टीस पडतात. परंतु त्या सर्वांचें पर्यवसान लोककल्याणावांचून दुसरें कोणतेंही नाहीं. **पे**शव्यांच्या कित्येक पत्रांत त्यांच्या ह्या अत्युच्च मनोरथाचें खरें स्वरूप व्यक्त झालेलें आहे. तें त्यांच्याच शब्दांनीं येथें सादर करितों:—

लेखांक २७५ मध्यें स्वामीमहाराज **पे**शव्यांस लिहितात:-"लक्षकोटी रत्नें माणकें मजला दिलीयानें कांहीं माझी कीर्ति वाढत नाहीं. उभयतां दोनी

बंधु **राम लक्ष्मण** तुमची फत्ते झाली, ह्मणजे त्रैलोक्यांत माझी कीर्ति जाहली. हेचि मी इच्छा रात्रंदिवस श्रीपाशीं इच्छितों. पैका नामर्दाचा; इजत व यश मर्दाचें."

लेखांक २६४ मध्यें लिहितातः-"तुह्मीं खुशाल सिंहासनीं बसणें......... मजला पालखी नलगे. कांहीं नलगे. तुह्मीं सुखी असावें हेच माझी पालखी."

लेखांक २७६ मध्यें लिहितातः—"**व**सिष्ठाचा हेत जे, **ह**रिश्चंद्राचें सत्व रक्षोन चंद्रसूर्यपर्यंत दिग्विजय व्हावा. त्याचप्रमाणें आमचाही हेत जे, चंद्र-सूर्यपर्यंत (तुमचा दिग्विजय व्हावा.) हा हेत धरून तुमचें कल्याण श्रीजवळ नित्य करीत असों."

लेखांक १३६ लिहितातः—"यश संपादोन सुखी आलेत, हें वृत्त अवगत होऊन कोटिशः संतोष जाहला. आह्मांस द्रव्याची इच्छा नाहीं. तुमची कीर्ति ऐकोन परम सुखी आहों."

ह्या सर्व उद्गारांवरून स्वामींचें खरें हृद्गत काय होतें ह्याची चांगली ओळख पटते. अर्थात् स्वामींचा असा उदात्त हेतु असल्यामुळें त्यांच्या उत्तेजनानें व प्रेरणेनें **म**राठे सरदारांच्या हातून महत्कृत्यें घडून आलीं, व त्यानें **म**हाराष्ट्राचें अपरिमित कल्याण झालें, ह्यांत शंका नाहीं.

## स्वामींची महत्वाकांक्षा.

स्वामींचा हेतु हिंदुधर्माचा सर्वत्र प्रसार व्हावा हा होताच. तथापि, त्यांची विशेष इच्छा, श्री **भा**र्गवाचा भक्तिपंथ चोहोंकडे वाढवून श्रीचीं देवालयें व महोत्सव जागोजागीं करावेत, अशी विशेष होती. श्री समर्थ **रा**मदास स्वामींनीं जागोजाग **मा**रुतींची स्थापना करून सर्वत्र भक्तिमार्ग वाढविण्याचा प्रयत्न केल्याचें प्रसिद्धच आहे. त्याप्रमाणें ह्याही स्वामींनीं, **कों**कणांतील **पे**ढें, **गो**ठणें, वगैरे ठिकाणीं व देशांतील **धा**वडशी, **मा**ळशिरस वगैरे गांवीं **भा**र्गवरामाची संस्थापना केली; व जागोजाग इतर देवतांचींही देवालयें बांधून सर्व जनांच्या मनांत भक्तिभाव उत्पन्न करण्याचा प्रयत्न केला. तत्प्रीत्यर्थ त्यांनीं श्री **भा**र्गवाच्या नांवानें बहुत भिक्षाद्रव्य मिळविलें. तथापि तेवढ्यानें त्यांची मनीषा तृप्त झाल्याचें दिसत नाहीं. त्यांनीं सर्व **म**राठी राज्यांत **भा**र्गवपट्टी नांवाचा देवाचा एक कर गांवगन्ना स्थापित करण्याबद्दल आपला हेतु दर्शवि-

त्याचें लेखांक १४६ ह्या **चि**माजी आपांच्या पत्रावरून दिसून येतें. ही नुसती **भा**र्गवपट्टीच नव्हे, तर श्री **भा**र्गवाच्या नांवाचा शिक्का सर्व **कों**कणांत चालू करावा, अशीही स्वामींची महत्वाकांक्षा होती. हें ऐकून कोणास आश्चर्य वाटणार नाही? ह्यासंबंधाचें स्वामींचें स्वदस्तुरचें एक पत्र उपलब्ध झालें आहे. त्यांत पुढील सांकेतिक मजकूर आहे:—

"**शा**मलाचें अगदीं निर्मूलन. **जं**जिरा, **उं**देरी, **प**द्मदुर्ग, व **अं**जणवेली **गो**वळ येथील इस्तकबिल कार्तिक मास तागाईत मार्गशीर्ष मासामध्यें निर्मूलन होतें. कार्य सिद्ध जाहलेयासी चौदा लक्षांचा **कों**कणांत हक्क श्री **भा**गर्वपट्टी दरसदे आकार रुपये तीन प्रमाणें व श्रीचा शिक्का याप्रमाणें हरफः—

**श्री भार्गव चरण। परमहंस ब्रह्मेंद्र शरण॥**

ऐसी मुद्रा श्रीस करून द्यावी. हें सकल यश **पे**शवे **बा**जीराव यांस व **आं**गरे यांस येतें." ह्यापत्रावरून यतिमहाराजांची महत्वाकांक्षा केवढी जबरदस्त होती हें व्यक्त होतें.

## स्वामींची उत्तेजन देण्याची तऱ्हा.

स्वामी स्वतः निरिच्छ सत्पुरुष असून त्यांस श्री **भा**र्गव प्रसन्न होता, अशी लोकांची समजूत असल्यामुळें, त्यांच्या मुखांतून जें प्रसादवचन निघेल तेंच कार्यसिद्धि करील, अशी सर्वांची खात्री झाली होती. त्यामुळें स्वामींचा आशीर्वाद घेण्याकरितां प्रत्येक सरदार अगदीं पराकाष्ठेचा उत्सुक असे. तशांत, स्वामींची आशीर्वादरूपानें प्रोत्साहन देण्याची तऱ्हा फारच चित्ताकर्षक असल्यामुळें त्यांच्या वाणीचा परिणाम कांहीं विलक्षणच होत असे. त्यांच्या शब्दांत असा विचित्र मोहकपणा असे कीं, त्यानें सर्व लोकांचीं अंतःकरणें कसल्याही दुःखांनीं व चिंतांनीं व्याप्त असलीं, तरी तीं तेव्हांच आनंदानें उल्लसित होत असत. स्वामी आपणास **पे**शव्यांचे "**जागली**" म्हणजे पहारेकरी असें म्हणत असत. व वारंवार त्यांचा उद्वेग दूर करून त्यांस उत्तेजन देत असत. त्यांनीं **बा**जीराव व **चि**माजीआपा ह्यांचीं **रा**म व **ल**क्ष्मण अशीं नांवें ठेविलीं होतीं. त्यांस पत्रें लिहितांनां 'मननिर्मलगंगाजल' 'सत्यवक्ता' 'एकवचनी' 'भक्तराज' 'निजभक्तशिरोमणी' 'रणधीर' 'रणशूर' अशीं गोड व प्रेमळ विशेषणें लिहिण्याचा त्यांचा सांप्रदाय असे. आणि केव्हां केव्हां त्यांचें अभिनंदन करि-

तांनां, महाभारत व रामायण ह्यांतील थोर व पराक्रमी पुरुषांच्या उपमा देऊन व त्यांचा गौरव करून त्यांचें चित्त प्रसन्न करण्यांत त्यांचा हातखंडा असे. बहुतेक सर्व मराठे सरदारांस स्वामींनीं 'जडभरत', 'बोधला', 'सुदामा' वगैरे प्रसिद्ध देवभक्तांचीं नांवें ठेविलीं होतीं. स्वामींची नेहमींची एक ह्मण असे कीं,

**ज्याचा भार्गव सारथी । त्यास विघ्नें काय करिती ॥**

अर्थात् ही उक्ति[१] स्वामींच्या मुखांतून निघाली ह्मणजे तिच्या गर्जनेनें विघ्नांनींच घाबरून पळावें, ह्यांत आश्चर्य तें काय? श्री समर्थ रामदासस्वामींच्याः—

**समर्थाचिया सेवकां वक्र पाहे ।**

**असा सर्व भूमंडळीं कोण आहे ॥**

ह्या शब्दांत जें वक्तृत्व व जें सामर्थ्य आहे, तेंच स्वामींच्या वर निर्दिष्ट केलेल्या वचनांत दिसून येतें. अशा जोरदार वाणीनें मिळणाऱ्या उत्तेजनानें मराठेवीरांच्या हातून लोकोत्तर कृत्यें व्हावींत ह्यांत नवल तें काय?

## स्वामींची शिफारस.

स्वामींच्या अंगीं व्यवहारचातुर्य विशेष असल्यामुळें त्यांस मनुष्यपरीक्षा फार चांगली करितां येत असे. ह्या कारणास्तव, छत्रपति व पेशवे ह्यांच्या दरबारांत स्वामींच्या शिफारसीस विशेष मान असून, त्यांनीं पसंत केलेल्या माणसास योग्य

---

१ स्वामींची ही उक्ति त्यांच्या कित्येक पत्रांतही आढळून येते. उदाहरणार्थ पुढील पत्र पहा:—

"श्रीमत् परमहंस स्वामी यांहीं.

सहस्रायु चिरंजीव विजयीभव नाना प्रधान यांप्रती आज्ञा ऐसीजे:—तुह्मीं पत्र छ० ५ जमादिलावलचें पाठविलें तें छ० १६ जमादिलाखरीं पावोन बहुत समाधान जालें. तरी नाना, **ज्याचा भार्गव सारथी, त्यास विघ्नें काय करिती?** आमचा निजध्यास तुह्मां वितरिक्त नाहीं. सर्व तनमन आमचें तुह्मांखेरीज नाहीं. आह्मीं मागें दोन चार पत्रें तुह्मांस लिहिलीं, परंतु पावलीं न पावलीं हें न कळे. तुह्मी स्वदेशास भिवरा उतरोन आलेत ह्मणजे दर्शनच जालें. वरकड यंदा आमचे शरीरीं अशक्तपण बहुत आलें. चौ दिवशीं समाधीस जाऊं. आपल्याकडील हमेशा सुखसंतोषाचें वर्तमान लिहीत गेलें पाहिजे. तुह्मां वेगळे आह्मांस जोड कांहीं नाहीं. ...हे आज्ञा"

अधिकार देण्याचा परिपाठ असे. १८ व्या शतकाच्या प्रथमार्धामध्यें आपलें राजकार्यधुरंधरत्व व पराक्रमपटुत्व ह्या दोन अप्रतिम गुणांचा उज्वल प्रकाश अखिल महाराष्ट्रांत चमकत ठेवणारीं जीं नररत्नें निर्माण झालीं, त्या सर्वांच्या उदयास, प्रत्यक्ष अथवा अप्रत्यक्ष रीतीनें, हे स्वामी महाराज कारणीभूत झाले आहेत. थोरले बाजीराव पेशवे व इतर मराठे सरदार ह्यांची वारंवार शाहु महाराजांजवळ शिफारस करून त्यांचे वास्तविक गुण त्यांच्या नजरेसमोर आणण्याचा व त्यांची योग्य जागीं योजना करून स्वदेशकार्य सिद्धीस नेण्याचा स्वामींचा क्रम फार प्रशंसनीय असे. पेशव्यांच्या जवळही ते कर्तृत्वशाली माणसांची तारीफ करून त्यांस मोठ मोठे हुद्दे व महत्वाचे अधिकार मिळवून देत असत. लेखांक २७८ ह्यामध्यें धारच्या पवारांचा मूळपुरुष उदाजी पवार ह्याबद्दल स्वामींनीं अशी शिफारस केली आहे कीं, "उदाजी पवार कर्ता सरदार. पलीकडील वर्षीं राजश्रींनीं उदाजीस रायगड प्रांतें शामलावर पाठविला, तों वाडीपाचाड येथें सिद्दी अंबर अफवानी याणें पांच सातशें माणूस जमावानिशीं युद्धास उभा राहिला. ते समयीं उदाजीनें त्याचा मोड करून अफवानीचें शीर कापून आणिलें. महाड, बाणकोट हस्तगत केला. सिद्दी साद यासी धास्त लाविली. रायगडचे मोर्चे उठविले. मग गोवळकोटावर गेला. तेथेंही शर्तच केली. तर, उदाजी सारिखा सरदार तुम्हांकडेस आला, तर त्याचा सरंजाम करून चालविल्या तो लाखाचें यश देईल. आम्ही तुमचे जागली. तुम्ही आमचे शब्द मानितां म्हणून आम्ही तुम्हांस सांगतों. न ऐकाल तर मग आपणास लोकांमध्यें श्रीचें कां म्हणवितां व आम्हांस महत्त्व कशास देतां? तुम्ही जाणते सुज्ञ आहां." लेखांक २७२ मध्यें जगजीवन पवाराबद्दल स्वामींनीं अशी शिफारस केली आहे कीं, "जगजीवनराव पवार जर तुम्हांकडे येईल तर त्याचे मनानुरूप सरंजाम करून त्यास आणावा. पवार मर्दाने, पुरातन आहेत. जगजीवन कर्ता, तरवारीचा शूर आहे. त्याला हत्ती देऊन बहुमान करून आपणाजवळ आणिल्यास तुमची कीर्ति होईल, आणि आमचें वचन ऐकिलें असें होईल." ह्याचप्रमाणें लेखांक २८९ ह्यामध्यें, आंगऱ्याचा नामांकित सरदार दत्ताजी कनोजे ह्याचा पुत्र सयाजी कनोजे ह्यास महिपतगडचा हवाला देण्याबद्दल स्वामींनीं शिफारस केली आहे. ह्या सर्व उदाहरणांवरून

इतकें सिद्ध होतें कीं, स्वामींस मराठी राज्यांतील बहुतेक माणसें पूर्ण माहित असून, त्यांच्या योग्यतेप्रमाणें त्यांना उदयास आणण्याचे कामीं, त्यांनीं आपली योजकता व गुणग्राहकता चांगली व्यक्त केली आहे. स्वामींच्या अंगीं ही लोकसंग्राहकशक्ति चांगली वसत असल्यामुळें त्यांच्या हातून मराठी राज्याचें फार कल्याण झालें ह्यांत शंका नाहीं. अर्थात् स्वामींच्या शिफारसीमुळें व कृपासाहाय्यामुळें सर्व प्रख्यात मराठे सरदारांचा ज्या अर्थीं उदय झाला आहे त्या अर्थीं त्यांनीं ह्या सर्ववंद्य सत्पुरुषाविषयीं पूज्यबुद्धि व अभिमान बाळगावा हें रास्त आहे.

## स्वामींचा राग.

स्वामींचा स्वभाव अत्यंत गोड व प्रेमळ असे. तथापि त्यांचा कोणी आज्ञाभंग केला अथवा अपमान केला, तर तो त्यांस अगदीं सहन होत नसे. ते तेव्हांच कोपायमान होत असत, आणि आपलें खाणें पिणें सोडून देत असत. नित्यशः तक्र व गोमूत्र प्राशन करण्याचा त्यांचा नियम असे. तोही मग बंद ठेवीत, आणि कोठें तरी शांत व निर्जन अशा स्थळीं जाऊन जप करीत बसत. त्यांना एकदा राग आला ह्मणजे त्यांची समजूत करण्यास सामान्य मनुष्य समर्थ नसे. त्या स्थितींत ते प्रत्यक्ष जमदग्निसारखे भासत असत. मग ते कोणास भेटत नसत व कोणाशीं बोलत नसत. अशा सक्रोध वृत्तींत ते कित्येक दिवसपर्यंत अगदीं उपाशी तापाशी राहत; व क्षौर वगैरे कांहीं न करितां दाढी वाढवून बसत. मग ही बातमी छत्रपति शाहुमहाराज अथवा पेशवे ह्यांस कळे. नंतर ते भेटीस येऊन स्वामींची विनवणी करीत व त्यांच्या रागाचें कारण काढून टाकून त्यांची समजूत घालीत. नंतर स्वामीमहाराज आपल्या मठास येत. स्वामींचा हा राग अगदीं वरकरणी असे, व त्याचा उद्देश केवळ उन्मत्त लोकांस शासन करण्याचा किंवा इष्टकार्य साधण्याचा असे. स्वामींवर शाहु महाराज व त्यांच्या राण्या ह्यांची पराकाष्ठेची भक्ति असल्यामुळें, स्वामींस कोणीं राग आणलेला त्यांस अगदीं खपत नसे. ते तेव्हांच त्याचें पारिपत्य करीत असत. त्यामुळें स्वामी रागावले म्हणजे सर्वांची फार त्रेधा उडत असे. स्वामींच्या विश्वासाचीं व अंतःकरणाच्या अंतर्भागांतलीं जीं माणसें असत, त्यांना स्वामींच्या स्वभावाचे हे सर्व आविर्भाव पूर्ण माहीत असत. त्यामुळें तीं स्वामींच्या मर्जीचा नोकझोक पाहून वागत असत. स्वामींचे पट्टशिष्य

चिमणाजीपंत भागवत ह्यांच्यावर स्वामींची पूर्ण कृपा असे. त्यामुळें तेही केव्हां केव्हां स्वामींच्या रागाचें निरसन करीत असत. स्वामींच्या कोपाच्या स्थितीचें वर्णन जगन्नाथपंतांनीं आपल्या वडिलांस एका पत्रांत लिहिलें आहे. तें येणेंप्रमाणें:—

"तीर्थरूप रा० दादा वडिलांचे सेवेसीः—

अपत्यें जगन्नाथानें चरणावर मस्तक ठेवून साष्टांग नमस्कार विनंति. उपरी येथील वर्तमान ता० फाल्गुन शुद्ध पौर्णिमा शुक्रवार पावेतों वडिलांचे आशीर्वादेंकरून वर्तमान यथास्थित असे. विशेष. श्रीमत् स्वामी क्षौर करीत नाहीं. कित्येक प्रकारें सांगितलें परंतु ऐकत नाहीं. शरीर तो फार कृश जाहालें. कोणाचें ऐकत नाहीं. बावा ह्मणतात जे, धावडशीस दादा आल्यावांचून कांहीं येत नाहीं. वडिलांप्रती विशेष काय लिहिणें. क्षौर फार वाढलें आहे. जागाचा कंटाळा आला. सायंकाळपर्यंत एकासनीं जप करितात. मागतीं जप प्रहर रात्र पावेतों करितात. निद्रा येत नाहीं. हे विनंति. पुढें काय होईल तें पहावें. हे विनंति."

हें पत्र ता० ८ मार्च इ० स० १७३४ सालचें असावें. ह्यानंतर स्वामींचा राग दूर करण्याकरितां ता० १४ जून इ० स० १७३४ रोजीं शाहु महाराज स्वतः धावडशीस गेले. त्यांनीं स्वामींचें दर्शन घेतलें, व नम्र भाषणानें त्यांचा राग दूर करून श्री भार्गवरामास माळशिरस हा गांव इनाम दिला. ह्या इनामगांवाची सनद शाहु महाराजांनीं स्वदस्तुर लिहून दिली आहे. तींत येणेंप्रमाणें मजकूर आहेः—

श्रीभारगोराम.

"श्री भुलेश्वर दरोबस्त माळसीरस नजर. देसमुखी व बाबी खेरीजकरून नजर अस. भोयाचा चावर व इठलपताचा चावर व सरदेसमुखी व मो (ग) लाई व मोकास बाब नजर. साहोत्रा नजर. भारगोरामास नजर."

ह्या भेटीचा उल्लेख बाजीराव पेशव्यांच्या लेखांक २८ व २९ ह्या पत्रांत

---

१ ही अस्सल सनद आह्मांस रा. आपासाहेब भागवत मु० पिंपरी ह्यांचे दप्तरांत मिळाली. तिची हुबेहूब प्रतिकृति शाहुमहाराजांच्या अक्षरांचा नमुना दाखविण्याकरितां सोबत जोडली आहे.

आहे. "स्वामींनीं राजश्रीची विनंति मान्य करून क्षौर केलें व गोमूत्र चालतें केलें." ह्या वाक्याचा अर्थ आतां वाचकांच्या नीट लक्षांत येईल.

स्वामींच्या रागाचे असे अनेक वेळां प्रसंग येत असत व **शा**हु महाराज स्वतः जाऊन त्यांचें समाधान करीत असत. इ० स० १७३३ मध्यें **निं**बकर व **अ**नेवाडीकर ह्यांचा गांवच्या शिवेवरून तंटा झाला. त्या वेळींही स्वामी असेच रागावले व **शा**हु महाराजांनीं त्यांची समजूत केली. त्या प्रसंगाची हकीकत अशीः—**निं**बकरांचा **वि**रुबाईराणीकडे कांहीं वशिला होता. तेव्हां त्यांनीं त्या जोरावर, अन्यायानें, **अ**नेवाडीकरांची शीव रेटली. "हें वर्तमान **अ**नेवाडीकर पाटील यांनीं बावांस सांगितलें. त्यावरून गोसावीबावा नव दिवस शिवेस जाऊन बैसले. हें वर्तमान राजश्री स्वामींस कळलें. मग राजश्री स्वामी जाऊन गोसावीबावांचें समाधान करून पालखींत बैसवून **धा**वडसीस पाठविलें. कार्तिक मासामध्यें ही गोष्ट झाली. जे समयीं पालखींत बसले तेव्हां बोलिले जे, "आजि पालखींत बैसावें आणि उद्या पायीं चालवावें कीं काय"? तेव्हां राजश्री स्वामींनीं उत्तर दिलें कीं, "नेहमीं पालखी दिल्ही." त्यावर तीर्थरूप राजश्री **रा**ऊ यांस पत्र पाठविलें कीं, पालखीचा खर्च तुह्मीं चालवणें. त्यावर राजश्री स्वामी **प्र**तापगडास गेले. माघारे फिरतेसमयीं **मा**भळेश्वर (**म**हाबळेश्वर), **धो**म, **वा**ईस येऊन राहिले. संक्रांति **वा**ईस जाली. तेथून येऊन **निं**बावर मुक्काम केला. आमावस्या **निं**बावर झाली. माघ शुद्ध पक्षीं द्वितीयेस **धा**वडसीस श्रीच्या दर्शनास महालसहवर्तमान गेले. ते समयीं पालखीचा मजकूर घातला, आणि एक गांव मागितला. ते समयीं राजश्री स्वामींनीं **प्र**तिनिधींस आज्ञा केली कीं, राजश्री पंत **प्र**धान यांचे जिल्हेमध्यें गांव देणें. त्यावरून **प्र**तिनिधि यांनीं राजश्री **तां**त्यास गांवाविशीं सांगितलें. यांनीं उत्तर दिलें कीं तुमच्या चित्तास येईल तो गांव देणें. त्यावरून गोसावीबावांनीं **को**थळे व **बे**लसर या गांवांतून एक गांव मागितला." पुढें

१ महादाजीपंत पुरंदरे.

२ हा अस्सल पत्रांतील उतारा आहे. ह्या पत्राचें हस्ताक्षर मल्हार तुकदेव ह्यांचें दिसतें. परंतु पत्र अर्धे फाटलेलें असल्यामुळें तें कोणास लिहिलेलें आहे त्याचें नांव गांव समजत नाहीं!

ह्या पालखीच्या गांवाबद्दल बरीच वाटाघाट झाल्याचें लेखांक २६४ वरून दिसून येतें. शेवटीं **को**थळें गांव **पे**शव्यांनीं पालखीच्या खर्चाकरितां स्वामींस समर्पण केला.

स्वामींचा राग खुद्द **शा**हुमहाराजांवर व त्यांच्या राण्यांवरही होत असे; व ते "तुमचें राज्य सोडून वाटेल तिकडे जाईन" असें ह्मणत. परंतु हे सिद्ध महापुरुष, आपल्या राज्याचे हितचिंतक, असें समजून ते त्यांना कोठें जाऊं देत नसत. स्वामी रुसून गेले तर **शा**हु महाराज त्यांस आणाशपथा घालून व परोपरीनें आर्जव करून त्यांस परत बोलावीत असत, असें पुढील पत्रावरून दिसून येतें:-

" तीर्थस्वरूप श्रीस्वामींचे शेवेसीः-

अपत्यसमान **शा**हु राजे कृतानेक दंडवत विनंति उपरी. आपण न विचारितां गेले ही गोष्ट वडीलपणास उचित कीं काय? आपले जाण्यामुळें आमचें चित्त स्वस्थ नाहीं. यास्तव हें पत्र आपणांस लिहिलें आहे. तरी वडीलपणें दर्शनाचा लाभ देऊन आमचे चित्ताचा संतोष करून गेलें पाहिजे. वडिलास आमचे गळ्याची शपत असे. अनमान न करितां माघारें आलें पाहिजे. एकदा लाभ आम्हांस द्यावा. यांत आमचें समाधान व वडिलांसही उचीत आहे. आपण आम्हांस न पुसतां स्वामी गेल्याकारणें चित्तास समाधान नाहीं. तर पत्रदर्शनीं येऊन दर्शन देऊन सनाथ करण्यास स्वामी अनमान करतील तर आमची शपत असे. हे विनंति. "

छत्रपतींच्या राणीवर स्वामी रागावल्याचें एक पत्र उपलब्ध झालें आहे. त्यावरून राणीनें स्वामींची समजूत करण्याबद्दल **ज**गन्नाथपंताची विनवणी केली आहे. हें पत्र येणेंप्रमाणें:-

"श्रीमंत सकल सौभाग्यादिसंपन्न मातुश्री बाईसाहेब यांणीं राजश्री **ज**गन्नाथ पंत **दा**दाजी यांसी आज्ञा केली ऐसीजेः—

तुह्मीं विनंतिपत्र पाठविलें, प्रविष्ट होऊन लेखनार्थ अक्षरशः विदित जाला. **श्री** (स्वामी) **त्र्यं**बकेश्वरची यात्रा व **गं**गास्नान करून आले त्याचें वृत्त लिहिलें तें कळोन संतोष जाला. दर्शनास यावयाचें लिहिलें तरी दर्शनास येणें. श्री **प**रमहंस स्वामी यांणीं येथून रुसवा करून गेले! तरी इतरांच्या सांगितलें ऐकोन

मनांत विकल्प आणावा ऐसें काय होतें? ह्या उपरी तुह्मी प्रसंगीं बुद्धिमंत आहां. तरी श्रीच्या मनांतील किल्मीष काढून कृपावचनें गौरवीत तें करणें. बहुत काय लिहिणें."

## स्वामींचा हितमंत्र.

स्वामींचा मराठ्यांच्या सर्व राजकारणांत चांगला प्रवेश होता व सर्व राज्य-सूत्रें त्यांच्या तंत्रानें चालत असत हें मागें सांगितलेंच आहे. तथापि त्यांच्या हितमंत्राबद्दल स्वतंत्र उल्लेख करणें अवश्य आहे. राजकीय मनसब्यांतील ना-जूक डावपेंच सूक्ष्म रीतीनें मनन करून त्याबद्दल योग्य सल्लामत स्वामींकडून वारंवार मिळत असेच; तथापि त्याशिवाय बहुतेक मराठे सरदारांच्या मोहि-मांची व हालचालींची कच्ची बातमी ठेवून, स्वामीमहाराज त्यांस जेवणखाणाप-र्यंत गुप्त रीतीनें आपला हितमंत्र कळवीत असत, हें वाचून त्यांच्या स्वदेश-हिताच्या कळकळीबद्दल कोणासही साल्हाद कौतुक वाटल्यावांचून राहणार नाहीं. लेखांक १३१ मध्यें स्वामींनीं चिमाजी आपांस लिहिलें आहे कीं, "चिरंजीव बाजीराव यांस लेहून पाठाविलें जे, त्या प्रांतें गेले आहां. ज्येष्ठमास पावेतों कोणाचा विश्वास न धरणें. कोणा परकीयाचे हातचें व त्याचे घरीं जेवण, पाणी, विडा कांहींच न घेणें. तैसेंच तुम्ही व तुमचे उभयतांचे पुत्र देखील, याप्रमाणें कोणाचा विश्वास न धरणें. बहुत सावधपणें असत जाणें. ज्येष्ठ मास गेलियावरी मग पुढें तुम्हांस बहुत दिवस कोणाचें भय नाहीं. राज्याराम चिरकाल कराल." लेखांक १३२ मध्यें लिहिलें आहे कीं, "कित्येकांस कित्येक प्रकारें दगे करणारांनीं केले आहेत. याकरितां सावध राहत जाणें. शाम-लाकडील कोणी येत जाईल त्याचा विश्वास धरीत न जाणें." लेखांक ३१० मध्यें स्वामींनीं संभाजी आंग्रे ह्यांस असाच उपदेश केला आहे. "तुम्ही त्या स्थळीं (राजपुरीस) गेलेत आहां, (तरी) शामल लोकांचा विश्वास न धरावा. आपणास जतन करणें. तुमचे हातून महत् कामें होऊन यश मोठें पदरीं पडणें आहे. याजकरितां बहुत बहुत जतन आपणास करणें." ह्यावरून स्वामींची किती दूरवर दृष्टि होती ह्याची कल्पना करितां येईल. स्वामी अशा प्रकारचे स्वजनकल्याणाचे गुप्त मंत्र सर्व मराठे सरदारांस वारंवार सांगत असत, एवढेंच नव्हे तर केव्हां केव्हां त्यांच्या मधील गैरसमज व भांडणतंटेही

अशाच हितमंत्रांनीं नाहींसे करण्याचा प्रयत्न करीत असत. **कान्होजी आं**ग्र्याचे पुत्र **सं**भाजी व **मा**नाजी ह्यांच्या मध्यें जो वैरभाव उत्पन्न झाला होता, तो नाहींसा करण्याबद्दल स्वामींनीं पुष्कळ खटपट केली होती. त्याबद्दल त्यांनीं ह्या उभय बंधूंस परोपरीनें उपदेश केल्याचे उल्लेख त्यांच्या पत्रांत अनेक वेळां दृष्टीस पडतात. "बंधुविरोधाचा अर्थ चित्तांतून टाकून सर्वमान्यता दिसे तो विचार करणें" (ग्रं० ले० ३६२), ह्या एका वाक्यांत स्वामींच्या ह्या उपदेशांचें सर्व सार आलें आहे. **सं**भाजी व **मा**नाजी ह्या दोघां बंधूंचें सख्य करण्याकरितां स्वामींनीं पुष्कळ प्रयत्न केला, परंतु त्याचें चीज झालें नाहीं. त्यामुळें त्यांनीं **सं**भाजी संबंधानें अनेक वेळां कठोर व अप्रिय उद्गार काढिले आहेत. (ग्रं० ले० पहा). स्वामींच्या सदुपदेशाचा प्रभाव सर्व **म**राठे सरदारांच्या कलहामध्येंच व्यक्त होत नसून, तो **छ**त्रपति व त्यांच्या राण्या ह्यांच्या प्रेमकलहामध्येंही केव्हां केव्हां दृष्टीस पडतो. लेखांक २५८ ह्यांत **छ**त्रपतींच्या राण्यांस उद्देशून स्वामीमहाराज लिहितातः–" तुह्मीं आपले गुरूचे पायाची क्रिया केली आहे. **छ**त्रपतीशीं भांडो ना. तर तुम्हीं निरवानिरव केली आहे. भांडल्यास हा देश टाकीन. राजांशीं तुम्ही भांडिलांत नाहींत, म्हणजे विश्वजन सुखी होईल. ऋषीश्वराचे पायाची क्रिया केली आहे. तुम्हीं जें जेवण कराल तें राजास अमृतसमान लागेल. आणि तुमचें राजाचें एक चित्त नाहीं, म्हणजे तुह्मीं सोन्याचा ग्रास केला तरी राजास विषसमान वाटेल." ह्यावरून कलहाचें बीज नाहींसें करून सर्वांचा ऐक्यभाव ठेवण्याकडे स्वामींचें विशेष धोरण होतें हें स्पष्ट आहे. बंधुबंधु व नवराबायको ह्यांच्या कलहांत स्वामींचा उपदेश जसा दृष्टीस पडतो, तसा मातापुत्र ह्यांच्या विग्रहामध्येंही तो दिसून येतो. जेथें प्रेमळ व गोड शब्दांनीं काम होत असे, तेथें तसे शब्द स्वामी योजीत असत; व जेथें त्या शब्दाचा उपयोग होत नसे, तेथें कठोर व मर्मभेदक शब्द स्वामी उपयोगांत आणीत असत. त्यामुळें त्यांच्या त्या क्रोधयुक्त दर्पोक्तीनें तेव्हांच इष्ट परिणाम घडून येत असे. **प**वारांच्या घराण्यांतील प्रसिद्ध सरदार **ज**गजीवनराव, जो स्वामींच्या कृपेमुळें पुढें नांवलौकिकास चढला, त्याचें व त्याच्या आईचें भांडण झालें; व तो स्वच्छंदानें व दुराचारानें वर्तूं लागला. तेव्हां स्वामींनीं त्यांस जें पत्र लिहिलें आहे, तें फारच जोरदार व कडक आहे. त्यांत स्वामी लिहितातः–

"तुजला नशेद (निषेध) करून लिहिलें जे, मायेचे पायावर डोई ठेवून तिचे आज्ञेंत राहणें. त्यास, तूं आम्हांस लिहिलें जे, मायेचे श्राप पुत्रास लागत नाहीं. तरी तिजला तूं शिवी दिलीस तरी तिचे श्रापें तुझें भस्म होईल. तिजजवळ तूं बेअदबी, कितेक लहान माणसांच्या बोलें तुफान होऊन तिजला कष्टी केलें आहे. तुला पुढें वांचोन नांवरूप करणें असेल तरी तिचे पायांवर डोई ठेवून झाले अन्याय बक्षीस करून घेणें. न घेस तरी तुझें बरें होत नाहीं. दारू खाऊन बेअदबी, माता ती, तिजजवळ करितोस, हें बरें नव्हे. पाजी तूं आहेस! काय आमचें वचन मोडशील? तेव्हां बाजीचे बटकीकडून धरून आणून तुजला चाकर केलें जाईल. हें पुरतें मनांत आणून आनंदीचे समजाविसी करून, तिचा कागद आला तरच तूं वांचलास. नाहीं तरी तुझा मुलाहिजा होत नाहीं, हें पुर्तें समजणें! (लेखांक २०७)"

ह्या स्वामींच्या चरचरीत पत्रामुळें जगजीवन पवारास चांगलेंच अंजन मिळालें असेल हें निराळें सांगावयास नकोच आहे! असो. एकंदरींत स्वामींसारखे निस्पृही, सदाचारी, निरपेक्ष असे साधु पुरुष सर्व महाराष्ट्रमंडळाचे अध्वर्यु व मार्गदर्शक होते; त्यामुळें त्यांच्याकडून लहानथोर सर्व गोष्टींत हितमंत्र मिळून अतोनात लोककल्याण झालें, असें म्हटल्यावांचून आमच्यानें राहवत नाहीं.

## स्वामींच्या युद्धसंबंधीं देणग्या.

स्वामी महाराष्ट्रांतल्या सर्व राजकारणांत लक्ष घालीत असत, हें त्यांच्या पत्रव्यवहारावरून सिद्धच आहे. परंतु ते स्वतः युद्धसंबंधीं शस्त्रास्त्रांचा संग्रह करीत असत व महाराष्ट्रवीरांना समरांगणास जातेवेळीं प्रसाद ह्मणून तीं देत असत. हें ऐकून वाचकांस मौज वाटल्यावांचून राहणार नाहीं. सन इहिदे ह्मणजे इ० स० १७३१ ह्या सालचा श्रीच्या शस्त्रांचा एक हिशोबाचा कागद सांपडला आहे. तो येणेंप्रमाणेः—

"यादी दागीने श्री सु॥ इहिदे:—

| बंदुखा | तोफा |
|---|---|
| १ विजयदुर्गपैकीं | ३ कित्ता |
| १ भापकर | |
| १ राघोपंत | कित्ता |
| २ धोकडसिंग | २ फिरतलें |
| १ सेखोजी आंगरे | ६ निमचे |
| ३ बाजीराव | तरवारा |
| २ कृष्णंभट देसाई | ८ |
| ११ | |
| २ जेजाला | मु॥ पिंपरी |
| १३ | १ भांडें |
| गोठणें | २ बंदुखा |
| १ भांडें मोठें | २ भाले |
| तारवापैकीं (यशवंतराव | ५ |
| पवार याकडे पाठविलें) | १ जेजाला |
| | २ छ २३ रजब धावडशीस आले |
| | माळशिरस. ता॥ अंतोबा |
| | बंदूख १ |
| | भांडें जंबोरा १ |
| | २ |

ह्यावरून स्वामी शस्त्रांचा संग्रह करीत असत असें दिसतें. बाजीराव व इतर मराठे सरदार ह्यांच्या पत्रांत स्वामींनीं बंदुखा व लढाऊ घोडे मागितल्याचे उल्लेख आहेत. त्याचप्रमाणें त्यांनीं कित्येक सरदारांस बंदुखा व लढाऊ घोडे बक्षीस दिल्याचे दाखले सांपडतात. लेखांक २०७ ह्यांत उदाजी पवारास बंदूख दिली ह्मणून थोरातांच्या मुलांनीं स्वामींस खेळावयास बंदूख मागितल्याचा उल्लेख आहे. लेखांक १९३ ह्या पत्रांत, यशवंतराव पवारानें गढीमध्यें ठेवण्याकरितां एक तोफ

मागितल्याचा उल्लेख आहे. ह्यावरून हे स्वामीमहाराज नुसती जपमाळ घेऊन जप करणारांपैकीं नसून, स्वराज्य व स्वधर्म ह्यांच्या अभिवृद्ध्यर्थ लढणाऱ्या योद्ध्यास शस्त्रांचाही प्रसाद देत असल्याचें दिसून येतें. मराठा वीर सज्ज होऊन रणसंग्रामास निघाला ह्मणजे तो प्रथम स्वामींची भेट घेत असे. त्या वेळीं हे राजकारणी सत्पुरुष त्यास, शुभदायक असें उंची वस्त्र, त्याबरोबर एखादें उत्तम शस्त्र, आणि आपला प्रेमपूर्ण आशीर्वाद हीं अर्पण करीत असत. स्वामींचें प्रसादवस्त्र मिळालें ह्मणजे तें 'वज्रकवच' असें समजून, स्वशरीरसंरक्षणार्थ तो एकनिष्ठ वीर धारण करीत असे; आणि रणांगणामध्यें जाऊन व शत्रूशीं झुंजून, विजयी होत्साता पुनः स्वामींच्या दर्शनास परत येत असे. लेखांक ७७ ह्या पत्रांत "तुह्मांस वज्रकवच पाठविलें आहे. स्वारीशिकारीस अंगीं घालीत जाणें" असें सदाशिव चिमणाजीस स्वामींनीं लिहिलें आहे. त्याचप्रमाणें लेखांक २८९ ह्यांत मल्हारराव होळकरास पांढरी सकलाद पाठवून हें 'वज्रकवच' अंगावर घेत जाणें ह्मणून स्वामींनीं आज्ञा केली आहे. ह्या सर्व उदाहरणांवरून स्वामींची मूर्ति फारच चतुर होती असें ह्मणणें भाग पडतें.

## स्वामींचा थाट.

स्वामी स्वतः विरक्त तपस्वी होते व संसारविषयक गोष्टी त्यांना सर्व तुच्छ होत्या; परंतु लोककल्याणार्थ त्यांनीं बाह्यात्कारें सांसारिक वृत्ति धारण केली होती. त्यामुळें त्यांचा थाट एखाद्या राजदरबारासारखा झाला होता. त्यांच्या जवळ कारकून, शिपाई, प्यादे वगैरे सर्व सरंजाम होता. त्यांची कोठी व मुतपाकखाना फार प्रचंड असे. गरीब गुरीबांस अन्नदान देण्याचा त्यांचा एकसारखा सपाटा असे. त्याचप्रमाणें छत्रपतीपासून तों दीन याचकापर्यंत, राव असो वा रंक असो, त्याचा यथायोग्य सत्कार करण्यांत ते सदैव तत्पर असत. शाहु महाराज व त्यांच्या राण्या हजारों लोकांच्या लव्याजम्यानिशीं धावडशीस

---

१ शाहु महाराज स्वामींच्या मठांत हजारों माणसांसह जेवण्यास जात असत असेबद्दल कागदपत्रांचा आधार आहे. स्वामींस व त्यांच्या कारकुनास, छत्रपतींची स्वारी अमक्या वेळीं येईल तेव्हां "खाशाखेरीज हजार माणसांचे रसोईचें सामान तयार करणें" ह्मणून आलेल्या अस्सल चिठ्ठ्या सांपडल्या आहेत.

जात असत व स्वामींचा प्रसाद भक्षण करून स्वतःस पुनीत मानीत असत. स्वामींच्या कोठीचे २०० बैल कोंकणांत जाऊन तिकडून सामान आणीत असत. त्यांना सर्व राज्यांत जकात माफ असे. अशीं माफीचीं दस्तकें पुष्कळ सांपडलीं आहेत. निरनिराळ्या वस्तूंचा संग्रह करण्याच्या कामीं स्वामी फारच दक्ष असत. केशर, कृष्णागर, चंदन व अष्टगंध वगैरे परिमल द्रव्यें त्यांच्या पूजेस नेहमीं लागत. त्यांचा संग्रह त्यांच्याजवळ अतिशय असे. त्याचप्रमाणें हेमगर्भ, नारायणतेल वगैरे मात्रा व इतर औषधें ह्यांचाही स्वामींजवळ संचय असे. उत्तम मध ते घागरीच्या घागरी जमवून लोकांस वांटीत असत. तसेंच भरजरी शालजोड्या, बादली मंदिल, चांदणी दुपेटे, अष्टगोली शेले, उंची ताफते, व तलम मखमली इत्यादि परोपरीचीं उंची वस्त्रें त्यांच्या संग्रहास विपुल असत. तीं भेटीच्या समयीं ते सरदार लोकांस अर्पण करीत असत. ह्या सर्व जिनसा स्वामी आपल्या भक्तवृंदांकडून जमवीत असत. व तत्प्रीत्यर्थ केव्हां केव्हां ते रुष्टही होत असत. १०३ वा १/४८

स्वामी दररोज समाधि घेत नसत. प्रतिवर्षी श्रावण शुद्ध प्रतिपदेस ते कृष्णातीरीं समाधि घेत असत, व एक महिना एकांतस्थानीं राहून भाद्रपद शुद्ध चतुर्थीस समाधि विसर्जन करून बाहेर येत. तेव्हां त्यांचा सत्कार करण्यास शाहु महाराज व त्यांचे सरदार जात असत. ह्या वेळीं धावडशी येथें मंगलोत्सव होत असे. तत्प्रीत्यर्थ छत्रपतींकडून हत्ती, घोडे, निशाणें, भालदार, चोपदार, नगारे, वाजंत्री, वगैरे सर्व सरंजाम जात असे. नंतर मोठ्या समारंभेंकरून यतिमहाराजांस पालखींत घालून धावडशीस आणीत असत. तेथें मग हरिकीर्तन, अन्नसंतर्पण, वगैरें होत असे. छत्रपतीकडून व पेशव्यांकडून गणेशचतुर्थीस बहुमूल्य वस्त्रें व गुरुदक्षिणा निराळी येत असे. स्वामींच्या ह्या प्रतिवार्षिक महोत्सवास प्रचंड जनसमुदाय जमत असे. ह्यावरून स्वामींचा हा समाधिविसर्जनसमारंभ महाराष्ट्रांत संघशक्तीचें बीजारोपण करण्यास कसा कारणीभूत झाला ह्याची कल्पना करितां येईल. स्वामींच्या ह्या अलौकिक कृतीमुळें त्यांचा कीर्तिमहिमा सर्वत्र पसरून ते सर्वांचा दर्शनहेतु होऊन राहिले. त्यामुळें, कवि मोरोपंतांनीं ह्मटल्याप्रमाणें

**मोठे मोठेहि मठद्वारांतुनि भेटि घेति पायांची ॥**

असा प्रकार धावडशीस नित्यशः दृष्टीस पडत असे. तात्पर्य, स्वामींच्या कार-

कीर्दींत **धा**वडशी येथें नेहमीं राजदरबारासारखा थाट चालत असून, तेथें 'नित्य श्री नित्य मंगलम्' ह्या म्हणीची सार्थकता दृष्टीस पडत असे.

## स्वामींची भिक्षा.

स्वामी प्रत्येकास श्रीचा वरप्रसाद देऊन व त्याचें कल्याण करून त्याजकडून देवाची भिक्षा घेत असत. स्वामींच्या आशीर्वचनांचा प्रभाव कांहीं लोकोत्तर असल्यामुळें लोकांस तीं भद्रकर वाटून, ते मोठ्या भक्तिभावानें तीं प्राप्त करून घेत असत; व स्वामींच्या इच्छेप्रमाणें त्यांच्या देवस्थानास द्रव्य देत असत. स्वामींच्या आशीर्वादाचा लाभ घेतला नाहीं असा एकही **म**राठा सरदार सांपडणें कठीण आहे. किंबहुना, त्यांच्या आशीर्वादानें सर्व **म**हाराष्ट्रमंडळ व्यापिलें होतें असें ह्मटलें असतां अतिशयोक्ति होणार नाहीं. स्वामींच्या भिक्षेचा उल्लेख सर्व सरदारांच्या पत्रांत कमजास्त प्रमाणानें सांपडतो. तथापि कांहीं प्रमुख सरदारांकडे त्यांचीं वर्षासनें ठरलीं होतीं. त्यांची एक यादी सांपडली आहे. ती येणेंप्रमाणें:—

### श्रीभार्गवराम.

यादी वर्षासनें श्रीस्वामी संस्थान **धा**वडसी. श्रीस्वामींचे कारकीर्दींत पावत आले:—

६१०० श्रीमंत कै० **ना**ना यांणीं करार करून दिले.
१००० राजश्री **म**हादाजी **अं**बाजी तीन वर्षांनीं सहस्र रुपये द्यावे.
३००० महाराज **छ**त्रपतींकडील वर्षासन.
५००० रा० **हो**ळकर तीन सालांनीं.
१२०० रा० **जा**धव तीन सालांनीं.
१५०० रा० **फ**त्तेसिंग **भों**सले.
५००० रा० **शिं**दे तीन सालां.
५००० रा० **प**वार तीन सालां.
१००० **आ**नंदराव वकील ( सुमंत ) तिसालां.
१००० **ना**रबा शेणवी ( मंत्री ) ,,
५०० **रा**णोजी **डु**बल. ,,
५०० **र**त्नाकरपंत. ,,

ह्यावरून स्वामींची भिक्षा फक्त छत्रपति, पेशवे व कांहीं मराठे सरदार ह्यांची मिळून प्रतिवर्षी १५८३२ रुपये ठरींव होती. ह्याशिवाय जे समयीं खासा स्वारी भिक्षेस जाई, त्या वेळीं ज्यास जें अनुकूल पडे तें तो देत असे. वर्षासनाचीं करारपत्रें पेशव्यांवांचून कोणाचींच नाहींत. पेशव्यांचें करारपत्र बाळाजी बाजीरावांनीं मात्र दिलेलें आहे. (लेखांक १५६ पहा). स्वामींवर सर्वांची भक्ति असल्यामुळें त्यांस कधीं कोणी विन्मुख दवडीत नसत. स्वामींनीं ह्या द्रव्याचा विनियोग देवालयें, विहिरी, तलाव वगैरे बांधण्यांत, गरिबांना अन्नदान देण्यांत, आणि छत्रपति, पेशवे व इतर मराठे सरदार ह्यांना अडचणीच्या प्रसंगीं कर्ज देण्यांत केला. ह्यापैकीं कर्जाचा पैसा सव्याज वसूल होत असे. व कित्येक वेळां बुडतही असे. स्वामींनीं आपल्या कारकीर्दीत लाखो रुपये खर्च केले व देवालयें वगैरे बांधिलीं, तरी त्यांच्या निधनसमयीं त्यांच्या जवळ १६०६३७॥~। रुपये शिलक होती. ह्यापैकीं ऐन शिलक ५७१०८॥=। रुपये व बाकी निसबतवार लोकांकडे कर्जाऊ १०३५२९८≶ इतके रुपये होती. ह्या वरून 'भिक्षापति तो लक्षापति' ही ह्मण स्वामींस यथार्थ लागू पडते असें कोण ह्मणणार नाहीं?

## स्वामींचीं सार्वजनिक कामें.

स्वामींनीं भिक्षाद्रव्य गोळा करून लोकोपयोगार्थ अनेक देवालयें, तलाव, विहिरी वगैरे बांधिल्या. त्यांपैकीं मुख्य मुख्य कामांची यादी सांपडली आहे. ती येणेंप्रमाणें:—

| | |
|---|---|
| १००००० श्री परशुराम वास्तव्य पेढें | ३०००० तलाव धावडशी |
| २२१००० धावडशी येथील कामें | ३०००० तलाव गणेशखिंड नजीक पाल |
| २००००० मुख्य समाधि | ४०००० तलाव इंदापूर |
| ५००० वाघजाईचें देवालय | १०००० तलाव नातेंपुतें |
| ५००० मारुतीचें देवालय | ५०००० श्री रामेश्वर कृष्णातीर नजीक मरढें देवालय |
| १०००० वाड्याचा कोट | |
| ५०० श्री जनीचें देवालय | १००५०० श्री भुलेश्वर नजीक माळशिरस |

| | |
|---|---|
| ५०० **ग**णपतीचें देवालय | १००००० **म**हादेवाचें देवालय जीर्णोद्धार |
| ५०० श्री **ए**कवीर | |
| ५०० श्री **का**ळकाई | ५०० समाधीची जागा |
| २२१०० | १००५०० |

| | |
|---|---|
| १००००० श्री **मे**रुलिंग नजीक **धा**वडशी डोंगरावर देवालय, कोट व तलाव | २०००० **ग**णपतीचें देवालय **रा**जुरी |
| | ७०००० विहिरी मौजे **मा**ळशिरस |
| १००००० तलाव **त्रि**पुरी | ८००० बारव **पां**वस |
| ४७००० **पु**ण्याचे वाटेस | ७००० बारव **कु**रकुंभ |
| ४५००० **खां**बटकीचा घाट | ४००० विहीर **ये**वत |
| ३२००० विहीर **अं**धारवाडी | १०००० देवालय मौजे **गो**ठणें ता० **रा**जापूर |
| ४७००० | |

ह्या सर्व इमारतींच्या खर्चाची संख्या ८८४५०० रुपये आहे. ह्याशिवाय आणखी ४३००० रुपयांचीं जागोजाग विहिरींचीं लहान लहान कामें केलेलीं आहेत. ज्या कामांचे हिशोब सांपडले आहेत त्यांचा खर्च ९२७५०० रुपये इतका आहे. ह्या शिवाय स्वामींनीं आणखी सार्वजनिक उपयोगाचीं कामें बहुत केलीं आहेत. ह्या सर्व कामांत स्वामींची परोपकारबुद्धि व सत्कारणीं व्यय दिसून येतो. गांवोगांव विहिरी व तलाव बांधून लोकांना जलदान द्यावयाचें पुण्य-कृत्य स्वामींनीं समाधि घेईपर्यंत एकसारखें चालविलें होतें. लोकांच्या जाण्यायेण्यास अडचण पडूं नये म्हणून नद्यांस पूल व डोंगरांतून घांट बांधण्याचें कामही स्वामींनीं करण्याचें योजिलें होतें. लेखांक २१६ व २६३ ह्या पत्रां-वरून **नी**रा नदीवर लोकांच्या सोयीसाठीं पूल बांधण्याकरितां स्वामींनीं **वि**रुबाई व **प्र**तिनिधि ह्यांचे मार्फत **शा**हु महाराजांकडे खटपट चालविल्याचें दिसतें. परंतु तो बेत सिद्धीस गेला नाहीं. प्रवासीजनांच्या सुखाकरितां डोंगराचे घांट बांधून उत्तम रस्ते तयार करण्याचाही स्वामींचा यत्न होता. **पु**ण्याच्या रस्त्यावर **खां**बटकीचा घांट स्वामींनीं बांधवून काढला. त्याचप्रमाणें इतर ठिकाणचेही घांट बांधवून काढण्याकडे त्यांचें लक्ष असल्याचें दिसून येतें. **सं**भाजी **शिं**दे ह्यास लिहिलेल्या एका पत्रांत **आं**बोला घांटांतील **गा**ढव खडक दुरुस्त करण्या-बद्दल स्वामींची आज्ञा दृष्टीस पडते. हें पत्र येणेंप्रमाणें:—

"श्रीमत् परमहंस स्वामी यांहीं सहस्रायु चिरंजीव भक्तराज संभाजी शिंदे नामजाद किल्ले रसाळगड यांसी आज्ञा केली ऐसीजेः-तुह्मीं तानाजी संकपाळ याजबरोबर पत्र पाठविलें तें पावोन संतोष जाहला. वाघांबर आणखी यत्न करून पाठविलें ह्मणून लिहिलें, तें प्रविष्ट जाहलें. सतरा नखें आहेत. तीन नखें नाहींत. याजउपरी यत्न होईल तर बच्चा वाघ डाहाणा याचें वाघांबर आणखी मिळेल तर उत्तम आहे. अंतोजीनें मेहनती केली, तरी हल्लीं डाहाणा पटाईत ह्याचा यत्न जाला तरी घेऊन त्यास पाठविणें. मेहनत श्री सार्थक करील. केवळ माणूस जाया होऊन वाघांबर आणावें ऐसें नाहीं. वाघांबर माणूस जाया न होतां अनायासें हातास आलें तर पाठविलें पाहिजे. विशेष काय लिहिणें. मध पाठविला तो पावला. सुसीचा तागा पाठविलेप्रमाणें पावला. बहुत शहाणपणें धंदा करीत असिलें पाहिजे. विशेष लिहिणें तरी आपण सुज्ञ आहेत. आंबोला घांटांत गाढव खडकाजवळ बैल पडतात. त्यास तेथें दोघे पाथरवट व चार माणसें पाठवून मार्ग नीट करणें. त्यांचा महिना होईल तो सांगोन पाठविणें. आह्मी देऊं. गई न करणें. तुह्मांस प्रसाद गोडांब्या पाठविल्या आहेत. घेतल्या पाहिजेत. हे आज्ञा."

स्वामींचें सार्वजनिक कामावर पोटच्या लेंकराप्रमाणें प्रेम होतें असा त्यांचा एका पत्रांत उल्लेख सांपडतो. तें पत्र येणेंप्रमाणें:—

"श्रीमत् परमहंस स्वामी यांहीं:—

सहस्रायु चिरंजीव रघुजी घाटगे हवालदार व सेखोजी नलवडे सरनोबत व सबनीस किल्ले संतोषगड यांसी आज्ञा केली ऐसी जेः—कोणास पोटचीं लेंकरें असतात. आमचीं लेंकरें हे कारखाने. तुमचे देवानें मोठेंसें वाईट केलें!! कारखाना तेथें आहे. त्याचा हरएक बाबें सांभाळ करीत जाणें. विहिरीपासील ओढा किल्ल्याचे लोक व गांवचे लोक देऊन खणोन टाकवणें. बहुत काय लिहिणें हे आज्ञा."

ह्या सर्व गोष्टींवरून स्वामींचें अंतःकरण किती लोकहिततत्पर होतें ह्याचा बरोबर अंदाज करितां येतो; व त्यांची परोपकृति पाहून मन थक्क होऊन जातें.

## स्वामींची समदृष्टि व सर्वांभूतीं प्रेम.

स्वामींच्या उपलब्ध झालेल्या पत्रव्यवहारावरून त्यांची सर्व जातींच्या व सर्व धर्मांच्या लोकांविषयीं समदृष्टि व प्रेमबुद्धि असल्याचें दिसून येतें. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र अशा प्रकारचा भेदभाव त्यांच्या वर्तनांत केव्हांही दिसत नाहीं. जातिभेद किंवा वर्णभेद यांसारखे क्षुद्रविचार एकीकडे ठेवून सर्वराष्ट्राचें एकीकरण व समुन्नति करण्याकडे स्वामींचें सर्व धोरण दिसतें. त्यांच्या सर्व पत्रांचें लक्षपूर्वक मनन केलें तर त्यांत कोठेंही तिळमात्र देखील भेदभाव आढळत नाहीं. **बा**जीरावाविषयीं जें प्रेम तेंच प्रेम **म**ल्हारराव **हो**ळकराविषयींही दृष्टीस पडतें. त्यांत पात्रापात्र व योग्यायोग्य हा विचार होता; परंतु जातिभेदाचा किंवा धर्मभेदाचा त्यास गंधही नव्हता. **हिं**दुधर्माचें संरक्षण व स्वराज्याचा विस्तार हें स्वामींचें ब्रीद असल्यामुळें त्या कार्यांत जे आड येत त्यांचा प्रतिकार करणें राजकीयदृष्टीनें त्यांस अवश्यक होतें. तेव्हां त्याबद्दल त्यांनीं जे यत्न केले त्यांचा विचार आलाहिदा आहे. परंतु जे **हिं**दुधर्मास त्रास देत नसत, त्यांच्याविषयीं स्वामींच्या ठिकाणीं प्रेमभाव वसत असे. खुद्द स्वामींजवळ **सु**लतानभाई नांवाचा **मु**सलमान नौकर असे. त्याजवर त्यांचा जीव कीं प्राण असे. **जं**जिऱ्याचे **ह**बशी **सि**द्दी **या**कूदखान हे स्वामींचे एकनिष्ठ भक्त होते. त्यांनीं स्वामींच्या देवस्थानास दोन इनाम गांवें दिलीं होतीं, हें मागें सांगितलेंच आहे. खुद्द स्वामींचें कोणत्याही व्यक्तीशीं खाजगी वैर नसे. एवढेंच नव्हे पण प्रत्यक्ष शत्रूशीं देखील त्यांचा स्नेहभाव असे. **सि**द्दी **सा**त, **सि**द्दी **सं**बूल वगैरे **ह**बशी लोक हिंदुधर्माचे कट्टे शत्रू, पण त्यांचा व स्वामींचा पत्रव्यवहार चालत होता. स्वामी घांटावर आल्यानंतर **ह**बशी लोकांनीं त्यांना आपल्या राज्यांत श्री **प**रशुराम येथें नेण्याबद्दल पुष्कळ खटपट केल्याचें दिसून येतें. (लेखांक २४०।४१।४२।४३ पहा). अर्थात् **हिं**दुधर्माचा द्वेष करणाऱ्या **ह**बशी लोकांनीं देखील स्वामीविषयीं पूज्यबुद्धि व भक्तिभाव दाखवावा, हें स्वामींच्या योग्यतेचें लक्षण समजलें पाहिजे व त्याबद्दल **ह**बशांचेंही अभिनंदन केलें पाहिजे. स्वामींचा व **ह**बशांचा राजकीय बाबतींत कितीही बेबनाव झाला, तरी त्यांच्यामध्यें घरोब्याचा पत्रव्यवहार व प्रेमाच्या नजरा अखेरपर्यंत चालत असत. स्वामी इ० स० १७२८ मध्यें **धा**वडशीस आले, तथापि ते इ० स० १७३२

पर्यंत कोंकणांत श्रीस्थळीं समाधीस जात असत. व पुढेंही दोन तीन वेळां तिकडे गेले होते. त्या वेळीं हबशांच्या व त्यांच्या भेटी झाल्याचे व परस्परांस नजरनजराणे पाठविण्याचे उल्लेख दृष्टीस पडतात. राजकारणानिमित्त मराठ्यांचे व हबशांचे इतके विग्रह झाले, तथापि त्या घराण्याचा व स्वामींचा स्नेहसंबंध कधींही तुटला नाहीं. जंजिरेकर हबशी ह्यांनीं स्वामींस इ० स० १७४३ सालीं पेढें व आंबडस वगैरे गांवच्या पुनः सनदा करून दिल्या आहेत. त्यांतही स्वामींच्या स्नेहाचा उल्लेख आहे. ह्यावरून मुसलमान लोकांची हिंदु साधूच्या ठायीं पूर्वीं कशी भक्ति असे हें चांगलें दिसून येतें, व स्वामींच्या ठिकाणीं खरें साधुत्व असल्याची साक्ष पटते. राजकीय दृष्टीचे सर्व विकल्प व सर्व विकृति एकीकडे ठेवून, सर्वत्र प्रेम बाळगण्यास व समत्व ठेवण्यास मन किती सुसंस्कृत व किती प्रगल्भ असलें पाहिजे ह्याची कल्पना वाचकांनीं करावी हें

---

१ हबशांनीं छ साबान हिजरी सन ११५६ ह्मणजे ता० १२ सप्टेंबर इ० स० १७४३ रोजीं स्वामींस दिलेल्या दोन सनदा धावडशीदप्तरांत सांपडल्या आहेत. त्यांपैकीं एक पेढें व दुसरी आंबडस ह्या गांवांबद्दल आहे. दोहींचा मजकूर एकच आहे. ह्याकरितां त्यांतील एक येथें सादर करितों:—

(फारसी शिक्का.)

“देशाधिकारी वर्तमान भावी व देशमुख व देशपांडे व जमेदार व रयान तर्फ चिपळून मामले आमदाबाद सुभे आमाल बंदर मयमुन मुस्ताफाबाद ऊर्फ दाभोळ सरकार तळ कोंकण आदिलखानी मीनमजाफ सुभे दारुलजफर बिजापूर तालुके किल्ले महरुसे जंजिरे दंडाराजपुरी यांणीं समजावें. सुरुसन आर्बा आर्बैन मया व आलफ. पूर्वीं इकडे हरिभक्तिपरायण ब्रह्मेंद्र गोसावी संस्थान परशराम यांस मौजे पेढें तर्फ मजकूर हा गांव पेशजी वालिजामी खानवालाषान बेहष्त मकान साहेब यांणीं इनाम देऊन चालवीत होते. अलीकडे दुतर्फा अंमलाचे गर्गशामुळें भोगवटा राहिला होता. परंतु हलीं मनास आणितां गोसावी मशारनिल्हे हे पूर्वींपासून या घराण्याचें कल्याण चिंतून अति स्नेह चालवीत आहेत, आणि पुढेंही हीच इच्छा ठेवून निरंतर दौलत रहावी असा आशीर्वाद देत आहेत, याकरितां नवस सिद्धीस न्यावा ह्मणोन मौजे मजकूर मशारनिल्हेस पूर्वींप्रमाणें हलीं इनाम बक्षीस करून दिल्हा असे. इ०”

बरें. ह्यावरून राष्ट्रोद्धार करण्याकरितां अवतीर्ण झालेल्या पुरुषांच्या ठिकाणीं जातिभेदादि क्षुद्र विचारांचा गंधही नसून, तेथें शुद्ध प्रेमभाव व सर्वांविषयीं पूर्ण सहानुभूति कशी बाणलेली असते हें शिकण्यासारखें आहे.

## स्त्रियांचा राजकारणांत प्रवेश.

स्वामींच्या चरित्रांत अत्यंत महत्वाची गोष्ट ही निर्देशनास येते कीं, **शा**हु महाराजांच्या राण्या **स**खवारबाई, **स**गुणाबाई आणि **वि**रूबाई[1] ह्यांचा व इतर प्रमुख **म**राठे सरदारांच्या स्त्रियांचा राजकारणांत चांगला प्रवेश होता. सर्व **म**हाराष्ट्र सरदारांच्या स्त्रियांशीं स्वामींचा पत्रव्यवहार चालत असे व त्यांचें त्यांचें चांगलें दळणवळण असे. ह्या स्त्रिया फार चतुर व राजकारणी असत. त्यांच्या मार्फत स्वामी आपलीं सर्व इच्छित कार्ये करून घेत असत. **आं**ग्र्याच्या स्त्रिया **म**थुराबाई व **लिं**बाई, **हो**ळकराची पत्नी **गौ**तमाबाई, **दा**भाड्याची **उ**मा-बाई, **पे**शव्यांची **रा**धाबाई, ह्यांचीं पत्रें उपलब्ध झालीं आहेत. तेव्हां त्याबद्दल अधिक विस्तृत माहिती देण्याची अवश्यकता नाहीं. परंतु **रा**जसबाई **निं**बा-ळकर हिचें एक पत्र उपलब्ध झालें आहे. तें येथें सादर करितों.

"तीर्थरूप महाराज राजश्री **प**रमहंसबावा वडिलांचे सेवेसीः—

बालकें सौ० **रा**जसबाई चरणावर मस्तक ठेवून साष्टांग दंडवत विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लेखन आज्ञा केली पाहिजे. विशेष तुह्मीं पत्र पाठविलें तें पावलें. लिहिलें वर्तमान विदित जाहालें. '**सं**कार'[2] नाम याचा मजकूर लिहिला. सविस्तर अवगत जाहला. त्याचें पारिपत्य स्वामी वेगळें

---

१ विरूबाईचें छत्रपतींच्या दरबारांत चांगलेंच वर्चस्व होतें हें तत्कालीन पुराव्यानें सिद्ध होतें. इंग्रज लोकांनीं शाहूची मर्जी प्रसन्न करण्याकरितां तिला नजरनजराणे पाठविले होते. क्याप्टन गॉर्डन ह्मणून जो त्यांचा वकील छत्रपतींस भेटण्याकरितां गेला होता त्यानें तिचें दर्शन घेण्याचाही यत्न केला होता. परंतु तो सफल झाला नाहीं. त्यानें त्याबद्दल पुढील उल्लेख केला आहेः—

"As we could not see Virubâi, a woman of consequence, we sent her letters and present. She gave a civil profession in return."

२ 'स' ह्या अक्षरानें प्रारंभ होणारें कोणाचें तरी सांकेतिक नांव आहे.

कांहीं होत नाहीं. बाणगंगेच्या पुलाचा मजकूर लिहिला, तर स्वामी समर्थ आहेत. जैसें कळेल तैसें फलटणीं उदकाची समृद्धि होय ऐसें केलें पाहिजे. येविसीं पूर्वीं एक दोन वेळां स्वामींस पत्र लिहिलेंच होतें. तर आतांही विनंतिपत्र सूचनेसाठीं लिहिलें असे. बहुत काय लिहिणें? कृपा निरंतर असों दिली पाहिजे हे विनंति."

ह्या एका पत्रावरून स्वामींचा व महाराष्ट्रस्त्रियांचा संबंध कोणत्या सत्कारणाप्रीत्यर्थ होता हें चांगलें व्यक्त होतें. ह्या सर्व स्त्रिया स्वामींस राजकारणाच्या गोष्टी कळवीत असत; युद्धवार्ता निवेदन करीत असत; आपल्या मुलाबाळांस ह्यांचा आशीर्वाद घेत असत; आणि त्यांच्या कृपाप्रसादानें आपणांस कृतकृत्य मानीत असत. हा सर्व इतिहास फार मौजेचा आहे. त्या योगानें महाराष्ट्रस्त्रियांची योग्यता व बहुगुणसंपन्नता अधिक प्रदर्शित होऊन, स्वराष्ट्राच्या अभ्युदयास त्यांची उत्कृष्ट मदत झाल्याचें दिसून येणार आहे.

## इंग्रजांचा व स्वामींचा स्नेहभाव.

इंग्रजांविषयीं ब्रह्मेंद्रस्वामींचें फार चांगलें मत असून त्यांच्याशीं त्यांचा स्नेहभाव होता असें दिसतें. मराठे व हबशी ह्यांची लढाई चालली असतांना इंग्रजांचा व आपला स्नेह आहे असें सांगून, ते त्यांच्या भेटीकरितां मुंबईस जाण्यासही तयार झाले होते, असें लेखांक ९ ह्यावरून उघड होतें. इंग्रजांचा व स्वामींचा प्रत्यक्ष पत्रव्यवहार अद्यापि उपलब्ध झाला नाहीं; तथापि इंग्रजांच्या व पेशव्यांच्या राज्यकारस्थानांचीं पत्रें स्वामींकडे येत असावींत व सर्व गोष्टी त्यांच्या अनुमतानें होत असाव्यात असा तर्क करण्यास आधार सांपडतो. मुंबईचे गव्हरनर जॉन हॉर्न ह्यांनीं बाजीरावांस लिहिलेलें इ० स० १७३५ सालचें एक पत्र स्वामींच्या कागदपत्रांत सांपडलें आहे. तें येणेंप्रमाणें:—

"आजम बाजीराऊ पंडित प्रधान दाम महब्बतहू:—

रफअत व अवालिपन्हा शोकत व हशमत्‌दस्तगाह ऐंतजाद दोस्तान् अजदिल् एखलास जॉन हॉर्न गोवर्नदोर जनरल वालाजाः बरतानिया (ब्रिटानिया) पातशाही इंग्रेजान साहेबी थोर अखतियार हशमतपन्हा दस्तगाह आन-

राबल कोंपनी फोर्त **बम्बई** वाके **हेंदुस्थान** या **पार्सीया आरबस्तान** या बअमल मैं जंजीरे **मुंबै**· सलाम सलामत अंजयाम आंमी येथील खैरियत जाणून मोहिबीं आपली खैरआफियत हमेशा मरकुम फरमाऊन शादमानी हांसिल केली पाहिजे· दिगर, मोहिबांकडील किताबती ३ तीन नेकसात येऊन पोंचल्या· मोहिबांची खुष खबरी रुएदाद आयां होऊन बहूतसी खुषी हांसिल जाली· मौजे **अलिबागे**हून कूच करून मजलदरमजल घांटावर गेले· व आजम कपितान **इंच-बर्ड** व इज्जत आसार **कृष्णाजी राम** यांचे मूंजबानीवर होवे ह्मणून· तर मशा-रनिल्हे येऊन बिलफल मूंजबानी आयां केलें· त्याजवरून इजहार झालें व मोहिबांच्या फत्तेनसरतीच्या कित्येक खबरा कलमीं केल्या· त्या माळूम होऊन खुषवक्त झालों· व डाक्तर **सांडी** यांस रवाना करणें ह्मणून कलमीं केलें· ऐशियास बरसात काल असे; आणि बंदर मजकुरीं अजारी बहूत· याकरितां मशारनिलेस यावयास माफगत होत नसे· व ईजानेबास मालुम होऊन आलें कीं मशारनिले **कृष्णाजी राम** यांस मोहिबीं येथें ठेवलें· सबब कीं, ईजानिबाचे कर्तव्याची पाळत करून घ्यावी ह्मणून· हाल्लीं शारनिलेस मोहिबांचे नजीक पाठवून दिला असे· अम्मा यावरून तर्फैनची दोस्ती तमाम झाली असें नसे· सबब कीं ईजानीब हरयेक मोहिबांची प्यार खिदमत चाहत असत· ज्यादा काय लिहिणें? र॥ छ २३ मोहोरम हे किताबती· ता॥ जून सन १७३५ इंग्रजी· हे किताबती·"

ह्या पत्रावरून **पेशव्यांचे** व **इंग्रजांचे** पत्रव्यवहार व त्यांचीं राजकारणें स्वामींस अवगत होतीं हें सिद्ध होतें· **शाहु** महाराजांच्या राजदरबारांत स्वामींचें वर्चस्व होतें, ही गोष्ट **इंग्रजांसही** माहीत असावी असें वाटतें· ह्या वेळीं **इंग्रज** लोक केवळ व्यापारी ह्या नात्यानें **हिंदुस्थानांत** वास करीत असल्यामुळें त्यांच्या विषयीं **शाहु** महाराजांस किंवा **ब्रह्मेंद्रस्वामींस** प्रतिकूल मत बाळगण्याचें कांहीं कारण नव्हतें· मि० **अंडरसन** ह्यांनीं "पश्चिमप्रांतांतील पहिल्या लढाया व

---

१ मि० अंडरसन ह्यांचें मूळ वाक्य येणेंप्रमाणें आहे:—

"The Raja, Peishwa, principal Chiefs, and especially the Yogees, whose advice was then highly esteemed, coincided in

तह" ह्या आपल्या लेखामध्यें असें लिहिलें आहे कीं "**शा**हु महाराज, **पे**शवे व इतर प्रमुख **म**राठे सरदार हे व ज्यांच्या सल्लामसलतीची **म**राठे दरबारांत अत्यंत चहा होती असे **योगी** लोक, ह्या सर्वांच्या मतें, **इं**ग्रज लोक हे स्वराज्याचे हितचिंतक असून, त्यांना सन्मान देणें अत्यंत अवश्यक आहे असें होतें." क्याप्टन **गा**र्डन नांवाचा **इं**ग्रजांचा एक वकील इ० स० १७३९ च्या जून महिन्यांत **शा**हु महाराजांच्या भेटीस आला होता. त्यानें महाराजांचा दरबारांतील रागरंग व अंतस्थ प्रकार ह्या सर्वांचें सूक्ष्म दृष्टीनें निरीक्षण करून **मुं**बईच्या गव्हरनरास सर्व वृत्त निवेदन केलें आहे. त्यांत **शा**हु महाराजांचे **इं**ग्रजाविषयीं स्नेहभावदर्शक उद्गार व्यक्त केले आहेत. त्यांतील सारांश, "**इं**ग्रज लोक हे सालस आणि निरुपद्रवी असून त्यांना व्यापारवृद्धीची इच्छा आहे. त्यांनीं आपल्या धर्माच्या आचरणामध्यें एकास देखील पीडा दिलेली नाहीं. तेव्हां त्यांच्याशीं स्नेहसंबंध ठेवल्यानें नवीन जिंकलेल्या मुलुखाची भरभराटच होईल." असा आहे. अर्थात् अशा लोकांविषयीं **म**हाराष्ट्रधर्माचें व राज्याचें अभीष्ट चिंतणार राजमान्य योगी **ब्र**ह्मेंद्रस्वामी हे स्नेहभाव बाळगतील ह्यांत नवल नाहीं. स्वामींच्या व **इं**ग्रजांच्या स्नेहसंबंधाचें चांगलें आविष्करण होण्यास आणखी कांहीं अस्सल कागदपत्र सांपडले पाहिजेत, ह्मणजे फार बहार होईल.

---

the opinion that the English were a blessing to the country, and ought to be respected."

ह्यांत योगी हा शब्द अनेकवचनी योजिला आहे. परंतु स्वामींसारखे योगी किती आहेत ह्याची कल्पना त्या वेळच्या इंग्रज लोकांस असण्याचा संभव नसल्यामुळें तसें त्यांनीं लिहिलें असावें. परंतु ज्यांच्या शब्दास सर्व लोक मान देत असत असे योगी ह्मणजे ब्रह्मेंद्रस्वामी हेच होत, असें सर्व मराठी कागदपत्रांवरून सिद्ध होतें.

१ "On the 27th the Raja............ observed by saying we were a good and peaceable people, desirous of commerce, molested none in the exercise of their religions, and that preserving our friendship would highly contribute to the prosperity of their late conquest."

—*Gordons' letter, English Embassy to the Marâttâs.*

## स्वामींचे अद्भुत चमत्कार.

महाराष्ट्रांतील सर्व साधुसंतांसंबंधानें कांहींना कांहींतरी लोकोत्तर व अमानुष शक्तीच्या चमत्कारिक कथा प्रसिद्ध आहेत. त्याप्रमाणें ब्रह्मेंद्रस्वामी संबंधानेंही दोन तीन गोष्टी कागदपत्रांच्या पुराव्यांत सांपडल्या आहेत. त्या पुढें लिहिल्याप्रमाणें:—

१ स्वामी केळीच्या पानावर बसून समुद्राची खाडी तरून जात असत. ही गोष्ट स्वामींच्या बखरींत दिलेली असून प्रस्तुत ग्रंथाच्या पहिल्या भागांतही तिचा उल्लेख आलेला आहे.

२ पेशव्यांच्या राज्यांत पाऊस पडला नाहीं तर स्वामी अनुष्ठान करून पाऊस पाडीत असत. ह्याबद्दलचे दोन उल्लेख दृष्टीस पडतात. लेखांक ४५ ह्या चिमाजी आपांच्या पत्रांत "या प्रांतीं यंदा पर्जन्य आजि पावेतों पडला नाहीं. प्रजा बहुत श्रमी झाली. हें वर्तमान ती० रा० राऊ यांणीं स्वामींस निवेदन केलें. त्यावरून स्वामी कृपावंत होऊन, प्रस्तुत श्री जेजुरी येथील तळ्यावर येऊन, दोन पायली सराटे आसनास घालून, अनुष्ठानास बसलेत आहां. जेव्हां पर्जन्य पडेल तेव्हां गोमूत्र घेईन असा निश्चय केला आहे इ० इ०" उल्लेख आहे. व लेखांक १८१ ह्या पिलाजी जाधवरावाच्या पत्रांत "गतवर्षीं भुलोबांजवळ पाउसाकरितां बैसलों. देवानें पाऊस दिल्हा. तरी स्वामींच्या चित्तांत पाऊस पडावा असें आलें, तेव्हां श्री भुलोबांसही संकट पडलें. ते गोष्टीचें अपूर्व नाहीं." असा उल्लेख आहे. ही गोष्ट इ० स० १७३८ सालची असावी.

ह्या दोन्ही गोष्टींच्या सत्यासत्यासंबंधानें चर्चा करण्याची अवश्यकता नाहीं. ह्यावरून इतकेंच सिद्ध होतें कीं, स्वामींच्या वेळचे लोक अतिशय भक्तिभोळे असत व त्यांची स्वामींवर पराकाष्ठेची निष्ठा असे. त्यामुळें त्यांना अशा अलौकिक कृति आचरून त्यांचें समाधान करणें भाग पडे.

---

१ लोकांच्या समजुती व मतें जशीं असतील त्यांस अनुसरून वागण्याचा कल पूर्वींच्या सत्पुरुषांचा असावा असें दिसतें. त्यामुळें लोकांचा भाव वाढून त्यांच्या हातून महत्कार्यें घडत असत. ह्यावरून असल्या चमत्कारांचा उगम

## स्वामींच्या देवभोळेपणाच्या गोष्टी.

स्वामींच्या पत्रव्यवहारावरून स्वामींच्या वेळच्या समाजस्थितीचा व देवभोळे-पणाच्या कल्पनांचा बराच प्रकाश पडतो. त्या वेळीं निस्सीम धर्मश्रद्धा व दृढ-तम ईश्वरावलंबन हे दोन गुण सर्वत्र वसत होते. परंतु त्यांबरोबर, भूत पिशाच वगैरे संबंधाचे सद्ध्यांप्रमाणेंच कित्येक लोकभ्रम आणि अज्ञानजन्य विचार अस्तित्वांत होते. खुद्द स्वामींचा भुताखेतावर विश्वास होता, व त्यांचीं कांहीं मतें अत्यंत देवभोळेपणाचीं होतीं, असें कांहीं गोष्टींवरून दिसून येतें. त्यांपैकीं दोनतीन मासले येथें सादर करितोंः—

**धा**वडशीकर **अं**बाजी पाटील ह्यांचें व स्वामींच्या लोकांचें वांकडें आलें. तेव्हां त्यानें स्वामींच्या वाड्यांत व कारकुनावर भुतें घातलीं. त्यामुळें कारकून लोक आजारी पडले व गुरेंढोरें मेलीं. तेव्हां स्वामींनीं **भ**गत नांवाचा एक देवऋषि आणून त्याच्याकडून भुतांचा निवाडा केला. त्यांत दोन भुतें निघालीं. त्यामुळें स्वामी वाडा सोडून मोठ्या रागानें **कृ**ष्णेच्या कांठीं जाऊन राहिले. ह्या प्रसंगीं त्यांनीं **य**माजी **शि**वदेव **मु**तालिक यांस वाड्याचा बंदोबस्त करण्याक-रितां जें पत्र लिहिलें आहे, तें उपलब्ध झालें आहे. तें येणेंप्रमाणेंः—

"चिरंजीव **य**माजीपंत अण्णा यांसी आज्ञा. **अं**बाजी पाटील मु॥ **धा**व-डशी याचे निसबत दोन भुतें वाडियांत पडोन, कारकुनांचे घरीं दुखणीं पडलीं. गुरेंढोरें मेलीं. **भ**गतानें निवडिलें. त्याचे विल्हे करून वाटेस लावावीं, ते न लावीत. याजपुढें वाडियांत नास न व्हावा ऐसा कतबा मागितला. तो न देत. याजकरितां आम्ही निघोन रागें **कृ**ष्णेवरी गेलों. मागें वाडा आहे तो जतन करावयासि दहा घोडीं पाठविणें. पाटील गांवांत घोडियांस दाणा वैरण देतील."

ह्या संबंधानें स्वामींनीं **शा**हु महाराजांपर्यंत तक्रार नेली. ( लेखांक २५४

---

लोकांच्या श्रद्धाळूपणांत होतो असें दिसतें. युरोपियन विद्वानांचेंही असेंच मत दिसतें.

"Miracle is the pet child of faith"—*Goethe.*

"It is the atmosphere of child-like credulity which pre-disposes men to require and accept these wonders and miracles as events of ordinary occurrence."—*Lecky.*

पहा ) पुढें अंबाजी पाटलानें स्वामींस ता० ६ जानेवारी इ० स० १७३९ रोजीं एक कतबा लिहून दिला. तो येणेंप्रमाणें:—

"दमदोस्ती अंबाजीपाटील मौजे धावडशी सु ॥ तिस्सा सल्लासीन मया अलफ. साहेबांचे बंदगीस लिहोन दिल्हा कतबा ऐसा जेः—धावडसीचीं भुतें दोन संभनाक भगत याणें निवडिलीं आहेत. संभनाक मागेल त्याप्रमाणें हे वारितों. याजपुढें आमचे निसबत थळचें कांहीं भूतबाधा वाडियांत झाली तरी आपण दिवाणचे गुन्हेगार असो. छ ६ सौवाल."

वरील दोन पत्रें मासल्याकरितां दिलीं आहेत. अशा प्रकारचीं आणखीही कित्येक पत्रें आहेत. ह्या सर्वांवरून भुतांविषयींचा लोकभ्रम स्वामींच्या कालांत पुष्कळ अस्तित्वांत होता असें दिसतें.

भुतासंबंधाच्या कल्पनांप्रमाणें देवास कौल लावणें, नवस करणें, वगैरे भोळ्या समजुती स्वामींच्या ठिकाणीं वसत होत्या, असेंही कांहीं पत्रांवरून दिसून येतें. बाळाजी हरि अंतुरकर नामक एका इसमास स्वामींनीं धावडशी गांवाच्या व्यवस्थेकरितां ठेविलें. परंतु पुढें त्यानें कांहीं लबाडी केल्यावरून त्यास कामावरून दूर केलें, आणि त्याचे जागीं अंताजी नारायण यास नेमिलें. तेव्हां अंतुरकरानें वांकुडपणानें त्यावर भुतें घातलीं, व त्याचा नाश करण्याचा उपाय आरंभिला. ही गोष्ट स्वामींस कळल्यावर स्वामींनीं धावडशीचे देवास कौल लाविला, व त्याचा पडताळा पाहण्याकरितां संभाजी शिंदे नामजाद किल्ले रसाळगड ह्यास तेथील देवीस कौल लावून पाहण्याबद्दल लिहून पाठविलें. त्याप्रमाणें त्यानें किल्ल्यावरील देवीस कौल लावून ता० ५ जिल्काद रोजीं स्वामींस पुढील मजकूर लिहिला आहेः—

"बाळाजी अंतुरकर याजकडील लागभाग अंताजी नारायण याजकडे पडोन त्याचा नाश होतो. ते गोष्टीचें धावडशीचे देवास खरें जाहलें आहे. परंतु तुह्मीं किल्ल्याचे देवीस विती लावून काय सांगेल तें लिहून पाठवणें. ह्मणोन आज्ञा केली. आज्ञेप्रमाणें आह्मीं देऊळास जाऊन श्रीस प्रसाद लाविला. देवीनें सांगितलें कीं, बाळाजी अंतुरकर याजकडील लागभाग अंताजी नारायण याजकडे होऊन नाश होतो. ऐसें खरें सांगितलें. विदित होय. दखलीचे

देवीस माणूस पाठविलें आहे. तेथून निवाडा होऊन येईल तेंही लिहून पाठवितों. विदित होय."

ह्याप्रमाणेंच ग्रामदेवतांच्या कृपेअवकृपेबद्दलही त्या वेळच्या लोकांचे चमत्कारिक समज होते असें दिसतें. स्वामी देशावर आल्यानंतर श्री **प**रशुराम येथील देवाच्या पादुका स्वामींनीं **र**साळगडाचे हवालदार **सं**भाजी **शिं**दे ह्यांच्या स्वाधीन केल्या होत्या. त्यांची पूजाअर्चा त्यांनीं चालविली. परंतु ती तेथील ग्रामदेवीस न अवडल्यामुळें त्या देवीनें महदरिष्टें पाठविलीं. अशाबद्दल एक मौजेचें पत्र **सं**भाजी **शिं**दे ह्यांनीं छ०९ सवाल रोजीं स्वामींस लिहिलें आहे. त्यांत "श्रीच्या पादुकांची स्वामींच्या आज्ञेप्रमाणें पूजा चालली. छपरपलंगास निराळें देवालय बांधोन तेथें सर्व साहित्य ठेविलें. पूजाअर्चा होऊन अधिष्ठान चाललें. हे गोष्ट श्री देवीचे चित्तास न ये सारखी झाली. स्वामी ह्मणतील कीं 'या मागें लिहिलें नाहीं, उणेंपुरें सव्वा वरीस जालें. आतां लिहितात'! तरी हे गोष्ट आह्मांस कांहीं ठाऊक नव्हती. पादुका छपरपलंगावरी मांडोन पूजा चालों लागली. यावरी पंधरा दिवस जाहले. तों आपले भाऊ **दि**गोरीहून भेटीस आले. सर्वांच्या भेटी झाल्या. तेच दिवशीं **ग**णोजी पाटील याचा मूल मृत्यु पावला. त्यावरी विजयादशमीस पालखी शृंगारोन, पादुका आंत घालोन, निशाणेंदेखील सीमा-उल्लंघनास नेली. व श्रीची पालखी नेली. आपटेपूजन होऊन भांडें मारलें. त्याच्या कपरा एका मुलास लागोन तेथेंच मृत्यु पावला. ते समयीं आणखी कित्येक नाश जाहला होता. तेव्हां श्रीस विती लावोन पुशिलें. तेव्हां **भा**र्गवाची पालखी काढिली याजनिमित्त ह्मणोन सांगितलें. सत्य मिथ्या न कळे. याकरितां आह्मीं गईच करीत गेलों. तो अकस्मात **रा**घोपंतावरी वीज पडिली. हें निमित्त जाहलें. देवाज्ञा जाहली. कोठीस अग्न लागला...त्याजवरी दोनचार महदारिष्टें येऊन पडलीं. किल्ल्यावरी लोकांस दुखणीं लागलीं. ऐसा कित्येक प्रकार होऊं लागला. तेव्हां सारे मिळून श्री देवीस प्रसाद लावून पुशिलें. तेव्हां सांगितलें कीं, श्री **भा**र्गवाच्या पादुका मांडोन पूजा होऊन अधिष्ठान चाललें याजनिमित्त अपकार होतात." इ० इ० मजकूर लिहिला आहे. ह्याप्रमाणें **चि**मणाजीपंत **भा**गवत ह्यांसही निराळें पत्र लिहिलें आहे. ह्याचा पुढें स्वामींनीं कसा बंदोबस्त केला हें समजत नाहीं.

स्वामींचें पत्र सापडलें तर बरीच मनोरंजक माहिती ह्यांत सामील करिता येईल.

देवास नवस करून लोकांची कार्यसिद्धि करून देण्याचा स्वामींचा क्रम प्रसिद्धच आहे. त्याबद्दलचे उल्लेख स्वामींच्या व **पे**शव्यांच्या पत्रांत अनेक आहेत. **व**सईचा नवस फेडण्याकरितां **भु**लेश्वरास पुतळ्या व रुपये पाठवून दिल्याचा उल्लेख **चि**माजी आपांच्या लेखांत ५३–५४ ह्या पत्रांत आहे. हीं सर्व पत्रें पाहिलीं ह्मणजे स्वामींची आपल्या उपास्यदेवतावर व लोकांची स्वामींवर, अत्यंत दृढ निष्ठा होती एवढें सिद्ध होतें.

वर सांगितलेलीं देवभोळेपणा अथवा लोकभ्रम ह्यांचीं उदाहरणें सर्व राष्ट्रांच्या जुन्या इतिहासांत दिसून येतात. त्याअर्थीं कोणत्याही राष्ट्राच्या असंस्कृत दशेमध्यें हे प्रकार असावयाचेच व त्याप्रमाणें ते **म**हाराष्ट्रामध्येंही होते, इतकेंच मानिलें पाहिजे.

---

# भाग ७ वा.

## स्वामींचें निर्याण व उपसंहार.

**व**सईच्या स्वारीमध्यें **चि**माजीआपा व **शिं**दे **हो**ळकरादि प्रमुख **म**राठे सरदार गुंतले असतांना, **बा**जीराव **पे**शवे हे **खा**नदेशांत असून, तिकडील राजकीय मनसबे पाहात होते. तों त्यांस, **तो**हमास्तकुलीखान ऊर्फ **ना**दिरशाहा ह्यानें **दि**ल्लीवर चाल करून तेथील बादशाही गारत केली, व तो दक्षिणेकडे येण्याच्या विचारांत आहे, अशीं बातमीपत्रें आलीं. **व**सईच्या मोहिमेंत सगळें **म**राठेसैन्य गुंतल्यामुळें व खर्चास पैसा नसल्यामुळें, "**हिं**दुलोकांस संकट थोर प्राप्त झालें," असें **बा**जीरावांस वाटलें. ह्मणून त्यांनीं आपले पूज्य गुरु व साहाय्यकर्ते श्रीमत् **ब्र**ह्मेंद्रस्वामी ह्यांस हें सर्व वृत्त निवेदन केलें; आणि ह्या महदरिष्टांतून कसें मुक्त व्हावें ह्याबद्दल त्यांचा उपदेश विचारिला. स्वामींनीं ह्या वेळीं **बा**जीरावांस कसें उत्तेजन दिलें व कोणता हितमंत्र सांगितला, हें समजण्यास मार्ग नाहीं. तथापि, **बा**जीरावांनीं ह्या प्रसंगीं आपला धीर न सोडतां, आपल्या

सद्गुरूंच्या वचनावर पूर्ण भरंवसा ठेवून, फार हिंमत धरिली; आणि आपल्या शूरपणाच्या बाण्यास साजेल असेंच वर्तन केलें. दिल्लीकडील पेशव्यांच्या वकिलांचीं पत्रें येऊन, तिकडे मोठी राज्यक्रांति झाली व भयंकर अनर्थ गुदरले, असें वृत्त कळतांच, बाजीरावांनीं ब्रह्मेंद्रस्वामींस व चिमाजीआपांस पत्रें पाठविलीं. ब्रह्मेंद्रस्वामींस लिहिलेलीं पत्रें ४१ व ४२ ह्या लेखांकांखालीं सादर केलीं आहेत. तीं अत्यंत महत्वाचीं असून बाजीरावांच्या वीर्यशालित्वाचीं व गुरुभक्तीचीं पूर्ण दर्शक आहेत. लेखांक ४२ ह्यामध्यें बाजीरावांनीं स्वामींस लिहिलें आहे कीं, तोहमास्तकुलीखान "दक्षिणप्रांतें स्वार होणार आहेत. याजउपरी त्यास आणखी कोणी गनीम आहे असें नाहीं. आह्मी त्यास व ते आह्मांस गनीम आहों." अशास "जों ते तेथून निघाले नाहींत, तों तमाम मराठ्या फौजा एक होऊन चमेली पार व्हावें, त्यास अलीकडे येऊं न द्यावें, असा विचार आहे." ह्या बाणेदार विचाराप्रमाणें बाजीराव पेशवे ह्यांनीं चिमाजीआपांस वसईची मोहिम लवकर आटोपून मदतीस येण्याबद्दल पाचारण केलें. हें पत्र येणेंप्रमाणें:—

"श्रियासह चिरंजीव राजश्री आपा यांसीः—

बाजीराव बल्लाळ आशीर्वाद उपरी येथील कुशल ता० छ० जिल्हेज जाणून आपणाकडील कुशल लिहीत जाणें. यानंतर रा० त्र्यंबकोजी राम यांची व रा० धोंडो गोविंद यांचीं पत्रें आलीं. त्यांच्या नकला काल छ० २३ रोजीं का॥ सोलनिंभोरें येथील मुकामींहून प्रातःकाळीं रवाना केल्या आहेत. पावल्या असतील. तदोत्तर काल सायंकाळ मुकाममजकुरीं, राजश्री बाबूराव मल्हार यांचीं पत्रें सवाई जयपुरचे मुकामींहून आलीं. त्यांच्या नकला करून घेऊन अस्सल पत्रें तुह्मांस अवलोक व्हावीं यास्तव पाठविलीं आहेत. यावरून सविस्तर वर्तमान कळेल. सारांश, अमिरांनीं व पातशाहांनीं नाहिंमतीनें फजिती करून घेतली. निजामउल्मुल्क याची अवस्था सर्वापेक्षां कनिष्ठ आ (हे). अतःपर दक्षिणेंत म्लेंच्छांचे नांवास तारांडी द्यावी ऐसा विचार नाहीं. तमाम अंमल बंद करून गडकोट किल्ले हस्तगत केले पाहिजेत. त्यास, कमाविसदारांस आह्मीं किल्ल्यांचा व अंमल बंद करावयाचा मजकूर लिहिला आहे. परंतु त्यांच्यानें कार्य होईल, जेव्हां तुह्मीं शाहणा मातबर माणूस, दोन चार हजार फौज,

एक दोन हजार हशम पाठवाल तेव्हां. तेव्हांच गडकोट किल्ले हस्तगत होतील; व अंमलही बंद होईल. तरी लिहिल्याप्रमाणें मातबर आणि शाहणा माणूस पाठविला पाहिजे. व फौज, हशम व कारकून व पागा पाठविल्या पाहिजेत. आह्मी बऱ्हाणपुराजवळ मुक्काम करून खानदेशचा बंदोबस्त करितों. तुह्मी वसईचा प्रसंग लौकर उरकून घांटावरी आलें पाहिजे. कुल मोंगलाई अमलाचा बंदोबस्त केला पाहिजे. त्यास, तुह्मी मातबर फौजेनिसीं औरंगाबादेजवळ बसल्यानें, दौलताबाद सरकारचा अंमल कुल बंद होऊन, टका पदरीं पडेल. या मनसबियापेक्षां अधिकोत्तर दुसरा मनसबा आहे ऐसा अर्थ नाहीं. माळवाप्रांतें एक सरदार पाठवावा लागतो. तरी पाठविला पाहिजे. तेथें फौज आहे, त्यांत जे जे सरदार व जे जे फौज रिकामी होत जाईल, तें पाठवीत जाणें. रा० बाबूराव मल्हार मोठ्या संकटांत होते. श्रीनें अरिष्टांतून काढिलें. सामान्य गोष्ट न जाहली. बरें. प्रस्तुत तोहमास्तकुलीनें बाजी जिंकली आहे. परंतु औध्या हिंदूंनीं हिंमत बांधल्यास व आमच्या फौजा मातबर गेल्यास हिंदूंचीच बातशाही होईल, ऐसा प्रसंग दिसतो[१]. (पुढील मजकूर फाटला आहे)."

ह्यावरून ह्या वेळीं सर्वत्र हिंदुपदपादशाही करण्याचा व जरूर पडल्यास नादिरशहाशीं देखील टक्कर देण्याचा बाजीरावांचा संकल्प दिसतो. परंतु तेथपर्यंत प्रसंगच आला नाहीं. कारण, नादिरशहानें महमदशहास पुनः दिल्लीच्या तख्तावर बसवून व अपरिमित लूट घेऊन स्वदेशास गमन केलें. महमदशहास बाजी-

---

१ ग्रांटडफ साहेबांनीं लेखांक ४१ । ४२ व हें पत्र पाहिलें असावें असें दिसतें. त्यांनीं "Hindoos and Mussulmans." Says Bajee Rao, "the whole power of the Deccan must assemble, and I shall spread Mahrattas from the Nurbuddah to the Chumbul." ह्मणून बाजीरावाच्या ज्या शब्दांचें अवतरण दिलें आहे, तें वरील पत्राच्या शेवटच्या फाटलेल्या भागांतील एखाद्या आवेशयुक्त वाक्याचें ढोबळ भाषांतर असावें असें दिसतें. ह्या पत्रांत खुद्द बाजीरावांच्या हातचा शेवटचा मजकूर आहे. परंतु दुर्दैवानें पत्राचा पुढील भाग गहाळ झाल्यामुळें तो सांपडण्यास मार्ग नाहीं!

रावांची पराक्रमशक्ति माहीत असल्यामुळें व त्यांच्याशीं गोडीगुलाबीनें वागण्यावांचून गत्यंतर नसल्यामुळें, त्यानें तख्तनशीन झाल्याचें आनंदवृत्त **बा**जीरावांस कळविलें; व **म**राठ्यांचा स्नेह संपादन करण्याकरितां कांहीं बहुमूल्य पोषाक व पूर्वी दिलेल्या हक्कांचीं व जहागिरींचीं सनदापत्रें पाठवून दिलीं. तीं **बा**जीरावांस छ० २४ सफर (ता० २२ मे इ० स० १७३९) रोजीं **खा**नदेशांत असतांनाच मिळालीं. अर्थात् बादशाहाचा असा प्रेमभाव आहे असें पाहतांच, **बा**जीरावांनीं त्यास राजी राखून व मदत करून, आपलें कार्य नम्रपणानें साधून घेण्याचा विचार केला. **दि**ल्लीच्या बादशाही तख्ताविषयीं **शा**हु महाराजांची फार पूज्यबुद्धि असल्यामुळें, सर्व **म**राठे इष्टकार्य साधल्यास त्याचा मान ठेवण्यास कधींही मागें पुढें पाहात नसत. ह्या राजकारणासंबंधानें **बा**जीरावांनीं **चि**माजी आपांस एक पत्र लिहिलें आहे. तें फार वाचनीय आहे.

"आशीर्वाद उपरी "**म**हमदशाहा याची पादशाही गेली होती; परंतु ईश्वरें पादशाही काईम राखिली. त्यास आपण राजकारण राखून **अ**मीरुल्उमरा यासारिखें व्हावें. पोटास फौजेस लागेल तें आह्मी पातशाही माल पैदा करून त्यांत घेऊं. उरला पैका खजाना दाखल व्हावाया फौजेस जागिरा अलाहिदा मागाव्या; आणि सर्वांस माजी करावें; आणि पातशाही बंदोबस्त करून द्यावा. लौकिक मोठा आहे. कैसा ह्मणाल तरी जीर्णोद्धार देवालयाचा केल्यास नवीन लिंगाचे स्थापनेपेक्षां अधिकोत्तर आहे. **म**हमदशाहाचे पातशाहीचा बंदोबस्त केल्यास लौकिक मोठा आहे. मोडून टाकिल्यास लौकिक नाहीं. दुसरी गोष्ट, हजारों चोर पोर खातील; आणि पातशाही मोडल्याचें श्रेय आपणाकडे. दुसरें, राजश्री **छ**त्रपति स्वामीही पातशाही इच्छीत नाहींत. जीर्णोद्धार केल्यास संतोष मानितील." ह्मणून राजश्री **बा**बूराव **म**ल्हार यांणीं लिहिलें आहे. दुसरें त्यांणीं लिहिलें आहे जे, "हा विचार चित्तास उत्तम भासेल तरी **स**तारकुलीखान **गा**जुद्दीखानाकडील येथें कामांतून बोलावून आणून, त्यासी **द**क्षणेच्या बंदोबस्ताविसीं **गा**जुद्दीखानांहीं मान्य करावें. आह्मी ते दुसरा पदार्थ नाहीं. समाधान करूं. ह्मणजे **द**क्षण निर्व्याकुल होईल. **म**हमदशाहाकडेही राजकारण (राहील). स्वामींस त्यांणीं हातीं धरावें आणि बंदोबस्त करून घ्यावा. येविसीं चालणा करूं. यामध्यें जैसी आज्ञा होईल तैसी वर्तणूक करूं.

**ना**दरशा गेला, तेव्हां चहूंकडे वळवळ करून कजिया करून दाखवावा, उचित नाहीं." ह्मणून लिहिलें आहे. याचा विचार काय त्यास लिहून पाठवावा, तें लिहिलें पाहिजे. लोभ असों दीजे हे विनंति."

ह्या पत्रावर दाखल तारीख छ० ४ रबिलावल म्हणजे ता० ३१ मे इ० स० १७३९ ही आहे. ह्यावरून तें ह्याच समयाचें आहे ह्यांत शंका नाहीं. ह्यानंतर **दि**ल्लीपतीशीं सलोखा ठेवण्याचा निश्चय करून, व **मा**ळवा व **बुं**देलखंड इकडील राजकारणें उरकून, **बा**जीराव **पे**शवे हे **नि**जामाचा मुलगा **ना**सिर- जंग ह्याची खोड मोडण्याकरितां **द**क्षिणेकडे वळले. तों त्याच सुमारास **व**सईचा कार्यभाग आटोपून **चि**माजीआपाही त्यांस येऊन मिळाले. नंतर उभयतांनीं दोनअडीच महिनेपर्यंत **गो**दावरीच्या कांठीं **मों**गलाचा पिच्छा पुरवून त्यास जेरीस आणण्याचा यत्न केला. परंतु तो व्हावा तसा फलद्रूप न होतां **म**राठी सैन्याचे फार हाल होऊं लागले ( लेखांक ५५ ). तेव्हां त्यांनीं **मों**गलाशीं तह केला, व मिळाला तेवढा प्रांत संतोषानें पदरांत घेतला. ह्या स्वारींत **बा**जीरा- वांस द्रव्यलाभ अगदीं न झाल्यामुळें त्यांची खर्चाची फार ओढाताण झाली. ह्मणून त्यांनीं **सा**तान्यास किंवा **पु**ण्यास न जातां **हिं**दुस्थानाकडे मोर्चा वळ- विला. इकडे **चि**माजीआपा **ना**सिरजंगाची भेट घेऊन, **सं**भाजी **आं**ग्र्यानें **कों**कणांत गडबड सुरू केली ह्मणून त्याचे पारिपत्यार्थ **पु**ण्यास आले; व तेथून **बा**ळाजी **बा**जीरावास बरोबर घेऊन **कों**कणांत गेले. लेखांक ५५ व ५६ ह्या दोन पत्रांत **चि**माजीआपांनीं आपल्या हालचालीचें इत्थंभूत वर्तमान स्वामींस कळविलें आहे. त्यावरून **बा**जीराव व **चि**माजीआपा ह्यांनीं को- णत्याही प्रकारें आपली हिंमत खचूं न देतां, मोठ्या उमेदीनें, यशोवैभवाच्या उत्तुंग शिखरावर चढण्याचा एकसारखा प्रयत्न चालविला होता, असें दिसून येतें. परंतु त्यांचें कीर्तितेज विश्वभक्षक काळास असह्य होऊन, त्यानें मोठ्या निर्दयपणानें ह्या वीररत्नांवर आपला पाश फेंकून, त्यांस इहलोकांतून उचलून नेलें. त्यामुळें सर्व **म**हाराष्ट्र दुःखसागरांत बुडून गेलें! **बा**जीरावासारखा तेजोरवि मावळल्यामुळें **म**हाराष्ट्रांत किती हाहाःकार झाला असेल ह्याचें वर्णन लेखणीनें करवत नाहीं! हा पराक्रमशाली योद्धा ता० २८ एप्रिल इ० स० १७४० रोजीं **खा**नदेशांतील **रा**वेर गांवीं मृत्यु पावला. ही बातमी **ब्र**ह्मेंद्र

स्वामींस कळली मात्र, तों त्यांचा हृदयगिरी दुःखरूपी वज्रानें भेदून गेला! **बा**जीरावासारखा आज्ञाधारक पट्टशिष्य मृत्युमुखीं पडल्यामुळें, स्वामींच्या सर्व राजकारणांचें मुख्य सूत्र तुटून गेलें! त्यांच्या उच्च मनोरथसिद्धीचें खरें साधन नष्ट झालें! त्यांच्या प्रेमसर्वस्वाचा मुख्याधार नाहींसा झाला! त्यांच्या महत्वाकांक्षेच्या जोमदार तरूचें उन्मूलन झालें; आणि त्यांच्या परोपकृतीचा तेजस्वी दीप मालवला गेला! त्यामुळें त्यांच्या विवेकी व विरक्त मनाची देखील चमत्कारिक स्थिति व्हावी ह्यांत आश्चर्य तें काय? त्यांस **बा**जीरावांच्या मृत्यूचें विपरीत वर्तमान श्रुत झाल्यानंतर त्यांनीं बहुत शोक आरंभिला; गोमूत्र प्राशन करण्याचें सोडून दिलें; आणि अत्यंत उदासीनता धारण केली. आणखी, **चि**माजी आपांस लिहिलें कीं "**बा**जीसारखा शिष्य गेला. या उपर या मुलखांतून जावें किंवा प्राण सोडावा, काय करावें ते लिहिणें." ह्या हृदयद्रावक पत्रास **चि**माजीआपांनीं जें प्रेमळ, करुणरसपूरित व समयोचित उत्तर पाठविलें आहे, तें लेखांक १४१ मध्यें छापलें आहे. **चि**माजीआपांसारख्या सामान्य जनानें स्वामीसारख्या पूर्ण वैराग्य बाणलेल्या तपस्वी साधूचें सांत्वन करण्याचा प्रयत्न करावा, व स्वामींनीं त्या योगानें शांत चित्त करावें, ही सर्व प्रेमलीला आहे. गुरुशिष्याच्या अकृत्रिम भक्तीचा असा हा अपूर्व मासला इतरत्र क्वचितच पहावयास सांपडेल. असो.

**बा**जीराव मृत्यु पावल्यानंतर **चि**माजीआपा व **ना**नासाहेब हे स्वामींचें चित्त स्वस्थ करून **सा**तार्‍यास राजदर्शनासाठीं गेले. तेथें **छ**त्रपतींची व त्यांची भेट झाली. नंतर रीतीप्रमाणें दरबाराचा थाट होऊन **ना**नासाहेबांस प्रधानपदाचीं वस्त्रें मिळालीं, व **चि**माजीआपांसही बहुमानाचा पोषाक मिळाला. ह्या प्रसंगीं त्यांनीं स्वामींस लिहिलेलीं पत्रें उपलब्ध झालीं आहेत. (लेखांक ५७,१४३,१४४ पहा). त्यांवरून स्वामींचें सान्निध्य व आशीर्वाद त्यांना कल्याणकर झाला असेल असें मानण्यास हरकत नाहीं. **पे**शवेपदाचीं वस्त्रें प्राप्त झाल्यानंतर, उभयतां चुलतेपुतणे **धा**वडशी मुक्कामीं स्वामीमहाराजांच्या भेटीस गेले. तेथें गुरुशिष्यांची सप्रेम भेट होऊन जो करुणरसात्मक प्रकार घडला, तो शब्दांनीं वर्णन करितां येणें कठीण आहे! स्वामींचें दर्शन होतांच परस्पराचीं अंतःकरणें भरून जाऊन त्यांच्या नेत्रांतून घळघळ अश्रुधारा वाहूं लागल्या. स्वामींनीं त्या उभय वीरांस दृढालिंगन देऊन प्रेमभरानें कुरवाळिलें,

व त्यांस सर्व सुखदुःखाच्या गोष्टी सांगून व त्याचा आदरपुरस्सर बहुमान करून त्यांना निरोप दिला. नंतर **चि**माजीआपा व **ना**नासाहेब **पु**ण्यास परत गेले.

**बा**जीराव वारले त्या वेळीं स्वामींचें वय शंभरांजवळ जवळ आलें होतें. त्यामुळें वार्धक्याची छाया त्यांच्या तेजःपुंज देहावर कमीजास्त प्रमाणानें व्यक्त होत होती. तशांत त्यांच्या मनावर हा दुःखाचा भयंकर डोंगर कोसळला, त्यामुळें त्यांच्यावर बराच परिणाम होऊन ते अगदीं कृश झाले. ह्याच समयास त्यांचे मुख्य कारभारी **चि**मणाजी **कृ**ष्ण **भा**गवत हे मृत्यु पावले, व पुढें लवकरच **चि**माजीआपाही कैलासवासी झाले. त्यामुळें स्वामींचें मन अधिक अधिक उदासीन होऊन ते राजकीय चळवळींतून अगदीं परांगमुख झाले. इ० स० १७४० च्या पुढें स्वामींच्या राजकारणांचीं पत्रें विशेष दृष्टीस पडत नाहींत.

**बा**ळाजी **बा**जीराव व **स**दाशिव **चि**माजी ह्यांनीं स्वामींस गुरुस्थानीं मानून त्यांच्याशीं आपल्या वडिलांप्रमाणें पत्रव्यवहार ठेविला होता. परंतु स्वामींचें व त्यांचें **बा**जीराव किंवा **चि**माजीआपा ह्यांच्याप्रमाणें मन मिळालेलें दिसत नाहीं. स्वामींच्या कित्येक पत्रांत " **बा**जीराव व **चि**माजीआपा आह्मांसीं निष्ठापूर्वक वर्तत होते. तुह्मी आह्मांसीं प्रतारणा करितां. " असे उद्गार निघालेले आहेत. **पे**शव्यांनीं स्वामींच्या दर्पास भिऊन त्यांचीं अनेक वेळां आर्जवें केलीं आहेत. तथापि ह्या पुढच्या कारकीर्दीत, स्वामींची ती पूर्वींची उमेद, तो उत्साह, व ती चळवळ चांगलीसी निदर्शनास येत नाहीं. त्यांची वृत्ति स्वाभाविकपणें पुढें अधिक सौम्य व विरक्त झाली; आणि त्यांनीं आपलें इतिकर्तव्य संपलें असें समजून, आपल्या देवस्थानांची व आश्रितजनांची पुढील व्यवस्था करण्याकडे लक्ष घातलें. स्वामींचे परमविश्वासू शिष्य व मुख्य कारभारी **चि**मणाजी **कृ**ष्ण हे वारल्यानंतर, त्यांनीं **शा**हुमहाराजांस पत्र लिहून, **चि**मणाजीपंतांचे पुत्र **ज**गन्नाथपंत ह्यांचा प्रतिपाल करण्याबद्दल विनंति केली. त्याप्रमाणें **शा**हुमहाराजांनीं त्यांस " हा मृत्युलोक. मानवाचा भरंवसा आहे असें नाहीं. म्हणोन वगैरे उदासीनें लिहिलें, त्यास आपण ईश्वर, जें करतील तें होईल. गांव शिव पैका मिळविला यास धनी कोण? असें बहुतप्रकारें लिहून आलें. त्यास, लिहावयाचें कारण काय? मुळींच **ज**गन्नाथपंत याचें पुत्रवत् रक्षण केलें. तेव्हां तो धनी व आम्हांस सर्वांस गुरु, याप्रमाणें आज्ञा जाहली आहे. त्याप्र-

माणें जगन्नाथपंत याचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरा आह्मी व आमचे वंशांत जे होतील ते चालवितील. यांत अंतर होणार नाहीं ( लेखांक ७ )." असें ता० ३१ मे इ० स० १७४१ रोजीं उत्तर पाठविलें. नंतर पुढें स्वामीं कोंकणांत गेले. तेथून त्यांनीं जगन्नाथपंत यांस पत्र पाठवून असें कळविलें कीं, "चिमणाजीचें पुत्रवत् पालग्रहण केलें. तो तर आह्मांस टाकून गेला. हा मृत्युलोक. आमचा भरंवसा आहे असें नाहीं. काय ते आमचे पुत्र व शिष्य तूंच आहे. मेळविले गांव, शिव, पैका पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें खाणें. तुम्हांस कोणी उपद्रव देणार नाहीं. मजमागें तुमचें शाहू चालवील. कोणते गोष्टीचे चिंता न करणें. जो उपद्रव देईल त्याचा निर्वंश होईल, हें समजणें." ह्याप्रमाणें स्वामींनीं जगन्नाथ चिमणाजी व इतर कारकून मंडळी ह्यांची यथायोग्य व्यवस्था केली. त्याचप्रमाणें दासदासी ह्यांचीही व्यवस्था करून त्यांना शाहुमहाराजांची राणी सगुणाबाई हिच्याकडून राजमुद्रेनिशीं अभय पत्रें देवविलीं. स्वामींचा थाट राजदरबारासारखा असल्यामुळें त्यांच्या पदरीं सेवकजन व परिचारिका बहुत होत्या. त्यांपैकीं परिचारिकांस दिलेलें अभयपत्र सगुणाबाई राणीच्या राजमुद्रेनिशीं उपलब्ध झालें आहे. ह्यावर ता० २२ जानेवारी इ० स० १७४५ ही तारीख आहे. हें पत्र मौजेचें असल्यामुळें येथें सादर करणें अवश्य आहे.

## श्रीबालकृष्ण.

"श्रीमंत सौभाग्यादिसंपन्न मातुश्री बाईसाहेब यांणीं, राजश्री सरदारांनीं, पागा शिलेदारांनीं, ठाणेदारांनीं, किल्लेदारांनीं व कमाविसदारांनीं व चौकीदा-

---

१ हें संपूर्ण पत्र आह्मांस मिळालें आहे परंतु तें रा० राजवाडे ह्यांनीं ग्रंथमालेमध्यें अगोदर छापल्यामुळें आह्मीं निराळें छापलें नाहीं. ( लेखांक २२ ग्रंथमाला पहा. ) ह्या पत्रावर रा० राजवाडे ह्यांनीं २२ आगष्ट इ० स० १७४० ह्मणून जी तारीख दिली आहे ती बरोबर जमत नाहीं. ज्येष्ठ वद्य ४ दुर्मति नाम संवत्सरे ह्मणजे ता० १३ मे इ० स० १७४१ रोजीं चिमणाजी कृष्ण भागवत हे मृत्यु पावले. तदनंतर स्वामी कोंकणांत गेले. अर्थात् इ० स० १७४१ मध्यें जर चिमणाजीपंत वारले तर इ० स० १७४० मधल्या पत्रांत त्यांच्या मृत्यूचा उल्लेख येणें शक्य नाहीं. तेव्हां ही तारीख निःसंशय चुकली असावी.

रांनीं व जमीदारांनीं व मुकदमांनीं वर्तमान व भावी महालांनिहाय आज्ञा केली ऐसीजेः–श्रीमत् परमहंस बावा स्वामी यांच्या सेवेच्या परिचारिका–नांवें बितपसीलः—

सेवेच्या बायका.

| | |
|---|---|
| १ सजणी. | १ येशी. |
| १ कृष्णी. | १ गंगी. |
| १ यशोदा. | १ सोनी. |
| १ नयनी. | १ लक्ष्मी. |
| १ राधी. | १ माणकी. |
| १ गोदी. | १ जवसी. |
| १ नथी. | १ नागी. |
| ७ | ७ |

एकूण असामी चवदा राजश्री परमहंस स्वामींची सेवा करीत आहेत. त्यांनीं राजश्री परमहंस स्वामींस विनंति केली कीं, आह्मीं आज पावेतों एकनिष्ठेनें सेवा केली. अशास, स्वामीमागें आह्मांस कोणी उपद्रव करील; त्यास स्वामींनीं आपलें आज्ञापत्र करून देऊन, दिवाणचें पत्र करून द्यावें; आणि आह्मांस कोणाचा उपसर्ग न लागेल ऐसें करून द्यावें. ह्मणजे आह्मी स्वामींच्या समाधीपाशीं सेवा करून राहूं ह्मणून. त्यावरून स्वामींनीं मनास आणून आज्ञापत्र करून दिलें. बि॥ः—

"श्रीमत् परमहंस भार्गवराम स्वामी यांणींः–सजणी सेवेस होती. अशास "हिजला मजमागें कोणी हिचे वस्तवानी व कोणेएक गोष्टीस, सुतळीच्या "तोड्यापर्यंत, घेईल आणि उपद्रव देईल; त्याचा निर्वेश होईल. त्याचें बरें कधीं "होणार नाहीं. आणि माझे समाधीजवळ राहोन झाडलोट करून रहाशील; "तरी मजमागें माझे कारभारी चालवितील. त्यास जो कोणी लि॥ प्रमाणें न "ऐके, त्याजला शपथ असे. त्याचे आईवर तलाख असे. हें आज्ञापत्र दिलें "आहे."

सदरहूप्रमाणें चवदा असाम्यांस, प्रत्येकीस एक ऐसीं चवदा पत्रें स्वामींनीं करून दिलीं. आणि साहेबांस आज्ञा केली कीं, येविषयीं हुजुरचें पत्र करून

देणें. त्यावरून मनास आणून राजश्री स्वामींच्या सेवेच्या बायका ऐसें जाणून, हें पत्र तुह्मांस सादर केलें असे. तरी तुमची वस्तभाव सुतळीचा तोडा आदिकरून तुह्मांस जी स्वामींनीं दिली आहे, ती मुबा केली असे. तरी वस्तभाव व नक्त व हरचीज व चतुष्पदें देखील जीं असतील तीं, तुह्मी घेऊन समाधीपार्शी अगर हरएक जागां सुखरूप रहाणें. तुह्मांस स्वराज्यांतील जो कोणी असेल तो उपद्रव करणार नाहीं. तरी तुह्मी यांसी दरम्यान कोणी मुजाहीम न होणें. यांसी स्वामींनीं जें दिलें आहे तें बक्षीस केलें असे. तें हुजरून त्यांला मुबा केलें असे. तें घेण्यास कोणास प्रयोजन नाहीं. जाणिजे. छ० २९ जिल्हेज सु॥ खंमस आर्बैन मया आलफ शके ७१ रक्ताक्षिनाम संवत्सरे माघ शुद्ध प्रतिपदा भौमवासरे आज्ञा प्रमाण. ( मोर्तब )"

ह्या पत्रावरून सेवेच्या दासदासी ह्यांच्या हिताबद्दल देखील स्वामींची दूरदृष्टि व कळकळ होती असें दिसून येतें. असो.

**शाहु** महाराज व राणी **स**गुणाबाई ह्यांनीं, स्वामींचा वृद्धापकाळ झाला असून तनु अत्यंत कृश झाली आहे असें पाहून, त्यांचा वारंवार समाचार घेण्याचा क्रम ठेविला होता. स्वामींच्या वरप्रसादानें छत्रपतींच्या गादीचा बोलबाला झाला ही गोष्ट **शाहु** महाराज केव्हांही विसरले नाहींत. ते स्वतः इतके विलासरंगी व स्वच्छंदानुवर्ती होते; तथापि स्वामींचा प्रत्येक शब्द त्यांना शिरसावंद्य असे. सर्व **म**राठे सरदार छत्रपतींची सक्रोध मुद्रा पाहून गर्भगळित होत असत; परंतु स्वामींची पुण्यशील विभूति दृष्टीस पडली कीं, त्यांचा राग क्षणभरही टिकत नसे. स्वामींचीही तशीच स्थिति होती. ह्या अन्योन्य भक्तीमुळें त्यांच्या परस्परांच्या विनोदपर लीलाही केव्हां केव्हां चालत असत. मनाची कितीही उद्विग्न वृत्ति असली, तरी **शाहु** महाराज त्यांच्या दर्शनास जात; व तेथील शुचिर्भूत देखावा पाहून हर्षभरित होत असत. स्वामींच्या अंतकालापूर्वी **शाहु** महाराज व त्यांची राणी **स**गुणाबाई हे **धा**वडशीस गेले होते. त्यांच्या भेटीचा साद्यंत वृत्तांत व त्यांचें विनोदपर संभाषण स्वामींच्या बखरींत सविस्तर वर्णिलें आहे. तेव्हां त्याची पुनरुक्ति करण्याचें येथें कारण नाहीं. ह्या भेटीमध्यें स्वामीमहाराज निरवानिरवीच्या गोष्टी अधिक बोलूं लागले. त्यावरून **शाहु** महाराजांच्या व राणीच्या मनास चटका बसून, त्यांना विशेष चिंता उत्पन्न झाली;

व तेव्हांपासून त्यांनीं त्यांच्यावर अधिक बारकाईनें लक्ष ठेविलें. राणी सगुणाबाई हिनें स्वामींस कृष्णातीरीं वार्षिक समाधीस जाऊं नये ह्मणून आग्रहपूर्वक विनंति केली. परंतु स्वामी मृत्यूची पर्वा न करणारे असल्यामुळें त्यांनीं आपल्या नित्यकर्मांत अंतर पडूं दिलें नाहीं.

स्वामीमहाराज हे शके १६६० क्रोधननामसंवत्सरे ह्या वर्षाच्या श्रावणमहिन्यांत, आपल्या प्रतिवार्षिक नियमाप्रमाणें, श्री कृष्णातीरीं समाधीस गेले. रीतीप्रमाणें जगन्नाथपंतांनीं त्यांच्या समाधीचें सर्व साहित्य करून दिलें, व दोन शिपाई समाधिस्थानाच्या रक्षणास ठेवून स्वामींचा निरोप घेतला. स्वामींनीं त्यांजबरोबर शाहु महाराजांस देण्याकरितां कांहीं प्रसाद फळें देऊन त्यांस निरोप दिला. जगन्नाथपंत तेथून परत आल्यानंतर सुमारें आठ दिवस स्वामी एकांतामध्यें होते. नंतर नववे दिवशीं ते आकस्मिक बाहेर आले. व गुंफेंतील दर्भासन बाहेर आणून, कृष्णास्नान करून, त्यावर येऊन ईश्वरस्मरण करीत बसले. समाधीचा पूर्ण काल न होतां स्वामी गुंफेंतून बाहेर आले हें पाहतांच द्वाररक्षकांस परमाश्चर्य वाटलें. स्वामींनीं त्यांस जगन्नाथपंतास आणण्याबद्दल आज्ञा केली; आणि आपण दर्भासनावर लांब मृगासन पसरून, एका शालेच्या पदरीं जपाची माळ बांधून, उशाकडे ठेविली; व शालजोडी पांघरून घेऊन श्री रामनामाचा उच्चार करीत निद्रा केली. मुखांतून राम राम असें नामस्मरण चाललें असतांनाच त्यांचे प्राण नारायणस्वरूपीं मिळाले. इकडे धावडशी येथें जगन्नाथपंत ह्यांस स्वामींचा निरोप पोहोंचतांच ते तांतडीनें कृष्णातीरीं धांऊन आले. तों स्वामीमहाराजांची मूर्ति समाधिस्थानांतून बाहेर येऊन निद्रिस्त झालेली त्यांच्या दृष्टीस पडली. तेव्हां त्यांनीं दर्शनोत्सुकतेनें स्वामींच्या तोंडावरील शालेचा पदर काढून पाहिला. तों स्वामीमहाराज ब्रह्मीभूत झाले आहेत असें त्यांस कळून आलें. मग त्यांच्या दुःखास पारावार काय विचारावा? अखिल महाराष्ट्राचा सद्गुरु, सद्गुणांचा मूर्तिमंत अवतार, स्वराज्याचा व स्वधर्माचा केवळ पंचप्राण, दुष्टांचा शासनकर्ता, सुष्टांचा संरक्षक, आणि दीनांचा त्राता असा सत्पुरुष इहलोकांतून गत झाल्यामुळें प्रत्येकाचें हृदय शोकरसानें भरून जाईल; मग प्रत्यक्ष पुत्रवत् पालन केलेल्या जगन्नाथपंतांची ती काय स्थिति? स्वामींची निधनवार्ता शाहु महाराजांच्या कानीं पड-

तांच ते स्वतःच्या लव्याजम्यासह कृष्णातटाकीं आले व स्वामींचा गतासु देह पाहून अत्यंत शोकाक्रांत झाले. हां हां ह्मणतां कृष्णेच्या निर्जन वाळवंटांत प्रचंड जनसमुदाय जमला, व स्वामींच्या कलेवराचें दर्शन घेऊन ढळाढळां नेत्राश्रू ढाळूं लागला. त्या वेळचा तो भयंकर शोकरस वर्णन करण्यास कोण समर्थ आहे?

शाहुमहाराजांनीं स्वामींचें कलेवर स्वतःचे पालखींत ठेविलें व त्यावर भरजरी चादर घालून व त्यांची सुगंधी द्रव्यांनीं पूजा करून मोठ्या समारंभानें ती पालखी धावडशी येथें आणली. तेथें स्वामींच्या स्नानसंध्येच्या पुण्यभूमीजवळ गर्ता तयार करून त्या कलेवराचे यथाविधि अंत्यउपचार केले. नंतर महाराजांनीं स्वामींच्या सर्व सेवकजनांचें यथोचित समाधान करून, आपल्या सरदार लोकांस "महाराज गेले आणि स्वामी आहेत" असें समजोन सर्वांनीं पूर्ववत् निष्ठा धरून चालावें. वर्षासनें पहिल्याप्रमाणानें सर्वांनीं द्यावीं. त्यांत अंतर करील त्यास शपथ असे. शिवाय पारिपत्य होईल" अशी ताकीद केली. नंतर स्वामींच्या समाधीचा व देवस्थानाचा उत्कृष्ट बंदोबस्त करून महाराज सातान्यास निघून गेले. पुढें तेरावे दिवशीं त्यांनीं पुनः धावडशीस येऊन तेथें ब्राह्मणसंतर्पण करून व सर्व जातींच्या लोकांस प्रसादभोजन देऊन, स्वामींच्या पुण्यतिथीची चांगल्या रीतीनें सांगता केली. नंतर त्यांनीं स्वामींचे वार्षिक उत्सव, देवाचे अभिषेक, नैवेद्य, नंदादीप, पूर्ववत् प्रमाणें चालवून स्वामींचा पूर्वींचा डौल कायम राहावा ह्मणून जगन्नाथ चिमणाजी ह्यांस धावडशी संस्थानचे मुख्य कारभारी नेमिलें; आणि सर्व प्रकारची उत्तम व्यवस्था केली. शाहुमहाराजांप्रमाणें त्यांची राणी सगुणाबाई हिनेंही स्वामींविषयीं तशीच भक्ति प्रदर्शित करून स्वामींची प्रतिवार्षिक पुण्यतिथि मोठ्या उत्सवानें चालविली.

स्वामीमहाराज समाधिस्थ झाल्यानंतर त्यांच्या समाधिस्थानावर भव्य देवालय बांधून त्यांच्या भव्यकीर्तीचें चिरस्मारक करावें असा छत्रपति शाहु महाराज ह्यांनीं विचार केला. त्याप्रमाणें त्यांनीं आपले खाजगी कारभारी विष्णु विश्वनाथ ह्यांस धावडशीस पाठवून जगन्नाथपंतांच्या विचारें तेथें प्रशस्त देवालय व भव्य सभामंडप बांधण्याचा बेत ठरविला. नंतर स्वामींचे भुलेश्वर

येथील देवालयाचे कामावरील शिल्पकलाचतुर गौंडी **सं**भाजीनाईक व **त्र्यं**-काजीनाईक ह्यांस आणवून सुमुहूर्तावर देवालयास प्रारंभ केला. त्यासे महाराज व राणीसाहेब वारंवार येऊन कारखान्यावर देखरेख ठेवूं लागले व लोकांचा परामर्ष घेऊं लागले. त्यामुळें देवालयाचें काम उत्कृष्ट रीतीनें चालू झालें. परंतु दुर्दैवानें मध्यंतरींच राणी **स**गुणाबाई ह्यांस क्षयाची भावना होऊन त्या ता० २५ आगस्ट इ० स० १७४८ रोजीं मृत्यु पावल्या. व महाराजांची प्रकृतीही उदासीन झाली. त्यामुळें हें देवालयाचें काम त्यांच्या डोळ्यांदेखत पूर्ण झालें नाहीं. **शा**हु महाराज ता० १५ डिसेंबर इ० स० १७४९ रोजीं मृत्यु पावले. व हें देवालय इ० स० १७५८ सालीं परिपूर्ण झालें. ह्या देवालयास एकंदर खर्च ११९३५३८॥ रुपये लागला. देवालयाचें काम संपूर्ण झाल्यानंतर **शं**कराजी गौंडी ह्यांस ३४५ रुपयांचें सोन्याचें कडें व ७० रुपयांचा रुप्याचा गज बक्षीस देण्यांत आला, व इतर पाथरवट गौंडी वगैरे लोकांस १४५५॥ रुपयांचीं इनामें दिलीं.[१] हें देवालय फार प्रेक्षणीय झालें आहे. ह्या देवालयाच्या महाद्वाराच्या शिरोभागीं **शं**कराजीनाईक ह्यांनीं पुढील लेख कोरून ठेविला आहेः—

**श्री भार्गवराम.**

**श्री भार्गवाचा अवतार साचा ॥**
**ब्रह्मेंद्रस्वामी बहुतां दिसांचा ॥**
**अवतार त्याचा समाप्त झाला ॥**
**संवत्सरा जाणही क्रोधनाला ॥ १ ॥**
**श्रावण शुक्ल नवमी भृगुवार होता ॥**
**अरुणोदईं प्राण प्रयाण होतां ॥**
**कृष्णातिरीं मुख्य समाधिस्थानिं ॥**
**वैकुंठवास मुनिला बहु लोक मानी ॥ २ ॥**
**प्रारंभ कामासि तयेचि कालीं ॥**
**वर्षे समाप्ती सहिशास्त्र झालीं ॥**

---

१ ही माहिती देवालयाच्या हिशोबांत दाखल असून ती कै० नारोराम शेखदार ह्यांनीं दिली.

शाहू नृपाल भजतो निजपूर्ण भावें ॥
सर्वत्र लोक भजती बहुपूर्ण भावें ॥ ३ ॥
तयाचा जगन्नाथ भक्त प्रशील ॥
समाधि स्थळ बांधिलें हें सुनील ॥
महा बुद्धिनें योजिला जो सुशिल्पी ॥
तया शंकरें बांधिलें आत्मकल्पीं ॥ ४ ॥
शके १६७२ प्रमोदनाम संवत्सरे.

ह्याप्रमाणें स्वामींचें देवालय तयार झाल्यानंतर स्वामींचें उपास्य दैवत श्री भार्गवराम ह्याची पाषाणाची मूर्ति पेशवाईतील प्रख्यात कारागीर बखतराम याजकडून पुणें येथें तयार करवून बाळाजी बाजीराव पेशवे ह्यांनीं पाठविली. व एक गणपतीची मूर्तिही पाठविली. त्यांची संस्थापना स्वामींच्या समाधिस्थानासन्निध केली आहे. त्यामुळें देवालयास विशेष शोभा येऊन तें फार रम्य व हृत्तापहर स्थान झालें आहे.

शाहु महाराज व सगुणाबाई वारल्यानंतर धावडशी संस्थानाचा योग्य अभिमान व अगत्य पेशव्यांनीं विशेष बाळगल्याचें दिसत नाहीं. शाहु महाराज होते, तोंपर्यंत देवस्थानाच्या थाटांत कांहीं उणें पडलें नाहीं. स्वामी नारायणस्वरूपी झाल्यानंतर त्यांच्या पश्चात् आंग्रे वगैरे बेलगामी सरदार स्वामींच्या कोकणांतील गांवांस उपद्रव देऊं लागले. हें वर्तमान महाराजांस कळतांच, त्यांनीं स्वदस्तुर आज्ञापत्र पाठवून त्यांस सक्त ताकीद केली. हें आज्ञापत्र येणेंप्रमाणेः—

"राजमान्य राजश्री तुळाजी आंग्रे सरखेल यांसी
आज्ञा केली ऐसीजेः—

श्री परमहंस थोर तपस्वी. त्यांचें आवश्यक स्वामींस विशेषात्कारें होतें. त्यास सांप्रत ते शांत जाहले. त्यांचें अधिष्ठान पूर्वींपेक्षां अधिकोत्तर चालवावें हें स्वामींस अगत्य. ते कांहीं सामान्य होते ऐसें नाहीं. तुमच्या वडिलांची निष्ठा श्रीच्या ठायीं बहुत होती. त्यांचीही ममता त्यांचे ठायीं असून तुमचे ठायीं बहुतसी होती. ऐसें असून या समयीं तुह्मीं त्यांचा कांहींच परामर्ष

केलांत नाहीं ! हें उचित कीं काय ? तेथें श्रीचें अधिष्ठान आहे. त्यावर **शि**व-भट ह्मणून एक ब्राह्मण ठेविला आहे, ह्मणून विदित जाहलें. हे गोष्ट उचित न केली. तरी **प**रशरामीं श्रीनीं कितीक श्रम साहस करून बागा, बागशाही व इमारती केल्या, हें साद्यंत स्वामींस विदित आहे. ऐसें असोन तेथें दुसरा ब्राह्मण ठेवावा हे कोण नीत ? हे गोष्ट स्वामींस मानत नाहीं. त्यामागें सर्व संपदा श्रीची जाणून, **कों**कणांतील गांव श्रीचेकडे सुदामतप्रमाणें चालवावयाची आज्ञा करून, हल्लीं हें आज्ञापत्र तुह्मांस सादर केलें असे. पेशजीपासून गांव चालत आले आहेत. बितपशीलः—

१ मौजे **पे**ढें, तालुके **चि**पळूण

१ मौजे **आं**बडस, तालुके **खे**ड

१ मौजे **ना**यसी ता॥ **सां**वडें

१ मौजे **डो**रलें ता॥ **पां**वस

१ मौजे **क**ळंबुसी

१ मौजे **मा**हाळुंगें.

१ मौजे **गो**ठणें, तालुके **रा**जापुर.

एकूण हे सात गांव पूर्वींपासून चालत आले आहेत. त्याप्रमाणें ताकिदी देऊन चालवणें. देहाय मजकुरांस हबशीपट्टी वगैरे उपसर्ग काडीमात्र लागूं न देणें. तुमच्या वडिलांची निष्ठा होती त्याप्रमाणें तुह्मीं धरून चालवावयासी अंतर न करणें. यासी तकरार कराल हें उचित नाहीं. जाणिजे. रवाना छ० ९ माहे साबान, सुहुर सन सीत आर्बैन मया आलफ.

( स्वदस्तुर लेख ) "सुदामतप्रमाणें चालवून करार न केलियास उचित न होय. पारिपत्य हुजुरहून होईल. सुज्ञ असा."

हें आज्ञापत्र वाचलें ह्मणजे **शा**हु महाराजांस स्वामींच्या पश्चात् देखील त्यांच्या देवस्थानाचें किती अगत्य होतें हें चांगलें दिसून येतें. परंतु हें अगत्य पुढें राहिलें नाहीं. **शा**हु महाराज निवर्तल्यावर **धा**वडशी संस्थानाचा वसूल सुरळीत येईनासा झाला. त्यामुळें स्वामींच्या वार्षिक पुण्यतिथीच्या खर्चाप्रीत्यर्थ देखील **पे**शव्यांजवळ याचना करण्याचा प्रसंग येऊन ठेपला. संस्थानचे कारभारी **ज**गन्नाथ **चि**मणाजी ह्यांचीं **पे**शव्यांस लिहिलेलीं एकदोन पत्रें उपलब्ध झालीं आहेत, त्यावरून ह्या ह्मणण्यास पुष्टि येते. तीं पत्रें येणेंप्रमाणेंः—

## श्री भार्गवराम.

"श्रीमंत राजश्री **भा**ऊ स्वामींचे सेवेसीः—

विनंति सेवक **ज**गन्नाथ **चि**मणाजी मुक्काम **धा**वडशी कृतानेक साष्टांग नमस्कार. विनंति. येथील क्षेम तागाईत आषाढ बहुल पंचमीपर्यंत वर्तमान यथास्थित असे विशेष. बहुत दिवस स्वामीकडील पत्र येऊन परामर्ष होत नाहीं. ऐसें नसावें. सदैव कृपा करून पत्रीं सांभाळ करणार स्वामी वडील आहेत. वरकड, श्रीची पुण्यतिथी श्रावणमासीं शुद्धपक्षीं प्रथम दिवसापासून नवमी पर्यंत होत असते. ऐशास आजिपर्यंत श्रीमंत सौभाग्यवती मातुश्री बाईसाहेब होती, ती सर्व साहित्य करीत होती. तो विचार यंदा राहिला. याजउपरी, आपण श्रीचे शिष्य समर्थ आहेत. याजउपरी, आपण पुण्यतिथीचें साहित्य उत्तम प्रकारें करून महोत्साह शोभिवंत करावा. आह्मांस आपण वडील आहेत. आज्ञा होईल तेणेंप्रमाणें वर्तणूक करूं. स्वामीस कोणे गोष्टीचें अशक्य आहे ऐसें नाहीं. सहजामध्यें होऊन येईल. **सो**माजी सेवेसीं विनंति करील तेणेंप्रमाणें अनुकूलता करावी. किनखाप गुदस्ताप्रमाणें उत्तम गळेफांस देविला पाहिजे; व वार्षिक ऐवजाची आज्ञा **सा**तारा घ्यावयाची करावी. ह्मणजे मुदतीस पावतां होईल. बहुत काय लिहावें. कृपा करावी ही विनंति."

हें पत्र **शा**हु महाराजांची राणी **स**गुणाबाई वारल्यानंतर लिहिलें असावें असें दिसतें. ह्यानंतर **शा**हु महाराज वारल्यानंतर दुसरें पत्र लिहिलें आहे तें येणेंप्रमाणें:—

## श्री भार्गवराम.

"श्रीमंत राजश्री **भा**ऊ स्वामींचे सेवेसीं:—

विनंति सेवक **ज**गन्नाथ **चि**मणाजी, कृतानेक साष्टांग नमस्कार. विनंति येथील कुशल तागाईत आषाढ शुद्ध दशमी पावेतों, स्वामींचे कृपेनें यथास्थित असे विशेष. श्री स्वामींची पुण्यतिथी श्रावण शुद्ध नवमीस, प्रतिपदेपासून नवमीपावेतों, कीर्तन व संतर्पण सांप्रदाय पांच वर्षे वार्षिक चालला. आजपावेतों पुण्यतिथीस साहित्य राजश्री **छ**त्रपती स्वामीकडून होत होतें. वार्षिक टाकितां नये. करावें तों, सामर्थ्य स्वामींस विदितच आहे. मीच सेवेसीं येत

होतों. परंतु कांहीं साहित्य नाहीं. व कांहीं व्यासंगदुःख ह्मणून विनंतिपत्र पाठविलें आहे. तर स्वामींचें संस्थान. आज्ञेप्रमाणें वर्तणूक करूं. स्वामीजवळ विनंति केली, तिचा परिणाम लावणार स्वामी समर्थ आहेत. रा० **वि**ष्णुपंत अद्यापि निकालावर येऊन श्रीचे रुपये देत नाहींत. ते रुपये स्वामींचे. व संस्थान स्वामीवांचून दुसरा कोण चालविणार? आह्मी आज्ञांकित असों. कारखाना उपाशी मरतो. तीन चार महिने लोकांस रोजमुरा नाहीं. विश्वासघात **वि**ष्णुपंतानें केला. काम निम्में राहिलें. आमचा उपाय जे, स्वामींस विनंति करावी. भिक्षेचा रुपया श्रीस्वामींनीं कोणाप्रकारें मिळविला; व आपणच त्याचें रूप करून वृद्धि केली जे, सत्कारणीं व्यय होईल. तें द्रव्य मध्येंच राहून काम पडलें! याची आज्ञा करणार आपण वडील आहेत. **सो**माजी विनंति करितां विदित होईल. कृपावृद्धि केली पाहिजे. श्रीचे समाधीस गळेफांस व प्रावर्ण बादलीवस्त्र असावें. पुण्यतिथीचें सामान कांहीं आज्ञा करून देवावें. ही विज्ञापना."

ह्यानंतर **पे**शव्यांनीं कांहीं ताकिदी करून व खर्चास थोडासा ऐवज वगैरे पाठवून कशीतरी व्यवस्था केली. परंतु ह्यापुढें केव्हांही **धा**वडशी संस्थानांत बिलकूल स्वास्थ्य राहिलें नाहीं.

**शा**हुमहाराज निवर्तल्यानंतर **सा**ताऱ्यास जी गडबड झाली, त्या गडबडीमध्यें कोणी **अ**द्वैतेंद्र गोसावी नामक एक इसम पुढें आला; व त्यानें **ता**राबाईस अनुकूल करून घेऊन **धा**वडशी संस्थानाचें स्वामित्व आपल्याकडे घेण्याचा यत्न केला. ह्या गोसाव्याची माहिती स्वामींच्या बखरींत प्रसिद्ध झालेली नाहीं. परंतु कित्येक कागदपत्रांत त्याचा उल्लेख सांपडतो. त्यानें **ता**राबाईकडून व **पे**शव्यांकडून सर्व सरदारांस पत्रें लिहवून **धा**वडशी संस्थानाची भिक्षा व वसूल आपणांस मिळावा असा यत्न केला होता. त्यामुळें **ज**गन्नाथ **चि**मणाजी परम कष्टी झाले व त्यांनीं **पे**शव्यांस एक विनंतिपत्र पाठविलें. तें येणेंप्रमाणें:—

---

१ पेशव्यांचें ह्या गोसाव्यास आंतून अंग होतें व त्यांनीं होळकर पवार वगैरे सरदारांस ह्या अद्वैतेंद्र गोसाव्यास धावडशी संस्थानचा शिष्य समजून

## श्री भार्गवराम.

"श्रीमंत तीर्थस्वरूप राजश्री **नाना** व राजश्री **भाऊ** स्वामींचे सेवेसी—अपत्येसमान **जगन्नाथ चिमणाजी** मुक्काम **धावडशी** कृतानेक साष्टांग नमस्कार. विनंति तागाईत छ० १५ जिल्कादपर्यंत स्वामींचे कृपेंकरून वर्तमान यथास्थित असे विशेष. स्वामींची आज्ञा घेऊन **धावडसीस** आलों. ते समयीं स्वामीनें आज्ञा केली कीं दसरा करून मागती **पुण्यास** येणें. त्यास घरीं नवरात्र झालें. दसरा जहाला. उपरांतिक निघोन यावें तों, **सातारा** गडावरून वर्तमान आलें कीं, मागें येथें गोसावी राहिला होता, त्याणें मातुश्री आईसाहेबांकडेस संधान करून आपली स्थापना या स्थलीं करावी ह्मणोन मध्यस्थ घातलें. मागें **धावडसीस** एक शिंपी होता, तो त्या गोसावियास सामील जाहला आहे.

---

भिक्षा द्यावी अशीं पत्रें पाठविल्याचाही आधार सांपडतो. मल्हारराव होळकराचें पुढील पत्र वाचलें असतां ह्याची साक्ष पटेल.

"राजश्री **पंतप्रधान** साहेबांचे सेवेसी

श्रीमंत सकलगुणालंकरण अखंडित लक्ष्मीअलंकृत राजमान्य आज्ञाधारक मल्हारजी होळकर दंडवत. विज्ञापना येथील क्षेम ता० छ० २२ सवाल पावेतों मु० **वाफगांव** स्वामींच्या कृपावलोकनें करून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेष. स्वामींहीं पत्र पाठविलें. तेथें आज्ञा:—श्री **भार्गवराम** बावा स्वामींचें वार्षिक तुह्मांकडे असेल. त्याप्रमाणें त्यांचीं माणसें येतील, त्यांजवळ देणें. पुढें श्रीचे शिष्य श्री **अद्वैतेंद्र** येतील त्यांचा बहुमान करणें ह्मणून आज्ञा. त्यास प्रस्तुत श्रीकडून रा० केसोपंत आले. त्यांजसमागमें आज्ञेप्रमाणें सविस्तर अर्थ निवेदिला आहे. त्याप्रमाणें श्रीचे सेवेसी विदित होईल. पुढें स्वामींचें आगमन होईल त्यासमयीं बहुमानास सेवकापासून अंतराय होणार नाहीं. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना."

ह्याचप्रमाणें पवार वगैरेंचीं पत्रें सांपडलीं आहेत. हा अद्वैतेंद्र गोसाव्याचा समग्र वृत्तांत प्रसिद्ध झाला तर पेशव्यांच्या ह्या अद्वितीय कृतीचें खरें स्वरूप व्यक्त होईल. ह्या उपलब्ध झालेल्या पत्रांवरून तर पेशव्यांच्या कीर्तीस कलंक लागल्यावांचून राहणार नाहीं!

तो गडावर मातुश्रीकडे जाऊन, नानाप्रकारचे खेळ खेळोन, गोसावी याची उभारणी करावितो. गोसावी यांसीं वस्त्रें देऊन आठा चौ दिवशीं या स्थलास पाठविणार, ऐसें वर्तमान तह्कीक ऐकिलें. तो गोसावी मागें दोन चार महिने होता. त्याणें नानाप्रकारच्या उपाधी केल्या. राजश्रीपर्यंत जाहलें. राजद्वारीं फजीत पावला. हें सर्व वर्तमान स्वामींसही विदित आहे. गुदस्तां पुण्यास मातुश्री होती. ते समयीं राजश्री बाजीराऊ अमात्य यांहीं ह्याचा अगत्यवाद धरिला होता. हें वर्तमान स्वामीस कळल्यावर स्वामीनें नशेद करून तेथून घालविला. तो मागतीं हा प्रसंग साधून आठां चौ दिवशीं या स्थलास यावें ऐसा करार जाहला आहे. तरी तो गोसावी या स्थानास आल्यानंतर, येथें दहा वीस ब्राम्हण, बहुत कालीं श्रीचे पदरचे, व जुनीं माणसें शें दोनशें आहेत. यांणीं देशत्याग करावा, ऐसा प्रसंग जाहला! आह्मी लोकीं त्या गोसाव्याचे हाताखालीं राहावें ऐसा प्रसंग मागेंच राहिला नाहीं. याज उपरीं, स्वामी मायबाप गणगोत. श्री मागें आह्मांस दुसरे पाय आहेत असा अर्थ नाहीं. साभिमानी स्वामी आहेत. आह्मीं काय विचार करावा ते आज्ञा करणार वडील स्वामी आहेत. बहुत काय लिहावें. सेवेसी श्रुत व्हावें ही विज्ञापना."

हें पत्र गेल्यानंतर पेशव्यांनीं पुढें काय व्यवस्था केली तें समजत नाहीं. तथापि पुढें ह्या गोसाव्याचें नांव कागदपत्रांत कोठें दिसत नाहीं. त्याअर्थीं हें प्रकरण कसें तरी विझलें असावें असें दिसतें.

ह्यानंतर बाळाजी बाजीराव पेशव्यांनीं इ० स० १७५८ सालीं धावडशी संस्थानचे हिशेब घेऊन त्याच्या शिलकेंतून १२७१०॥।॰ रुपये वडूथ येथील शकुंतेश्वराच्या देवालयास दिले व स्वामींच्या कारकूनमंडळींस व समाधीच्या खर्चास ठरीव नेमणुका बांधून देऊन एक बेहेडा तयार करून दिला. नंतर पुनः थोरले माधवराव पेशवे ह्यांनीं इ० स० १७६६ सालीं दुसरा बेहेडा करून दिला. त्याप्रमाणें अद्यापि व्यवस्था चालत आहे. कोकणांतील पेढें येथील परशुराम व गोठणें येथील भार्गवराम ह्या स्वामींच्या देवस्थानांत पेशव्यांनीं फारच घोटाळा केला व तीं निरनिराळ्या लोकांकडे चालविलीं. ह्या सर्वांचा पुढील वृत्तांत अत्यंत भानगडीचा व वादग्रस्त असल्यामुळें तो स्वामींच्या पवित्र चरित्रांत दाखल करण्याची आमची इच्छा नाहीं.

**धा**वडशी संस्थानचे कारभारी **ज**गन्नाथ **चि**मणाजी हे इ० स० १७८२ मध्यें मृत्यु पावले. नंतर त्यांच्या सरळ वंशजाकडे हें संस्थान चाललें आहे. सांप्रतचे वहिवाटदार **गं**गाधर **भि**काजी **भा**गवत हे आहेत. संस्थानांमध्यें स्वामींच्या सर्व कारकूनमंडळीचे वंशज अद्यापि आपापल्या वृत्तींचा उपभोग घेत आहेत. त्या सर्वांचा योग्य रीतीनें परामर्ष घेऊन व स्वामींची योग्यता व कर्तृत्वशक्ति सदैव लक्षांत ठेवून, त्यांचा कीर्तिघोष सर्व **म**हाराष्ट्रांत यावच्चंद्र दिवाकरौ गर्जत राहील असें वर्तन ठेवणें त्यांकडे आहे. इतकें सांगून व स्वामींच्या समाधीस अनन्य भावें प्रणाम करून हा चरित्रग्रंथ येथें समाप्त करितों.



श्री

महापुरुष

# ब्रह्मेंद्रस्वामी धावडशीकर

यांचा पत्रव्यवहार.

## स्वामींस आलेलीं पत्रें.

### शाहूमहाराज.

[लेखांक १] श्री.

श्रीसकल तीर्थस्वरूप श्रीमत् परमहंस श्रीस्वामींचे सेवेसी:—

अपत्यसमान शाहुजी राजे कृतानेक दंडवत विनंति. येथील कुशल स्वामींचे कृपाकटाक्षें यथास्थित असे विशेष. स्वामींनीं सदय होऊन आशीर्वादपत्र पाठविलें. प्रविष्ट होऊन अक्षरशः अभिप्राय विदित जाला. वीरमाडे[1], अनेवाडी, धावडशी, येथें बावाजी शिवदेव व राजश्री यमाजी[2] शिवदेव व भवानी शंकर हे वेठबिगारीचा उपद्रव अ-

१ वीरमाडे, अनेवाडी व धावडशी हीं गांवें सातार्‍याजवळ पांच सहा मैलांचे अंतरावर असून स्वामींच्या देवस्थानाकडे इनाम चालत आहेत. मराठी राज्याचे वेळीं धावडशी हें परळी तर्फाखालीं मोडत असे. वीरमाडे वाई हवेलीमध्यें असे, व अनेवाडी प्रांत व्याघ्रगड तर्फ कुडाळ असें मोडत असे. ह्या तिन्ही ठिकाणीं स्वामींच्या वेळचीं कांहीं स्मारकें आहेत. धावडशी येथें स्वामींची समाधि व भार्गवरामाचें देवालय फार प्रसिद्ध आहे. येथेंच स्वामींनीं कोंकण प्रांतांतून आल्यानंतर प्रथम वास केला.

२ यमाजी शिवदेव मुतालीक असावेत.

निवार करितात. ऐसीयास कोंकणप्रांत त्याग करून येथें आलों. येथें हे उपद्रव करितात. त्यामुळें आपलें राहणें होत नाहीं ह्मणून चित्तांत उदासीनता आणून विशेष खेद केला; त्यावरून राजश्री यमाजी शिवदेव व भवानी शंकर यांस स्वमुखें रुबरु आज्ञा करणें ते केली. याउपरी त्यांकडून कांहीं उपसर्ग होणार नाहीं. स्वामींनीं चित्त स्वस्थ करावें. उदासीनता सर्वथा न आणावी. स्वामींपेक्षां दुसरें अधिकोत्तर आहे असें नाहीं. स्वामी देवालयें, वापी, कूप, तटाकें झाडझडोरा लावितात हे कीर्ति अक्षय करीजेती.[२] यापेक्षां उत्तम काय आहे ? आह्मांस ह्या गोष्टीचा बहुतसा संतोष आहे. स्वामींनीं अननासें व केवड्याचे रोप पाठविले तेही पावले. वरकड विचार लिहिला तर जें होणें तें स्वामींच्या आशीर्वादप्रतापें होईल. ते गोष्टीचें अगाध आहे असें नाहीं. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[ लेखांक २ ] श्री.

श्री सकल तीर्थस्वरूप श्री परमहंस श्री स्वामींचे सेवेसीः—

अपत्यें शाहूजी राजे कृतानेक दंडवत विज्ञप्ति. येथील कुशल वैशाख शुद्ध द्वितीया सौम्यवासर स्वामींच्या आशीर्वादें यथास्थित असे विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र प्रेषिलें तेथें आज्ञा जे, श्रीस आपण धारादत्त कुलबाब कुलकानु गांव इनाम दिल्हे असतां राजश्री प्रतिनिधि चव्हाण[३]-

---

१ कोंकणप्रांत त्याग करून स्वामीमहाराज देशीं सन खमस अशरीनांत आले असें काव्येतिहाससंग्रहांतील ब्रह्मेंद्र स्वामींच्या चरित्रांत लिहिलें आहे त्यावरून हें पत्र इ. स. १७२४-२५ च्या सुमाराचें असावें असें दिसतें.

२ स्वामींस लोकोपकारार्थ देवालयें, विहिरी, तलाव बांधण्याचा व फुलझाडें व फळझाडें यांचे बाग करण्याचा फार नाद असे.

३ चव्हाणपट्टी ही उदाजी चव्हाणानें बसविली होती. उदाजी चव्हाण हा अथणीचा राहणारा असून रामचंद्रपंत अमात्य ह्यांच्या हाताखालीं वाढला होता.

पट्टी रुपये तीनसें साठ घेतले, आणीक इनामपट्टी आटसें रुपये घेणार ह्मणून लिहिलें. ऐसीयास पहिले चव्हाणपट्टीचा पैका घेतला तो स्वामींस विदित झाला नाहीं. विदित होतें ह्मणजे मना केलें असतें. हल्लीं इनामपट्टीचा ऐवज न घ्यावयाची आज्ञा करून मना केलें असे. श्रीस गांव दिल्हें असतां दुसरा उपसर्ग लागेल असें काय आहे? कित्येक वृत्त वेदमूर्ति राजश्री सदाशिवभट अग्निहोत्री सेवेसी निवेदितील त्यावरून विदित होईल. सेवेसी श्रुत होय सेवेस विनंति.

[लेखांक ३] श्री.

श्री सकल तीर्थरूप श्रीमत्परमहंस श्री स्वामींचे सेवेसीः–

अपत्यसमान शाहुजी राजे कृतानेक दंडवत विनंति. येथील कुशल पौष वद्य ५ भोमवासरे स्वामींचे आशीर्वादें यथास्थित असे विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें. पावून लेखनार्थ अवगत जाहला. तेथें आज्ञा जे, मौजे वीरमाडीकर पाटील हरामजादगी करितात, मसाला दोनशें रुपये माफ केला तीं पत्रें मागतात, कमाविसदार नको ह्मणतात, ऐशास तो गांव घेऊन दुसरा गांव द्यावा ह्मणोन, तर स्वामींस गांव दत्त करून दिल्हा तो माघारा घेणें ऐसें होईल कीं काय? गांवकरी पाटील हरामजादगी करितात त्यास आपण कळेल त्याप्रमाणें तंबी

---

तो पुढें फार प्रमत्त होऊन त्यानें बत्तीसशिराळ्यांची गढी काबीज केली आणि त्या प्रांतामध्यें फार दंगा मांडला. त्याचें सामर्थ्य विशेष जाणून शाहू महाराजांनीं त्याजबरोबर तह केला व त्यास शिराळें व कराड येथील चौथाईचे हक्क दिले. तथापि त्यानें आपली पुंडाई तशीच चालवून गांवोगांवीं चव्हाणचौथाई घेण्याचा सपाटा चालविला. त्यास कोल्हापुरच्या संभाजीराजाचें सहाय्य होतें. इ० स० १७२९ मध्यें शाहूनें प्रतिनिधीस त्याजवर पाठवून त्याचा व संभाजीचा अगदीं पराभव केला. उदाजी चव्हाणानें जी चव्हाणपट्टी बसविली होती ती पुढें कांहीं दिवस चालली असावी असें दिसतें.

करावी, त्यास दुसरा कोणी मुजाहिम होईल ऐसें नाहीं. पाटिलास तंबी केल्याविना बलखुद राहतात असें नाहीं. कुणबी हरामजादे, त्यांस तंबी पोहोंचवून विचारेंच राखिले पाहिजेत, तरीच सुरळीत वर्ततील. स्वामींपेक्षां कुणब्याचें आवश्यक आहे असें नाहीं. हा अर्थ विस्तारें ल्याहावा तरी स्वामींस आमचें हृद्गत अविदित असें काय आहे? जैसें कळेल तैसें कुणबी यास बलखुद ठेवून सुरळीत वर्तवावें. विदित होय. सेवेसी श्रुत होय हे विनंति.

[लेखांक ४] श्री.

श्रीसकल तीर्थस्वरूप श्रीमत् परमहंस श्रीस्वामींचे सेवेसीः—

अपत्यसमान शाहुजी राजे कृतानेक दंडवत विज्ञप्ति. स्वामींचे आशीर्वादें कार्तिक बहुल सप्तमी मंदवासर यथास्थित असे विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें. पाहून समाधान झालें. तेथें आज्ञा जे, कृष्णंभट देसाई ता. राजापूर याचे वादी याणें यासीं वतनाचा कथला केला तो पूर्वार्थ मनास न आणितां राजश्री कान्होजी[1] आंग्रे यांणीं वादी यास विभागपत्रें करून दिलीं. याजपासीं या······फर्मान व थोरले कैलासवासी महाराजांचीं पत्रें आहेत त्यांवरून सखोजी[2] आंग्रे सरखेल यांणीं आपलीं पत्रें दिलीं. महाराजांनीं आपलीं पत्रें करून द्यावीं, ह्मणून लिहिलें. तरी त्यास हुजूर पाठवावें. मनास आणून आज्ञा करणें ते केली जाईल. विदित होय हे विनंति.

[लेखांक ५] श्री.

तीर्थरूप परमहंस श्री स्वामी वडिलांचे सेवेसीः—

अपत्य शाहूनें त्रिकाल चरणीं मस्तक ठेऊन शिरसाष्टांग दंडवत विज्ञा-

---

१ कान्होजी आंग्रे—कारकीर्द इ० स० १६८० पासून इ० स० १७२९ पर्यंत.

२ सखोजी आंग्रे—कान्होजीचे वडील पुत्र. ह्यांस सरखेल पदाचीं वस्त्रें इ. स. १७२९ त झालीं. परंतु ते लवकरच वारले.

पना. जेष्ट बहुल त्रयोदशीपावेतों आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. आज्ञापत्र आलें त्यांत कित्येक प्रकारें लिहिलें तें कळलें. आंग्रे यांजविषयींचा मजकूर लिहिला, त्यास त्याजकडे मुद्दाम जासूद पाठवून आणवितों. राजश्री रघोजीराव भोंसले यांजकडून व होळकर यांजकडून पूजा वगैरे आलें ह्मणोन लिहिलें तें नीट जाहलें. हा[1] मृत्युलोक, मानवाचा भरंवसा आहे असें नाहीं ह्मणोन वगैरे उदासीनें लिहिलें, त्यास आपण ईश्वर, जें करतील तें होईल. गांव सिव पैका मिळविला यास धनी कोण असें बहुतप्रकारें लिहून आलें. त्यास लिहावयाचें कारण काय? मुळींच जगन्नाथ[2]पंत याचें पुत्रवत् रक्षण केलें. तेव्हां तो धनी व आह्मां सर्वांस गुरु याप्रमाणें आज्ञा जाहली आहे. त्याप्रमाणें जगन्नाथपंत याचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरा आह्मी व आमचे वंशांत जे होतील ते चालवितील. यांत अंतर होणार नाहीं. हें कळलें पाहिजे. शालजोडी १ एक व बनात १ एक व मोहोरा १०० येणेंप्रमाणें पाठविलें आहे. हें कृपा करून घेतलें पाहिजे. बहुत काय लिहिणें हे विनंति.

[लेखांक ६] श्री.

श्रीसकलतीर्थरूप श्रीमत् परमहंस श्रीस्वामींचे सेवेसी:—

अपत्यसमान शाहुजी राजे कृतानेक दंडवत विनंति. येथील कुशल कार्तिक शुद्ध द्वितीया स्वामींचे आशीर्वादें यथास्थित असे विशेष. आपण घोडेविसीं लिहिलें होतें त्यावरून हल्लीं घोडे चार पाठविले

---

१ स्वामींस आपला अंतकाळ अगोदर समजला असून त्यांनीं शाहू महाराजांजवळ व आपल्या पदरच्या लोकांजवळ तशा अर्थाचे उद्गार वारंवार काढिले होते. स्वामी इ. स. १७४५ मध्यें समाधिस्थ झाले त्यापूर्वीचें हें पत्र असावें.

२ जगन्नाथपंत:—हे चिमणाजी कृष्ण भागवत यांचे चिरंजीव. स्वामींचे मुख्य कारभारी.

आहेत. यांत चित्तास येईल तो मान्य केला पाहिजे. राजश्री राघोराम याबराबरी पाठविले आहेत. विदित होय.

'घोडे चार पाठविले आहेत. चित्तास येईल तो घेणें ही विनंति.'

[ लेखांक ७ ] श्री.

श्रीसकलतीर्थरूप राजश्री श्रीमत् परमहंस स्वामींचे सेवेसी.

अपत्यसमान शाहुजी राजे कृतानेक दंडवत विज्ञप्ति. येथील कुशल फाल्गुन शुद्ध तृतीया सौम्यवासर स्वामींचे आशीर्वादें यथास्थित असों विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र प्रीदिलें ( प्रेषिलें ? ) तेथें आज्ञा जे, श्रीनें जें वदविलें त्यास संदेह आहे असें नाहीं. पत्र पत्रिकार्थ जाणून जतन करून ठेवणें ह्मणून त्यावरून स्वामींनीं आशीर्वादप्रसाद दिला; त्यास संदेह चित्तांत आणिजेतो असें नाहीं. सूचनार्थ विनंति लिहिली होती. त्यास निर्वाहरूप पत्रिकाच आज्ञा प्रमाण, संग्रहीं ठेविली असे. विदित होय. श्रीपदप्रसाद पाठविला तो पावला. सेवेसी विनंति.

[ लेखांक ८ ] श्री.

श्रीसकलतीर्थरूप श्रीमत् परमहंस श्रीस्वामींचे सेवेसीः—

अपत्यसमान शाहुजीराजे कृतानेक दंडवत विज्ञप्ति. येथील कुशल भाद्रपद शुद्ध तृतीया, सौम्यवार स्वामींचे आशीर्वादें यथास्थित असों विशेष. सांप्रत स्वामींचें आशीर्वादपत्र येऊन परामृष होत नाहीं याकरितां चित्त साक्षेपित असे. तरि सर्वदां आशीर्वादपत्र पाठवून चित्त सानंदित केलें पाहिजे हे विनंति.[१]

---

१ लेखांक ७ व ८ हीं दोन पत्रें काव्येतिहाससंग्रहांतील "पत्रें यादी वगैरे" मध्यें प्रसिद्ध झालीं आहेत.

# छत्रपतींच्या राण्या.[1]

[लेखांक ९] श्री.

तीर्थस्वरूप श्री परमहंस स्वामींचे सेवेसीः—

अपत्यें सौभाग्यादिसंपन्न सखवारबाई दंडवत विनंति उपरी येथील कुशल स्वकीय लेखन करीत गेलें पाहिजे. यानंतर स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें पावलें. श्रीचा प्रसाद पाठविला तो पावला. रुपये पाठवून दिले पाहिजेत ह्मणून लिहिलें, तर आपणासीं करार केला त्यास अंतर होणार नाहीं. ऐवज करून पाठविलें जाईल. इंग्रेज बंद करावयास आपण ममईस जावें कीं काय? आज्ञा जाली तर जाऊं ह्मणून लिहिलें तर केवळ आपण जावें असा अर्थ नाहीं.[2] परंतु कार्य होय ऐसा विचार करावा. आणि जेणेंकडून इंग्रेज बंद होऊन शामलास मदत न करी, आपणास सलूख राखे, तें करावें. हें कार्य जालि-

---

१ छत्रपति शाहू महाराजांस एकंदर लग्नाच्या स्त्रिया चार होत्या, व राख एक होती. त्यांचीं पादशाही लष्करांत दोन लग्नें झालीं. रुस्तुमराव जाधव यांची कन्या अंबिकाबाई, व शिंदे यांची कन्या सावित्रीबाई. दुसऱ्या लग्नांत विरुबाई म्हणून एक स्त्री शिंदे यांनीं महाराजांस अंदण दिली, ती त्यांनीं राख म्हणून ठेविली होती. परंतु ती फार पवित्र व सदाचरणी बायको असल्यामुळें शाहू महाराजांची तिजवर फार प्रीति होती. महाराज दक्षिणेंत आल्यानंतर त्यांनीं कुवरजीराजे शिर्के यांची कन्या सखवारबाई व मोहिते यांची कन्या सगुणाबाई या दोन स्त्रियांबरोबर लग्नें केलीं. ह्यांपैकीं सखवारबाई, सगुणाबाई व विरुबाई यांची स्वामींवर फारच भक्ति होती हें त्यांच्या पत्रव्यवहारावरून दिसून येईल.

२ जंजिऱ्याच्या शिद्दीचें व मराठ्यांचें युद्ध चाललें असतां इंग्रजांनीं शिद्दीस न मिळतां मराठ्यांस साह्य करावें व तत्प्रीत्यर्थ स्वामींनीं इंग्रजांकडे प्रयत्न करावा अशाविषयीं हें पत्र आहे. ह्यावरून इंग्रजांकडेही स्वामींचें त्या वेळीं धोरण होतें असें दिसतें, व छत्रपतींच्या राण्या राजकारणामध्यें लक्ष्य पुरवीत होत्या हेंही व्यक्त होतें.

यावरी आपलें स्वहित आहे. याकरितां अंतराय न करणें. स्वामीं-प्रति विशेष काय लिहिणें. कृपा निरंतर असो दिजे हे विनंति.

[लेखांक १०] श्री.

तीर्थस्वरूप श्रीमंत परमहंस स्वामी स्वामींचे सेवेसी:—

अपत्यें सौभाग्यादिसंपन्न सखवारबाईसाहेब दंडवत विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकार्य लिहित गेलें पाहिजे. विशेष:-आपण पत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन लेखनाभिप्राय श्रवण जाहला. तेथें आज्ञा जे धामणी व सोनगांव ता० खेड प्राणवल्ली प्रांत राजापूर या गांवाच्या सनदा पाठवून देणें. तर आपलें मागें पत्र आलें त्यांत मजकूर लिहिला होता जे इंग्रजाची व आपली मैत्री[1] आहे. ऐसीयासीं प्रस्तुत राजश्री स्वामींनीं आज्ञा केली, त्यावरून राजश्री तुळाजी आंग्रे अंजन-वेलीस वेढा घालून बैसले आहेत. तर मैत्रीकीमुळें इंग्रजास सांगून शा-मलाची मदत न करीत तो अर्थ केला पाहिजे, ह्मणजे गांव लिहिल्या-प्रमाणें स्वामींकडे येतील. रुपयांचा मजकूर लिहिला तरी राजश्री स्वा-मींची प्रकृति बरी झाल्या उपरांतिक रुपये मागून घेऊन स्वामींचे पाठ-विले जातील. रजईचा मजकूर लिहिला तर प्रस्तुत जामदारखान्यांत शाल नाहीं. शाल मेळवून आज्ञेप्रमाणें रजई पाठविली जाईल. आज्ञेस अंतर होणार नाहीं. बहुत काय लिहिणें हे विनंति.

पाौ छ १७ सफर सन खमस.[2]

---

१ ह्या पत्रांत स्वामींची व इंग्रजांची मैत्री होती असा स्पष्ट उल्लेखच आहे.

२ पैवस्ती म्हणजे दाखल तारीख १७ सफर सन खमस ही आहे. ह्या-वरून ता० ८ जुलई सन १८३४ ही तारीख असावी. अंजनवेल सर केल्याचा उल्लेख पुढील पत्रीं आहे. त्यावरून त्या पूर्वींचें हें पत्र आहे.

[लेखांक ११] श्री.

तीर्थस्वरूप राजश्री परमहंस स्वामी स्वामींचे सेवेसी:—

अपत्यें सौभाग्यादिसंपन्न सखवारबाईसाहेब दंडवत विनंति उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लेखन करीत असलें पाहिजे. यानंतर येथील वर्तमान तर जंजीरे अंजनवेली येथें मोर्चेबंदी करून जेर केली आणि माघ[1] शुद्ध द्वितीया बुधवारीं किल्ला फत्ते केला. दोनतीनशें माणूस शामलाकडील ठार झाले. व आपणाकडीलही थोडीं बहुत माणसें घोडीं ठार झालीं. ईश्वरें कार्य सिद्धीस नेलें. हें संतोषाचें वर्तमान स्वामींस कळावें यास्तव लिहिलें आहे. बहुत काय लिहिणें हे विनंति.

[लेखांक १२] श्री.

तीर्थस्वरूप श्री परमहंस स्वामींचे सेवेसी:—

अपत्यसमान सौभाग्यादिसंपन्न सखवारबाई व सौ० सगुणाबाई दंडवत विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करीत गेलें पाहिजे. यानंतर स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट जालें. लिहिलें कीं चिरंजीव राजश्री फत्तेसिंगदादा[2] याचे भेटीस गेलों होतों. भेट जाली. बहुत सन्मान करून पूजा केली. हत्ती घोडे पालखींत बैसऊन आज्ञा दिली. सोमवारीं धावडसीस आलों; व चिमणाजीपंतदादा[3] यास देवाज्ञा जाली. त्याच्या चिरंजीवाचा परामर्ष करावा ह्मणोन लिहिलें. ऐशास चिरंजी-

---

१ माघ शुद्ध द्वितीया बुधवार म्हणजे ता० १५ जानेवारी इ. स. १७३५.

२ फत्तेसिंगदादा:—फत्तेसिंग भोंसले अक्कलकोटकर.

३ चिमणाजीपंत दादा:—चिमणाजी कृष्ण भागवत. स्वामींचे परमविश्वासू शिष्य व मुख्य कारकून हे इ. स. १७४१ मध्यें मृत्यु पावले. त्यावरून हें पत्र त्या सालचें असावें.

वांचे भेटीस गेलां, उत्तम केलें. त्यांनीं स्वामींची पूजा सन्मानेंकडून केली. यावरून चित्तास बहुत आनंद जाला. तुह्मां महापुरुषांची पूजा न करीत तर कोणाची करतील ? चिमणाजीपंताचें वर्तमान तर दैवी गतीस इलाज आहे ऐसें नाहीं ! त्याच्या चिरंजीवाचे परामर्षास अंतर होणार नाहीं. वरकड संतानवृद्धीचा मजकूर लिहिला तर आपली निष्ठा स्वामींच्या पायांसीं दृढतर, आणि आपली कृपा आमचे ठायीं, ते अन्यथा होईल ऐसें नाहीं. आपले आशीर्वादेंकडून फलात्कारही होईल. प्रसाद श्रीफल दोन, साखरपुडा एक पाठविला तो पावला. अत्यादरें मस्तकीं वंदून स्वीकार केला. निरंतर आशीर्वादपत्रीं सांभाळ केला पाहिजे. बहुत काय लिहिणें कृपा निरंतर असों दिजे. हे विनंति.

[लेखांक १३] श्री.

श्रीमंत तीर्थस्वरूप परमहंस बावा स्वामींचे सेवेसी—

अपत्यें सौभाग्यादि संपन्न सगुणाबाई चरणावरी मस्तक ठेवून दंडवत प्रणाम विनंति उपरी येथील कुशल माघ बहुल नवमी पावेतों स्वामींचे आशीर्वादें क्षेम जाणोन स्वकीय कुशल लेखन करीत असलें पाहिजे. विशेष स्वामींनीं आमची शपथ क्रिया घेऊन जे आज्ञा केली त्या शपथेप्रमाणें आज तागायत आपणाजवळून कांहीं अंतर पडों दिल्हें नाहीं. त्याकडून जें अंतर पडावयाचें तें पडत गेलें. परंतु कांहीं स्वामींच्या आज्ञेप्रमाणें अंतर पडों दिलें नाहीं. याउपरी आह्मी केल्या शपथाप्रमाणें उतराई जालों. उपरी आमची क्रिया सुटली. आह्मांस मोकळीक करून उत्तर पाठविलें पाहिजे. हें पत्र एकांतीं वाचून आपले चित्तांतच गोष्ट असों द्यावी. कागद फाडून टाकिला पाहिजे. बहुत काय लिहिणें हे विनंति.

[लेखांक १४] श्री.

तीर्थस्वरूप श्री परमहंस स्वामींचे सेवेसीः—

अपत्यें सौभाग्यादिसंपन्न विरुबाई साष्टांग दंडवत विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लिहिलें पाहिजे. विशेष स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन अक्षरशः श्रुत झालें. कितेक दृष्टांत देऊन लिहिलें तर हे गोष्टी यथार्थच आहे. आह्मांस स्वामीं-पेक्षां अधिकोत्तर काय आहे? राजश्री बाजीराव पंडित प्रधान यांचे मातुश्रींनीं आह्मांस सोवळें दिलें तें स्वामींकारणें राजश्री येसाजी महादेव कारकून जामदारखाना याजबरोबरी पाठविलें आहे. घेऊन पावल्याचें उत्तर पाठविणें. माटेचें बीज व पोकळ्याचें बीज पाठविलें, तें प्रविष्ट जालें. जाणिजे. बहुत काय लिहिणें कृपा निरंतर असों दिजे हे विनंति.

हे।। अपत्यें बसवंतराव दंडवत विनंति लिहिली परिसीजे. लोभ असो दिजे हे विनंति.

[लेखांक १५] श्री.

तीर्थस्वरूप राजश्री परमहंस बावा स्वामींचे सेवेसी.—

विनंती अपत्यसमान सौभाग्यादिसंपन्न सगुणाबाई दंडवत विनंति येथील कुशल ता। छ २० रजब पावेतों स्वामींच्या आशीर्वादेंकरून यथास्थित जाणून स्वकीय लेखन करावयासी आज्ञा केली पाहिजे. विशेष, मौजे रिळे ता॰ शिराळे हा गांव राजश्री येसाजी भोंसले यांनीं श्रीकडे दरोबस्त दिल्हा आहे, तेथें सरदेशमुखी व साहोत्रा याचा उपद्रव होता तो दूर करणें ह्मणून आज्ञा केली. तरी स्वामींनीं एक माणूस तेथें ठेवून यांजकडून रोखे येतील ते माघारे टाकावे. तेथून त्याचा बोभाटा आला ह्मणजे त्यास आज्ञा करणें ते केली जाईल. ये गोष्टीचें कांहीं अगाध आहे असें नाहीं. बहुत काय लिहिणें हे विनंति.

[लेखांक १६] श्री.

श्रीमत् परमहंस राजश्री बावा स्वामींचे सेवेसी.—

सौभाग्यादिसंपन्न मातुश्री बाईसाहेब[1] दंडवत प्रणाम विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लेखन केलें पाहिजे विशेष. आपण श्रावण शुद्ध चतुर्थीस समाधीस बैसलां, त्यास कोणे दिवशीं उठणार तें लिहिलें पाहिजे. आमचे शरीरीं आपण येथें आलें होतें ते समयीं आरोग्य नव्हतें तैसें हल्लीं जाहलें आहे. आपले आशीर्वादेंकरून आरोग्य होईल. चिंता न करणें. आपण कोणे दिवशीं कोणी वेळेस समाधींतून बाहेर येणार तो दिवस लेहून पाठवावयास आज्ञा केली पाहिजे. जो दिवस नेमला असे ते दिवशीं पालकी पाठविली जाईल. पालकी पाठवून धावडशीस मठीस पाविली जाईल. बहुत काय लिहिणें हे विनंति.

## कोल्हापुरकर ताराबाई व संभाजी.

[लेखांक १७] श्री.

श्रीमत् हरिभक्तिपरायण राजमान्य राजश्री स्वामी वडिलांचे सेवेसीः—

प्रति श्रीमन् मातुश्री ताराबाईसाहेब[3] क्षेम उपरी वडिलांकडील बहुत दिवस खबर बखर कळों येत नाहीं. तरी वडिलीं ऐसें न करावें. आह्मांकडील वर्तमान तरी वडिलांस परस्परें विदित जाहलेंच असेल. परंतु

---

१ बाईसाहेबः—राणी सखवारबाई किंवा सगुणाबाई ह्यांपैकीं एक असावी.

२ स्वामी समाधीस बसले म्हणजे समाधि समाप्त होईपर्यंत त्यांची कोणाची भेट होत नसते. समाधि समाप्त झाली म्हणजे त्यांस समारंभेंकरून पालखींत बसवून धावडशीच्या मठांत नेत असत. ही पालखी सातारच्या महाराजांकडून जात असे.

३ ताराबाईः—राजारामाची बायको व कोल्हापूर संस्थानची मूळस्थापना करणारी सुप्रसिद्ध ताराबाई (इ. स. १७००–इ. स. १७६१). हिचीही स्वामींवर भक्ति असून तिचा स्वामींशीं पत्रव्यवहार होता असें दिसतें.

वडिलांस आमचें वर्तमान निवेदित व्हावें. याबद्दल मुजरत आप्पाजी कृष्ण व हुजरे ऐसे पाठविले आहेत. हे वडिलांस स्वमुखें निवेदन करतील. तीं आमचे मुखचीं वचनें ऐसीं जाणोन, वडिलीं सविस्तर चित्तांत आणोन, आपले मनीं गोष्ट ठेविली पाहिजे. जो धंदा एक दोन वेळां केला, परंतु ती गोष्टी साधोन आली नाहीं. तेंही विदित जाहलेंच असेल. बरें, होणार तें समयीं होईल. आपला आशीर्वाद मस्तकीं आहे तों कांहीं आपणास कोणे गोष्टीची चिंता आहे असें नाहीं. प्रस्तुत खर्चाची प्रतिकूलता नाहीं तरी वडिलीं खर्चाची पोक्ती बेगमी व सकलादची पासोडी एक व बारीक लांब रुंद नेसावयाचे शेले दोन ऐसे देऊन मशारनिल्हेची रवानगी करून सत्वर पाठविले पाहिजे. बिगर वडिलांचे प्रासादिक वचनावांचून आपलें कांहीं बरें होतें ऐसें कांहीं नाहीं. आपले चित्तांत गोष्टी ठेविली पाहिजे. इतक्या उपरी वडिलांच्या चित्तास येईल तें केलें पाहिजे. आजिपावेतों वडिलांस संकट घातलें नव्हतें. बहुत लिहिणें तरी आपण वडील सुज्ञ असा.

[लेखांक १८] श्री.

श्रीमंत परमहंस परिव्राजक धर्मविराजमान एकनेमप्राणायामप्रत्याहारादिअष्टांगयोगसिद्धिसंपन्न भार्गवराम परमहंस स्वामीचरणारविंदाप्रतिः—

अपत्यें संभाजी[१] राजे दंडवत प्रणाम विज्ञापना अत्रत्य कुशल माघ शुद्ध द्वितीया भोमवासरपर्यंत स्वामींचे कृपावलोकनेंकडून समस्त कुशल असे. स्वामींनीं पूर्ण कृपेकडून सर्वदा आशीर्वादपत्र प्रेषून परामर्ष करीत गेलें पाहिजे. विशेष मौजे मुंढवे ता॥ हवेली पुणें येथील पाटीलकी पुरातन गायकवाड यांची, त्याप्रमाणें हल्लीं चालत आहे व राजश्री यशवंतराव गायकवाड येथें सेवाही करितात. ऐसीयास

१ संभाजी राजेः—कोल्हापूरकर. कारकीर्द इ. स. १७१२ पासून इ. स. १७६० पर्यंत.

प्रस्तुत गायकवाड यांणीं विदित केलें कीं स्वामीपासीं सोनजी लोणकर जाऊन हयाल जाहला आहे. "आपण मौजे मुंडवेचे पाटील. आपला उच्छेद गायकवाड यांणीं करून वतन अनुभवितात. स्वामींनीं आपले विसीं राजश्री बाजीराव प्रधान यांस सांगून त्यांचे हातीं देऊन आपले स्थापना वतनावरी करावी" ह्मणून निवेदन केलें तें स्वामींस प्रमाण वाटलें. स्वामींची स्वाभाविक चिंता की जे विनंती करतील त्यांचें साहित्य करावें. त्याअर्थी त्याचेविसीं राजश्री बाजीराव यांस सांगोन हातीं दिल्हें. ऐशास त्याचा कजिया वतनदारीचा पूर्वोत्तर स्वामींस न कळला. त्या लोणकरी याच्या सांगण्यावरून स्वामींनीं साहित्य केलें. तरी लोणकर पुरातन कुणबी गायकवाड याच्या आजांनीं गांवीं आणून ठेविला. बारा रुपयांचें शेत व घर देऊन दिवाणचा वहसूल करून रहा ह्मणून ठेविला. त्याप्रमाणें चालत असतां कितीक दिवसांनीं लोणकर आपली पाटिलकी ह्मणून कजिया करूं लागला आणि राजश्री बाजीराव प्रधान यापासीं जाऊन हयाल झाला. तेव्हां गायकवाडही बाजीरावाकडे जाऊन आपली पाटिलकी लोणकर आपला ठेवणाईत कुणबी आहे, सर्वांचे ग्वाही साक्षीनें रास्त न्याय करा; ह्मणून बोलिले. त्यावरून बाजीराव याणीं प्रांत मजकूरचे देशमुख देशपांडे व गांवगन्नाचे पाटिल वतनदार जमा करून त्यांस येविसींचा हरएक निवाडा करावयास सांगितलें. त्यांनीं गायकवाड व लोणकर याचे पूर्वोत्तर मनास आणून व गायकवाड यांचे पूर्वील महजर कागदपत्र पाहून निवाडा करितां गायकवाडची पाटीलकी खरी. यांणीं लोणकरास शेत व घर देऊन कुणबी ठेविला त्यास संबंध नाहीं ऐसें जाहलें. त्याप्रमाणें बाजीराव प्रधान यांणींही खरेंखुरें ऐसें मनांत आणून गायकवाडास पाटीलकीचीं पत्रें दिल्हीं. गोताचा महजर दिल्हा. दिवाणाचीं पत्रें दिल्हीं. पाटीलकी गायकवाड अनुभवितात. हें वृत्त स्वामींस विदित नव्हतें. ऐसें असोन

लोणकरानें आपणाजवळ प्रसंग केला. त्यावरून त्याची निर्वाण आपण बाजीरायास केली तरी त्याचा विचार या प्रकारचा आहे. पाटीलकी गायकवाड याचीच खरी आहे. यशवंतराव गायकवाड येथें सेवा करीत आहेत आणि ज्यापेक्षां हें पत्र लिहिलें असे तरी लोणकराचे सांगण्यावरून अन्यथा गोष्टी आपण चित्ताला न आणावी. त्यास निराकरण करून सांगोन, तो फिरोन गायकवाड याचे पाटीलकीची चर्चा न करी ऐसें करावें. व बाजीराव प्रधान यांसही सांगोन पूर्वीं त्यांणीं निवडलें आहे त्याप्रमाणें लोणकरास देवून वर्तवीत ऐसें करणें. सर्व न्यायनीत आपण जाणत असतां आह्मीं तपशीलें आपणास ल्याहावेंसें काय आहे? बहुत लिहिणें तरी आपण सुज्ञ आहेती. हे विनंति.

# पेशवे.

## बाळाजी विश्वनाथ पेशवे.

[लेखांक १९] श्री.

श्रीमंत परमहंस भृगुनंदनस्वरूप स्वामींचे सेवेसी.—

चरणरज बाळाजी[1] विश्वनाथ कृतानेक नमस्कार विनंति आत्रत्य कुशल स्वामींचे आशीर्वादें ताा वैशाख शुद्ध सप्तमी रविवासर पावेतों

---

१ बाळाजी विश्वनाथ पेशवे हे सातान्यास येऊन प्रधानपदारूढ होण्यापूर्वीं चिपळुणास मीठबंदरावर हबशाचे तर्फे कारकून होते. त्या वेळीं ब्रह्मेंद्रस्वामी चिपळुणाजवळील परशराम नामक गांवीं असत. त्यांच्यावर बाळाजी विश्वनाथाची परम भक्ति होती व त्यांच्याच आशीर्वादप्रसादानें त्यांस पेशवाईचीं वस्त्रें मिळालीं. स्वामींचा व बाळाजी विश्वनाथांचा पत्रव्यवहार फार महत्वाचा असला पाहिजे, परंतु तो उपलब्ध नाहीं ही दिलगिरीची गोष्ट होय. आह्मांस त्यांचें फक्त हें एकच पत्र मिळालें आहे.

मुक्काम किल्ले लोहगड[1] यथास्थित जाणोन स्वकीय स्वानंदलेखनाज्ञा केली पाहिजे. विशेषः—श्रीचा ऐवज[2] चिरंजीव राजश्री बाजीरावाकडून देववून हवाला घातला आहे. त्यास सांप्रत राजश्री[3] व चिरंजीवांचे[4] लग्न-प्रसंगामुळें वोढीचा अर्थ जाला आहे तो पत्रीं ल्याहावासा नाहीं. ऐसी-यास सांप्रत चिरंजीवाकडून ऐवज मोहरा २५ सोनजी दळवी याज-बराबरी रवाना करविला तो ते रवाना करतील. तो घेऊन पावल्याचें आशीर्वादपत्र पाठविलें पाहिजे. बाकी ऐवजही सत्वरींच रवाना केला जाईल. श्रीचे कार्यास आह्मांपासून अंतराय होणार नाहीं. विदित जालें पाहिजे. आह्मी स्वामींचे पदरींचे आहों. सर्व प्रकारें दया करून आशी-र्वादपत्रीं परामर्ष घेत गेलें पाहिजे. कृपा केली पाहिजे. [5]सेवेसी विज्ञप्ति.

---

१ लोहगड पुणें जिल्ह्यांत खंडाळ्यापासून ८ मैलांवर आहे. हा जुनाट किल्ला ब्राह्मणी राज्यापासून इतिहासप्रसिद्ध आहे. हा शिवाजीनें इ. स. १६४८ मध्यें घेतला परंतु पुनः तो औरंगजेबाकडे परत गेला. परंतु मराठ्यांनीं पुनः हस्तगत केला. हा इ. स. १७१३ मध्यें कान्होजी आंग्र्यापासून बाळाजी विश्वनाथाकडे आला. येथें बाळाजी विश्वनाथ राहत असे.

२ श्रीचा ऐवजः—स्वामी संकटप्रसंगीं पेशव्यांस व इतर सरदारांस दे-वाच्या नांवानें कर्ज देत असत त्या पैशास 'श्रीचा ऐवज' ह्मणत. पेशव्यांच्या दप्तरीं स्वामींकडील कर्जाचा हिशोब श्रीभार्गवराम देवाच्या नांवानेंच चालत असे.

३ राजश्री–शाहुमहाराज.

४ चिरंजीव–लग्नप्रसंगाचा संबंध दिसतो. त्याअर्थीं चिमाजीआपांचें लग्न असावें.

५ शेवटच्या दोन तीन वाक्यांवरून बाळाजीची स्वामींविषयींची निष्ठा व्यक्त होते.

## राधाबाई[1].

[लेखांक २०] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंस स्वामींचे सेवेसीः—

आज्ञाधारक राधाबाई कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील क्षेम ता॰ माघ शुद्ध नवमी पावेतों स्वामींचे कृपावलोकनेंकरून समस्त क्षेम असों विशेष. स्वामींनीं पत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन परम संतोष जाहला. असेंच सदैव आशीर्वादपत्र पाठवून परामर्ष केला पाहिजे. स्वामींचें आज्ञापत्र सादर जाहलें. तेथें आज्ञा कीं, सोवळ्यांत पांघराव-यास दुलई सोवळ्याची उत्तम हिंवाळाप्रावर्णास पाठवून देणें ह्मणून आज्ञा. आज्ञेप्रमाणें पशमी दुलई, अस्तर ताफत्याचें, संजाब ताफत्याचा सोमाजीचे गुजारतीनें तयार करून सेवेसी पाठविली आहे. अंगीकार करावयासी स्वामी समर्थ आहेत. चिरंजीवास तिळगुळ व पत्रें पाठ-विलीं तें आज्ञेप्रमाणें रवाना करितों. चिरंजीवास अहोरात्र आशीर्वाद द्यावा, आणि शत्रुपराभव होय तो अर्थ करावा. चिरंजीव राजश्री रायांकडील[2] पत्र आलें, तें आपणाकडे पाठविलें असे. श्रवण करून पत्र माघारें पाठविलें पाहिजे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक २१] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंस स्वामींचे सेवेसीः—

आज्ञाधारक राधाबाई कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल तागाईत माघ शुद्ध एकादशी पावेतों स्वामींचे कृपेंकरून समस्त

---

१ राधाबाईः—बाळाजी विश्वनाथ यांची बायको. ही मल्हार दादाजी बर्वे यांची कन्या. ही फार शहाणी व चतुर बायको होती. हिची स्वामिचरणीं दृढभक्ति होती, असें या व पुढील पत्रांवरून व्यक्त होतें.

२ रायाकडील—बाजीरावांकडील. बाजीरावांस 'राव' किंवा 'राय' असेंच ह्मणत असत.

क्षेम असों विशेष. चिरंजीव राजश्री रायाचीं व राजश्री आपाचीं पत्रें काल तृतीय प्रहरीं आलीं............उत्तम आहे............स्वामींचे सेवेसी पाठविलीं आहेत. त्यांवरून सविस्तर निवेदन होईल. अहोनिरंतर आशीर्वादांचा वर्षाव करून, उभयतां चिरंजीव यशस्वी होऊन.... येत, तो अर्थ करणार स्वामी समर्थ आहेत. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.[1]

[लेखांक २२] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा सेवेसीः—

चरणरज राधाबाई साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान तागाइत माघ बहुल तृतीया पावेतों स्वामींच्या आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. चिरंजीव राजश्री रायाचीं व राजश्री आपाचीं पत्रें आलीं, त्यांची नकल करून स्वामींकडे पाठविली आहे. त्यावरून सविस्तर निवेदन होईल. सारांश, स्वामींच्या आशीर्वादाचा महिमा थोर, तन्मुळें सर्व गोष्टी अनुकूल आहेत. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.[2]

[लेखांक २३] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

विनंति राधाबाई विज्ञापना. येथील कुशल स्वामींचे आशीर्वादेंकरून असे विशेष. पत्र पाठविलें तें पावलें. पांचा व घोडी पाठवून द्यावयाविसीं लिहिलें, ऐशास आपा असतां हा कारभार जाहला होता. पांचा कोण्हाकडून आणविल्या होत्या किंवा नव्हत्या, आह्मांस ठावकें नाहीं. स्वामींनीं चार रोज कृपा करावी. चिरंजीव राजश्री नाना स्वारी-

---

१ हें पत्र किरकोळ आहे, तथापि ह्यावरून स्वामींच्या आशीर्वादाची योग्यता पेशव्यांच्या बायकांस देखील किती वाटत होती हें व्यक्त होतें.

२ मागील पत्रासारखेंच हें पत्र आहे.

हून आलियावर, स्वामी आज्ञा करितील त्याप्रमाणें तो वर्तणूक करील. आपण नानास[1] व वरकड मुलांस आशीर्वाद पूर्ण देऊन, झाडें लावून फळें घ्यावीं. या प्रसंगीं हे गोष्ट थोर आहे. आह्मीं लिहावें असें नाहीं. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[ लेखांक २४ ] श्री.

श्रीमत् महाराज श्री स्वामींचे सेवेसी:—

चरणरज राधाबाई विज्ञापना तागाइत जेष्ठ शुद्ध दशमी पावेतों वर्तमान यथास्थित असे विशेष. चिरंजीव राजश्री बाजीरायाकडील पत्रें आलीं, त्यांची नक्कल करून सेवेसी पाठविली आहे. त्यावरून सविस्तर वर्तमान विदित होईल. चिरंजीव राजश्री चिमाजींनीं गोवाई[2] आंबे आह्मांस पाठविले; त्यांपैकीं जासुदाबरोबर आंबे १० दहा स्वामीकारणें पाठविले आहेत. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[ लेखांक २५ ] श्री.

श्रीमत् श्री परमहंस स्वामींचे सेवेसी:—

चरणरज राधाबाई साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान ताा कार्तिक बहुल द्वादशी मंगळवार सायंकाल दीड प्रहर रात्रीपावेतों स्वामींचे आशीर्वादें यथास्थित असे विशेष. चिरंजीव राजश्री आपा प्रस्था XXXXX परतीरीं गेले होते. त्यास बृहस्पतिवारीं सतमीस दहा घटका रात्रीस वेथा बहुत जाहली. उपरांत सावध जाहल्यावर प्रातःकालीं दोन घटिका रात्रीस पालखींत घालून घरास आणिलें. नालगुताची वेथा जाहली ह्मणोन उपाय करीत आहों. व वैद्यही पांच सात आहेत. तेही उपाय करितात. स्वामींनीं ईश्वरापाशीं संकट घालून चिरंजीवास

---

१ नाना—राधाबाईचा नातू—बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब.

२ गोवाई—गोमांतकी—गोव्याचे आंबे माधुर्य, स्वाद व रुचि ह्यांविषयीं प्रसिद्धच आहेत.

आरोग्य होय तो उपाय करणार स्वामी समर्थ आहेत. साकल्यवृत्त राजश्री जगजीवनपंत निवेदन करितां विदित होईल. बहुत काय लिहावें, स्वामी अंतरसाक्ष आहेत हे विज्ञापना.

## बाजीराव.

[ लेखांक २६ ] श्री.

महाराज परमहंस श्री स्वामींचे सेवेसीः—

चरणरज बाजीराव बल्लाळ प्रधान कृतानेक विज्ञापना. येथील क्षेम श्रीकृपें ताा छ० ५ सवाल[1] नजीक डभोई[2] यथास्थित असे. येथील वर्तमान तरी त्रिंबकराव[3] दाभाडे व उदाजी[4] व आनंदराव पवार व कंठाजी

१ छ ५ सवाल ह्मणजे ता० २ एप्रिल सन १७३१, रोज शुक्रवार चैत्र शुद्ध ७ शके १६५३.

२ डभोईः—हें गांव बडोद्याजवळ आहे. बडोदा-ग्याझिटियरमध्यें ज्या ठिकाणीं लढाई झाली त्या गांवाचें नांव भिलापूर असें दिलें आहे.

३ त्रिंबकराव दाभाडेः—हा सेनापति खंडेराव दाभाडे यांचा पुत्र. ह्यास सेनापतिपदाचीं वस्त्रें शाहू महाराजांकडून इ. स. १७२१ च्या भे महिन्यांत मिळालीं होतीं. गुजराथची चौथसरदेशमुखी सरबुलंदखानाकडून बाजीरावांस मिळाल्यापासून तो त्यांचा द्वेष करीत होता. निजामानें ही संधि पाहून त्यास अनुकूल करून घेतलें. त्यामुळें तो सैन्य जमवूं लागला व लोकांमध्यें असें प्रसिद्ध करूं लागला कीं, "आमचा धनी मराठा, त्याचें राज्य बाजीरावानें घेतलें. तें त्याचें त्यास द्यावयास जातों." त्यावरून बाजीरावानें त्यावर स्वारी करून डभोई येथें त्याचा पराभव केला.

४ उदाजी व आनंदराव पवारः—हे सख्खे बंधु. त्यांच्या वडिलांचें नांव संभाजी. हे शाहू महाराजांच्या कारकीर्दींत उदयास आले. त्यांपैकीं आनंदराव पवार ह्याचें व पेशव्यांचें पुढें सख्य झालें व त्यास गुजराथ व माळवा प्रांताच्या चौथसरदेशमुखीच्या वसुलाचें काम मिळालें. ह्यानें इ. स. १७३४ नंतर धार येथें आपलें कायमचें ठाणें केलें. हा इ. स. १७४९ मध्यें मृत्यु पावला. उदाजीच्या मृत्यूचा सन बरोबर समजत नाहीं. परंतु तो पुढें लवकरच कैदेंतून सुटून मलठण येथें आला व तेथें मृत्यु पावला.

रघुजी कदम व पिलाजी[1] गायकवाड व चिमणाजीपंत[2] दादा असे तीस पस्तीस हजार फौजेनिशीं आह्मांसीं युद्धास आले. छ० ४ सवालीं युद्ध जाहलें. त्रिंबकराव दाभाडे व जावजी दाभाडे व मलोजी पवार व पिलाजी गायकवाडाचा पुत्र ऐसे चौघे ठार जाहले. उदाजी पवार व चिमणाजीपंत पाडाव जाहले. आनंदराव पवार व पिलाजी गायकवाड व कुंवरबहादर जखमी होऊन पळून गेले, व बांडे पळाले. फौज लुटली. हत्ती पाडाव केले. सारांश स्वामींचे आशीर्वादें फत्ते जाहली. आपणांस कळावें यास्तव लिहिलें आहे. निरंतर स्वामींचें चिंतन करीत असों. सदैव पत्रीं परामृष केला पाहिजे. आपणांकडील नारायणजी ढमढेरे ठार पडले व आणखीही कित्येक लोक पडले व जखमी जाहले; परंतु कार्य जाहलें. कळलें पाहिजे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक २७] श्री.

श्रियासह[3] चिरंजीव राजश्री आपा यांसी:—

बाजीराव बल्लाळ आशीर्वाद उपरी येथील कुशल तागाईत

---

१ पिलाजी गायकवाडः—बडोद्याच्या गायकवाडांचा मूळपुरुष दमाजी गायकवाड याचा पुतण्या (इ० स० १७२२–इ० स० १७३२).

२ चिमणाजीपंत दादाः —इतिहासामध्यें चिमणाजी दामोदर ह्या नांवानें हा प्रसिद्ध आहे. शाहू महाराजांस प्रारंभीं ज्या पुरुषांनीं साह्य केलें त्यांपैकीं हा एक होय. याजकडे पागा बरीच होती. ग्रांटडफनें ह्याजबद्दल "He was a very active marauder" असें मोघम लिहिलें आहे.

३ हें पत्र बाजीराव पेशव्यांनीं चिमाजीआपांस लिहिलें आहे. तें चिमाजीआपांनीं स्वामींच्या अवलोकनार्थ जसेंच्या तसेंच पाठविलें आहे. हें व बाजीरावांचीं दुसरीं पत्रें स्वामींस पाठविल्याबद्दल चिमाजीआपांच्या पत्रांत उल्लेख आहे. (तें पत्र चिमाजीआपांच्या पत्रांमध्यें दिलें आहे.) बाजीरावांकडून किंवा चिमाजीआपांकडून स्वारींतून वगैरे जीं पत्रें सातारकर महाराजांस किंवा पुण्यास येत असत, तीं स्वामींच्या अवलोकनार्थ जशींच्या तशींच पाठविण्याचा परिपाठ होता.

वैशाख[1] वद्य छ. १५ जिल्हेज मु॥ नजीक सवाई जयनगर[2] जाणून स्वकीय कुशल लिहित जाणें विशेष. बुनगे बुंदेलखंडाचा राजा जगतराज[3] याचे हवालीं करून, बुंदेलखंडांत रवाना करून, आह्मी सडे जाइलों. याचें वृत्त सादतखानाचें[4] युद्ध होऊन सरदार आलियाचें वर्तमान विस्तारें लेखन करून चतुर्भुज कासिदांबरोबर पत्रें पाठविलीं. तीं पावोन सविस्तर कळलेंच असेल. सादतखान यमुना उतरोन आगरियासी आला. त्यासी गांठ घालावी तरी तो आगरियाचा आसरा करून राहिला. तेथें जाऊन युद्ध करावें तरी तो आश्रियाचा असतां मोडेल न मोडेल कळतच आहे.

---

१ वैशाख वद्य ८ जिल्हेज:—ता० १५ मे इ० स० १७३४, बुधवार शके १६५६.

२ सवाई जयनगर:—राजपुतान्यांतील सुप्रसिद्ध जयपूर शहर. हें सवाई जयसिंगानें इ० स० १७२८ मध्यें वसविलें; ह्मणून त्यास सवाई जयनगर अथवा जयनगर असें नांव पडलें आहे. हें शहर फार प्रेक्षणीय आहे.

३ जगतराज:—बुंदेलखंडांतील छत्रसाल राजाचा दुसरा मुलगा. हा बाजीरावास आपला भाऊ समजत असे. ह्यानें बुंदेलखंडांत जेतपूर येथें गादी स्थापन केली. हा मराठ्यांच्या सर्व मसलतींत सामील असून तो त्यांना वारंवार लागेल तें साह्य करीत असे. तो इ० स० १७५८ मध्यें मृत्यु पावला. सध्या बुंदेलखंडांत चरखारी ह्मणून जें संस्थान आहे तें याच्या वंशजांची एक शाखा होय.

४ सादतखान:—हा मूळचा खुरासान प्रांतांतला व्यापारी. ह्याचें नांव महंमद अमीन. हा स्वतःच्या कर्तबगारीनें दिल्ली दरबारांत योग्यतेस चढला. इ० स० १७२४ मध्यें त्यास राजा गिरिधराच्या मागून अयोध्येची सुभेदारी मिळाली. नंतर त्यास बऱ्हाणउल्‌मुल्क ही पदवी मिळाली. ह्याचें व मराठ्यांचें फार वैर असे. हा नादिरशहाच्या लढाईमध्यें ता० ९ मार्च इ० स० १७३९ मध्यें मारला गेला. ह्याच्या मागून त्याच्या भावाचा मुलगा अबदुल मनसुरखान सफदरजंग हा अयोध्येचा सुभेदार झाला.

जरी गंभीरे[1] यमुनेच्या संगमीं दिल धरून रहावें तरी ते जागा जवून कों-त र खळ्या फार. खानडवरा[2] व महमदखान[3] बंगस वगैरे दिल्लीहून आगरियास येत होते व सादतखान एक जालिया मनसबा भारी प-डेल. याजकरितां संगमीं राहणें उत्तम नव्हे. दुसरें, सादतखानांनीं पाद-शाहास व खानडवरा व कमरदीखान वगैरे अमिरांस लेहून पाठविलें कीं, "मराठीयांची फौज यमुना उतरोन आली होती ते बुडविली. दोन हजार स्वार मारिले, व दोन हजार नदींत बुडाले. मल्हारजी होळकर व विठोबा बुळे कामास आले. बाजीराव याची धाड आली होती, तिची गत हे जाहली. त्याचे फौजेंत बाकी राहिली नाहीं. आ-पण यमुना उतरोन मराठे बुडवून चमेली[4] पार करितों." ह्मणून

---

१ ही भरतपूर संस्थानांतून येऊन यमुनेस मिळणारी एक नदी आहे.

२ खानडवरा:—खानदौरान—ह्याचें मूळचें नांव अबुदल सामदखान असें Beale's Biographical Dictionary मध्यें दिलें आहे. परंतु मि० आयर्हिन ह्यांनीं ख्वाजा महमद आशीम असें नांव लिहिलें आहे. ह्यास जहांदरशहाच्या कारकीर्दींत ७००० स्वारांची मनसब मिळाली. महमदशहानें त्यास आश्रफखान व नंतर शमशामउद्दौला, खानदौरान, मनसुरजंग बहादुर अशा किताबती दिल्या होत्या. परंतु मराठे त्यास खानडवरा किंवा खानदौरा असें ह्मणत असत. हा फार प्रौढ व भला मनुष्य होता. हा मराठ्यांशीं गोडी-गुलाबीनें वागत असे. हा नादिरशहाच्या दंगलीमध्यें ता. २३ फेब्रुवारी इ० स० १७३९ मध्यें जखमी झाला व ता० २७ रोजीं मृत्यु पावला. त्या वेळीं याचें वय ६८ वर्षांचें होतें.

३ महमदखान बंगष:—हा अलाहाबादचा सुभेदार असतां ह्यानें बुंदेलखं-डच्या छत्रसाल राजास मनस्वी त्रास दिला; ह्मणून बाजीरावांनीं इ. स. १७२९ मध्यें त्यावर चालून जाऊन त्याचा पूर्ण पराभव केला होता.

४ चमेली:—मध्यहिंदुस्थानांतील एक नदी. ही चंबळा ह्या नांवानें प्र-सिद्ध आहे. ही विंध्यपर्वतांतून निघून यमुनेस मिळते.

कित्येक गप्पा लेहून पाठविल्या. पादशाहासी मजुरा करून घेतला. पादशाहांनीं खुशाली करून सादतखानास वस्त्रें व मोत्यांची माळ व हत्ती व शिरपांव पाठविला. व वकिलासही शिरपांव दिला. आपली बाजू सेर करून घेतली. वरकडही अमिरांस कित्येक प्रकारें धि:कारून लिहिलें. तें वृत्त राजश्री धोंडो[1] गोविंद यांणीं वरचेवर लिहून पाठविलें. तात्पर्यार्थ, आमचे फौजेंत जीव नाहीं; केवळ निर्जीव; बुडवून नस्तनाबूत केली; असें लिहीत. (लपंडाव ?) करून दाखविले. मोंगली कारभार आपण ऐकत जाणतच आहेत. करावें थोडें लिहावें फार. पादशाहास सत्य भासलें. तें मिथ्या केलें पाहिजे. त्याचे विचार दोन:–एक सादतखानास बुडवावें किंवा दिल्लीस जाऊन दिल्लीचें पूर जाळावें. तेव्हां मिथ्या होईल. त्यास सादतखान आगरें सोडीनासें देखोन आह्मी दिल्लीस जावयाचा निश्चय केला. पूर[2] जाळावें व मराठे आहेत असें पादशाहास अवलोकन करावें ऐसा विचार करून, छ० २६ जिल्कादीं[3] कुच करून, पादशाही रस्ता सोडून, लांब लांब मजला करून, दमनसिंग[4] चूडामण जाट याचे

---

१ धोंडो गोविंद:—पुरंदरे, पेशव्यांचे दिल्लीचे वकील.

२ हे शब्द ग्रांटडफ साहेबांनीं आपल्या इतिहासांत अक्षरश: भाषांतर केले आहेत:—" I was resolved " says Bajee Rao "to tell the Emperor truth, to prove that I was still in Hindostan, and to show him flames and Mahrattas at the gates of his capital. "—Page 235.

३ छ० २६ जिल्काद:—ता. २० एप्रिल शनिवार इ० स० १७३४.

४ दमनसिंग चूडामण जाट:—चूडामण हा जाट जातीच्या रजपूत लोकांचा पुढारी होता. तो सतराव्या शतकाच्या अखेरीस उदयास आला. दीग ह्मणून जो प्रसिद्ध किल्ला भरतपुराजवळ आहे त्याच्या दक्षिणेस, त्यानें थून व सिनसिनवार असे दोन किल्ले बांधिले. औरंगजेबानें दक्षिणेवर स्वारी केली त्या वेळीं हा पुंडावे करीत असे; व केव्हां केव्हां बादशाही सैन्यावर हल्ले करीत असे व फार त्रास देत असे. सवाई जयसिंगानें त्यावर पुष्कळ स्वाऱ्या केल्या व शेवटीं सय्यद बंधूंच्या कारकीर्दींत त्यानें त्याचा भाऊ बदनसिंग (Badansingh) ह्यास

मुलुखांतून नेवातियाचे सरदें (सरहद्दें) डोंगरकिनाऱ्यानें चालिलों. खानदौरा व बंगस आगरियास गेले. यांची व सादतखानाची भेटी छ २ जिल्हेजीं जाहली. धोंडोपंत खानदौरापासीं होते. सादतखानांनीं खानदौरास सांगून पाठविलें कीं, "बाजीराव याची फौज आपण मोडली. बुनगे पळाले. ते खासाही चमेल उतरोन गेले. अद्याप तुह्मी त्याची खुशामत करितां. वकील ठेवून घेतला आहे. हा कोण्या विचारें? वकिलास निरोप देणें." त्यावरून धोंडो गोविंद वकील यांसी निरोप दिल्हा. सादतखानानें सांगितलें यावरून वकिलास निरोप द्यावा असें खानदौराचें थोरपण नव्हतें. परंतु त्यांणीं त्याचा शक चित्तांत न आणून यासी निरोप दिल्हा. आह्मांजवळ आले. कमर्दीखान व अजमुल्लाखान वगैरे आले. आह्मीं त्यांजसीं गांठ न घातली. साता कोसांवर उजवे बाजूस आमचे हातें त्यांस टाकून, लांब लांब मजली वीस वीस कोसांच्या करून, दोन मजलींनीं छ० ७ जिल्हेजीं, दिल्लीस बारापुला व कालिकेचें देऊळ उजवें हातें टाकून जाऊन, कुशबंदी नजीक शहर येथें मुक्काम केला. पुऱ्यास आगी देऊन खाक शहर करावें, त्यास दिल्ली महास्थळ, पादशाही बरबात जालियांत फायदा नाहीं. दुसरें, पादशाहाचे व खानदौराचे चित्तांस सलूख करावयाचें आहे. मोंगल यांस सलूख करूं देत नाहींत. व अमर्यादा केल्यास, राजकारणाचा दोरा तुटतो. याकरितां

---

अनुकूल करून घेऊन चूडामणाचा पूर्ण पराभव केला; आणि बदनसिंग ह्यास ठाकूर ही पदवी देऊन दीग येथें जाट लोकांच्या गादीचें अधिपति केलें. ह्याच्या नांवासंबंधानें घोंटाळा आहे. मराठी पत्रांत दमनसिंग असें आहे व इंग्रजी पुस्तकांतून बदनसिंग असें आढळतें. ह्याचाच मुलगा सुरजमल्ल जाट हा मराठ्यांच्या इतिहासांत प्रसिद्ध आहे. ह्यानेंच पुढें आपणांस राजा किताब घेऊन भरतपूर येथें राज्य स्थापिलें.

१ दिल्लीच्या गादीविषयीं मराठ्यांस किती पूज्यबुद्धि वाटत होती, हें बाजीराव पेशव्यांच्या लिहिण्यावरून व्यक्त होत आहे. दिल्लीच्या पातशाहीचा मान शाहू महाराज सदैव ठेवीत असत हें प्रसिद्धच आहे.

आगी लावायाचें महकूब करून, पादशाहास व राजे बखतमल यांसी पत्रें पाठविलीं. शहरांतून दोन हत्ती व घोडीं उंटें आलीं होतीं तीं सांपडलीं. लष्करचे लोकांनीं शहरचे लोक भवानीचे यात्रेस बाहिर आले होते, त्यांस झांबडा झांबड केलें. दुसरे दिवशीं [1]बुधवारीं, पादशाहाचे आज्ञेनें राजे [2]बखतमल यांणीं उत्तर पाठविलें कीं धोंडोपंतांस पाठविणें. त्यावरून मशारनिल्हेस पाठवावें तरी आह्मी शहराजवळ आलों. यामुळें दिल्लींत गलबला झाला. यामुळें पाठविलें नाहीं. "भला मजुरा व स्वार पाठवून देणें. मशारनिल्हेस पाठवून देतों. आह्मी शहरानजीक राहिल्यानें शहरास उपसर्ग लागेल. याकरितां कुच करून झीलच्या तलावावर जातों" ह्मणून उत्तर पाठवून आह्मीं कुच केलें. शहराजवळून येत असतां पादशाहांनीं नबाब मीरहसनखान कोका दरोगा खास चौकी, नबाब अमीरखान व खोजे रोजअफजूखान, राजे शिवसिंग जमातदार रिसालेअमीर व मुजफरखान नायबबक्षीगिरी आहादी यांनीं व नबाब मुजफरखान खानदौराचे बंधु सात आठ हजार फौजेनिशीं शहराबाहेर रिकाबगंजाजवळ आले. राजश्री सटवाजी जाधव पुढें गेले होते. त्यांची व मोंगलांची गांठी पडली. झटापटी होत होती. मशारनिल्हेंनीं आह्मांस सांगोन पाठविलें त्याजवरून राजश्री मल्हारजी होळकर व राणोजी शिंदे व राजश्री तुकोजी पवार व जिवाजी पवार व यशवंतराव पवार, व मानाजी पायगुडे व गोविंद हरी पाठविले. त्यांचे यांचें झुंज होऊन मोंगल मोडिले. राजे शिवसिंग वगैरे दहा बारा दरबारी ठार झाले. नबाब मीरहसनखान कोका जखमी झाला. दिगरबादे चौकीं पादशाहाचे अडीच तीनशें मेले. चारशें माणूस जखमी जाहलें. रोजअफजुखान व अमीरखान व मुजफरखान

---

१ बुधवारः—ता० १ मे सन १७३४.

२ बखतमल्लः—हा बखतमल्ल कोण? जोतपुरच्या अभयसिंगाचा भाऊ बखतसिंग कीं काय?

वगैरे शहरांत पळोन गेले. दोन हजार घोडा पाडाव जाहला. पांच सहा हजार पळोन गेले. राजश्री राणोजी शिंदे याजकडील इंद्राजी कदम यांसी बोटास गोळी लागोन दोन बोटें उडोन गेलीं. वरकड नामांकित माणूस फार कोणी ठार झालें नाहीं. घोडे माणूस जखमी झाले. तदनंतर आह्मीं झीलच्या तळावर मुक्काम केला. संध्याकाळच्या चार घटका दिवस बाकी राहिला. तों कमर्दीखान पादशाहापुरावरून आल्याची बातमी खबर आली. तेच क्षणीं आह्मी तयार होऊन गेलों. त्यांचे आमचे फौजेचें युद्ध जाहलें. बारांत गेलेला एक हत्ती राजश्री यशवंतराव[1] पवार यांणीं घेतला. घोडीं उंटें लष्करांत आलीं. त्यास दिवस अस्तमानास गेला. रात्रीचा दम धरून चौकीर्द मोंगल वेढून बुडवावा, तरी झीलेचा[2] तलाव सोळा कोस लांब. उजवीकडे कमर्दीखान. पुढें शहर. दुसरें, आह्मी दिल्लीस गेल्याचें वर्तमान नबाब खानदौरा व सादतखान व महमदखान बंगस यांसी छ[3] ७ जिल्हेजीं मंगळवारीं राधाकुंडाचे मुक्कामीं कळतांच, सडेसड होऊन पंचवीस तीसहजार फौजेनें बडेलास बत्तीस कोस येऊन मुक्काम केला. दुसरे दिवशीं आलावर्दीच्या[4] नालियावर पंचवीस कोस मुक्काम केला. गुरुवारीं[5] प्रातःकाळीं खानदौरा व सादतखान व बंगस व कमर्दीखान सारे एक होणार. एक झाल्यावर सोसणार नाहीं व शहर समीप. यास्तव मोंगलास टाकून चहूं

१ यशवंतराव पवारः—आनंदराव पवाराचा पुत्र. हा फार शूर असून मराठ्यांच्या उत्तर हिंदुस्थानांतील पुष्कळ मोहिमांमध्यें होता. हा पानिपतच्या लढाईत पडला. ( कारकीर्द इ. स. १७४९—१७६१ ).

२ झीलः—ह्या शब्दाचा अर्थ तलाव असा आहे. झील हा परभाषेंतील शब्द असल्यामुळें "झीलचा तलाव" अशी द्विरुक्ति झाली असावी.

३ छ० ७ जिल्हेजः—ता. ३० एप्रिल इ. स. १७३४.

४ आलावर्दी—नाल्याचें नांव दिसतें.

५ गुरुवारीं—ता. २ मे इ. स. १७३४ रोजीं.

कोसांवर मुक्काम केला. आह्मांकडील फिरंगोजी पाटणकरास गोळी लागोन ठार जाहला. वरकडही दहापांच माणूस व घोडीं जखमी जाहलीं. मोंगलाकडील दहापांच ठार झाले. दहावीस जखमी जाहले. गुरुवारीं सादतखान व खानदौरा व बंगस सारे कमर्दीखानाजवळ आले. आलावर्दीपासून झीलच्या तलावापर्यंत मुक्काम करून आहेत. आह्मी मोंगल पाठीवर घेऊन दाबांत आणून बुडवावें, या विचारें कूच करून रेंवाद[1] कोटपुतळी[2] मनोहरपुरावरून[3] आलों. परंतु अद्याप मोंगल सारे आलावर्दी व झीलच्या तलावरीं आहेत ह्मणोन बातमी वर्तमान आलें. व मीरहसनखान[4] कोका पहिल्या झुंजांत जखमी जाहला होता, तो मेला ह्मणोन वर्तमान आलें. खानदौराचीं पत्रांवरी पत्रें राजश्री सवाई[5] जयसिंगजीस गेलीं. त्यांवरून ते पंधरा सोळा हजार फौज व तोफखाना देखील स्वार होऊन बासवियावर[6] गेले आहेत. खानदौराचे भेटीस जातात. सवाईजीचीं पत्रें ममतायुक्त आपला मुलूख रक्षावा ह्मणोन येतात. व

---

१ रेवादः—रेवारी? रेवारी हें दिल्लीच्या दक्षिणेस एक गांव आहे. रेवाद असें नांव मात्र सांपडत नाहीं. रेवाडी होऊं शकेल.

२ कोटपुतळीः—राजपुतान्यांत जयपूरपासून ईशान्य दिशेस ७४ मैलांवर एक गांव आहे.

३. मनोहरपूरः—जयपूर संस्थानांतील एक लहानसें गांव.

४ मीर हसनखान कोकाः—महमदशाहा बादशाहाच्या हुजुरपागेचा अधिकारी.

५ सवाई जयसिंगजीः—जयपूरचा प्रख्यात राजा सवाई जयसिंग. हा इ. स. १६९९ मध्यें गादीवर बसला. हा मुत्सद्दी असून मराठ्यांच्या बाजूचा होता. हा ज्योतिष व गणितशास्त्रांतही फार प्रवीण होता. हा इ. स. १७४३ मध्यें वारला.

६ बासवाः—जयपूर संस्थानांतील एक लहानसें जहागीरगांव.

आह्मांकडील व्यंकाजी राम[1] त्याजपाशीं आहेत. त्याजपासून लिहवीत असतात. आह्मी त्यांचे मुलुखाचे वाटेस जात नाहीं. वाटेनें दाणादुणा देतील. अभयसिंग[2] जोतपुरास आहेत. आह्मी ग्वालेर भडावर प्रांतें आतां बाकी साकी राहिली आहे ते वसूल करून, मोंगल मागें मागें आले तरी त्यांस हैरानपेरोसान करून, पाईची धांपा देऊन, धांवतां धांवतांच खराब होत तेंच करून, दाबांत आणून, गांठ घालून, राजश्री स्वामींचे पुण्यें व वडिलांचे आशीर्वादें बुडवितों. आमची चिंता न करणें. मुख्य गोष्टी पादशाहाचे व खानदौराचे चित्तांत सलूख करावयाचें आहे. मोंगल यांणीं हिंमत धरली आहे. त्यांतें शीरउपस्त सादतखान आहे. याचा गर्व हत श्रीसंकल्पें जाहलियास सर्व मनोदयानुरूप होईल. जरी मनोदयानुरूप सलूख जालिया करूं; नाहींतरी सलूख करीत नाहीं. दिल्लीभवतां मुलूख खालसा केला. पुढें सोनपत पाणिपत यमुनापार मुलूख राहिला; तोही ताराज करून, मोंगल अन्नास महाग होत ऐसेंच केलें जाईल. मागाहून होईल तें वृत्त तुह्मांस लिहून पाठवूं. कदाचित् मोंगल दिल्लीस राहिले, तरी आगरियास जाऊन अंतर्वेदींत उतरून, मुलूख कुल मारून ताराज करितों. नबाब निजामनमुलुख यांणीं गडबड केली, रेवा उतरले, तरी तुह्मीं मागें शह देणें. पेशजी लिहिलें आहे त्याप्रमाणें करणें. मारून ताराज करणें. इकडेस सक नाहीं. तिकडेसही नाहींसा क-

---

१ व्यंकाजीराम:—पेशव्यांचे जयपूरच्या राजाजवळचे वकील.

२ अभयसिंग:—हा जोधपुरचा राजा. हा फार दुष्टकर्मा होता. हा इ० स० १७२५ मध्यें आपला बाप अजितसिंग ह्याचा नीच रीतीनें वध करवून गादीवर बसला. ह्यानें दिल्लीच्या महमदशहा बादशाहास फार साह्य केलें व अहमदाबाद येथें सरबुलंदखानाचा पराभव केला. त्यामुळें बादशाहाची त्यावर फार कृपा जडली. हा इ० स० १७५० मध्यें मृत्यु पावला.

रणें. निजाम यास पायबंद असलिया उत्तम आहे. लोभ असों दीजे हे आशीर्वाद.

---

१ हें पत्र फार महत्वाचें असून ह्याचेच आधारानें ग्रांटडफ साहेबांनीं दिल्लीच्या स्वारीचें वर्णन लिहिलें आहे. त्यांनीं टीपेमध्यें "A private letter, or rather journal, in the hand-writing of Bajee Rao to his brother Chimnajee Appa. Without various corroborative testimonies as to the facts, it bears that internal evidence of truth which commands confidence."–Page 236. ह्मणून ज्या पत्रासंबंधानें लिहिलें आहे, तेंच हें पत्र होय. परंतु ग्रांटडफ ह्यांनीं ह्या पत्रांतील हकीकत सन १७३६ सालाखालीं घातली आहे त्याबद्दल शंका आहे. हा वृत्तांत सन १७३४ सालचा असावा. ता. ७ जिल्हेज नंतर दुसरे दिवशीं **बुधवारीं** ह्मणजे ता. ८ जिल्हेजीं पातशाहांनीं उत्तर पाठविलें असें ह्या पत्रांत आहे. रा. मोडक यांच्या जंत्रीवरून असें दिसतें कीं, इ. स. १७३६ मध्यें ता. ८ जिल्हेजला **शुक्रवार** व वैशाख शुद्ध १० पडतात. तसेंच इ. स. १७३५ मध्यें त्या तारखेस **सोमवार** येतो व वैशाख शुद्ध १० पडते. इ. स. १७३४ मध्यें त्या तारखेस **बुधवार** येतो. यावरून तोच सन बरोबर आहे. शिवाय निजामाला पायबंद द्यावा असें ह्या पत्रांत आहे. यावरून तो (निजाम) बादशाहास त्या वेळीं मिळाला नव्हता हें सिद्ध आहे. त्याची व बादशाहाची गांठ छ. १६ रबिलावल रोज **सोमवार** या दिवशीं पडली, असें एलियट व डॉसन यांच्या इतिहासांत आहे. व तो वार सन १७३४ मध्यें ता. ५ आगस्ट रोजीं येतो. त्यावरून हें पत्र १७३४ चेंच आहे असें ठरतें. कनिंगह्याम साहेबांच्या "Book of Indian Eras" नामक जंत्रीवरून देखील हेंच साल बरोबर जमतें. तेव्हां ग्रांटडफ साहेबांचें १७३६ साल ग्राह्य धरितां येत नाहीं.

ग्रांटडफ साहेबांनीं ही हकीकत लिहितांना दुसऱ्या बाजूचा विशेष आधारभूत असा ग्रंथ "सियारुलमुताखरीन" हा धरिला आहे. त्या ग्रंथांत जे सन दिले आहेत ते मोडकांच्या जंत्रीशीं मुळींच जमत नाहींत. बादशाहाची व निजामाची भेट छ. १६ रबिलावल सन ११५० रोजीं झाली, असें मूळ मुसलमान इतिहासकारानें लिहिलें आहे. परंतु त्याचा इंग्रजी सन भाषांतरकारानें ता. २२

जून इ. स. १७३७ दिला आहे. मोडकांच्या जंत्रीवरून तो ता. ३ जुलई सन १७३७ येतो. तेव्हां ह्या सनांचा कांहींच मेळच जमत नाहीं. मोडकांची जंत्री प्रमाणभूत मानली तर ह्या स्वारीचें साल सन १७३४ हेंच ग्राह्य समजलें पाहिजे. कारण ह्याच सालांतील तारिखा व वार ह्यांचा पेशव्यांच्या पत्रांप्रमाणें बरोबर मेळ पडतो.

आतां "सियारुलमुताखरीन" ह्या फारसी ग्रंथांतील मजकुराप्रमाणें पाहिलें तर त्याचा व बाजीरावांच्या पत्रांतील मजकुराचा खासा मेळ दिसतो.

"* * * * On the junction of Khan Dowran with Saadet Khan six or seven days were occupied in visits and entertainments. This delay being perceived by the Mahrattas, they availed themselves of the circumstance to recover breath from Saadet Khan's pursuits; and turning suddenly round his rear, they marched direct on the capital, which they rightly judged to be void of troops. They advanced with such celerity that on the eighth of Zilhej of that same year, they reached Toghluck poor, under the command of Bajy Rao. This town was filled with a multitude of Mussulmans and Hindus from Delhi, who had gone thither both on account of devotion and on parties of pleasure. These were now all leisurely plundered. An immence booty was obtained by the Mahrattas, who having passed the night near Khwaja Kutbuddin's monument, on the following day plundered the Mina Bagh, and sacked and burned all the shops. About noon they proceeded further, sacked the town of Calem; from whence the wounded flying into the city of Delhi, alarmed the inhabitants with dreadful accounts of what they had experienced. The citizens without further inquiry lost their senses and filling the city with their uproar, the whole became one scene of dismay and confusion. The Emperor now ordered the few officers and troops that were about his person to sally forth and to repel the Mahrattas. In consequence of which, Amirkhan, Raja Bakhtmal, and Mir Husseinkhan, Cocaltashkhan, Abdulmaa-

[लेखांक २८] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

अपत्यें बाजीराव बल्लाळ प्रधान कृतानेक विज्ञापना येथील कुशल [1]आषाढ शु॥ द्वितीयापर्यंत स्वामींचे आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें पावोन बहुत समाधान जाहलें. "[2]राजश्रीं येऊन बहुत समाधान केलें. राजश्री [3]सचीव पंता-

---

budkhan, and Sivasing, the commandant of the corps called Amberies, with many other commanders, marched out of the city and took up an advantageous post between Kazi-sera and Lal-katora. They extended their lines and offered battle to the enemy. Mir Hussein-Khan and Sivasing, who had more courage than prudence, advanced farther, although Amir-khan repeatedly sent them word to wait; but this advice had no effect on those two imprudent men, who continued advancing alone. The Mahrattas at first appeared at a distance, a few at a time, until they had drawn this body farther and farther into the plain; when they suddenly fell upon it, and, with their spears and long swords did such execution as threw the whole into disorder. &c."

*Siyar-ul-mutakherin* Page 396-97.

ज्या अर्थी ह्या मुसलमानी ग्रंथांतील हकीकत अगदीं बरोबर जमते, त्या अर्थी त्यांतील सन बरोबर मानला तर तो छ० ८ जिल्हेज ११४९ ह्मणजे मोडकांच्या जंत्रीप्रमाणें ता. २९ एप्रिल इ. स. १७३७ मंगळवार हा दिवस येतो. तेव्हां इ. स. १७३४ व १७३७ ह्यांपैकीं खरें साल कोणतें ह्याचा निर्णय बरोबर होत नाहीं.

१ आषाढ शुद्ध द्वितीयाः—ता. २१ जून सन १७३४ शुक्रवार.

२ राजश्रीः—शाहू महाराज. "राजश्री येऊन" ह्मणजे "राजश्रींनीं येऊन". जुन्या पत्रांमध्यें विभक्तीचे प्रत्यय पुष्कळ ठिकाणीं गाळलेले दिसतात.

३ सचीवपंतः—नारो शंकर सचीव ( इ० स० १७०७–१७३७ ).

करून माळशिरसच्या[1] सनदा दिल्या. सचीव पंतांनीं नम्रत्वें फारच विनंती केली. राजश्रींनीं विनंती अतिशय केली. त्याजवरून क्षौर केलें. गोमूत्र[2] चालतें केलें" ह्मणून लिहिलें; ऐसीयास राजश्री स्वामी येऊन स्वामींचें समाधान केलें, स्वामींनीं राजश्रींची विनंति मान्य करून क्षौर केलें, गोमूत्र चालतें केलें हे गोष्ट बहुत उत्तम केली. येविसींचा आह्मांस अतिशयेसी संतोष जाहला. सचीव पंतांकडील सनद आली आहे ही गोष्ट बहुतच बरी जाली. स्वामी थोर, पुण्यपुरुष, तपस्वी, जें मनावरी धरितील तें सिद्धीस पावेलच येविसीं संदेह नाहीं. तुळया व वासीयांविसीं आज्ञा याजवरून तुळया * * * * * * * कृपा केली पाहिजे हे विज्ञापना.

[लेखांक २९] श्री.

श्रीमत् राजश्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

अपत्यें बाजीराव बल्लाळ प्रधान कृतानेक विज्ञापना येथील कुशल आषाढ[3] शुद्ध अष्टमीपर्यंत स्वामींचे आशीर्वादेंकरून यथास्थित असो विशेष. स्वामींचे आशीर्वादेंकरून पत्र पाठविलें तें उत्तम समयीं प्र-

---

१ माळशिरसः—पुणें जिल्ह्यांत पुरंदर तालुक्यांत एक गांव आहे. येथें स्वामी केव्हां केव्हां येऊन राहत असत. येथें त्यांनीं भुलेश्वराचें देवालय व एक तलाव वांधिला आहे. हें गांव धावडशी येथील भार्गवरामाकडे इनाम आहे.

२ गोमूत्र चालतें केलें:—स्वामी तपोनिधी असून ते कित्येक दिवस नुसते गोमूत्र प्राशन करून राहत असत. त्यांची कोणीं अवज्ञा केली तर तें गोमूत्र देखील घेत नसत. अशा वेळीं शाहू महाराज स्वतः जाऊन स्वामींचें समाधान करीत असत. स्वामींचा राग बाह्यात्कारेंच असे त्यामुळें तो मग तेव्हांच नाहींसा होत असे.

३ आषाढ शुद्ध अष्टमीः—ता. २७ जून १७३४.

विष्ट होऊन लेखनार्थश्रवणें संतोषातिशय झाला. "राजश्री स्वामी धावडशीस येऊन निष्ठापुरस्सर कित्येक भाषण केलें; पांच नगें वतन दिल्हें, विठ्ठलराव याचा इनाम दूर करून दरोबस्त गांव करून स्वदस्तुरें लिहून दिल्हें" ह्मणोन स्वामींनीं कितेक लिहिलें त्यावरून बहुत बहुत संतोष जाह्ला. स्वामी थोर तपस्वी, ईश्वरविभूति, आपली आज्ञा अमान्य करीसा या योग्य कोण आहे? ईश्वर कोणी पाहिला असे? मनुष्य निष्ठा धरील तरी मृत्युलोकीं स्वामी ईश्वरतुल्य आहेत. आपणांस गांव दरोबस्त करून दिल्हे याचें अपूर्व काय? सर्व आज्ञा आपलीच आहे. "[१]राजश्रीजवळ तुमची फारशी शिफारस केली. कितेक तुमच्या स्वहिताच्या गोष्टी सांगितल्या" ह्मणोन आज्ञा, ऐसीयास स्वामी आमची शिफारस न करील तरी कोण करील? माय बाप देव धर्म सर्व स्वामींचे पाय, न्यूनपूर्ण सर्व स्वामींचें, आह्मी स्वामींचे चरणांकित, सर्व चिंता स्वामींस आहे. तेथें आमची शिफारस व बऱ्याच्या गोष्टी सांगितल्याचें अपूर्व काय? आमची निष्ठा स्वामींच्या पायांपाशीं आहे. तेथें विस्तार आह्मीं काय लिहावा? माळशिरसच्या घरास लांकडे पाठविण्याविषयीं लिहिलें तरी सात तुळया व शंभर वांसे स्वामींच आज्ञेप्रमाणें माळशिरसास पाठविले आणि स्वामींस विनंतीपत्र पाठविलेंच आहे; त्याजवरून विदित होईल. घोडा [२]टांकण, उत्तम

१ हें पत्र मागील पत्राप्रमाणेंच स्वामींच्या पत्राचें उत्तर आहे. मागील पत्रांतील व त्यांतील मजकूर एकच आहे. मात्र तो विशेष बहुमानपुरस्सर व निष्ठापूर्वक लिहिलेला आहे. शाहू महाराज स्वामींच्या भेटीस धावडशीस गेले तेव्हां स्वामींनीं बाजीरावांची शिफारस केली व छत्रपतींची मर्जी सुप्रसन्न करून सोडली. हें पाहून बाजीरावांस अत्यंत संतोष होऊन त्यांनीं स्वामीविषयीं जे भक्तिपूर्वक उद्गार काढिले आहेत ते परमाल्हादक आहेत.

२ टांकण घोडा:—भरधांव चालणारा चपळ घोडा. स्वामींस घोड्यावर बसण्याचा सराव व नाद होता असें यावरून दिसून येतें.

बसावयालायक पाठविणें ह्मणून आज्ञा, त्यास राजश्री पिलाजी जाधवराव आले, याजबराबर लष्कर आलें, यांत टांकण तुर्की स्वामींनीं लिहिले प्रमाणें आढळत नाहीं. याउपरी प्रयत्न करितों. मिळाल्यास स्वामींच्या पायांजवळ अंतर करूं ही गोष्ट सहसा होणार नाहीं. स्वामींचे आज्ञेपेक्षां अधिक तें काय आहे? सारांश स्वामींनीं आज्ञा केली याप्रमाणें टाकण तुर्की, उत्तम, स्वामी त्याजवर बसल्यानें संतोष पावतील ऐसा मिळाल्यास लक्षप्रकारें पाठवूं. "राजश्री रंगोपंत अकलेकर[1] रुपये २५, व अकलेकर गांवकरी रुपये १०, व अंताजी हरी परंचेकर रुपये २५, येणेप्रमाणें साठ रुपये उदईक घातले ते तुह्मी वसूल घेऊन पोतापैकीं साठ रुपये पावणें" ह्मणोन आज्ञा, त्याजवळ रुपये ६० पाठविले असत. बंदुखीविसीं[2] आज्ञा केली त्याजवरून बंदुख एक पाठविली असे. आह्मांस राजश्री स्वामींनीं दर्शनास येणें ह्मणोन आज्ञापत्र आलें आहे, त्याजवरून सातारा[3] येतो. स्वामींचेही चरण दृष्टीस पाहून जे विनंती कर्तव्य ते करूं. कृपा केली पाहिजे हे विज्ञापना.

---

१ अकले:—हा धावडशीजवळ एक गांव आहे.

२ स्वामींस बंदूक वाळगण्याचाही नाद होता. येथें रंगनाथस्वामी निगडीकरांचें वाचकांस स्मरण होईल. ते घोड्यावर बसण्यांत व निशाण मारण्यांत पटाईत होते.

३ सातारा येतों:—सातान्यास येतो (विभक्तिप्रत्यय गाळल्याचें दुसरें उदाहरण). महाराजांनीं बोलावल्याप्रमाणें बाजीराव पेशवे पुण्याहून छ० ६ रविलावल ह्मणजे ता० २६ जुलई रोजीं सातान्यास गेल्याचा दाखला सांपडतो. त्यावरून दिल्लीकडून स्वारी आटोपून आल्यानंतरची ही छत्रपतीची भेट होय. वरील दोनीं पत्रें बाजीराव पेशव्यांनीं पुण्याहून लिहिलीं असावींत असें दिसत.

[लेखांक ३०] श्री.

श्रीमत्[१] परमहंस स्वामींचे सेवेसीः—

अपत्यें बाजीराव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील क्षेम ता॰ छ २५ जिल्काद[२] स्वामींच्या आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें उत्तम समयीं पावोन बहुत समाधान जालें. पांचहजार रुपये कर्जाचे ऐवजीं पाठवणें ह्मणून आज्ञा, त्यास तूर्त येथील विचार राजश्री अंतोबा सांगतील त्याजवरून कळेल. स्वामींची आज्ञा तों न उल्लंघावी याकरितां राजश्री अंताजीपंताकडून तूर्त दोन हजार रुपये देविले आहेत. ते घेऊन पावलियाचें उत्तर त्याजपासीं द्यावयास आज्ञा केली पाहिजे. वरकड कित्येक अर्थ राजेश्री अंतोबापासीं सांगितला आहे. ते निवेदन करतील. त्याचा विचार काय करणें तें करावा. त्याप्रमाणें वर्तणूक करून तीन हजार रुपये श्रावण भाद्रपद पत्तर (पर्यंत?) पावते करूं. सर्वप्रकारें एक निष्ठेनें सेवा केली तिचें फल प्राप्त जाहलें. त्याचें त्यास दिल्हें, देऊत! परंतु आह्मांस कर्जानें

---

१ लें॰ ३०।३१।३२ हीं पत्रें बाजीराव अतिशय कर्जग्रस्त झाले त्या वेळचीं आहेत. ग्रांटडफ साहेबांनीं "Bajee Rao, owing to the vast army he had kept up, both to secure his conquests and to overcome his rivals, had become greatly involved in debts. His troops were in arrears; the sovkars (or bankers), to whom he already owed a personal debt of many lakhs of rupees, refused to make any further advances, and he complained bitterly of the constant mutinies and clamours in his camp, which occasioned him much vexation and distress." ह्मणून बाजीरावाच्या ज्या स्थितीचें वर्णन केलें आहे, त्याच स्थितीचें उत्कृष्ट चित्र ह्या पत्रांवरून व्यक्त होतें. ग्रांटडफ हीं पत्रें इ॰ स॰ १७३६ ह्या सालाखालीं देतात परंतु त्या पत्रांची बरोबर तारीख व सन समजणें फार कठीण आहे.

२ छ २५ जिल्काद—८ एप्रिल इ. स. १७३५?

बुडविलें. एवढे गोष्टीकरितां प्राण जाता तरी बरें होतें. विष खाऊन मरावें इतकेंच, किंवा स्वामींचे पाय धरून बसावें इतकाच पदार्थ उरला आहे! दरबारीं सर्व साहित्य आमचें करणार सर्व आपल्यास विदितच आहे. स्वामींस कृपा येईल तरी आह्मी कर्जापासून मुक्त होऊं. लोकांचे नरकवासापासून दूर होऊं तो पदार्थ करावा. तरीच मज बाळकावर कृपा पूर्ण आहे. आतां प्रस्तुत सातारियास[1] जात नाहीं. तेथें जाऊन काय करावें? आमचे उरावर पाय देऊन कार्य करतील यास्तव जात नाहीं. काळें करून बसलों आहें. सर्व लज्या आह्मां कोंकण्यास आली. तूं भार्गव आमचा साह्यकारी असतां ऐसें कार्य अविलंबिलें तेव्हां तुझे ह्मणविल्याचें सार्थक काय? ज्या स्त्रीस पुरुष नाहीं तिचे गत होते तैसी तुह्मी असतां आमची गत साऱ्यांनीं मांडली आहे. बरें, चित्तास येईल तरी आपलें बिरित (ब्रीद?) रक्षावें हे विज्ञापना.[2]

[लेखांक ३१] श्री.

श्रीमत् महाराज परमहंस परशरामबावा स्वामींचे सेवेसी:—

आज्ञाधारक चरणरज बाजीनें कृतानेक विज्ञापना. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें पावलें, कितेक अर्थ लिहिला त्यास आमची निष्ठा स्वामींचे पायापाशीं आहे नाहीं हें आह्मीं काय सांगावें? जैसी स्वामी बुद्धि चित्तांत प्रेरतील तैसी होईल. असो. इतका परिवार लिहावा ऐसें

---

१ साताऱ्यास प्रतिनिधि वगैरे मंडळी बाजीरावाच्या विरुद्ध होती त्यामुळें साताऱ्यास जाण्यास बाजीराव धजत नव्हते असें ह्या पत्रावरून दिसून येतें. "आमचे उरावर पाय देऊन कार्य करतील" ह्मणून जें लिहिलें आहे तें कार्य कोणतें?

२ शेवटच्या शेवटच्या वाक्यांवरून बाजीरावांची स्थिति किती करुणास्पद झाली होती हें उघड होतें.

नाहीं. आह्मी[1] लवकरं सातारि (यास आलों), आज नव दिवस जाहले. राजश्री स्वामी निरोप देत नाहींत. आतां दोन प्रहरांच राजश्री अंबाजी-[2]पंतांचें पत्र आलें कीं, "पूर्णिमेकरितां येथें [येणें] फारसे रागें भरले आहेत. विलयास हे खास गोष्ट जाईल." असेंच लिहिलें आहे. त्यास आह्मी तो स्वामींचे आज्ञेवरून लोक, हशम, राउत, जमा करीत आहों. हजार दोन हजार माणूस जमा झाले. पैका रोज खर्चतो, पूर्णिमा जालियावर मुहूर्त पाहून कार्यास जावें. स्वामींचे आज्ञेप्रमाणें कार्यसिद्धि करावी. त्यास हा गुत्ता राजश्री कडील. ऐसीयास हे गोष्टीस उपाय काय करावा? आतां एवढे कार्यास आरंभ करून हा नाश एक. दुसरें पुढें होईल हा भरंवसा नाहीं. नवा दिवसांची मुदत करून व पुढें सव्वा महिन्यांत कार्यसिद्धि होईल अशी आज्ञा, त्यास एक गोष्ट तों ऐशी दिसते.

---

१ "आह्मी लवकर सातारि ( यास आलों )" हें वाक्य मुळामध्यें स्पष्ट नाहीं. तथापि पुढील संदर्भानें तें जुळविलें तर पुनः "पूर्णिमेकरितां येथें फार रागें भरले आहेत. विलयास हे खास गोष्ट जाईल" असें अंबाजीपंत लिहितात त्याचा संबंध नीट उलगडत नाहीं. "येथें" ह्मणजे कोठें? रा. अंबाजीपंत यांनीं साताऱ्याच्या दरबारांतील खबरबातमीचें पत्र पाठविलें ह्मणावें तर बाजीराव तेथें नऊ दिवस आहेत. मग "पूर्णिमेकरितां येथें फार रागें भरले आहेत" असें लिहिण्याचा उद्देश काय? "पूर्णिमेकरितां येथें" हें वाक्य बरोबर जमत नाहीं. तेवढ्याकरितां "येथें" ह्या शब्दाऐवजीं "येणें" असा शब्द असावा असें मानून जर "पूर्णिमेकरितां येणें. फार रागें भरले आहेत." अशीं दोन वाक्यें केलीं तर अर्थाचा संदर्भ बराच जुळतो. बाजीराव खुद्द साताऱ्यास नसावेत असें "पानें आणावयास साताऱ्यास माणूस गेला आहे" असें त्याच पत्रांत शेवटीं वाक्य आहे त्यावरून बाजीराव साताऱ्यानजीक असावेत हें उघड आहे. धावडशीहून स्वामींकडून पत्राचें उत्तरही दुसरे दिवशीं मागितलें आहे त्याअर्थीं बाजीराव धावडशी व सातारा ह्यांच्या नजीक असले पाहिजेत.

२ अंबाजीपंतः—पुरंधरे.

पुढील गोष्टी होईल नव्हे हें स्वामी जाणत. इतकीयावर मी गरिबानें काय करावें? कोणता विचार करावा हे आज्ञा जाहली पाहिजे. माझे विचारें हे सर्व संग सोडून उठोन एखादेकडे जावें. पुन: तोंड खावंदास अगर लोकांस दाखवावें असें नाहीं. परंतु तुह्मी वडील, वर्तमान अगोदर श्रुत व्हावें याकरितां लिहिलें असे. उत्तराचा मार्ग पाहतों. उत्तर आलियावर जो विचार चित्तांत आला आहे तो करून येतों. तुमचे शरीरीं सावकाश नाहीं. कुवत नाहीं कीं, तुह्मांस लिहून एखादा महत् उपायें संकट देवास घालूं ते गोष्ट तों राहिली. इतकीयावर हें कार्य राहतें. कर्ज फिटत नाहीं. आतां वांचलियाचें सार्थक काय? आपला जिवाचा त्याग करितों. लटकी समजाविसीचा अर्थ ल्याहाल तरी मी ऐकत नाहीं. जर रुपयांचा उपाय करून राजश्री स्वामींचा निरोप या चौ पांचा दिवसांत येईल संतोषेंकरून, तरीच बरें. नाहींतरी आमचा उपाय आह्मी करूं. कोन पाठविला आहे. घेणें. साड्या नव्याच दोन पाठविल्या आहेत घेणें. पान आणावयास सातान्यास माणूस गेला आहे. आला ह्मणजे पाठवून देऊं. राजश्री बापूजीपंत उदईक येतील. वासे त्यांचे हवालीं केले ते पावते करतील. वरकड रानचे जिनसासाठीं माणसें पाठविलीं आहेत. आल्यावर पावतें होईल. उत्तर उद्यां पाठवून देणें. तुमची आमची भेट होणार नाहीं. सेवेशी श्रुत होय हे विज्ञप्ति.

[लेखांक ३२] श्री.

श्रीमत् परमहंस परशरामबावा स्वामींचे सेवेसी:—

विनंती सेवक आज्ञाधारक बाजीराऊ कृतानेक विज्ञापना. महाराजांनीं खंडूबरोबर आशीर्वादपत्र पाठविलें व कित्येक आज्ञा केली

---

१ हें पत्र फारच आणीबाणीचें आहे. मनुष्य अतिशय त्रासला ह्मणजे तो कसा एकेरीवर येतो तें ह्या पत्रावरून फार चांगलें व्यक्त होतें. बाजीरावास स्वामींचा किती आधार होता व सर्व राजकारणें त्यांच्या आधारावर कशीं अवलंबून होतीं हें ह्या पत्रावरून स्पष्ट होतें.

तरी बावा, आह्मांस काय चिंता आहे. तुह्मी जालेत गोसावी, आणि आह्मांकडे प्रपंच लाविला. त्या प्रपंचामुळें आह्मी जोड इतकीच केली कीं वीस लाख रुपये कर्जदार झालों. कर्जदारांचे नरकांत कुजतों इतकेंच मेळविलें. या दुःखास्तव गतवर्षी पिंपरीस आलों तेव्हां सारें तुमच्या हवालीं करून मोकळे होऊन देवाची सेवा करावी हा हेत धरून स्वामींस विनंती केली. स्वामी कृपाळु होऊन आश्वासन दिल्हें, "भार्गव तुझे ध्यानीं आहे. फत्ते तुझी होईल. व पैकाही उदंडसा मिळोन कर्ज फिटेल. सर्व साह्यकारी भार्गव आहे." तेवढे वचनावर दृष्टि देऊन होतों. त्यास चिरंजीव तिकडे[1] तुझा गेला होता; यश मात्र थोडें बहुत आलें; पैका न मिळाला. लष्करचे हाल श्रीरंगपट्टणचे[2] वेळेस

१ तिकडे:—ह्मणजे हिंदुस्थानच्या स्वारीस. ह्या स्वारींत फायदा कांहीं झाला नाहीं, फक्त यश मात्र आलें, माळवा वगैरे प्रांत अद्यापि मिळाला नाहीं असें त्यावरून उघड आहे. त्याअर्थी ही सन १७३४ चीच स्वारी असावी.

२ श्रीरंगपट्टणचे वेळेस लष्करचे फार हाल झाले होते ह्मणून ह्मटलें आहे. ही श्रीरंगपट्टणाची स्वारी सबा आशरीनच्या रजब महिन्यांत ह्मणजे इ० स० १७२७ च्या फेब्रुवारीमध्यें झाली होती. छ० २३ ला बाजीराव श्रीरंगपट्टण मुक्कामीं होते. सोंधे, बेदनूर, वगैरे ठिकाणीं जमादिलामध्यें जाऊन नंतर बाजीराव श्रीरंगपट्टणास गेले. कर्नल विल्कस यांनीं ह्मैसूरच्या इतिहासामध्यें ह्या संबंधानें विशेष माहिती दिली नाहीं व ग्रांट डफ ह्यांनींही विशेष माहिती दिली नाहीं. त्यांनीं फक्त फत्तेसिंग भोंसल्यासह बाजीराव १७२६ मध्यें कर्नाटकामध्यें गेले, प्रांत लुटून श्रीरंगपट्टणावर खंडणी बसविली, इतकी माहिती देऊन असा शेरा मारिला आहे कीं:—"No particulars of this campaign have been discovered; but it appears by a letter written 12 or 13 years afterwards by Bajee Rao to his brother, that they lost a number of men without gaining advantages which had been anticipated." ह्यावरून ग्रांटडफ ह्मणतात त्या अर्थाचें चिमाजी आपांस लिहिलेलें एखादें पत्र निराळें असलें पाहिजे. परंतु बाजीरावांच्या वरील पत्रावरूनही श्रीरंगपट्टणच्या स्वारीचा बोध होत आहे.

झाले होते तसेच झाले. आपण या गोष्टीचा शोध करावा. आतां नित्य उठोन कर्जदारांचे पाया पडावें. शिलेदारांचे पाया पडतां पडतां कपाळ छिनंत[1] चाललें. आतां हीं सुखें आह्मांस नकोत. तुह्मी या आणि आपला कारभार संभाळा. अगर टाकून द्या ह्मणाल तरी टाकून उठोन येतों. वरकड तुह्मीं आपल्या पैक्यासाठीं लिहिलें तरी स्वामीनें कांहीं चिंता न करावी. आमचा जीव आहे तो पैकीयाची काय चिंता आहे? कोणे समयीं पाहिजे तें आह्मांसही कळतें. पैका पावता करूंच. आतां प्रस्तुत तो आमचा जीवच मात्र आहे. येथें येऊन घेणें अगर तेथें बोलावशील तरी सर्वसंग टाकून येतों. तुह्मी थोर देव. तुह्मांस वचनास धरावें तें वचन खरें न झालें ह्मणून आह्मीं लेकरांनीं तुमची रड तुह्मां-पासी रडावी, आणि रडतियाची अशी तुह्मी पुसोन परिणाम त्याचा करावा तो कराल. तुमचें झाड लाविलें तोडाल तरी आतां तोडा, वाढवाल तरी वाढवा. या गोष्टीस नादर कोण आहे. तुमचे दबवणीस आह्मी कां भिऊं? मारशील तरी तूंच बावा मारशील; यांतही कीर्ति

---

१ ग्रांटडफनें "Among Hindoos an attitude of worship or adoration is to place the forehead at the threshold of a temple, or at the foot of the idol, and is used in supplication to a superior. The following extract of a letter from Bajee Rao to his Mahapooroosh must of course be understood figuratively; but it shows the embarrassments under which he laboured:—"I have fallen into that hell of being beset by creditors, and to facify sovcars and silledars, I am falling at their feet till I have rubbed the skin from my forehead." Part of this distress originated in the high rates of pay which he was obliged to give, in order to out-bid Nizam-ool-Moolk, and secure the best of the Deccan soldiery." ह्मणून जी टीप दिली आहे ती ह्याच मजकुरास अनुलक्षून आहे. त्यावरून हें पत्र ग्रांट डफ ह्यांनीं पाहिलें होतें ह्यांत शंका नाहीं.

तुझीच आहे. आणि आह्मां लेंकराचे लडिवाळ चालवून कीर्तिरूप होसील तरी तूंच होसील. गांवचा मजकूर लिहिला कीं शिष्य पाठविणें, त्याचे हवालें करूं. तरी शिष्य मीच आहें. मला बोलवावें; मीच येतों. हा कारभार पहावासा असला तरी येऊन आटपणें. पाहिजे तरी आह्मी मुतालिक तुझे. टाकून द्या ह्मणाल तरी येतो. नाहीं, चार दिवस आमचेच हातून घ्यावासा असेल तरी तैसीच आज्ञा करावी. आह्मी तो कर्जदाराचे नरकांत बुडालों. तुझे वचनावर जर अवंदाचे सालीं जर मला कर्ज व राजा व लोक यांचे देणियांपासून मुक्त करशील यास्तव देवाजवळ आपला प्राण देऊं. आह्मांस मुक्त लेंकरास कराल ऐसें वचन अभयपूर्वक आलिया एवढे आठ महिने आणीक जीव धरून पाहूं. यांत जर आह्मी कृत्रिम लिहिलें असेल तरी आह्मांस तुझीच शफत असे. काय तें उत्तर लवकर पाठविणें. तैसीच तजवीज करूं. तूं देव कैसा कीं आमची कृत्रिमता किंवा निर्मळता न कळे. ध्यानांत येईना तेव्हां आह्मीच प्राक्तनाचे गाढे. आमचें कपाळ फुटलें! तुमचा कोप आह्मां गरीबांवर कशास? जे दुष्ट असतील त्यांजवर करा कीं, तेणेंकरून प्रजा सुख पावे. आज दाभाडे[1], गायकवाड, बांडे कोटी कोटी रुपये खजिने आणि मीन आह्मी तुझे पायाशीं व धन्याचे पायाशीं निष्ठेनें वर्ततों ते अन्नास महाग झालों! त्यांत आह्मी चिपळुणें, तुझे वाढविले, लाज तुला असावी. लाज धरशील तरी त्यांजवर कोप करा आणि आमचे उर्जित करून राहिलें ब्राह्मणाचें काम करून घ्या. नाहीं तरी आह्मांवर कोप राग कशास पाहिजे? आपलें स्वाधीन करून घे आणि आह्मांस मुक्त

१ दाभाडे, गायकवाड व बांडे हे आपल्या स्वार्थाकडे दृष्टि देऊन स्वतंत्रपणानें प्रांतोप्रांतीं स्वाऱ्या करीत होते व मिळेल तितका फायदा आपल्या पदरांत ओढून गबर झाले होते असा त्यांच्यावर हा आरोप आहे.

करा. आणीक एखादा देव पाहून सेवा करूं. पिंपरीसच[1] बोलिलें आहां कीं "माझा राग तुजवर होणार नाहीं. कदाचित् रागें भरलों तरी चालणार नाहीं." त्यास आतां लिहिलें कीं, "पिंपरीस मरत होतों, ज्वरानें शुद्ध नव्हती. ते बोली प्रमाण नाहीं."तरी मरत होतास तरी रात्रींच माझे रक्षणास कैसा आलास ? ह्या गोष्टी कशास लिहितां ? जर आह्मी उमगतों न तरी त्वां भार्गवच साक्ष असेल. आतांच उठोन संन्यांसी[2] होऊन एखादेकडे उठोन जावें ऐसें वाटत नसेल तरी भार्गवाची शपथ आहे. परंतु मागती कांहीं विवेक करून धीर धरून पाहतो. जर धीर धरवेल तरी धरवून पाहूं. नका ह्मणाल तरी आह्मी तों सिद्धच आहों. सेवेसी श्रुत होय. हजार रुपये साताऱ्याहून धावडशीस पावते करणें ह्मणून पूर्वींच खंड्र्चें पत्र अगोदर दोन दिवस लिहून पाठविलें आहे. पावलें असेल अगर पावतील. उत्तर पाठवावें हे विज्ञप्ति.

[लेखांक ३३] श्री.

श्रियासह चिरंजीव राजश्री आपा यासीं:—

बाजीराव बल्लाळ प्रधान आशीर्वाद उपरी येथील कुशल ता० छ ७ रमंजान[3] जाणून आपणाकडील कुशल वृत्त लिहून पाठवणें. यानंतर निजाम उलमुल्ख माळव्यांत रवाना झाल्यावर आह्मीही त्वरा करून नबाबाच्या मुकाबलियास आलों. आठ नवकोसांचें अंतर उरतांच नबाबाच्या फौजा सलाबत खाऊन भुपाळ किल्ल्याच्या आश्रयास गेले. तळें

---

१ पिंपरीः—पुणें जिल्ह्यांत सुपें तालुक्यांत एक लहान गांव आहे. येथें स्वामींचें देवस्थान असून हा गांव त्याकडे इनाम आहे. येथें स्वामी केव्हां केव्हां राहत असत.

२ मनुष्य वैतागला ह्मणजे सर्व संग सोडून संन्यासी बनतो त्याप्रमाणें बाजीरावांच्या मनाची स्थिति झाली होती.

३ छ० ७ रमजानः—ता. १९ दिसेंबर इ० स० १७३७ सोमवार.

पाटीसीं, नाला पुढें, देऊन राहिले. आह्मींही त्याच दिवशीं छ. ३ रमजानीं[1] चालोन घेतलें. नबाबांनीं सवाईचे[2] पुत्र व बुंदेले सभासिंग[3] व जाट व रजवाडीयांच्या फौजा व तोफखाना ऐसा एक तोंडी झुंजाची जागा होती ते वाट बांधोन उभे केलें. आपण खासा पाठीवर उभे राहिले. आमच्या फौजा राजश्री राणोजी शिंदे व राजश्री पिलाजी जाधवराव व सयाजी गुजर व किरकोळ पथकें रजपुताचे फौजेवर उठलीं. आराबीयाचा मार सोसून थडक मोठी जाहली. दिडशें माणूस रजपुतांचें मारिलें. आपणाकडील पन्नास साठ माणूस ठार झालें. दोन चारशें जखमी. तैसीच घोडीं शंभर पावेतों पडलीं. पांच सातशें जखमी जाहलीं. परंतु नबाबांनीं तमाशा बराच पाहिला. रजपुतांपुढें गजड्याचा आराबा व नाला नसता तरी मारून गर्दीस मेळविले जाते. असो. युद्धप्रसंग जालियावर नबाबाच्या गोटापासून दोन बाणांच्या टप्पावर सड्या फौजांनीं बसलों आहों. नबाबाची गांठ भुपाळापासून एकदोन मजलीवर पडती तरी अवघेच फौजेची मिठी चौकोर्द पडती. तर राजश्री स्वामींच्या प्रतापें नबाबाचे डोळे थंड होते. परंतु आश्रयास गेले. असो. एक झुंज झालियावर आज तीनचार रोज आनमान पाहिला. त्यास नबाबांनीं कुल आपले बुनगे व रजपुतांचे व रजवाडकरांचे बुनगे कुल भुपाळ शहरांत आश्रयास घातले. आपले डेरेही माघारी अडचणींत नेले. तमाम फौजेनिशीं प्रातःकाळपासून तयार होऊन हत्तीवर बसून

---

१ छ० ३ रमजानः—ता० २५ दिसेंबर इ० स० १७३७ गुरुवार.

२ सवाईचे पुत्रः—सवाई जयसिंगास इसरीसिंग व माधवसिंग असे दोन मुलगे होते त्यांपैकीं एक फौज घेऊन निजामाच्या मदतीस आला होता.

३ सभासिंग बुंदेलेः—राजा छत्रसालाचा नातू. बुंदेले राजे मराठ्यांच्या वतीचे होते परंतु निजामानें जबरदस्तीनें त्यांना आपल्या बाजूस वळवून घेतले होते.

गोटांतच उभे राहतात. बाहेर युद्धास निघतात ऐसी आवाई घालितात. परंतु निघत ना. डेरेचौक्या गोटापुढें होत्या. तो माघारा कोटा किल्याच्या आश्रयास नेऊन मोर्चेबंदी मांडली. कुसूं घालितात. याप्रकारचा प्रसंग आरंभिला आहे. धान्य तें महर्ग होत चाललें. चौ दिवसांत रुपयाचे पीठ चार शेर जाहलें. पुढें काय होईल तें पहावें. हत्ती घोडे यांस वैरण अगदीं नाहीं. एक दिवस झाडाच्या साली व तळ्यांतील लव्हाळे चारिले. आतां तें कांहींच नाहीं. रजवाडेकरी, बुंदेले व सवाईची फौज या समागमें आहे. ती प्रास्थाई पडली. नबाबाचा इतबार त्यांस नाहीं, व त्यांचा इतबार नबाबास नाहीं. पळोन निघावें ह्मणतील तरी बुनगे शहरांत अडकविले यामुळें निघों फावत नाहीं. बाहेर युद्धास निघावें तरी सोबतीयांचा भरंवसा न पुरे. आमच्या फौजा तों चौगीर्द बैसल्या आहेत. रात्रीचे बाणबंदुका चौक्यांवर चालवितो यामुळें सारी रात्र दंगे गोटांत होऊन फौजा ताटकळोन उभ्या राहतात. घोड्यांस चारा नाहीं. दुसरें, सारा वेळ तयारी. ऐसी जाजती मांडली आहे. नबाब बुद्धिवंत होत्साता हे बुद्धि वृद्धापकाळीं करून बदवक्र करून घेतला. दिल्ली आदिकरून सतत चालली. कदाचित् नबाबांनीं रजपुतांनीं अवसान करून बाहेर युद्धास निघाले तरी कोस दोन कोस वेढून लगट करून निघते तरी सभवतें बैसलोंच आहों. जे गत[1] बंगसाची ते गत यांची होईल. नबाब थोर अमीर, फौज पाहतां तीस चाळीस हजार, हातनाला, व सुतरनाला, व बरकंदाज, व रेहकले समागमें बहुत, ऐसें असतां आश्रयास बसावें (हें) श्लाघ्य नव्हतें. विचारें पाहतां बसावया कारण हेंच कीं, कांहीं दिल्लीची फौज मदतीस यावी व दक्षणी फौज यावी. त्यास दिल्लीस फौजांविसीं पादशाहांस अर्जी जाहली. त्यांणीं खानदौरास व कमर्दीखान यांस पादशाहांनीं फर्माविलें

१ लेखांक ३६ मधील बंगसासंबंधाची विस्तृत टीप पहा.

कीं, तुह्मी कोठें जाणार ? आह्मी निघों तेव्हां तुह्मी समागमें असावें. त्याजवरून ते येतां दिसत नाहींत. आतां मोठा भरंवसा दक्षणी फौजेचा आहे. प्रतिदिनीं पाच सात जोड्या रवाना होतात. कदाचित् तवकल करून फौज नबाबांस सामील व्हावयास येईल. त्याला आपा, या समयीं जरी तिकडील तिकडे फौजेस तुमचा शह बसोन आटकली तरी हे फौज बुडवावयास असामान्य दुसरा येणार नाहीं. आह्मांजवळ आहे फौज इतक्यानिशींच नबाबांस जेर करून विल्हे लावितो. ते फौज येऊन सामील झाली तरी नबाब जरा भारी होतील. जाजती श्रम करणें लागतील. याजकरितां फौजांस अटकाव होय तें करणें. यासमयीं तुह्मांस जे फौज मिळेल (ते) जमा करून भारी राहणें. दाभाडे[1] बांडे आह्मांकडे आले नसले तरी तुह्मी आपणाजवळ बोलावून सामील करणें. राजश्री स्वामींजवळ[2] जो जमाव आपला आहे तो आपणांजवळ आणणें. चिरंजीव राजश्री महादोबा यांस लिहून राजश्री स्वामींस विनंती करून राजश्री फत्तेसिंगबावा व राजश्री शंभुसिंग जाधवराव व सरलष्कर व जाधव आणवणें. त्या खेरीज लोक मिळतील ते जमा करून तिकडील फौजांस शह देणें. ह्मणजे एकटें याचें साहित्य दुसरा कोणी करणार नाहीं. नबाबाचा निर्वाह व्हावा या सायास दुसरा ऐसा येणें नाहीं. हे ठिकाणीं लागल्यावर अवघी दक्षिण निर्वेध होईल. अवघ्यांनीं या समयीं या कामांत चित्त घालावें. आमचे फौजेचे उस्तवारीस अगर कर्जपरिवारास एक

---

१ दाभाडे बांडे वगैरे सरदार पेशव्यांस ह्या वेळीं साह्य करीत नसून अलग राहिले होते. त्यांस मदतीस जाण्याबद्दल शाहू महाराजांकडून व पेशव्यांकडून पत्रें गेलीं होतीं.

२ राजश्री स्वामीः—शाहूमहाराज. ह्यांच्या हुजूर दरबारांत महोदाबा ह्मणजे महादाजीपंत पुरंदरे हे असत ह्मणून त्यांचेकडून महाराजांस विनंति करविली होती.

नवाब खेरीज दुसरी जागा नाहीं. जे फौज समागमें आहे इतक्यानिशीं रात्रंदिवस कस्त मेहेनत करणें, तें नबाबाजवळ करीतच आहों. फळ होतां ईश्वराचें.***राजश्री आवजी कवडे बरे समयास चांगले सामानानिशीं आले आहेत. राजश्री राणोजी भोंसले या ज शे दाकडे आल्याचें वर्तमान आहे. जरी ते आले तरी ते आमचे जाहले. न येती ते गोष्टीचाही मुजाका काय आहे. एक तों राजश्री स्वामींजवळ मोहिमेस असावयाचें होतें तें तों नाहीं. येव्हां या प्रसंगास तरी त्यांणीं यावें. येथेंही न येत, तेव्हां सरंजाम मुलुख खाऊन अप्रयोजक होतील. तुह्मांस जो यत्न होईल तो करून तिकडील फौजेस पायबंद देणें. शहांजापुरचा[1] मोंगल दीड हजार राजश्री मल्हारबा व राणबा व यशवंतराव पवार यांणीं बुडविला हें वर्तमान पूर्वीं तुह्मांस पत्रीं लिहिलें आहे त्यावरून कळलेंच असेल. राणोजी भोंसले आह्मांकडे आले तरी बरें. नाहीं तर तुह्मी त्यांस गाठणें. ते फौज तुमच्या कामाची आहे. वरचेवर कागदपत्र पाठविणें. आणि आपणास सामील करणें. अगर तुह्मी गांठणें. जे गोष्टीनें ते फौजेस आटकाव होय तें करणें. वडिलांचें पुण्य व खावंदाचें आहे तरी त्यास घेतच आहों. लोभ असों दिजे हे आशीर्वाद.

[ लेखांक ३४ ] श्री.

श्रियासह चिरंजीव राजश्री आपा यांसी

बाजीराव आशीर्वाद उपरी येथील ता० छ० १७ रमजान[2] मुकाम भूपाळ जाणोन आपणाकडील कुशल लिहीत जाणें विशेष. तुमचीं पत्रें

---

१. शहाजापूरचा मोंगल:—निजामाचा साह्यकारी मीरमानाखान फौजदार शहाजहानपूरकर हा भोपाळ येथें निजाम अडचणींत सांपडला असें देखून दुसरीकडून मराठ्यांवर हल्ला करायाचा प्रयत्न करीत होता. त्यास दाराई सराई नामक गांवीं शिंदे होळकर व पवार यांनीं ठार मारिला व त्याची दोन हजार फौज बुडविली.

२ छ० १७ रमजान:—ता० २९ दिसेंबर इ० स० १७३७ गुरुवार.

छ० २३[1] सवैनचें[2] आलें तें छ० ८ रमजानीं आलें. मौजे ओहोणे[3] सोनगीर गिरनातीर[4] येथील मुकामचें आलें तें काल छ १६ रमजानीं[5] पावलें. कुशलश्रवणें संतोष वाटला. येथील वर्तमान निजामुल्मुलुख भुपाळच्या आश्रयास गेला. नंतर छ० ३ रमजानीं मुकाबिला केला. युद्ध जाहलें. तें वर्तमान नबाबांनीं बुनगे भूपाळ शहराचे आश्रयानें ठेवून नंतर जाहलें हें वर्तमान तुह्मांस पहिलें लिहून पाठविलें आहे. त्याजवरून कळलेंच असेल. पत्रें रवाना झालीं. त्या अलीकडे वर्तमान तरी भुपाळास सभोंवती चौकीबंदी केली. यामुळें दाणा महर्ग जाहला. गवत तो न मिळेसारिखें जाहलें. तेव्हां बोलीचालीचा संदर्भ नबाबांनीं चित्तांत आणून राजश्री आनंदराव पंडित सुमंत यांस पाठविलें. मशारनिल्हे आल्यावरी आह्मीं आपला मतलब सांगणें तो सांगोन राजश्री बाबूराव मल्हार यांस समागमें देऊन नबाबाकडे पाठविलें, मतलब निवेदन केला. नबाबांनीं आज्ञा केली, प्रातःकाळीं राजश्री पिलाजी जाधवराव व आणखी मातबर पाठविणें; येथीलही माहितगार देऊन बोलीचाली होईल. ऐसें सांगितल्यावरी बाबूराव मल्हार आले. छ० १४ रमजानीं[6] आबदुल खेरखान व सय्यद लष्करखान व अनवरखान व सुमंत ऐसे लष्करापुढें टेंकडी होती तेथें आले. आह्मीं राजश्री पिलाजी जाधवराव व राजश्री बाजी भिवराव व राजश्री बाबूराव मल्हार पाठविले. संभाषण जाहलें. आमचा मतलब त्रिवर्गांनीं

---

१–छ० २३ सवानः—ता० ५ दिसेंबर, सोमवार.

२–छ०८ रमजानः—ता० २० दिसेंबर, मंगळवार.

३ ओहोणे सोनगीरः—हीं दोन गांवें खानदेशांत आहेत.

४ गिरनातीरः—ही तापीस मिळणारी एक लहान नदी आहे. तिच्या कांठीं वरील गांवें आहेत.

५ छ० १६ रमजानः—ता० २८ दिसेंबर, बुधवार.

६ छ० १४ रमजानः—ता० २६ दिसेंबर, सोमवार.

त्याचे त्रिवर्गास सांगितला. तेव्हां बोलिले कीं, तुमचा मतलब नबाबांस निवेदन करून नबाब तुमचें ऐकतील, परंतु नबाबांची अब्रू वाढविली पाहिजे. प्रातःकाळीं नबाब बाहेर निघतील. तुह्मी कोस दीड कोस माघारे जाऊन राहणें. आह्मी त्रिवर्ग तुह्मांजवळ येतों. बोली चाली करूं. त्यावरून दुसरे दिवशीं छ० १५ रमजानीं[1] आह्मी कुच करून कोसाच्या अंतरें बंदगींत राहिलों. नबाब नंतर बाहेर तळावर येऊन मुकाम केला. आबदुल खेरखान व अनवरखान यांस लष्करच्या दरम्यान पाठविलें. बोलीचालीचें मतलब सांगितलें. ते नबाबांस सांगोन करून देऊं ऐसें बोलोन नबाबांकडे गेले. जाबसाल यावा तो न आला. प्रातःकाळीं नबाबांनीं एकाएकींच नगारा व कुच करून पुनः भुपाळांतच गेले. तेव्हां राजश्री आवजी कवडे व राजश्री यशवंतराव पवार यांणीं दुमदारीस घाव केला. जाटाचे व आवजी कवडे यांची सरमिसळ जाहली. तेव्हां नबाब ठिकाणींच उभे राहिले. आह्मी तमाम फौजेनिशीं भंवते उभे राहिलों होतों. नबाबांनीं आराबा काढून टेंकडीपासून अर्धकोस जमीन भुपाळपावेतों दोन प्रहरांपासून सायंकाळपावेतों चालत होते. निदानीं तळ्यांत राहिले होते. तोही तळ सोडून फाटकाआंत पहिले बुनगे ठेविले होते त्याजवळ जाऊन केवळ अडचणींत राहिले. बंद होऊन राहिले. जैसा मनसबा महमदखान बंगस यांणीं विचारिला त्याचप्रमाणें यांणीं विचार केला आहे. नबाब थोर. यांणीं एक तों आमचा मतलब करून देऊन सुखरूप दक्षणेस जावयाचें होतें. परंतु दुसरें बाहेर निघोन झुंजावयाचें होतें. परंतु दोनी गोष्टी न करितां अडचणींत राहिले. अनुचित केलें. या गोष्टींत नबाबाची अब्रू काय राहिली ? असो. नबाबांनीं काय विचार चित्तांत आणिला असेल तो असो. परंतु आपल्या बंदोबस्तांत आतां

---

१ ता० १५ रमजानः—ता० २७ दिसेंबर, मंगळवार.

आसपास चौकीबंदी करून दाणागवत कुल बंद केलें आहे. नबाब कालपासून आजीपावेतों आंत उभेच केले होते. घोड्यावरी व गोळीच्या टप्यावरी आमचे फौजेचे मोर्चे लावून मार देत आहों. नबाब व नबाबांची फौज सत्वहीन झाली आहे. आणि गोटावरी लगट करून दोन तोफा हस्तगत केल्या. अतःपर राजश्री स्वामींच्या प्रतापें निजामउल्मुलुक यासी याच ठिकाणीं बुडवून टाकितों. दक्षणचे फौजेची यास आशा बहुत होती, त्यास तुह्मी तिकडे आहां. तुमच्या शहामुळें तेही येऊन पावे असा अर्थ नाहीं. तुह्मीं फौज जमा करून जितकी मिळेल तितकी मेळवून दक्षणचे फौजेस पायबंद देणें. दाभाड्याकडील शहाणा माणूस पाठवून त्यास आपणाजवळ आणणें. रणालियास[1] असली तरी उत्तम जाहलें. कदाचित् सोनगडपावेतों[2] गेले असले तरी तेपावेतों शहाणा माणूस पाठवून दाभाडे, बांडे, गायकवाड आपणाजवळ आणून तिकडील फौजेस पायबंद देणें. रघोजी भोंसले याकडे पत्रें व एक माणूस पाठवून त्यासही आपणाजवळ आणणें. सारांश ते फौजेस पायबंद दिल्यास नबाबास आह्मी बुडवीतच आहों. जें होणें तें धन्याचें प्राक्तन, वडिलांचे पुण्येंकरून उत्तमच होईल. आपल्याकडील लोक सारे सुखरूप आहेत. घोडीं कालचे झुंजीं तीस पसतीसपर्यंत पडिले. व मातबर माणूस कोणी पडिले नाहींत. पांच सात शिपाई पडले. बहुत काय लिहिणें, लोभ असों दिजे हे आशीर्वाद.

[ लेखांक ३५ ] श्री.

श्रीयासह चिरंजीव राजश्री आपा यांसीः—

बाजीराव बल्लाळ आशीर्वाद उपरी येथील कुशल ता० छ २७ रम-[3]

---

१ रणालें:—हें गांव खानदेश जिल्ह्यांत नंदुरबार तालुक्यांत आहे.

२ सोनगडः—हें गुजराथेंत बडोदा संस्थानांत गांव आहे. येथें बळकट किल्ला आहे.

३ छ० २७ रमजानः—ता० ८ जानेवारी इ. स. १७३८, रविवार.

जान जाणून आपणाकडील कुशळ लिहित जाणें, यानंतर तुमचीं पत्रें छ ८ [1] रमजानचीं वरणगांवचे [2] मुकामचीं विश्रामाबरोबरी आलीं व दुसरीं पत्रें छ० ११ रमजानचीं [3] आलीं तीं छ० २४ रमजानीं [4] पावलीं. लेखनार्थ विस्तारें कळला. येथील वर्तमान काल लिहून पत्र पाठविलें आहे त्यावरून कळलेंच असेल. अलीकडील वर्तमान तर नबाब बुनगे कांहीं भुपाळांत व कांहीं इस्लामपुरांत [5] टाकून सलुखाची संदर्प लावून कोस दोन कोस चालतात. आमच्या फौजा चौतर्फा चालवून दाणा-गल्ला घांसलकडी बंद केली. एक रुपयास एक शेर अन्न जाहलें. तेंही कोणास प्राप्त कोणास अप्राप्त जालें. घोडीं पळसाचा पाला खाऊं लागलीं. परवा छ २५ रमजानीं मोंगल पठाणांनीं भाड्याचे बैल खादले. रजपुतांस तों केवळ उपास पडों लागले. ऐसा प्रसंग जाहला. तेव्हां नबाब सर्वांचें दुःख पाहून बहुतच काहिला होऊन सलोखाविसीं त्वरा केली. बोलीच्या प्रसंगास पहिलेच आबदुल खेरखान व सयद लष्कर-खान व अनवरअल्लाखान होते. सांप्रत आयामल्ल [6] यांहीं सांगोन पाठविलें कीं बोलीचालीच्या प्रसंगांत आपणास बोलाविल्यास आमची अब्रू आहे. व आह्मी तुमचे शुभचिंतक असों. त्यावरून आयामल्ल यांसही पाठवून द्यावें. ह्मणवून नबाबास राजश्री आनंदराव पंडित सुमंत यांजसमागमें सांगोन पाठविलें. त्याजवरून नबाबानें आयामल्ल यांस भेटीस पाठविले. भेटीनंतर आयामल्ल यांस पहिले त्रिवर्ग यांस सांगोन बोलीचालीचा

---

१ छ० ८ रमजानः–ता० २० दिसेंबर इ. स. १७३७, मंगळवार.

२ वरणगांवः–हें गांव खानदेश जिल्ह्यांत भुसावळ तालुक्यांत आहे.

३ छ० ११ रमजानः– ता० २ जानेवारी इ. स. १७३८ सोमवार.

४ छ० २४ रमजानः– ता० ५ जानेवारी, गुरुवार.

५ इस्लामपूरः–भोपाळाजवळ एक लहान गांव आहे.

६ आयामल्लः–हा निजामास ~~मिळालेला कोणी जाट सरदार असावा~~.

ठराव केला कीं माळवा दरोबस्त द्यावा. पादशाही सनद दिल्लीस गेल्यावर करून द्यावी. द्रव्याची बोली पहिली राजश्री धोंडो गोविंद यांचे विद्यमानची आहे, त्याची रजबदल करून जें साधेल तें करून द्यावें. नर्मदे व चमेलमध्यें राजे आहेत त्यांजपासून आह्मी पैके घेतों तैसा कमपेस घेणें तो घ्यावा. राजे यांस निरोप देऊन नबाबांनीं दिल्लीस जावें. कोणेविसीं तफावत न करावी. जे गोष्टीनें आमचें बरें होईल तें करावें, या गोष्टीनें मजकुरात द्यावे तेसी सिबत जाला. काल छ २६ रमजानीं सदर्हुप्रमाणें करार करून नबाबांनीं माळवा दरोबस्त जाहगीर सुभेदारीचे यादीवरी दस्कत करून दिलें. व द्रव्यही साधेल ते पादशाहापासून करून देऊं ऐसें खासदस्तकानिसीं लिहोन दिलें. राजश्री पिलाजी जाधवराव व राजश्री बाबूराव मल्हार नबाबाचे दर्शनास पाठवून दस्तकखतानिसीं याद करून दिली. यावर तमाम लष्करास व वाणीयांस ताकीद करून इरसाल पोहोंचवून दिल्हा. अत:पर नबाब आपले बुरंगे बाहेर दक्षिणेस रवाना करून दिल्लीस जातील. सारांश नबाबास अडचणीचा प्रसंग प्राप्त झाला ह्मणवून आपण हावभरी होऊन बुडव्याच्या सायासास लागावें तर नबाबाची फौज तोफखाना व बंदोबस्त पाहतां अवघाच ध्यानांत आला. रोहिले, बुंधेले व रजवाडे व सवाई[1]ची फौज व खेची व नरवर[2] आदिकरून खासा नबाब देखील तीस पसतीस हजार, या खेरीज तोफखाना, तोही कोणे प्रकारचा हें तुह्मी जाणतच आहां. सभोंवता आराबा चालून तमाम फौजेनिशीं तोफखान्याचे पाठीं चालावें तर राऊत अगर पायींचे माणूस निघावया गरज नाहीं. बंदो-

---

१ सवाई:—सवाई जयसिंग.

२ खेची व नरवर हीं ग्वाल्हेर प्रांतांतील जुनीं संस्थानें होत. सांप्रत राघोगड ह्मणून जें मध्य हिंदुस्थानांत संस्थान आहे तें खची ह्या नांवानें प्रसिद्ध आहे. येथें खेची जातीचे रजपूत लोक आहेत ह्मणून ह्या प्रांतास खेचीवाडा असें ह्मणतात.

बस्तीनें चालत उठावें तर घोडे माणूस बहुत खर्च होऊं लागलें. धावयाविणें तग करून बुडवावें तर मोंगल लोक मागें सर खाणार ? झुंजतां दिसगत लागल्यास चार दिवस निघोन जातील. हा अर्थ व तुह्मीं कितीएक विचार लिहिला तो चित्तांत आणून सौरस्याचा प्रसंग संपादिला. जो नबाब चौथाई व सरदेशमुखीचीं नांवें घेत नव्हता त्यांणीं माळवे दरोबस्त ऐसें खासदस्तकानें लिहून व लिहितां उच्चार केला कीं, "या मागें कधींच गोष्टी न जाह्ली ते या प्रसंगीं जाह्ली" व नबाबांनीं हे गोष्टी मान्य करणें दुरापस्त. पुत्राचे नांवें सुभेदारी करून समागमें आणिलें त्या माळव्याची दरोबस्त सनद करून देतो. नबाबाच्या चित्तांत कल्पांत आला. परंतु काय करील ? संकटाचा प्रसंग देखोन द्यावें लागलें. जे राजेराजवाडीयाचे आपले बरे इच्छू कश्यप धरून होता ते त्यास हातचे सोडावे लागले. हें दुःख लहान सामान्य न जाह्लें. आपा, राजश्री स्वामींचें तपोबळ, वडिलांचें पुण्य समर्थ तरीच ही गोष्टी घडोन [आली]. अन्यथा होणें कळलेंच आहे. आज पादशाहींत नबाबासारिखा अमीर दुसरा कोण आहे? याणें जो पाया घालून दिल्हा तो अवघ्यांत श्रेष्ठ आहे. नबाब अतःपर दिल्लीस जातील व समागमें कोणी द्यावयाचा तो देऊन नबाब दिल्लीस गेलियावरी या प्रांताचा व राजवाडीयांचा बंदोबस्त कर्तव्य तैसा करून होईल वर्तमान तें लिहून पाठवूं. कांहीं द्रव्य नबाबाजवळ मागावें ही इच्छा होती, परंतु नबाब द्रव्याचा लोभी. पूर्वीं[1] याची साहित्य केली ते समयीं मन वाढवून द्रव्य देववलें नाहीं,

---

१ पूर्वीं:—ह्मणजे इ० स० १७२४ सालीं नबाबास बाजीरावांनीं साह्य केलें होतें. तो प्रसंग असा कीं, निजाम दिल्लीदरबारांतून निरोप घेऊन दक्षिणेंत आल्यानंतर त्याच्या स्वार्थप्रचुर आणि कपटी वर्तनामुळें बादशाहाच्या मनांत राग येऊन त्यानें हैदराबादचा सुभेदार मुबारिझखान (मराठी कागदपत्रांत कंबरजखान असें नांव दिलें आहे) ह्यास सैन्य जमवून निजामाचें पारिपत्य करण्याबद्दल

ते हल्ली पदरचे देतील हे गोष्टी तशासारखी. दिल्लीस गेल्यावर सार्व-भौमापासून प्राप्त जाहल्यास चुकणार नाहीं. करार झाला यांत अंतर न करावें ऐसी मनरोटी नबावांनीं दिली. अत:पर नबाब खता करतील? कदाचित् काळकम [काळक्रमें?] दुर्बुद्धि निर्माण झाली तर केलें पावतील. श्री त्यास जय देणार नाहीं. लोभ असों दीजे हे आशीर्वाद.

[लेखांक ३६] श्री.

श्रीमंत परमहंस महाराज श्री स्वामींचे सेवेसी:—

चरणरज बाजीराव बल्लाळ प्रधान कृतानेक विज्ञापना येथील कुशल महाराजांचे आशीर्वादें पौष[1] वद्य १४ पावेतों मुक्काम भुपाळ येथें यथा-स्थित असे विशेष. फौजसहित या प्रांतीं आलों. नबाबाचा व आमचा मुकाबला व्हावा तों नबाब भुपाळच्या आश्रयास गेले. छ० ३ रमजानीं[2] एक युद्ध जाहलें. दुसरें कालही[3] एक युद्ध नबाबाचें व लोकांचें जाहलें. बराच तमाशा[4] नबाबांनीं पाहिला. महाराजांचे प्रतापें मोर्चे-

---

गुप्त रीतीनें सांगून पाठविलें. त्याप्रमाणें मुबारिझखानानें तयारी केली. त्याप्र-संगीं निजामानें पेशव्यांची मदत मागितली. त्या वेळीं पेशव्यांनीं उत्कृष्ट मदत क-रून साखरखेडलें येथें छ० २३ मोहरम (ता. १ आक्टोबर सन १७२४) रोजीं मुबारिझखानाचा पराभव केला व त्यास व त्याच्या दोन पुत्रांस यमसदनीं पा-ठविलें. ह्यामुळें निजामाची दक्षिणची सुभेदारी निर्वेध झाली. इतकें उत्कृष्ट साह्य ह्या वेळीं पेशव्यांनीं केलें परंतु निजामानें त्याचा योग्य मोबदला दिला नाहीं. ह्या प्रसंगाचें स्मरण ठेवून पेशव्यांनीं निजामाच्या स्वभावाचें वर्णन केलें आहे.

१ पौष वा। १४:–ता० ८ जानेवारी इ. स. १७३८ रोज रविवार.

२ छ० ३ रमजान:–ता० १५ दिसेंबर इ. स. १७३७ रोज गुरुवार.

३ काल:–ता० ७ जानेवारी इ. स. १७३८, शनिवार.

४ तमाशा:–पराक्रम. जुन्या पत्रांतून हा शब्द फार वेळां येतो. शिवाजीनें आपला सापत्न बंधु तंजावरचा व्यंकोजी ह्यास जें उपदेशपर पत्र लिहिलें आहे त्यां-तही "तमाशा दाखविणें" ह्मणजे पराक्रम दाखविणें असाच उपयोग केला आहे. ज्ञानेश्वरी ग्रंथामध्यें तमाशा हा शब्द ह्याच अर्थी आहे.

जवळ नबाबांवरील सलाबत बरीसी चढली. नबाब भुपाळच्या आश्र-
यास तीस चाळीस हजार फौजेनिशीं बसले. आमचे मोर्चे हातधोंडि-
यावरी बसले आहेत. करोलांचा मार देत आहे. मोंगलांचा अर्गानर्गा
केला आहे. दाणा, गल्ला, वैरण, काडी कुल बंद झाली आहे. बंगसा[1]-

---

१ बंगसाची गत:—बाजीरावांनीं छत्रसाल राजाच्या मुक्ततेकरितां महमद-
खान बंगषाबरोबर जेतपूर येथें जी लढाई केली तींत बंगषाची अशीच स्थिति
झाली होती. ह्या संबंधाचा उल्लेख बाजीरावांच्या मागील पत्रांतही आहे.
ह्याकरितां ह्या संबंधाची थोडी विस्तृत माहिती देणें अवश्य आहे. महमद-
खान बंगष हा बंगष जातीचा एक रोहिला सरदार होता. तो फिरुखसियर बाद-
शहाच्या कारकीर्दींत उदयास चढला, ह्मणून त्यानें त्याच बादशहाच्या नांवानें
फरुकाबाद हें शहर वसविलें. ह्यास महमदशहा बादशहाच्या कारकीर्दींत मा-
ळव्याची व अलहाबादेची सुभेदारी मिळाली होती. हा तेथील सुभेदार असतांना
ह्यानें छत्रसाल राजावर स्वारी केली व त्यास मनस्वी त्रास दिला ह्मणून त्या वयो-
वृद्ध हिंदु राजानें बाजीराव पेशव्यांस विनंतीपत्र पाठवून आपल्या मदतीस बोलाविलें.
त्याप्रमाणें बाजीराव पेशव्यांनीं बुंदेलखंडावर इ० स० १७२९ मध्यें स्वारी केली व
महमदखान बंगषाच्या फौजेशीं मातबर लढाई दिली. त्या लढाईंत महमदखानाचा
पराभव होऊन तो जेतपूरच्या किल्ल्यामध्यें पळून गेला. परंतु मराठ्यांनीं त्या कि-
ल्ल्यासभोंवतीं वेढा बसवून त्याची सर्व सामग्री बंद केली, त्यामुळें त्याच्या सैन्याचे
फार हाल झाले. त्याचें वर्णन फरुकाबादच्या नबाबांच्या इतिहासामध्यें केलें आहे
तें येणेंप्रमाणें:—

* * Jaitpur was strictly invested for several months till
there was no longer any grain for food. Then the soldiers
began to slaughter their horses and bullocks. Flour could
not be procured even at one hundred rupees a seer.......Many
of the soldiers died of starvation, and many more leaving the
Nawab to his fate escaped from the fort. Bajirao's orders to
his guards were that any of Mahomed Khan's men who gave

चीच गत यास झाली आहे. स्वामींचे आशीर्वादें निजामउल्मुलुक या ठिकाणीं बुडत आहे. अगर सलोख झाला तरी आमचा होईल. नबाब किल्लेबंद झाले याजमुळें त्यांची अब्रू राहिली नाहीं. आपला आशीर्वाद समर्थ आहे. सर्व आशीर्वाद महाराजांचा आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक ३७] श्री.

श्रीमंत परमहंस श्री स्वामींचे सेवेसीः—

चरणरज बाजीराव बल्लाळ प्रधान कृतानेक विनंती येथील कुशल ताा छ० २ रमजानपावेतों[1] स्वामींचे कृपेंकरून यथास्थित असे विशेष. स्वामींनीं कृपा करून आशीर्वादपत्र पाठविलें तें (पावोन) बहुत समाधान वाटलें. लिहिलें कीं असी विकल्प वासना आमचे ठायीं नसावी ते कां जाहली, खंडूस[2] इतके दिवस कां ठेवून घेतला, माझें मज द्यावयास काय जातें, तांब्राचें वारापाणी[3] जालीयावरी नगारे आणावे ऐसा

---

up their arms should be allowed to pass unmolested. Many having no food preferred to give up their arms and get away."

ह्या वर्णनावरून महमदखान बंगषाची 'गत' कशी झाली होती ह्याची वाचकांस बरोबर कल्पना येईल. शेवटीं महमदखान बाजीरावांस शरण आला व त्यांनीं त्यास जीवदान देऊन सोडून दिलें. तो पुढें इ० स० १७४३ मध्यें मृत्यु पावला. निजामाच्या सैन्याची बाजीरावांनीं ह्या वेळीं बंगषाप्रमाणेंच दैन्यावस्था करून सोडली होती ह्मणून त्यांनीं त्या वेळचा उल्लेख ह्या व मागील पत्रांत केला आहे.

१ छ० २ रमजानः—ता० ३ दिसेंबर इ० स० १७३८ रविवार.

२ खंडूः—स्वामींचा नोकर.

३ तांब्राचें वारापाणीः—तांब्र ह्मणजे निजाम असा येथें संबंध दिसतो. निजामाचें युद्ध झाल्यानंतर बाजीरावाची स्वारी हिंदुस्थानांतून छ० ७ रबिलाखर रोजीं पुण्यास आली, त्या वेळीं येतांना स्वामींकरितां नगारे आणले नाहींत ह्मणून स्वामींनीं शब्द लावून पत्र लिहिलें होतें.

करार असतां न आणिले ह्मणून शब्द लावून लिहिलें; ऐसियास माये-खेरीज शब्द लाविजेल ऐसा अर्थ नाहीं. स्वामींची कृपा आहे ह्मणूनच इतकें लिहिलें. वरकड स्वामी अंतरसाक्ष आहेत. खंडूस विलंब लागायास कारण व नगारे न यावयाचा प्रसंग सर्व अंतरांत आलाच असेल. येथें वोढीचा प्रसंग बहुत जाहला होता. याजमुळेंच खंडूस विलंब लागला होता. तसेंच नगारे आणावयाचा प्रसंग तरी येते समयीं सोनगडाकडून येणें जाहलें असतें तरी समागमेंच आणावयाचा योग घडला असता. परंतु तिकडून येणें न जाहलें. स्वामींचे नगारे राहतील ऐसा अर्थ नाहीं. येतील. संकट नाहीं. विकल्पवासनेचा विचार लिहिला तरी स्वामींचे चरणरज असतां संकल्पविकल्प कोठें असणार ? मन बुद्धि वासना सर्व स्वामींचेच पाय आहेत व स्वामींचाच आशीर्वाद तोच आमचा खजाना फौज आहे. पैक्यासाठीं कांहीं चित्तांत आलें असेल तर सांप्रत वोढीच्या प्रसंगास्तव व वसईकडील खर्चानिमित्य[1] आणखी स्वामींजवळ ऐवज असेल तो द्यावा लागतो. वसईकडील सलुखाचा मजकूर लिहिला त्यास सलूख करावयास आह्मी राजीच आहों. परंतु विचार करून करावा लागतो. चिरंजीव राजश्री आपा कोंकणांत[2] जाणार आहेत. फिरंगी वि-चारावरी आल्यावरी सलुखाचा विचार होईल. तरी करावयास अंतर पडणार नाहीं. सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ति.

---

१. वसईकडील खर्चः—वसई घेण्याचा यत्न पुष्कळ दिवसांपासून चालू अ-सावा असें यावरून दिसतें.

२ आपा कोकणांत जाणार आहेत ह्मणून उल्लेख केला आहे त्याप्रमाणें ते छ० २८ रमजान रोजीं कोकण प्रांतीं माहिमास गेल्याचा दाखला सांपडतो.

[लेखांक ३८ *] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

विज्ञापना गोंवें प्रांताहून सात शेणवी[1] आला आहे, त्यांणीं स्वामींचे सेवेसी विनंती केली त्याचा विस्तार स्वामींनीं लिहिला, त्यांत मुख्यार्थ हाच कीं, "फोंडें[2] पंचमहाल जागा बाका, त्या जाग्यास आपलें ठाणें मातबर बसल्यास फिरंगी यांसीही शह देऊन साष्टी[3] बारदेशचा पैका घेई व सोंधेकरांसही[4] भारी होऊन त्या प्रांतीं ठाणीं घेऊन स्थळें जतन करी

---

* ह्या पत्रावर बाजीराव पेशव्यांचें नांव नाहीं तथापि पत्राच्या भाषेवरून तें बाजीराव यांचेंच असावें.

१ सात शेणवीः—हें नांव असावें. सातबा वगैरे नांवें आहेत.

२ फोंडें:—हा गोंवें प्रांतांत एक महाल आहे. येथील ठाण्यासंबंधानें ह्या पत्रांत मजकूर आहे.

३ साष्टी बारदेशः—पोर्तुगीज लोकांच्या ताब्यामध्यें हा प्रांत आहे. ठाणें जिल्ह्यांत साष्टी ह्मणून गांव आहे त्याप्रमाणें गोमांतकामध्यें साष्टी असें गांव आहे.

४ सोंधे:—हें कर्नाटकांतील एक जुनें संस्थान होतें. येथील राजास सोंधेकर असें ह्मणत असत. शिवाजीच्या कारकीर्दीपासून मराठे ह्या संस्थानाकडून खंडणी घेत असत. इ० स० १७६३ पर्यंत कर्नाटक प्रांतामध्यें उत्तरेस सोंधेकर व दक्षिणेस बेदनूरकर हे दोन संस्थानिक प्रबल होते. इ० स० १७६३ सोंधे व बेदनूर हे दोन्ही प्रांत हैदरानें हस्तगत केले. बासवलिंगाप्पा ह्मणून जो सोंध्याचा राजा होता त्याच्या कारकीर्दींत (इ० स० १६९७–इ० स० १७४५) बाजीरावांनीं सोंध्यावर इ० स० १७२६ मध्यें स्वारी केली होती. त्या वेळीं त्यानें व बेदनूरच्या राजानें चौथाई खंडणी देण्याचें कबूल केलें व त्याप्रमाणें खंडणी येत होती. परंतु इ० स० १७३५ मध्यें दिसेंबरच्या ४ थ्या तारखेस पोर्तुगीज लोकांचा व त्याचा तह झाल्यामुळें तो मराठ्यांशीं सलोख्यानें वागेनासा झाला, एवढेंच नव्हे तर तो पोर्तुगीज लोकांस साह्य देऊं लागला. ह्यामुळें त्यावर मराठ्यांचा रोख होता. पुढें सोंधेकराचा मराठ्यांनीं पराभव केला व त्यानें पुनः खंडणी कबूल केली. परंतु मधून मधून पुनः तो मराठ्यांच्या विरुद्ध होत असे, व त्याची खोड मराठे मो-

डीत असत. असा प्रकार इ० स० १७६३ पर्यंत चालला होता. इ० स० १७६३ मध्यें हैदरानें बेदनूर घेऊन हैवतजंग नामक आपल्या सरदारास सोंध्यावर पाठविलें. त्या वेळीं तेथील राजा सवाई इमोदी सदाशिव हा कारवारच्या उत्तरेस ८ मैलांवर शिवेश्वर येथें पळून गेला, आणि पोर्तुगीज लोकांच्या आश्रयास जाऊन राहिला. त्या वेळीं पोर्तुगीज गव्हरनर Mannel de Seldanha de Alboquerque हा होता. त्यानें हैदराचा प्रतिकार करण्याचा थोडा प्रयत्न केला परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. शेवटीं तो गोंवें प्रांतांत गेला. तेथें त्यास ५२५ पौंड पेनशन देऊन पोर्तुगीज लोकांनीं आपल्या संरक्षणाखालीं ठेविलें (ता० १० एप्रिल इ० स० १७६८). पुढें त्यानें त्यांच्या विरुद्ध इ० स० १७७४ मध्यें कांहीं गड-बड केल्यावरून त्यास गोंव्यानजीक मौळे (Moula) येथें ठेविलें, व त्याचें पे-नशन ३५० पौंड केलें. तथापि त्याची मानमरातब चांगली ठेविली होती. तो मेल्यानंतर इ० स० १७८२ मध्यें सवाई बासवलिंग हा त्याच्या मिळकतीचा मा-लक झाला. हा इ० स० १८३४ मध्यें वारला. नंतर त्याच्या मागून सदाशिव व वीरराजेंद्र असे दोन पुरुष झाले. परंतु ते अल्पायुषी झाल्यामुळें त्यांच्या संपत्तीस त्यांच्या बायका मालक झाल्या. त्यांनीं एक मुलगा दत्तक घेतला होता. त्याचा वं-शज अद्यापि गोमांतकांत आहे.

मराठी इतिहासवाचकास सोंधेकराची ओळख होण्याकरितां ही विस्तृत मा-हिती दिली आहे. हैदरानें सोंधे घेतल्यानंतर त्याची धूळधाण झाली. पुढें टिपूच्या कारकीर्दींतही तेथें लुटालुटीचा प्रकार चालला होता. टिपूची समाप्ति झाल्यानंतर इंग्रज, पेशवे व निजाम ह्यांच्यामध्यें मुलुखाची जी वांटणी झाली त्यांत सोंधे पे-शव्यांकडे येत होतें, परंतु तें त्यांनीं घेतलें नाहीं. तेव्हां त्यावर इंग्रजी अंमल का-यम झाला.

सोंधे येथें सांप्रत स्मार्त, वैष्णव, आणि जैन लोकांचे मठ आहेत, व एक जुना किल्ला असून तो प्राचीन वैभवाची साक्ष देत आहे. बाकी येथें पूर्वींचें वैभव कांहीं राहिलें नाहीं. नाहीं ह्मणावयास एक १८ फूट लांबीची तोफ असून ती तेथील रणसंग्रामाची साक्ष देत आहे! सोंधे (Sonda) हें गांव सांप्रत कारवार जिल्ह्यांत मोडत आहे. हें सिर्सी गांवाच्या उत्तरेस ८ मैलांवर आहे.

ऐसा भारी माणोस पाठविलिया उत्तम आहे. केवळ राजश्री व्यंकटराव[1] यांचे हवालीं केलियास कृष्णरायासारिखें होईल. दुसरे फिरंगी यांची जबरदस्ती जाहल्यासी तुमची कुमक पोहोंचून स्थळें जतन होत तरी बरें. नाहींतर सोंधेकराचीं ठाणीं सोंधेकराचे स्वाधीन करून खर्च जाहला पैका घ्यावा. ह्या दोहों पदार्थांतील तुमचे विचारें कोणती गोष्ट करावी तें लिहिणें. जरीकरितां तेथें ठाणेंच होणें असेल तर त्या प्रांतींची माहिती आणि मातबर सावकार जामीन येथें देई व रसदही देई असा आह्मी येथें एक (गृहस्थ) योजिला आहे. त्याचे स्वाधीन तेथील कमावीस करावी. ठाणियाचा बंदोबस्त आहे त्याप्रमाणें असों द्यावा. योजिला आहे गृहस्थ याचे स्वाधीन पंचमहालची कमावीस केलियासी कित्येक कामकाज फिरंगी याजकडील वगैरे त्याचे हातून घ्यावें. जरी आमच्या लिहिण्याची अवज्ञा करून पंचमहालचा हुद्दा दुसऱ्याचे स्वाधीन कराल तर त्यास श्रापून त्याचेंही बरें न होय, आणि तो मुलूख तुमच्या हातून जाईल असें समजणें; यास्तव योजिले गृहस्थासच धंदा सांगणें; ह्मणजे त्याचे हातून सोंधे, बुदनूर[2] (बेदनूर ?) व गोंवें वगैरे

---

१ व्यंकटराव:—व्यंकटराव नारायण घोरपडे?

२ सालगुदस्ता व्यंकटराव इत्यादिक सरदार त्या प्रांतें गेले ह्मणून ह्या पत्रांत उल्लेख आहे त्यावरून हें पत्र इ० स० १७३८।३९ सालचें असावें. कोकणप्रांतीं फिरंगी लोकांकडे साष्टी प्रांत होता तो घेण्याची मसलत ठरवून चिमाजी आपा छ० १ जिल्हेज ह्मणजे वैशाखमासीं निघून कोकणांत गेले. त्या समयीं गोव्यांकडे शह देण्याकरितां व्यंकटराव नारायण ह्यांस फौज देऊन पाठविलें होतें. तेथें त्यांनीं चांगला पराक्रम करून मुलूख सर केला व तेथें आपलें ठाणें बसविलें. त्यास अनुलक्षून हा उल्लेख असावा.

२ बेदनूर:—हें पूर्वीं जंगल होतें. येथें १६४० मध्यें बेदनूर नामक गांव वसविलें जाऊन इक्केरी येथील केलाडी राजांनीं आपली राजधानी केली. ह्याची पुढें फार भरभराट होऊन येथें मोठें नगर वसलें गेलें. येथील राजास नाईक ह्मणत

काज काम करून घ्यावें. ह्मी मातबर त्रिंबक शेट गुजर देतो अथवा सोंधेकराचा मुलूख सोंधेकराचे हवालीं करून सोंधेकराकडून पैका घ्यावा ऐसाच सिद्धांत झाला तर कोणते रोतीनें करणें तें लिहिलें पाहिजे. त्या सारिखा तोही मजकूर मनास आणूं" ह्मणोन विस्तारें लिहिलें तें कळलें. ऐसियास स्वामींनीं आज्ञा केली ते यथार्थच आहे. स्वामींपाशीं गृहस्थ तिकडील माहित[गार] मामला करणार त्यास येथें पाठवून द्यावें. त्याचे मुखें तिकडील सर्वही वर्तमान मनास आणून राजप्रकरणप्रसंग कसे काय सांगतो तेही कळतील. तदोत्तर त्यास उत्तर सांगणें तें सांगून. योजिला आहे गृहस्थ यास टाकून दुसऱ्यास हुद्दा सांगाल तर जो करील त्यास श्रापूं व मुलूख तुमच्या हातचा जाईल ह्मणोन आज्ञा, तर मुलूख मामला साधला तो स्वामींच्या आशीर्वादप्रतापें साधला. गेला तर स्वामींचा गेला. यांत आमचें काय गेलें ! आह्मी आज्ञाधारक स्वामींचे. स्वामी पूर्ण अभिमानी आहेत. तेथें आह्मीं चिंता करावीसें काय आहे ? परंतु नूतन ठेवून स्वामींजवळ विनीतभावें विनंती करितात तेंच स्वामींस प्रमाण वाटेल. त्यासच हुद्दा सांगा. नाहींतरी जो करील त्यास श्रापीन ह्मणोन आज्ञा होते. आह्मीं वडील वडिलोपार्जित स्वामींचे चरण अर्चिले असतां आमचें भाषण स्वामींस अप्रमाण वाटतें हीच गोष्ट अपूर्व आहे. असो. स्वामींजवळ जो गृहस्थ आला आहे त्यास येथें

---

असत. येथील शिवाप्पा नाईक फार प्रसिद्ध असे. बाजीरावांनीं ज्या वेळीं श्रीरंगपट्टणावर स्वारी केली त्या वेळीं येथें सोमशेखर नाईक ह्मणून राजा होता (इ० स० १७१४–इ० स० १७३९). तो मेल्यानंतर त्याचे मागून बसाप्पा गादीवर बसला. तो मेल्यानंतर त्याची राणी राज्य करीत असतां हैदरानें बेदनुरावर स्वारी करून तो सर केला. राणी विरम्माजी ही राजवाड्यास आग लावून पळून गेली. नंतर हैदरानें तेथें लुटालूट करून अतिशय द्रव्य नेलें. पुढें तेथें त्यानें हैदरनगर ह्या नांवाचें गांव वसविलें. सांप्रत ह्मैसूर इलाख्यांत हें गांव असून तें नगर ह्या नांवानेंच प्रसिद्ध आहे. आतां बेदनूरचा मागमूसही राहिला नाहीं.

पाठवावें. त्याचें वर्तमान मनास आणून त्यास उत्तर सांगणें तें सांगून. सालगुदस्ता व्यंकटराव इत्यादिक सरदार त्या प्रांतें जाऊन श्रम साहास केलें, झुंजले, भांडले, तुटले, फाटले, मुलूख साधिला, त्यास तेथून उडवून द्यावें ही गोष्ट स्वामींच्या तरी चित्तास येते कीं काय ? श्रम साहास करून मुलूख साधणार सर्व सरदार आहेत. आह्मीं अशी गोष्ट केलीयास कोण्ही बांधतो असें नाहीं. असो. स्वामी ईश्वरस्वरूप आहेत. स्वामींनीं त्या गृहस्थास येथें पाठवून द्यावें. त्याचें वर्तमान श्रवण होऊन उत्तर त्यास सांगणें तें सांगून व त्याचे हातून सोंधे प्रांतीचें (राज)कारण अथवा बिदनूर प्रांतीचें अगर गोंवें प्रांतीचें राजकारण होईसीं असतील तीं लक्षप्रकारें त्याचे हातून घेऊन. मुख्य गोष्ट फिरंगी याचा आमचा सलूख नाहीं. फिरंगी आमच्या जाग्याचे गळां येऊन पडणार. तसेंच सोंधेकराचा आमचा सलोख नाहीं. तो उपद्याप करणार. आह्मी त्याचा मुलूख पालथा घालणार. ऐसा प्रसंग आहे. तेथें कमावीस कोठून चालणार व गोंव्याचे साहुकार फेडण्यास[?] कोठून येतील ? आमच्या फौजा त्या प्रांतीं जाणें त्या जाऊन गर्गशा करतील. ऐसा विचार आहे. स्वामींनीं सात शेणव्यास पाठवून द्यावें. त्याचे हातून राजकारण प्रसंगानें जे जे घडोन येतील ते त्याचे हातून करविले जातील. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक ३९] श्री.

श्रीमत् महाराज परमहंस श्री स्वामींचे सेवेसीः—

चरणरज बाजीराव बल्लाळ प्रधान कृतानेक विज्ञापना येथील कुशल श्रीकृपें यथास्थित असे विशेष. चिरंजीव राजश्री आपांनीं माहिमे[१] घेत-

---

१ माहिमः—हें गांव ठाणें जिल्ह्यांत आहे. येथें एक लहानसा किल्ला आहे. येथें पोर्तुगीज लोकांचे ६० शिपाई व १५ जेजाला असत. चिमाजी आपा पेशव्यांनीं हें इ० स० १७३९ च्या जानेवारीमध्यें हस्तगत केलें.

त्याचें वर्तमान पहिलें सेवेसी लिहिलें आहे, त्यावरून विदित जाहलेंच असेल. माहिम घेतल्यावरी दुसरे दिवसीं छ १० सवालीं[1] केळवें[2] हल्ला करून घेतलें. ऐसीं माणसांचीं डोचकीं मारिलीं. त्याच सलाबतीनें शिरगांवकरांनीं कौल घेतला. केळवे जागा थोर नव्हती. माफ(क)च होती. शिरगांवची माडी होती ते आली. अतःपर चिरंजीव तारापुरास[3] बसले असतील. त्यास स्वामींचे आशीर्वादें तेही जागा हस्तगत होईल. सारांश स्वामींचे कृपेकरून होणें तें बरेंच होईल. "वसईचा[4] आपण आशीर्वाद दिल्हा आहे त्याप्रमाणें होईलच. यांत संदेह नाहीं. आह्मी लेंकरें स्वामींचीं आहों. सर्वस्वी श्रुत होय हे विज्ञापना."

[लेखांक ४०] श्री.

श्रीमत् महाराज परमहंस श्री स्वामींचे सेवेसी.—

चरणरज बाजीराऊ बल्लाळ प्रधान कृतानेक विज्ञापना येथील कुशल तागाईत छ० ७ जिल्काद[5] जाणोन निरंतर आशीर्वादपत्रीं सांभाळ

---

१ छ० १० सवालः—ता० १० जानेवारी इ० स० १७३९, बुधवार.

२ केळवें:—हें माहिमाजवळ एक लहान गांव आहे, ह्मणून केळवें माहिम ह्या संयुक्त नांवानें तें प्रसिद्ध आहे. येथेंही एक लहानसा किल्ला आहे.

३ तारापूरः—हें गांव ठाणें जिल्ह्यांत आहे. हें पोर्तुगीज लोकांच्या ताब्यांत होतें. तें चिमाजी आपांनीं इ० स० १७३९ मध्यें जिंकून घेतलें. नंतर मराठ्यांनीं येथील किल्ल्याची चांगली दागदुजी केली व तेथें चार तोफा ठेवून किल्ल्याच्या नीट बंदोबस्त केला.

४ वसईचा आशीर्वादः—स्वामींनीं चिमाजी आपांस "वसई दिली" ह्मणून अगोदरच आशीर्वाद दिला होता. त्या आशीर्वादाप्रमाणें वसई फत्ते करण्याचा चिमाजी आपांनीं यत्न केला.

५ छ० ७ जिल्कादः—ता० ६ फेब्रुवारी इ० स० १७३९, मंगळवार.

करावयास आज्ञा करावी. यानंतर तारापूर[1] संस्थान घेतल्याचें वर्तमान पूर्वीं सेवेसी लिहिलें आहे. त्यावरून विदित जाहलेंच असेल. तारापूर घेतल्यावरी अशीरगड[2] किल्ला फिरंगी याचा हस्तगत जाहला. किल्ला मातबर बिलंद आहे. परंतु स्वामींचे आशीर्वादें हस्तगत जाहला. अतःपर चिरंजीव राजश्री आपा कुल फौजेनिशीं साष्टीस गेले. साष्टींत तीन स्थळें त्यांपैकीं वेसावीयास[3] खंडोजी माणकर यांणीं मोर्चे देऊन जेर केलें आहे. स्वामींच्या आशीर्वादें इतक्या दिवसांमागें जाहलेंच असेल. वसई घेतल्यावरी वानेरें[4], धारावी हीं दोन स्थळें आपा गेल्यावरी घेतील. एकूण साष्टींतील तिन्ही स्थळें हस्तगत जाहल्यावर वसईचाही यत्न करतील. मुख्य स्वामींचा आशीर्वाद मस्तकीं आहे तेणेंकरून सर्व गोष्टी उत्तमच होतील. रजया आज्ञेप्रमाणें दोन सुसीच्या पाठविल्या आहेत. सेवेसी प्रविष्ट होतील. लोभ असों दिजे. सेवेशी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक ४१] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंस स्वामींचे सेवेसीः—

चरणरज बाजीराव बल्लाळ प्रधान कृतानेक विज्ञापना येथील कुशल

---

१ तारापूर संस्थानः–हें छ० २४ सवाल रोजीं फत्ते झालें. ह्याच दिवशीं पेशव्यांचा प्रख्यात सरदार बाजी भिवराव हा रणामध्यें मृत्यु पावला.

२ अशीरगडः–हा किल्ला छ० २ जिल्काद (ता० १ फेब्रुवारी १७३९) रोजीं फत्ते झाला. हा ठाणें जिल्ह्यांत आहे. ह्यास अशेरी असेंही ह्मणतात. हा किल्ला पोर्तुगीज लोकांकडे पुष्कळ वर्षांपासून असून ते त्याची फार योग्यता मानीत असत व त्यांचीं बायकामुलें त्याचें संरक्षण करीत असत.

३ वेसावेंः–हें ठिकाण खंडोजी माणकर यांणीं छ० ७ जिल्काद रोजीं सर केलें. हें लहानसें बंदर साष्टीच्या पश्चिम किनाऱ्यावर आहे.

४ वानेरें धारावीः—वानेरें (ज्यास वांद्रें Bandra ह्मणतात तें) व धारावी हीं दोन गांवें मुंबईजवळ ठाणें जिल्ह्यांत आहेत.

ता.[1] फाल्गुन वद्य सतमी भोमवार कुच प्रां गांधळी मुकाम नजीक धरणगांव परगणे येरंडोल प्रां खानदेश स्वामींचे आशीर्वादें यथास्थित असे विशेष. उत्तरेकडील वर्तमान तरी तोहमास्तकुलीखान लाहोर घेऊन पुढें आलियावरी महमदशा पातशहा याच्या व त्याच्या फौजांत दोन तीन लढाया जहाल्या. एक लढाई मातबर जाहली. हें वर्तमान राजश्री बाबूराव मल्हारी यांणीं छ० २१ जिल्कादीचें[2] लिहून पाठविलें कीं, "कजलबाशात व खानदौरा यांत युद्ध जाहलें; युद्धप्रसंगीं सादतखान जिवंत धरून नेला; खानदौरास दोन जखमा भारी होत्या; तोही गोटास येऊन मृत्यु पावला; यादगारखान व आणखी कितेक मातबर मेले; सात आठ हजार माणूस रणास आले; लढाई बिघडून गेली; आंव कोणांत राहिला नाहीं; कचरदेखान व निजामउल्मुलुक, तोहमास्त[3] कुलीच्या डेऱ्यास गेले. भेटून महमदशाहा पातशहाची भेट ठरावून आले. तदोत्तर छ० २१ जिल्कादी पादशहा त्याच्या डेऱ्यास तीनसें स्वारानिशीं गेले. भेट जाहली. त्यांणीं मेजवानी

---

१ फाल्गुन वद्य सप्तमी भोमवारः—ता० २० मार्च इ.स. १७३९ मंगळवार.

२ छ० २१ जिल्कादः—ता० २० फेब्रुवारी इ० स० १७३९ मंगळवार.

३ तोहमास्त कुलीखानः—हा इराणचा सुप्रसिद्ध नादिरशहा बादशहा. ह्याचें नांव ताहमास्प कुलीखान असेंही आहे. त्यावरून मराठे त्यास तोहमास्त कुलीखान असें ह्मणत असत. हा मुळचा धनगराचा मुलगा होता, परंतु त्याचा भाग्योदय होऊन तो ता० २६ फेब्रुवारी इ० स० १७३६ मध्यें इराणचा बादशहा झाला. हा मोठा योद्धा होता. ह्यानें आपली धनतृष्णा तृप्त करण्याकरितां हिंदुस्थानावर इ० स० १७३९ मध्यें स्वारी केली. त्यानें दिल्लीपर्यंत येऊन दिल्लीचें सिंहासन पादाक्रांत केलें; सुमारें दोन लक्ष लोक ठार मारिले; आणि तेथून १४॥ कोटी रुपयांची लूट स्वदेशास नेली. ह्याच लुटीमध्यें दिल्लीपतीचें रत्नजडित मयूरासनही त्यानें आपलेबरोबर नेलें. हा क्रूर व महत्वाकांक्षी बादशहा इ० स० १७४७ मध्यें मारला गेला.

द्यावयाची ती देऊन विदा केले. गोटास आले. आणि छ० २१ जिल्कादी तोहमास्तकुली महमदशहाच्या डेऱ्यास येणार. परंतु पाहतां नवी सृष्टि दिसते. गारुड कळत नाहीं." असें लिहिलें. पत्रें कालच आलीं. व दुसरें वर्तमान बऱ्हाणपुराहून लिहिलें कीं, महमदशहा पातशहास दस्त केलें; तोहमास्तकुली दिल्लीस येऊन तक्तीं बसले; द्वाही फिरविली; सादतखानास नवाबात सांगितली; ऐसें दिल्लीहून सावकारीं लिहिलें आहे. त्यावरून बऱ्हाणपुरच्या कमाविसदारांनीं लिहून पाठविलें आहे. हिंदुलोकांस संकट थोर प्राप्त झालें आहे. एक त्याची पातशाही बुडाली यांत संदेह नाहीं. आह्मांसही भारी आहे. स्वामींचा आशीर्वाद मस्तकीं असतां काय चिंता आहे. सविस्तर विदित व्हावें ह्मणून लिहिलें असे. अरिष्ट तों मोठें निर्माण झालें; आह्मी तों कर्जानें बुडालों व अवंदा पैसा कोठें प्राप्त नाहीं. संस्थानें वर्षास खडी, तीं तींही अवंदा राहिलीं. पोटाचेंच संकट प्राप्त जाहलें आणि अरिष्ट तों मोठें उभें राहिलें आहे. बरें, सर्व चिंता आपल्यास आहे. आपण पुढील विचार मनन करून लिहून पाठवावें. आह्मी लेंकरें तुमचीं आहों. सर्व चिंता तुह्मांस आहेच. अद्याप वसई आली नाहीं. परंतु आपले आशीर्वादें येईल. आवजी कवडे रघोजी भोंसल्याचे फौजेनें लुटली. ऐसा चहूंकडून आह्मांवर कसाला प्राप्त झाला आहे. असो. हे घरचे कजिये[1], परंतु पुढील अरिष्ट थोर आलें आहे, आणि पैसा नाहीं. या गोष्टीस योग कसा घडेल तें लिहावयास आज्ञा केली पाहिजे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

१ घरचे कजियेः—घरचे तंटे. पोर्तुगीज लोकांचें व मराठ्यांचें युद्ध चाललें असतां रघोजी भोंसले सेनासाहेब सुभे यांच्या पुतण्यानें मराठ्यांस मदत करण्याचें सोडून देऊन अहमदाबादेपर्यंत स्वाऱ्या करून तिकडे लुटालूट चालविली. तेव्हां त्यावर पेशव्यांनीं आवजी कवडे यास बंदोबस्तास पाठविलें; परंतु त्याचा त्याणें पराभव केला. हें वर्तमान पेशव्यांस कळतांच ते तिकडे जाणार तों हें नादिरशहाचें वर्तमान आलें. अर्थात् हे आपसांतील कज्जे इकडे चालले होते तोंच पुनः हें अरिष्ट आलें त्यामुळें पेशव्यांस महत् संकट वाटणें साहजिक आहे.

[लेखांक ४२] श्री.

श्रीमत् परमहंस श्री स्वामींचे सेवेसीः—

चरणरज बाजीराव बल्लाळ प्रधान चरणावरी मस्तक ठेवून सा० नमस्कार विनंति येथील वर्तमान ता० छ० २४ जिल्हेज[१] मुक्काम नसराबाद प्रांत खानदेश स्वामींचे आशीर्वादेंकरून वर्तमान यथास्थित असे विशेष. स्वामींनीं कृपा करून आशीर्वादपत्र पाठविलें तें पावोन बहुत संतोष जाहला. ऐसेंच हरघडी पत्र पाठवून सांभाळ करावा. स्वामी समर्थ आहेत. यानंतर तोहमास्तकुलीखान उत्तरेकडून आले, त्याची व महमदशहा पादशहाच्या फौजेची लढाई होऊन दिल्लीची पादशाही बुडाली. पातशहास व निजामउल्मुलुक यास व कमरुद्दीनखान यास कैद केलें. खानदवरा युद्धामध्यें लेंकभावासहवर्तमान मृत्यु पावले. सादतखान यांसी त्यांणीं धरून नेलें. त्यावर त्याणें तीन क्रोडी द्रव्य द्यावें (ऐसें) करून त्याचा चाकर जाहला. त्याणें पांच सात हजार फौज समागमें देऊन दिल्लीची बंदोबस्ती करावयाबद्दल पुढें पाठविली. मागाहून आपण दिल्लीस येणार होते. आलेच असतील. दिल्लीस दाखल जाहले. याउपरी दक्षिण प्रांतें स्वार होणार आहेत. याजउपरी त्यास आणखी कोणी गनीम आहे असें नाहीं. आह्मी त्यास व ते आह्मांस गनीम आहों, अशास जों ते तेथून निघाले नाहींत तों तमाम मराठ्या फौजा एक होऊन चमेली पार व्हावें, त्यास अलीकडे येऊं न द्यावें, असा वि[२]चार आहे. सर्व चिंत्ता स्वामींस आहे. अरिष्ट तें मोठेंच आलें. वस-

---

१ छ० २४ जिल्हेजः—ता० २४ मार्च इ. स. १७३९ शनिवार.

२ बाजीरावांचा विचार सर्व हिंदु फौजा एकत्र करून, चमेल पार होऊन दिल्लीस जावें असा होता व त्याप्रमाणें त्यांनीं रजपूत व बुंदेले राजांसीं गुप्त रीतीनें सलोख्याचे तह करून यलही केला होता. परंतु तो अंमलांत आणण्यापूर्वींच नादिरशहानें महमदशहा बादशहास गादीवर बसविलें आणि तो आपला बंधु आहे, त्याच्या आज्ञेंत सर्वांनीं चालावें ह्मणून हिंदुस्थानांतील प्रमुख राजेरजवाड्यांस

ईचें काम अद्यापि झालें नाहीं. आपले आशीर्वादेंकरून उत्तमच होईल. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

## चिमणाजी आपा.

[लेखांक ४३] श्री.

श्रीमत् परमहंस स्वामींचे सेवेसीः—

अपत्यें चिमाजीनें कृतानेक सा० नमस्कार येथील क्षेम तां वैशाख[1] वद्य तृतीया पावेतों स्वामींच्या आशीर्वादेंकरून सुखरूप असों विशेष. तीर्थरूप राजश्री रायांनीं माळवा प्रांतांत पाठविलें होतें. त्यास दयाब-[2]

पत्रें पाठविलीं. ग्रांटडफ ह्मणतात कीं शाहू महाराजांस व बाजीरावांसही त्याजक-डून पत्रें आलीं होतीं. हीं पत्रें फार महत्वाचीं असलीं पाहिजेत. बाजीराव साहे-बांनीं महमदशहास पुन: तक्त प्राप्त झालें ह्मणून १०१ मोहरा नजर पाठवून एक अभिनंदनपर पत्र पाठविलें होतें. त्याचा स्वीकार करून बादशहानें पेशव्यांस एक बहुमूल्य पोषाक पाठविला व पूर्वीं दिलेले अधिकार व जहागीर वगैरे कायम केलीं. बादशहाची फर्मान बाजीरावांस छ० २४ सफर (ता० २२ मे इ० स० १७३९) रोजीं मुकाम कसबे शहापूर परगणे जैनाबाद येथें मिळाली असा दाखला सांपडतो.

१ वैशाख वद्य तृतीयाः—ता० ४ मे इ. स. १७२९ रविवार.

२ दयाबहादूरः—हा माळव्याचा सुभेदार राजा गिरिधर याचा पुतण्या. राजा गिरिधर यासीं उदाजी पवार व चिमणाजी पंडित ह्यांनीं युद्ध करून इ. स. १७२९ मध्यें ठार मारिलें (ग्रांटडफ). त्यानंतर त्याचे जागीं दयाबहादूर ह्याची दिल्लीदरबारांतून योजना झाली. त्यावर चिमाजी आपांनीं स्वारी करून त्याचा धारेजवळ तेरळे (Terlah) येथें पराभव केला. ह्या युद्धांत तो मारला गेला असें ग्रांटडफ ह्मणतात, परंतु त्याचा सन १७३२ असा पुढें देतात. चिमाजी आ-पांच्या पत्रांत दयाबहादूर मारल्याचा उल्लेख नाहीं. ह्याच युद्धांत तो मारला गेला असें मानावें तर हें पत्र इ. स. १७२९ मधील असून आपा छ० १६ सवाल (ता० ४ मे इ. स. १७२९) रोजीं वरील स्वारी करून पुण्यास आले हें सिद्ध आहे. तेव्हां १७३२ हें साल बरोबर जमत नाहीं.

हादूर युद्धास आला. स्वामींच्या आशीर्वादानें त्यास पराभवातें पाठविलें. सांप्रत फिरोन देशास आलों. आजच पुण्यास आलों. तीर्थरूप राजश्री राऊ बुंदेलखंडांत छत्रसालाच्या साह्यास गेले आहेत. महमदखान बंगसाचें यांचें युद्ध मांडलें आहे. स्वामींचा आशीर्वाद मस्तकीं आहे तेणेंकरून तेही यश घेऊन लौकरच माघारे येतील. स्वामींचें आशीर्वादपत्र आल्यानें फार संतोष होईल. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना. पौ छ० ५ जिल्काद सन सलासीन.

[लेखांक ४४] श्री.

श्रीमंत परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

अपत्यें चिमाजीनें कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल ता। चैत्र[1] वद्य तृतीया बुधवार मुक्काम नजीक ग्वाल्हेर पाटीमागें येथून दहा कोस आहे. स्वामींच्या कृपावलोकनेंकरून यथास्थित असे. स्वामींच्या आशीर्वादेंकरून सर्व गोष्टी उत्तम आहेत. मुलुख मात्र वोस होऊन यमुनेपलीकडे गेला. कोठें माणूस नजरेस पडत नाहीं. स्वामींस वर्तमान कळावें ह्मणून लिहिलें असे. स्वामींनीं आशीर्वादपत्र वरचेवर पाठविण्याची आज्ञा केली पाहिजे हे विज्ञापना.

[लेखांक ४५] श्री.

श्रीमंत परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

चरणरज चिमणाजी बल्लाळ चरणांवरी मस्तक ठेवून सा० नम-

---

१ चैत्र वद्य तृतीया बुधवारः—ह्या मितीस ता० १४ एप्रिल इ. स. १७३१, किंवा ता० १० एप्रिल इ. स. १७३४, किंवा ता० ६ एप्रिल इ. स. १७३७ अशा तीन तारखा पडतात. ह्यांपैकीं इ. स. १७३१ किंवा १७३४ मधील हें पत्र असू शकेल. कारण डभोईची लढाई झाल्यानंतर आपा उत्तरेकडे स्वारीस गेले होते. त्याचप्रमाणें इ. स. १७३४ मध्यें पिलाजीराव जाधवाबरोबर स्वारीस गेले होते. परंतु ह्याचा निर्णय बरोबर होत नाहीं.

स्कार विनंति येथील कुशल ताा भाद्रपद वद्य प्रतिपदा[1] मंदवार पावेतों पुण्यास सुखरूप असों विशेष. या प्रांतीं यंदा पर्जन्य आजपावेतों पडला नाहीं. प्रजा बहुत श्रमी झाली. हें वर्तमान तीर्थरूप राजश्री राऊ यांणीं स्वामींस निवेदन केलें. त्यावरून "स्वामी कृपावंत होऊन प्रस्तुत श्री जेजुरी येथील तळयावर येऊन दोन पायली सराटे आसनास घालून अनुष्ठानास बसलेत आहां. जेव्हां पर्जन्य पडेल तेव्हां गोमूत्र घेईन, असा निश्चय केला आहे." हें वर्तमान बापुजी महादेव याणीं राजश्री बापुजीपंतास लिहिलें, त्यावरून सविस्तर कळलें. ऐसीयास स्वामी भृगु अवतार आहेत. जो निश्चय केला तो श्री सिद्धीस नेईल. पर्जन्यही बहुत पडेल ह्यांत संदेह नाहीं. पिंवळ्या सकलादेविसीं आज्ञा केली होती, त्यावरून साडेतीन गज पिंवळी सकलाद सेवेसी पाठविली आहे. प्रविष्ट जाहलियाचा जाब पाठवावयासी आज्ञा केली पाहिजे हे विज्ञापना.

[लेखांक ४६] श्री.

श्रीमंत परमहंस स्वामी स्वामींचे सेवेसीः—

अपत्यें चिमाजीनें कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल ताा पौष वद्य द्वादशी[2] रविवार मुक्काम अलेगांव[3] तर्फ पाटस स्वामींच्या आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट जालें. "शरीरीं फार बरें वाटत नाहीं. मज मागें सर्व तुमचे स्वाधीन आहे. कारकून पोरें आहेत, यांचें सर्वप्रकारें चालवावें. व

---

१ भाद्रपद वद्य प्रतिपदा मंदवारः—ता० २३ आगष्ट इ. स. १७३५ शनिवार, किंवा ता० १९ आगष्ट इ. स. १७३८ शनिवार, अशा दोन तारखा ह्या मितीस येतात. ह्यांपैकीं खरी कोणती हेंही निश्चित करितां येत नाहीं.

२ पौष वद्य द्वादशी रविवारः—ता० १६ जानेवारी इ. स. १७३७.

३ अलेगांव तर्फ पाटसः—हें पुणें जिल्ह्यांत भिमथडी तालुक्यांत आहे.

श्री भुलेश्वराचें[1] काम आपण पाहिलें नाहीं तें तुह्मीं पहावें; व गांवांतील तळ्यास काम लाविलें आहे तेंही जाऊन पाहून कारखान्याचे लोकांचें समाधान करावें" ह्मणून स्वामींनीं आज्ञा केली, ऐसीयास स्वामी चिरंजीवी, भार्गवाचा अवतार आहेत. यास्तव आरोग्यताही अविलंबेंच होईल. आरोग्यतेचें वर्तमान श्रवण होय तावत्काल संतोष नाहीं. यानिमित्य राजश्री बाबूराव नारायण यांस स्वामींचे सेवेसी पाठविले आहेत. आठदहा दिवस स्वामींचे पायांपासीं राहून दिन प्रतिदिनीं आरोग्यतेचें वर्तमान लिहितील. तेणेंकरून संतोष होत जाईल. वरकड कारकुनांस मजमागें तुह्मां वेगळें कोणी नाहीं ह्मणोन आज्ञा केली, तरी स्वामींचे आज्ञेपेक्षां विशेष काय आहे? त्यांच्या परामर्षास अंतर होणार नाहीं. श्री भुलेश्वरास जाऊन तेथील इमारतीचा व तळ्याचे इमारतीचा परामर्ष करून तेथें कामावर लोक आहेत त्यांचेंही समाधान करणें तें रीतीनें करितों. आपली व्यथा कठिण आहे, द्रव्याचें सार्थक करणें ह्मणोन पूर्वी पत्र आलें त्यांत लिहिलें होतें. ऐसीयास आज पावेतों लक्षावधि द्रव्य स्वामींनीं मेळविलें त्याचें सार्थकच केलें, व पुढेंही स्वामींच्या आशीर्वादें सार्थकच होईल. वरकड यशाचा वांटा तुह्मांस दिल्हा ह्मणून स्वामींनीं आज्ञा केली, तर यश, कीर्ति, लक्ष्मी जे आहे ते स्वामींच्या आशीर्वादाचीच आहे. तीर्थरूप राजश्री राऊ[2] नर्मदा उतरोन

---

१ श्रीभुलेश्वराचें कामः—हें देवालय जेजुरीजवळ माळशिरस गांवीं आहे. माळशिरस तर्फ कडेपठार प्रांत पुणें असें पूर्वीं मोडत असे. आतां पुरंदर तालुक्यांत तें गांव आहे. भुलेश्वराचें देवालय इ. स. १७३७ मध्यें स्वामींनीं बांधिलें हें ह्यावरून सिद्ध होतें. ह्या देवालयाचा कै० तुकोजीराव होळकरांनीं जीर्णोद्धार केला.

२ बाजीराव नर्मदा उतरोन गेले ह्मणून चिमाजी आपांनीं लिहिलें आहे ती पेशव्यांची इ. स. १७३७ सालची उत्तर हिंदुस्थानांतील स्वारी होय. ह्या स्वारीस बाजीराव छ० २९ रजब ह्मणजे ता० २२ नोव्हेंबर इ. स. १७३६ रोज सोमवार ह्या दिवशीं निघाले.

गेले. तेथून पत्रें आलीं. सांप्रत वोडशास[1] पावले असतील. राजश्री मल्हारजी होळकर[2] व राणोजी शिंदे येऊन भेटलेच असतील. वोडशाचा कारभार उरकोन आगऱ्यावरून दिल्ली समीप एक वेळ जावें ऐसा त्यांचा बेत आहे. अथवा यमुना उतरून अंतरवेदींत जावें हाही एक विचार आहे. स्वामींच्या आशीर्वादें सर्व मनोरथ सिद्धीस जातील. आमचा हेत वारणाशीस जावें असा आहे. तोही स्वामींच्या आशीर्वादें घडेल हे विज्ञापना.

[ लेखांक ४७ ] श्री.

श्रीमंत परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

अपत्यें चिमाजीनें कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती उपरी येथील कुशल ता॥ छ १० जिल्हेज एकादशी[3] गुरुवार मुकाम ठाणें यथास्थित असे विशेष. स्वामींच्या आशीर्वादेंकरून पुण्याहून स्वार होऊन ठाणें हस्तगत केलें. वानरें, वेसावें, बेलापूर हे जागे फार बळकट आहेत. तेथीलही उपाय करूं. जें होणें तें स्वामींच्या आशीर्वादें होईल. वसईजवळ फौज जाऊन बसली आहे. स्वामींस विदित व्हावें यास्तव लिहिलें असे. निरंतर आशीर्वादपत्र पाठवावयास आज्ञा केली पाहिजे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

१ वोडसें:—ज्यास सांप्रत वोरछा किंवा तेहरी असें ह्मणतात त्यास मराठी कागदपत्रांतून वोडसें असें नांव दिलेलें आढळतें. हें बुंदेलखंडांतील एक प्राचीन संस्थान असून तें झांशीच्या दक्षिणेस आठ मैल आहे.

२ मल्हारजी होळकर व राणोजी शिंदे ह्यांच्या व पेशव्यांच्या भेटी छ० १५ रमजान ता० ६ जानेवारी इ. स. १७३७ रोज गुरुवार ह्या दिवशीं भेलसे परगण्यांत वेत्रवती नदीच्या कांठीं झाल्या.

३ छ० १० जिल्हेज एकादशी गुरुवार:—३१ मार्च इ. स. १७३७.

[लेखांक ४८] श्री.

श्रीमंत महाराज राजश्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसी:—

अपत्यें चिमाजीनें कृतानेक सा० नमस्कार विज्ञापना येथील कुशल [1]माघ शुद्ध द्वितीया पर्यंत स्वामींचे आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. तीर्थरूप राजश्री [2]रायांकडील पत्रें स्वामींस आलीं तींच बजिन्नस पाठविलीं आहेत त्यांजवरून विदित होईल. सारांश स्वामींचा आशीर्वाद तीर्थरूपांचे मस्तकीं आहे. तत्प्रभावेंकरून [3]म्लेंच्छ महागर्वेंकरून आला तो गर्वहत जाहला; समूळ अविलंबेंच बुडाल्याचें वृत्त येईल तें मागाहून सेवेसी लिहून पाठवितों. [4]औरंगाबादेची फौज त्याचे कुमकेस जाणार. शहर सोडून [5]फुलदरीस आली आहे. स्वामींच्या आशीर्वादें हे फौजेचा निःपात इकडेच होय असा आशीर्वाद दिल्हा पाहिजे. होतें तें स्वामींच्या आशीर्वादें होतें. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

१ माघ शुद्ध द्वितीया:—ता० ११ जानेवारी इ. स. १७३८ बुधवार.

२ बाजीरावांकडून जीं पत्रें येत तीं चिमाजी आपा स्वामींच्या अवलोकनासाठीं स्वामींकडे पाठवीत असत. बाजीरावांच्या पत्रांमध्यें चिमाजी आपांच्या नांवचीं लेखांक ३३।३४।३५ हीं पत्रें आहेत हीं स्वामींच्या अवलोकनासाठीं चिमाजी आपांकडून गेलेलीं होत.

३ म्लेंच्छ:—निजामउल्मुलुक.

४ औरंगाबादेची फौज:—ही निजामाची दक्षिणेंतील फौज. हिला पायबंद द्यावा ह्मणून बाजीरावांनीं लिहिलें होतें (लेखांक ३३), त्याप्रमाणें चिमाजी आपांनीं त्या फौजेस उत्तरेस जाऊं न देण्याचा निश्चय केला होता.

५ फुलदरी:—असें नांव चिमाजी आपा आपल्या पत्रांत देतात; परंतु फुलमरी असें नांव पाहिजे. फुलमरी हें गांव औरंगाबादेजवळ आहे.

[लेखांक ४९] श्री.

तीर्थस्वरूप राजश्री राऊ स्वामींचे सेवेसीः—

अपत्यें चिमाजीनें कृतानेक सा० नमस्कार विनंति उपरी येथील कुशल ताा छ० २४ सवाल[1] बुधवार प्रातःकाळचा सवा प्रहर दिवस मु॥ तारापूर[2] यथास्थित असे विशेष. रात्रीं चार पांच सुरुंग मल्हारबा-कडून तयार जाहले. तैसेच हुजरातच्या सुरुंगाचे तीन फांटे एकाचे क-रून कुसाखालीं नेले. तसेंच यशवंतराव पवार याकडीलही एक तयार जाहला. राणबाकडील तयार जाला नाहीं. तयार जाहला त्यास आज दोन घटका दिवसास बत्ती दिल्ही. सारे लष्करचे लहान थोर माणूस रात्रींचेच खाडींतून उतरोन मोर्च्याचे पाठीमागें जमा करून बसविलें होतें. सुरुंग एकामागें एक अंतर करून उडाले. सरकारच्या सुरुंगाचें खिंडार मोटें पडलें. तैसेंच मल्हारबाचा खासा सुरुंग बुरुजाखालीं होता तेथेंही खिंडार मोठें पडलें. त्याच्या उजव्या हाताकडे दुसरे सुरुंग होते तेथेंही थोडीं बहुत खिंडारें पडलीं. त्याच्या उजवीकडे हशमाच्या लोकांनीं कोटासच मर्दामर्दी(नें) शिडी टेंकून वरते चढले. पुढें धार-करी होता तो वर चढल्यावर, वरी गोळी लागून, वरून खालीं भुईवरी पडला. त्याचे पाठीमागें दुसरा चढला, तोही वरून पडला. तेव्हां क्षण-भर शिडी रिकामी होती. फिरोन लोकांनीं लगट करून वरते चढले. वरी लोकांनीं मारामारीची शर्थ केली. हुजरातचे निशाणाजवळ राजश्री बाजी भीवराव व रामचंद्र हरी होते व सारे नामांकित लोक तितके होते. बरे वजेनें चालोन गेले. तैसेंच हशमांपैकींही तीनेकसें माणूस

---

१ छ० २४ सवाल बुधवारः—ता० २४ जानेवारी इ. स. १७३९.

२ तारापूरः—येथें पोर्तुगीज लोकांचें व मराठ्यांचें १७३९ सालीं युद्ध झालें त्याचें वर्णन ह्या पत्रांत आहे. ह्या युद्धामध्यें पोर्तुगीज सेनापति Don Francis de Alarcao हा होता.

सरकारच्या निशाणाजवळ होते. गुतेकर व बाळोजी चंद्रराव होते. हुजरातच्या निशाणाच्या उजवेकडे मल्हारबाचीं निशाणें सारीं होतीं. तैसींच राणोजी भोंसले याचीं होतीं. त्यांणींही शर्थ करावयाची तैसी केली. कुसा अलीकडे सात आठ हात खंदक खोल होता. आठ हात रुंद होता. तो खंदक उतरोन जावें त्या उपरी कोटावरी चढावयासी बहुता प्रकारची अडचण होती. वरले लोकांनीं आंत मेढा कोटाशेजारीं तयार केला होता. त्यामुळें कोटावरीही चढल्यावरी दोन घटका तेथें तुंब पडला. तसेंच जागा जागा. शेवट पावेतों फिरंगी यांणीं हिंमत सोडली नाहीं. हुकयाचा [?] व तोफांचा मार व बरकंदाजाचा मार सिमेपरतां. खाडीचे मध्यें माडी आहे तेथें आह्मी होतों. मल्हारबाचे पायास करट जाहलें आहे, त्यामुळें तेही एकटे आह्मांजवळ होते. सारें झुंज नजरेस पडलें. आमच्या लोकांमध्यें व मल्हारबाच्या लोकांमध्यें आंग्रे यांचेही लोक होते. राणोजी भोंसले यांणीं बरे वजेनें बाकोन घातलें. राजश्री बाजी भीवराव यांणींही बरेच वजेनें सीमेपरतें निशाण चालविलें. त्याचे मर्दुमीची सीमा लिहावी ऐसें नाहीं. हुजरातच्या मोर्च्याच्या डावे हातें गोविंद हरी होते. तेही बरे वजेनें पोंचले. राणबांनीं शिड्या तयार केल्या होत्या, तिकडे सुरुंग तयार नव्हता. ते जबरदस्तीनें खंदक उतरून शिड्या लावून चढलेच असतील. गोविंद हरीचे डावे हातीं बांडे होते. त्याचे पलीकडे यशवंतराव होते. त्याचे पलीकडे तुकोजी पवार. शेवटीं राणबा. तिकडील तपशीलवार वृत्त मागाहून लिहून पाठवूं. सारांश माणूसही सीमेपरते जायां झाले. नांवनिशी मागाहून तहकीक करून लिहून पाठवूं. सुभेदारही हशिमाचे लोक होते त्यांत शिरले होते. सारांश स्वामींचा पुण्यप्रताप थोर, तेणेंकरून जागा फत्ते जाहली असे. अद्याप लोक सारे गांवांतच आहेत. फिरंगी याचीं सारीं माणसें धरावीं ऐसी ताकीद केली आहे. जमा जाहलियावरि तहकीक

करून जसें करणें तसें केलें जाईल. तूर्त जागा फत्ते जाहल्याचें संतोष वृत्त तांतडीनें लिहिलें असे. जासूद चोहो दिवशीं शनवारीं तेथें पावतील. त्यास चित्तास येईल तें इनाम पोंचतें दिल्हें पाहिजे. कृपा केली पाहिजे हे विनंति.

[लेखांक ५०] श्री.

श्रीमंत श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसी:—

विनंती सेवक चिमणाजी बल्लाळ कृतानेक विज्ञापना येथील क्षेम तागाईत माघ[1] शुद्ध प्रतिपदा पावेतों स्वामींचे आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. माहिम, केळवें व शिरगांव व तारापूर व डाहाणू व नारगोळे व खतलवाड एकूण सात आठ जागीं स्वामीआशीर्वादें फत्ते जाहलें. वानरें व वेसावें व धारावी तीन स्थळें राहिलीं आहेत. तींही स्वामींच्या आशीर्वादेंकरून फत्ते होतीलच. सविस्तर वृत्त तीर्थरूप राजश्री राऊ यांणीं स्वामींस लेहून पाठविलेंच असेल. त्यावरून विदित जहालेंच असेल. सर्व महिमा स्वामींच्या आशीर्वादाचा आहे. तेणेंकरून जें होणें तें होतें. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक ५१] श्री.

श्रीमंत महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसी:—

अपत्यें चिमाजीनें कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत फाल्गुन[2] शुद्ध षष्ठीपर्यंत स्वामींचे आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन संतोष जाहला. तुह्मीं वसईवर लगट करून [जाणें]. शिमगे पूर्णिमेअलीकडे श्रीनें तुह्मांस वसई दिल्ही, ऐशियास स्वामी साक्षात्कार ईश्वराचा अंश आहेत. स्वामींचे मुखांतून नि-

---

१ माघ शुद्ध प्रतिपदा:—ता० २९ जानेवारी इ. स. १७३९.

२ फाल्गुन शुद्ध षष्ठी:—ता० ४ फेब्रुवारी इ. स. १७३९ रविवार.

घेल त्याप्रमाणें होईल येविषयीं संशय नाहीं. स्वामींनीं कृपा करून अभय उत्तरें देऊन वसई[1] दिली ह्मणोन आज्ञा केली तेव्हां वसई दिलीच. स्वामींचें अभय [ वचन ] पूर्ण चित्तांत धरून आज्ञेप्रमाणें शरीरद्वारा साहस करणें तें आह्मी सर्वही करीत असों. तरी शिमगे पूर्णिमेअलीकडे वसईवर स्वामींचा ध्वजारोहण करण्यास स्वामी समर्थ आहेत. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[ लेखांक ५२ ] श्री.

श्रीमंत महाराज श्री परमहंस बावा स्वामींचे सेवेसीः—

अपत्यें चिमाजीनें कृतानेक सा० नमस्कार विज्ञापना येथील कुशल ता॥० वैशाख[2] बहुल प्रतिपदापर्यंत मुकाम वसई स्वामींचे आशीर्वादेंकरून सुखरूप असों विशेष. स्वामींचे अभयावरून वसईस मोर्चे माघ शुद्ध दशमीस[3] लाविले. त्यादारभ्य मोर्चेच लाविले व धमधमे चार पांच बांधले. सुरुंग चालविले. जे जे उपाय स्थळ हस्तगत करावयाचे ते केले. फिरंगी यांणीं निराकरणाचे मंत्र पूर्वी युद्धप्रसंगीं मोठ्या मोठ्या सुरांनीं केले. तद्न्यायें फिरंगी यांणीं सुरुंगावर व धमधम्यावर गरनाळा टाकिल्या. सुरुंग विच्छिन्न केले. पनाळे लावून पाणी सोडिलें. आगीचे बोंडे जळके टाकून त्यांवर तेल, दारू, राळ टाकून चार चार रोज डोंब राहीसारखा करी. बरकंदाजी व तोफजी फिरंगी याची निः-

---

१ ह्या पत्रावरून असें दिसून येतें कीं, स्वामींनीं चिमाजी आपास वसई दिल्ही असा, ती हस्तगत होण्यापूर्वीच, आशीर्वाद दिला होता; व त्याप्रमाणें शिमगेपूर्णिमेच्या आंत तेथें स्वामींचा ध्वज लावण्याचा त्यांचा विचार होता.

२ वैशाख बहुल प्रतिपदाः—ता० १३ मे इ. स. १७३९ रविवार. मोडकांच्या जंत्रींत प्रतिपदेचा मुळींच क्षय दिसतो.

३ माघ शुद्ध दशमीः—ता० ७ जानेवारी इ. स. १७३९ बुधवार. ह्या दिवशीं वसईस मोर्चे लाविले.

सीम ह्मणावी तैसी. तथापि स्वामींचा आशीर्वाद उदंड हें सबल शस्त्र आह्मांजवळ, त्याचे प्रतापें इकडून तोफा लागू करून फिरंगी याच्या तोफा मना केल्या. सफेल सोडून लेश केली. वसई जागा बाका, बुलंद, सुरुंगाचा उपाय नाहीं. परंतु स्वामींच्या कृपाकटाक्षें सुरुंग चालवून दोहीं बाजूंनीं खांबावरती तख्तपोसी, त्यावर दोन अडीच हात रेती टाकून, दहा सुरुंग नेऊन पोहोंचवून, दोनशें पाथरवट लावून मोठेमोठे चिरे फोडून, सुरुंगाचे बुधलियास जागा करून, वैशाख शुद्ध पंचमीस[1] सकल सिद्धता करून, लोकांस बाजू वांटून देऊन, नगारियाची इशारत करून, सुरुंग उडतांच सर्वांनीं येलगारास उठावें, बुरुजावर चढावें, शिड्या ठेवून चढावें, ऐसा करार करून, वैशाख शुद्ध षष्ठी[2] बुधवारीं दोन घटिका दिवसास प्रातःकालचा समय येतांच सुरुंगास बत्त्या दिल्या. डावे बाजूचे सुरुंग कांहीं उडोन कांहीं उडणें होते, तोंच लोकांनीं उतावळी करून कोटावर चालोन घेतलें. तों दुसरे सुरुंग तेच बाजूनें उडाले. त्यांनीं लोक दडपले व जायां व ठार जाहले. तसेंच उजवे बाजूचे सुरुंग उडाले. एकदोन उडतांच बुरुजास वाट जाहलीसी देखून लोक वरते चढले. तों दुसरे सुरुंग उडाले. त्यांणीं वरते लोक चढले होते ते उडून गेले. लोक कसकरले. हिरमोड होऊन काम थंड पडलें. फिरंगी यांणीं सांभाळून हाके [?] व गरनाळा व रेजगिरीचा मार न भूतो न भविष्यति केला. त्याणें लष्करचे लोकांत व हशमांत अवसान राहिलें नव्हतें. उजवे बाजूचा मातबर सुरुंग राजश्री मल्हारजी होळकर याजकडील उडणें होता. त्याचा शोध करून पुन्हां त्यांत बुधले घालून रंजक दुरुस्त करून लोकांची निवड केली. आणि सुरुंग उडतांच खामखां निशाणें चढवावीं असा करार करून

---

१ वैशाख शुद्ध पंचमीः—ता० १ मे इ. स. १७३९ मंगळवार.

२ वैशाख शुद्ध षष्ठीः—ता० २ मे इ. स. १७३९ बुधवार.

वैशाख शुद्ध सतमी[1] गुरुवारीं उजवे बाजूचा सुरुंग उडविला. तेच समयीं लोक जाऊन बुरूज अर्धा उडाला त्याजवरी चढले. फिरंगी यांणीं सफेलीच्या आंतून मेढा घालून, पोतीं भरून, तोफा जोडून तयार होतांच तेथें फिरंगीं बोलावून हाके गरनाळाच्या दारूच्या फत्यास आग लावून मार केला, व रेजगिरीचा मार सीमेपरता केला. लोकांवरी अग्नीचा पर्जन्य करून भाजून काढिलें. तथापि स्वामींचें अभयआशीर्वादाचें वज्रकवच लोकांचे अंगीं होतें, तेणेंकरून अगीची तमा न धरितां लोकांनीं हत्यार बरे वजेनें केलें. फिरंगी यांणीं मर्दुमी शिपाईगिरी ह्मणावी तशी केली. त्याचप्रमाणें इकडील लोकांनीं भारती युद्धाप्रमाणें युद्ध केलें. यामागें युद्धें बहुत जाहलीं; परंतु ह्या लढाईस जोडाच नाहीं. सर्व स्वामींचा आशीर्वाद. लोक बुरूज सोडीनातसे जाहले, तेव्हां स्वामीच्या दंडप्रहारेंकरून फिरंगी धर्मद्वेष्टे बेहिंमत होऊन अष्टमीस[2] प्रहर दिवसास कौलास आले. कौल घेतला. आठा दिवसांत कबिला सुद्धां झाडून जातोसें करार केलें. त्याजवरून मार महकूब केला. फिरंगी यांणीं कबिले वस्तभाव गलबतांत भरली. काल वैशाख शुद्ध पौर्णिमेस[3] फिरंगी झाडून गेला. स्वामींचे पुण्येंकरून जागा फत्ते जाहली. लष्करचे व हशमाचे लोक सुरुंगांनीं उडाले व जायां ठार अजमासे पांच हजार किंबहुना विशेष होतील. तैसेंच फिरंगी याचे सात आठसें माणूस ठार व या निराळे जखमी जाहले. भारती युद्धाप्रमाणें [युद्ध] जाहलें. वसई बाका जागा. पश्चिमेकडून दक्षिणेकडे खाडी. पूर्वेकडे खाजण चिखल. तिहींकडून किमपि इलाज नाहीं. एके उत्तरेकडून उपाय. तिकडेही रेती, धर नाहीं. स्वामी साक्षात् ईश्वराचा

---

१ वैशाख शुद्ध सप्तमीः—ता० ३ मे इ. स. १७३९ गुरुवार.

२ अष्टमीः—ता० ४ मे इ. स. १७३९ शुक्रवार.

३ वैशाख शुद्ध पौर्णिमाः—ता० १२ मे इ. स. १७३९ शनिवार.

अंश. स्वामींनीं वसई "दिल्ही, दिल्ही, दिल्ही," त्रिवार लिहिलें ते शब्द अन्यथा कसे होतील. वरकड वसईची गोष्ट मानवी लोकांनीं ह्मणावी ऐसें नाहीं. वसई स्वामींचे आशीर्वादें फत्ते जाहली. श्रीचें सुदर्शन धर्मद्वेष्टे यांचे मस्तकीं वज्रप्रहार होऊन टोपीकर म्लानत्व पावले. अन्यथा वसई सही न होती. फिरंगी आगीचा पुतळा होता! स्वामींचे कर्तृत्वास पार नाहीं. स्वामींची महिमा स्वामी जाणत. आह्मां मानवी लोकांस काय कळे? वसई फत्ते होतांच सवासें पुतळ्या पाठवून देणें व श्री भुलेश्वरास सवासें रुपयांचा मुगुट घातला ह्मणून आज्ञा केली, याजवरून स्वामींचे आज्ञेप्रमाणें वसई फत्ते होतांच श्रीनिवास केदार याजबरोबर पुतळ्या सवासें व श्री भुलोबास मुगुट सवासें रुपयांचा घातला ते रुपये १२५ सवासें स्वामींचे सेवेसी पाठविले आहेत. प्रविष्ट होतील. आह्मी लेंकरें स्वामींची असों. सर्वप्रकारें कृपा करणार स्वामी समर्थ आहेत. स्वामींचे चरणाव्यतिरिक्त दुसरें दैवत आह्मांस काय आहे? (खास दस्तुर)" सारांश स्वामींच्या आशीर्वादें व दंडाच्या प्रतापें कार्य सिद्धीतें पावलें असे. स्वामींचा महिमा आह्मी वर्णावयास सामर्थ्य धरीत नाहीं. श्रीनिवास केदार पुतळ्या व रुपये देऊन रवाना केले आहेत. लौकरच पावतील. वर्तमान त्वरेनें विदित व्हावें यास्तव हें पत्र पुढें रवाना केलें असे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना."*

---

* हीं शेवटचीं वाक्यें खुद्द चिमाजी आपांच्या हातचीं आहेत. ह्या पत्रांत वसईच्या लढाईचें साद्यंत वर्णन दिलें आहे. तें अगदीं निष्पक्षपातपणाचें असल्यामुळें त्याचा व पोर्तुगीज लोकांनीं लिहिलेल्या वर्णनाचा उत्तम मेळ पडतो. ह्या युद्धांत पोर्तुगीज सेनापति Silveira de Menezes हा मृत्यु पावला. व पोर्तुगीज लोकांचे ८०० लोक पडले. त्यांचा पूर्ण पराभव झाल्यानंतर Captain de Souza Pereira ह्या पोर्तुगीज अधिकाऱ्यानें चिमाजी आपांस कौल देऊन वसई सोडून दिली. ह्या वेळीं मराठ्यांनीं पोर्तुगीज लोकांशीं फारच थोरपणाचें वर्तन केलें. ह्या युद्धाची साद्यंत हकीकत स्वामींच्या चरित्रांत दिली आहे.

[ लेखांक ५३ ] श्री.

श्रीमंत महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसी:—

चरणरज चिमणाजी बल्लाळ विज्ञापना येथील वर्तमान तागाईत वैशाख वद्य १ पावेतों महाराजांचे आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. स्वामींचे आज्ञेप्रमाणें श्रीनिवास केदार याजसमागमें पुतळ्या १२५ व रुपये १२५ एकूण सवाशें पुतळ्या व सवाशें रुपये पाठविले आहेत. सेवेसी प्रविष्ट जाहलियाचें उत्तर सादर जाहलें पाहिजे; व सर्व स्वामींच्या आशीर्वादेंकरून फत्ते जाहलें याचें वृत्त सविस्तर काल लेहून सेवेसी विनंतीपत्र पाठविलें आहे. तें पुण्याहून रा० अंताजी नारायण यांणीं स्वामींचे सेवेसी पावतें केलेंच असेल. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

पैवस्ती चंद्र २४ सफर सन तिसा सलासीन.

[लेखांक ५४] श्री.

श्रीमन्महाराज श्री परमहंस बावा स्वामींचे सेवेसी:—

अपत्यें चिमाजीनें कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल तागाईत ज्येष्ठ बहुल षष्ठी पर्यंत स्वामींचे आशीर्वादेंकरून य-

---

१ वैशाख वद्य १:—ता० १३ मे इ. स. १७३९ रविवार. ह्या पत्रांत लिहिलें आहे कीं वसई फत्ते जाहल्याचें सविस्तर वृत्त काल पाठविलें आहे. अर्थात् तें वरील पत्र होय. परंतु त्यावर मिति प्रतिपदाच दिली आहे, व ह्याही पत्रांत प्रतिपदाच लिहिली आहे. मोडकांच्या जंत्रींत मुळींच वद्य प्रतिपदेचा क्षय आहे. त्यावरून मिति घालण्यांत चूक झाली असें दिसतें. वरील पत्राच्या दुसरे दिवशीं जर हें पत्र लिहिलें आहे तर ह्याची ता० १४ मे इ. स. १७३९ सोमवार ही मिति असली पाहिजे.

२ ज्येष्ठ बहुल षष्ठी:—ता० १५ जून इ. स. १७३९ शुक्रवार. लेखांक ५२ व ५३ हीं दोन पत्रें चिमाजी आपांकडून गेल्यानंतर स्वामींचें जें अभिनंदनपर उत्तर आलें त्याचें हें प्रत्युत्तर होय.

थास्थित असे विशेष. सोमाजीबराबर[1] स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन संतोषावाप्ति जाहली. वसई फत्ते जाहली यावरून स्वामींनीं मजला कित्येक कृपा-उत्तरें गौरवून दाशरथी आदिकरून साक्ष-उपसाक्ष देऊन आज्ञा दिली; तर सर्व सामर्थ्य स्वामींचे आशीर्वादाचें. वसई दिल्ही, दिल्ही, दिल्ही, हीं उत्तरें त्रिवार स्वामींनीं लेख केलीं, व स्वामींनीं पाटसास मज दर्शन दिलें, तेथेंही वसईविशीं अभय दिलें. तदनुरूप स्वामींनीं वसईवर सुदर्शन प्रेरून धर्मद्वेष्टे यांचा निःपात केला. येरवीं वसई सई होती असें [नवतें] व टोपीकर अग्निरूप होते. त्यांच्या सर्व शक्ति कुंठित करणें हा प्रताप स्वामींचा. आह्मां मानवी लोकांचें हें कृत्य नव्हे. श्री रघुनाथ [यांणीं] वानरांहस्तें समुद्रीं पाषाण तरवून लंकेशादिक त्रिकुटाचळाचें मर्दन केलें, तैसेंच श्रीकृष्णें यादवांहस्तें म्लेंछादि दैत्यांचें निर्दळण केलें, त्याचप्रकारें पाश्चात्यांचें उपमर्दन स्वामींनीं करून वसईत ध्वजारोहण केलें. स्वामी मूर्तिमंत ईश्वररूप आहेत. स्वामींचा प्रताप कर्तृत्व वर्णावयास आमची बुद्धि नाहीं. प्रापंचिक विचारें स्वामींनीं मज महत्त्व देऊन आज्ञा दिली तर हें सर्व भूषण स्वामींचें आहे. मी स्वामींचा असें.

पुतळ्या पाठविल्या त्या निफांसी आहेत. त्यांस फांसे करावयास सोनें तोळे पांच पाठविणें ह्मणून आज्ञा, त्याजवरून सदरहू पांच तोळे सोनें सोमाजीबराबर पाठविलें आहे.

लक्ष्मणराव याजबाबत सातशें रुपये आह्मी पुण्यास येऊन सेवेसी पाठवून देऊं.

मोतें दररुपायास मोतीं एक १ प्रमाणें मोतीं सव्वाशें पाठविणें ह्मणून आज्ञा. त्यास येथें मोतीं नाहींत. स्वामींचे आज्ञेप्रमाणें पुण्यास खरीदी करून पाठवावयाशीं लिहिलें आहे. मोतीं मिळालीं तर पाठवितील. मोतीं न मिळत तर सव्वाशें रुपये सेवेसी पाठवितील.

---

१ सोमाजीः—स्वामींचा नोकर.

जिन्नस पाठविणें वजन पक्कें

८३ साकर

८२ गुळ

८८।। केशर

फिरंगी कागद गड्डी दोन २ पंवळ्यांची माळ १०८.

८८१ कृष्णागर

८८३ कस्तुरी तोळे

फिरंगी कागद गड्डी २

पंवळी माळ १०८

येणेंप्रमाणें पाठवणें ह्मणून आ-ज्ञा त्यावरून

साताऱ्याहून देवविलें.

८३ साकर

८३ गुळ

पुण्याहून देवविलें वजन पक्कें.

८८।। केशर

८८१ कृष्णागर

पांच कारकुनांस पाठवितों त्यांस धंदे सांगणें ह्मणोन आज्ञा. ऐशास आह्मी पुण्यास[1] आल्यावर स्वामींनीं दोन अथवा तीन कारकून पाठवून द्यावे हे विनंती आमची आहे. असें असतां स्वामींनीं पांच कारकून पाठविले तर स्वामी-आज्ञा आमचे वस्तु मोडवेल असें नाहीं. येवि-षयीं सोमाजी विनंती करील त्याजवरून विदित केलें आहे. स्वामींची आज्ञा सोमाजीनें जबानीं सांगितली त्याजवरून वस्त्रें पाठविलीं व सोमाजी बरोबर दोघे होते त्यांस दिलीं.

कारकुनास वस्त्रें.

१५ तिवटें

३ पासोडिया

सोमाजीस रुप्याचें कडें दिलें. सोमाजी बरोबर दोघे होते त्यांस दोन पासोड्या दिल्या.

१९० [?] पुण्याहून देवविले.

येणेंप्रमाणें सेवेसी पाठविलें आहे. विदित झालें पाहिजे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

१ चिमाजी आपा छ० १० जमादिलाखर ह्मणजे ता० ३ सप्तंबर इ. स. १७३९ रोजीं पुण्यास आले.

[ लेखांक ५५ ]                श्री.

श्रीमंत परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

अपत्यें चिमणाजी बल्लाळ कृतानेक सा० नमस्कार विनंति उपरी येथील क्षेम ता० छ० २५ जिल्हेज गुरुवार[1] एकादशी मुक्काम औरंगाबाद स्वामींच्या कृपावलोकनेंकरून यथास्थित असे विशेष. पुण्याहून स्वार जाहलियावर आमदानगरचे मुकामीं तीर्थस्वरूप राजश्री रायांजवळ पावलों. नासरजंगाकडील[2] बोलीचा विघाड जाहला, यामुळें आज दोन अडीच महिने गंगातीरींच त्याचें आमचें फिरणें जाहलें. पोटाची ओढ सीमेपरती. जोंधळे मात्र रानांत होते, त्यामुळें गुजरान झाली. विघाड झाला तो तैसाच राहूं देऊन आलें तर मागें कटाक्ष राहील तो कार्याचा नाहीं. यास्तव मेहेनत, पोटास पैसा नसतां करणें तैसी कमाल, स्वामींचा आशीर्वाद मस्तकीं आहे त्या बळें, करून मोंगल विचारावर आणून पहिले जहागीर द्यावयाची बोली होती त्याप्रमाणें करार करून घेतली, आणि सलूख केला. पुढें त्यांणीं आह्मीं एका विचारें चालून मुलुखाचा बंदोबस्त दुतर्फा उत्तमप्रकारें चालवावा ऐसा सिद्धांत करून तीर्थरूप राजश्री राऊ स्वार होऊन हिंदुस्थानास गेले. आह्मांस आग्रह करून शहर पा-

---

१ छ० २५ जिल्हेज गुरुवारः—ता० १३ मार्च इ. स. १७४०.

२ निजाम दक्षिणेंत नाहीं असें पाहून बाजीरावांनीं त्याचा पुत्र नासिरजंग ह्यावर स्वारी केली. उभयतांच्या बऱ्याच झटापटी झाल्या. चिमाजी आपा २० जिल्काद ह्मणजे ता० ८ फेब्रुवारी इ. स. १७४० रोजीं पुण्याहून निघून अहमदनगर येथें बाजीरावांस मिळाले. छ० १५ जिल्हेज रोजीं बाजीरावांची व मोंगलाची वरखेड येथें भेट होऊन बाजीराव हिंदुस्थानच्या स्वारीस गेले. आपा नासिरजंगाच्या आग्रहास्तव औरंगाबादेस गेले. तेथें त्यांचा फार सत्कार होऊन ते छ० १६ मोहरम ह्मणजे ता० १ एप्रिल इ. स. १७४० रोजीं परत आले. ग्रांटडफ ह्मणतात कीं मुंगी पैठण येथें मोंगलाशीं तह होऊन बाजीरावास हंडिया व खरगोण हे नर्मदेच्या कांठचे दोन प्रांत जहागीर मिळाले. तो हाच प्रसंग असावा.

चेतों बोलाविलें, यास्तव येथें आलों. काल शहरांत त्याचे हवेलीस गेलों होतों. चार सहा घटिका बसलों होतों. बेदराहून निरोप घेऊन एकूणीस हजार स्वार, वीस हजार बरकंदाज, दीडशें तोफा, तीन हजार जेजाला, तीनशें उंट बाणांचे इतकें सामान मोंगलाचें होतें. स्वामींच्या आशीर्वादें आमचीच सलाबत (झाली). आशीर्वादपत्र पाठवीत जावें हे विज्ञापना.

[ लेखांक ५६ ] श्री.

श्रीमत् परमहंस बावा स्वामींचे सेवेसी.

चरणरज चिमणाजी बल्लाळ कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती येथील कुशल तागाईत छ० २३ मोहरम चैत्र वद्य दशमी[1] मुकाम किल्ले कोरिगड घांटमाथा यथास्थित असों विशेष. औरंगाबादेहून पारनेरा-नजीक आलों. तेथें "राजश्री संभाजी[2] आंग्रे सरखेल एकाएकीं अली-

---

१ छ० २१ मोहरम:-ता० १० एप्रिल इ. स. १७४०.

२ संभाजी आंग्रे सरखेल:-कान्होजी आंग्र्यास एकंदर सहा पुत्र होते. त्यांपैकीं औरस सखोजी व संभाजी; व दासीपुत्र तुळाजी, मानाजी, धोंडजी आणि येसाजी. कान्होजी वारल्यानंतर सखोजी कुलाब्याचा मालक झाला, व संभाजीस सुवर्णदुर्ग दिलें. सखोजी इ. स. १७३३ मध्यें मृत्यु पावला. त्याचे मागून संभाजी गादीचा मालक झाला, परंतु तो सुवर्णदुर्गातच राहत असे. संभाजीचें व मानाजीचें पटेनासें झाल्यामुळें इ. स. १७३४ मध्यें बाजीराव पेशव्यांनीं कुलाब्यास जाऊन त्यांचा तंटा मिटविला. मानाजीस कुलाबा देऊन वजारतमाब असा किताब दिला, व संभाजीस सरखेल हें पद दिलें. परंतु ह्या बंधूंचें अधिक अधिक वैमनस्य वाढून संभाजीनें मानाजीस त्रास देण्याचा क्रम आरंभिला. आणि बाजीराव व चिमाजी हे औरंगाबादेस आहेत अशी संधि साधून कुलाब्यावर स्वारी केली. तेव्हां मानाजीनें पेशव्यांस व स्वामींस पत्रें लिहिलीं. त्यावरून पेशवे त्याच्या मदतीस गेले.

बागेंत उतरोन हिराकोट[1] घेतला, सागरगड[2] घेतला, चौलचा[3] कोट घेतला, थळचा[4] कोट घेतला, अलीबागेंत कुलाब्याचें पाणी बंद केलें. ये समय येऊन आपलें रक्षण करावें." ऐसें मानाजीचें पत्र नानांजवळ आलें. येतांच नानांनीं चार पांचशें राऊत, वासुदेव जोशी व विठ्ठल शिवदेव व अंताजी नारायण यां समागमें देऊन रवाना केलें. आह्मांस मानाजीचें पत्र होतें तें आह्मांकडे पाठविलें. पत्र मार्गीं पावलें. तेच दिवशीं लांब मजल करून घोडनदीवर मुक्काम केला. तेथूनच मानाजीस आश्वासनाचें पत्र लिहून रवाना केलें. दुसरे दिवशीं विसां कोसांची मजल करून लोहगांवास आलों. मानाजीचे कुमकेविषयीं इंग्रजांसही पत्रें पाठविलीं. तेच दिवशीं पुण्याहून चिरंजीव नानांस रात्रीं बोलावून आणून त्यां समागमें सारी फौज देऊन रवानगी केली. ते येथून पांचवे रोजीं कुलाबियास जाऊन पोहोंचले. आपणही पुण्यास जाऊन तीन दिवस तेथें राहून, मातुश्रीचें दर्शन व आज्ञा घेऊन, स्वार होऊन काल येथें आलों. नाना तेथें पावले. तेच दिवशीं संभाजी कडील चौकी बाहेर उभी हिराकोटाजवळ आश्रयास होती ते मारिली. पंचवीस तीस माणूस कापून काढिलें. तुळाजी आंगऱ्या जखमी धरून आणिला आहे. इंग्रजही अगोदर कुलाबियास येऊन पाणी सामान जें

---

१ हिराकोटः—हा अलिबाग शहराच्या ईशान्येस समुद्रकिनाऱ्याजवळ एक प्रचंड किल्ला आहे. हा कान्होजी आंग्र्यानें इ. स. १७२० मध्यें बांधला असें ह्मणतात. हा इ. स. १८४० पर्यंत आंग्र्यांच्या ताब्यांत होता.

२ सागरगडः—हा किल्ला अलिबागेच्या पूर्वेस ६ मैलांवर आहे. ह्या किल्ल्याच्या एका टोंकावरून अपराधी लोक समुद्रांत सोडीत असत. त्या टोंकास 'वानर टोंक' असें नांव आहे.

३ चौलः—रेवदंडा. हें बंदर इतिहासप्रसिद्ध आहे. येथें पोर्तुगीज लोकांचा अंमल पुष्कळ वर्षे होता.

४ थळः—हा अलिबागेच्या उत्तरेस तीन मैलांवर आहे.

पाहिजे तें कुलाबियास पोंचविलें. व सांप्रत तो आरमारानशीं कुला-
ब्याजवळ आहे. तेथून तोफांचा मार दिला. त्यामुळें अलिबागेंतून
सरोन हिराकोटचे उत्तरेस आश्रयानें मोर्चे बांधून राहिले आहेत. नाना
सागरगडाखालून खाडीचे कडेनें गेले. तेथें पंचवीस माणून संभाजी-
कडील आलें होतें. त्यांत सरदार होता तो व पांच सात माणूस जिवें
मारिलें व वरकड पळालें. सहा सातजण धरून आणिले. जर संभाजी
लौकर निकाल काढून जीव वांचवून निघोन गेला तर उत्तमच जालें.
गुराबा व थोरलीं गलबतें इंग्रजांचे भयानें सुवर्णदुर्गाकडे लावून दिलीं
आहेत. लहान गलबतें व महागिऱ्या मिळोन साठ दागिने, तरतीं साख-
रीचे खाडीजवळ ठेविलीं आहेत. जर धीर धरून मोर्चेबंदी करून रा-
हिला तर मोर्चे लावून पारपत्याचा विचार करणें तैसा स्वामींच्या आ-
शीर्वादाचे बळें करीतच आहों. इंग्रजांस मार्ग देऊन जाऊं द्या ह्मणोन
संभाजीनें सांगून पाठविलें होतें; परंतु इंग्रेजानें मान्य केलें नाहीं.
आह्मी औरंगाबाद प्रान्तीं आहों, ये प्रान्तीं धान्य नाहीं, ऐसा समय
पाहून [ संभाजी ] आले होते. तुमचा आशीर्वाद आमचे मस्तकीं अ-
सतां त्यांस समय काय फावणार आहे? कळावें ह्मणून लिहिलें असे.
मानाजीची स्थापना आह्मीं केली; परंतु त्यास स्मरण न राही ऐसें जहालें.
कितेक प्रकारें वावगी वर्तणूक आह्मांशीं केली. त्याचा विस्तार लिहि-
ल्यानें चित्तांत येणार नाहीं. जे समयीं पाय पाहूं तेव्हां विदित करूं.
उरण जागा फिरंग्याची ते आपणच बळकावली. तैसेंच आमच्या उरावर
बांधिला (?) तेविशीं व पैक्याविशीं वारंवार लिहिलें, परंतु ते गोष्ट चि-
त्तांत न ये. आज पांचा वर्षांत एक पैसा आमचा देणें तो दिला नाहीं.
बहुतच अमर्यादा मांडिली. यास्तव त्याचे डोळे उघडावे. याकरितां
तजविजेनें पाल व मिरगड दोन्ही जागे संभाजीच्या हातांस जात होते;
तेथील लोकांचा दिलासा करून ते जागे धेऊन आपलीं निशाणें चढ-

विलीं. तैसेंच फिरंगी याचें उरण बळाविलें होतें तेंही घेतलें. आजच फत्ते जाल्याचें पत्र उरणाहून आलें. सारांश त्याचे डोळे उघडले. व सर्व प्रकारें संभाजीचे हातोन जीवही ये समयीं वांचविला असे. सारांश इतकाही प्रताप स्वामींचे आशीर्वादाचा आहे. तेणेंकरून सर्व विचार होतात. दुसरा अर्थ नाहीं. कर्ज फिटेल ऐसें स्वामींचे मुखावाटें निघालें आहे, तेंही शेवटास जाईल. स्वामींच्या आशीर्वादावेगळें दुसरें जाणत नाहीं. उद्यां परवां घाट उतरोनही (?) कुलाब्या पावेतों जाणार आहे. तेथें न पावतां अगोदर संभाजीचा निकाल जाला तर उत्तमच आहे. नाहींतर तेथवर जाऊन होईल वृत्त तें लिहून पाठवूं. निरंतर आशीर्वाद-पत्र पाठवीत जावें. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक ५७] श्री.

श्रीमत् परमहंस बावा स्वामींचे सेवेसी

अपत्यें चिमणाजी बल्लाळ कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल स्वामींच्या कृपावलोकनेंकरून यथास्थित असे विशेष. महाराज राजश्री स्वामींनीं आज कृपा करून

| चिरंजीव राजश्री नानास[1] | आह्मांस |
|---|---|
| पेशवाईचीं वस्त्रें दिलीं. | १ मंदील. |
| १ मंदील | १ चादर. |
| १ चादर. | १ झगा मंदलाचा. |

१ नानांस पेशवाईचीं वस्त्रें आषाढ शुद्ध १२ बुधवार शके १६६३ रोजीं (ता० १४ जून इ० स० १७४१) दिवसां दहा घटिकेंस सातारा येथें मिळालीं. त्या वेळीं चिमाजी आपा बरोबर होते. वस्त्रें मिळाल्यानंतर कांहीं दिवस साताऱ्यास मुकाम करून नंतर ते धावडशीस ब्रह्मेंद्र स्वामींच्या दर्शनास गेले व तेथून वाई वगैरे ठिकाणीं जाऊन उभयतां चुलते पुतणे छ० २ जमादिलाखर ह्मणजे ता० ३ आगष्ट इ० स० १७४१ रोजीं पुण्यास आले.

| | |
|---|---|
| १ झगा मंदलाचा | १ पटका. |
| १ पटका. | १ तुरा मोत्यांचा. |
| १ तुरा मोत्यांचा. | — |
| १ तरवार. | ५ |
| १ कटार. | |
| १ हत्ती. | |
| — | |
| ८ | |

येणेंप्रमाणें वस्त्रें दिलीं असेत. स्वामींच्या कृपावलोकनेंकरून जें होणें तें होत असे. स्वामींस वर्तमान श्रुत व्हावें यास्तव विनंति लिहिली असे. कृपा केली पाहिजे हे विज्ञापना.

## बाळाजी बाजीराव.

[लेखांक ५८] श्री.

श्रीमंत महाराज श्री परमहंस स्वामींचे सेवेसीः—

चरणरज बाळाजी बाजीराऊ कृतानेक विज्ञापना येथील कुशल तागाईत चैत्र वद्य पंचमी[1] मंगळवार मुक्काम ह्मैसाळ[2] कृष्णातीर येथें स्वामींचे कृपेंकरून सुखरूप असो विशेष. वसईकडील वर्तमान[3] तरी मोर्चे लागले आहेत; दोन तीन सुरुंगांजवळही गेले आहेत; व पांच धमधमे तयार जाहले आहेत. परंतु सुरुंगास पाणी लागले वरून मोर्चा

---

१ चैत्र वद्य ५:—ता० १७ एप्रिल इ० स० १७३९.

२ ह्मैसाळ:—हें दक्षिण महाराष्ट्रांत मिरजेजवळ कृष्णानदीच्या कांठीं लहानसें गांव आहे.

३ वसईकडील वर्तमान:—वसईचा वेढा चालू होता त्या वेळचें हें पत्र आहे. बाळाजी बाजीराव ह्या वेळीं छत्रपति शाहू महाराज यांचे बरोबर ह्मैसाळ येथें गेले होते.

तो चालत नाहीं. लष्कर फार; दोन तीन महिने एक जागा मुक्काम जाहला; गवत चहूं गांवांहून आणावें लागतें; असें वर्तमान तेथील आहे. तें स्वामींस तीर्थरूप राजश्री आपा सेवेसीं लिहितच असतील. मीही वर्तमान विदित व्हावें ह्मणोन लिहिलें असे. इराणी तोहमासकुलीखान यानें पातशहा व सर्व अमीर कैद केले आणि आपण दिल्लीस येऊन तक्तावर बसणार. पुढें दक्षिणेवर चाल करावी हाच त्याचा पुर्ता आशय आहे. पुढें येईल वर्तमान तें सेवेसी लिहून पाठवूं. तीर्थरूप राजश्री राऊ बऱ्हाणपुराजवळ आहेत. येथील वर्तमान तरी तूर्त राजश्री छत्रपति स्वामींचा मुक्काम येथेंच आहे. विशेष अर्थ लिहावया योग्य असें नाहीं. सर्व आश्रा व आशीर्वाद आमचे मस्तकीं आहे तों वसईही येईल व तोहमासकुलीखानासही तंबी पोहोंचेल. स्वामींनींही सदैव लेखकांस आज्ञा करून तीर्थस्वरूप राजश्री आपांस लिहिलें पाहिजे. स्वामींची कृपा आहे तों सर्व घडतच आहे. वरकड विशेष अर्थ आहे असें नाहीं. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक ५९] श्री.

श्रीमंत महाराज श्री परमहंसबाबा स्वामींचे सेवेसीः—

चरणरज बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक विज्ञापना येथील कुशल ता। भाद्रपद बहुल पंचमीपर्यंत[2] स्वामींचे आशीर्वादेंकरून यथा-

---

१ तोहमास कुलीखानः—नादिरशहा. बाजीराव पेशव्यांच्या पत्रांत तोहमास्त कुलीखान असें नांव दिलें आहे.

२ भाद्रपद बहुल पंचमीः—एवढेंच मोघम लिहिलें असल्यामुळें बरोबर सन काढतां येणार नाहीं, परंतु ह्या पत्रांत पेशव्यांचे व निजामाचे भेटीचा संबंध दर्शविला आहे ती भेट एदलाबाद परगण्यांत छ० २९ सवाल ह्मणजे ता० ७ जानेवारी इ० स० १७४१ रोजीं झाली. त्या पूर्वींचें हें पत्र असल्यामुळें त्याची ता० ३१ आगष्ट इ. स. १७४० असावी असें दिसतें.

स्थित असे विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन संतोष जाहला. "आमची व किलीजखान[1] यांची भेटी करून देणें. त्याचाही वृद्धापकाळ जाहला आहे तरी हे भिक्षा देणें. त्याजपासीं बहुतसें मागणें नाहीं. ज्या गांवीं संन्यास[2] घेतला ते खेडें सातशें रुपयांचें आहे तेवढें मात्र मागोन घेऊं." ह्मणोन विस्तारें आज्ञा केली. ऐशास खेड्या करितां स्वामींनीं किलीजखानास जाऊन भेटावेंसें काय आहे? आमची व नवाब निजामउल्मुलुख यांचे भेटीचा योग घडलियावर स्वामींचे आज्ञेप्रमाणें खेड्याचा मजकूर करूं. जे गोष्ट स्वामींस अगत्य तेच आह्मांस अगत्य. आह्मी स्वामींचे आज्ञेखेरीज काय आहे? गणेशाचें राजुरीचें[3] तळें दुरुस्त जाहलें, देवालयासही काम लावणार असों, ह्मणून लिहिलें तें कळलें. स्वामींच्या चित्तांत येईल तें सिद्धीस पावेलच पावेल. स्वामी ईश्वराचा अंश आहेत. मानवी मनुष्यास मात्र अवघड. स्वामींस सर्वही पदार्थ सहजांत आहेत. स्वामींनीं कृपा करून समाधीचे अनुष्ठान समयींची दूल (धूळ?) पाठविली ते प्रविष्ट होऊन शिरसा वंदिली. घोडी पाठवून द्यावयाविसीं लिहिलें, त्यास पागा येथें जमा जाहल्या ह्मणजे स्वामींचे मर्जीप्रमाणें घोडी पाठवून देऊं. श्री भुलेश्वराचा[4] मंडप तयार जाहला त्यास घांटी बांधावयास दोन सोट बारा हात लांब, हातभर ऊंच, या प्रमाणें देणें ह्मणोन (आज्ञा), तर आह्मीं लांकडें आणिलीं होतीं तीं बंगल्यास लाविलीं. स्वामींनीं आज्ञा केली त्याप्रमाणें लांकडें नाहींत.

---

१ किलीजखान—निजामउल्मुलुक.

२ स्वामींनीं संन्यास घेतला होता तें गांव (राजुरी?) मोंगलाईंत होतें असें ह्यावरून सिद्ध होतें. तें निजामाकडून देवास मिळावें असा स्वामींचा यत्न होता.

३ राजुरीः—हें गांव कोणतें? स्वामींची जन्मभूमि जी राजुरी–जिला गणेशाची राजुरी असें नांव आहे ती मोंगलाईंत बेदर जिल्ह्यांत आहे.

४ भुलेश्वर—पुणें जिल्ह्यांत पुरंदर तालुक्यांत माळशिरस ह्मणून जें स्वामींचें इनाम गांव आहे तेथील हें देवस्थान होय.

लांकडें आलियावर (सादर करूं). स्वामींचे आज्ञे खेरीज काय असे? सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक ६०] श्री.

श्रीमत परमहंस महाराज श्री स्वामींचे सेवेसीः—

चरणरज बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक सा० नमस्कार विनंति येथील कुशल ता० छ० ७ जिल्काद[1] पावेतों स्वामींचे कृपावलोकनें-करून यथास्थित असे विशेष. बहुत दिवस आशीर्वादपत्र येऊन परामृष न केला. ऐसें नसावें. चरणरजाचा परामृष सदैव करावा. तीर्थस्वरूप आपांनीं[2] कैलासवास केला हें वर्तमान स्वामींनीं ऐकिलेंच असेल. मोठा घातच जाहला. तीर्थस्वरूप राऊ[3] यांणीं कैलासवास केल्यास आठ महिने न जाहले तों श्रीनें हा प्रसंग घडविला. एकाएकींच श्रीनें दुःखार्णवीं पाडिलें. होणार बळवत. श्रीइच्छेस उपाय काय? वडील होते त्यांजवरी स्वामींची कृपा होती, तन्मुळें जों जीवित्व तोंपर्यंत कीर्तिच जाहली. त्या माघारी चरणरजावरी महाराजांची कृपा आहेच व त्या कृपेमुळें कल्याणच होईल. नवाब निजामउल्मुलुख याचा व नासिरजंगाचा[4]

---

१ छ० ७ जिल्काद:—ता० १४ जानेवारी इ. स. १७४१.

२ आपा—चिमाजी आपा हे छ० ८ सवाल ह्मणजे तां० १७ दिसेंबर इ. स. १७४० रोजी वारले.

३ राऊ—बाजीराव हे छ० १२ सफर ह्मणजे ता० २८ एप्रिल इ. स. १७४० रोजीं नर्मदातीरीं रावेर येथें वारले.

४ नासिरजंगः—हा निजामउल्मुलुक याचा दुसरा मुलगा. निजाम दिल्लीस असतांना ह्यानें दक्षिणेंत पुंडावा सुरू केला. त्याचें पारिपत्य करण्याकरितां निजाम दिल्लीहून दक्षिणेंत आला. दिल्लीदरबारीं निजामाचें वजन विशेष असल्यामुळें माळव्याची सनद मिळवून देण्याचे कामीं त्याचें साह्य होईल अशा आशेनें, पेशव्यांनीं ह्या वेळीं निजामास मदत केली व त्याची नर्मदातीरीं दादें परगणे एदला-

कलह निर्माण जाहला होता त्यास आह्मीं साहित्य न करितां निजामउ-त्मुलुख याचें केलें. त्यावरून नासरजंग फकीर झाले. तदोत्तर असफ-बहाची भेट जाहली. बहुमान आदर फारच केला. सर्व प्रताप स्वामींचे कृपेचा आहे. स्वामींवांचून आह्मांस दैवत नाहीं. वरकड विस्तार काय लिहूं ? सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[ लेखांक ६१ ] **श्री.**

श्रीमंत महाराज श्री परमहंस बावा स्वामींचे सेवेसी:—

चरणरज बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक विज्ञापना ता। छ० २४ सफर मुकाम नजीक मंडळे रेवातीर पर्यंत आपले आशीर्वादेंक-रून सुखरूप असों विशेष. प्रस्तुत आशीर्वादपत्र येऊन कुशल अर्थ अवगत होत नाहीं. तरी सदैव आशीर्वादपत्रीं लेखन करीत अ-गावें. यानंतर इकडील वृत्त तरी आह्मी मंडळीयास येऊन मोर्चे ...दे. बारावे रोजीं शहर हस्तगत जाहले. उपरांत गढीस मोर्चे ...क. सुरुंग चालविले. गढी उडून हलालली. आपले आशीर्वादें-आ... गढी हस्तगत जाहली. मंडलेकर राजानें शिपाईगिरीच्या श-समयी

यांजकडे ...कारपूर्वक भेट घेतली. नासिरजंग हताश होऊन फकीर झाला व रोझे केली तें ...श्वरभक्ति करूं लागला. परंतु पुन: संधि येतांच त्यानें निजामाशीं ईश्वरस्वरूप ... तो पराभूत झाला व शेवटीं एका मित्राच्या साह्यानें प्राण बचा-...र राहिला. निजाम इ. स. १७४८ मध्यें मृत्यु पावल्यानंतर तो न्यून असेल ...भूमीवर येऊन दक्षिणेचा सुभेदार झाला. परंतु ती सुभेदारी करतीलच. कर... टिकली नाहीं. तो ता० ५ डिसेंबर इ. स. १७५० रोजीं

१ भाद्रपद शुद्ध ... —ता० १९ एप्रिल इ. स. १७४२ सोमवार.
गील पेशव्यांचें पत्र ... तीर:—नर्मदेच्या कांठीं जबलपुराजवळ गढामंडल ह्मणून
जी शालजोडी पाठवि... गढामंडळ ह्या नांवानेंही प्रसिद्ध आहे.
पाठविल्याचाही उल्लेख अ...
दिसतें. अद्यापि पेशव्यांची

र्तानें युद्ध केलें. आपण व एक पुत्र ठार जाहला. त्याचे बंधु व पुत्र दोन सांपडले. येथील राज्य त्याचे पुत्रास देऊन स्थापना करून ठेविलें. स्वामींचे आशीर्वादाविना दुसरें दैवत जाणत नाहीं. बरीं वाईट तरी स्वामींचीं लेंकरें आहोंत. एतद्विषयीं विस्तार लिहावा असें काय आहे? सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक ६२] श्री.

श्रीमंत महाराज परमहंस श्री स्वामींचे सेवेसीः—

चरणरज बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक विज्ञापना येथील वर्तमान आषाढ शुद्ध दशमी[1] गुरुवार मुक्काम गडपहार[2] नजीक सिरोंज प्रांत माळवा महाराजांचे आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. बहुत दिवस क्रमले. आशीर्वादपत्र येऊन परामृष न जाहला. ऐसें नसावें. निरंतर आशीर्वादपत्रीं परामृष केला पाहिजे. येथील वर्तमा[न] तरी यंदा मुल्खगिरीचे दिवस स्वदेशीं क्रमले. नर्मदातीरास आल्या[वर] मंडळ्यास गुत्ता पडला. उष्णकाळ निघून गेला. कमाविसदा[रां]ळें रसदा उगवल्या पाहिजेत, यास्तव रजवाडियांत आलों. [त्या]चा पर्जन्यकाळ प्रवर्तोन पाऊस पडूं लागला. नर्मदेस पाणी प[...] सैन्य विशेष. नवका थोड्या. यास्तव स्वदेशीं यावयाचा योग[...] या प्रांतेंच छावणी करावी लागली. असो. स्वामींची कृ[पा] किंबहुना विशेषात्कार आहे. तेणेंकरून कल्याणावह असे[...] दिनप्रतिदिनीं वृद्धीतें पावली पाहिजे. स्वामींस विस्तार[...] असें नाहीं. राजश्री दादोबा प्रसंगोचित विनंति सेवेसी[...] करणार स्वामी समर्थ आहेत. सेवेसी श्रुत होय हे वि[ज्ञापना].

बर इ. स.
प्रिल इ. स.
. निजाम दिल्लीस
रिण्याकरितां निजाम
शेष असल्यामुळें मा-
अशा आशेनें, पेश-
तीरीं दादें परगणे एदला-

---

१ आषाढ शुद्ध दशमी गुरुवारः–ता० १ जुलई इ.

२ गढपहारः—परगणे मुगावली, सरकार चंदेरी.

ता० [1]भाद्रपद शुद्ध अष्टमी मंगळवारपर्यंत स्वामींच्या आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन संतोष जाहला. "बाजीराव व चिमाजी आपा आह्मांसीं निष्ठापूर्वक वर्तत होते; तुह्मी आह्मांसीं प्रतारणा करितां; शालजोडी पाठविली ती कसरीनें खादली, ते माघारी पाठविली असे; उत्तम जोडी पाठविणें" ह्मणून कितेक आज्ञा केली, ऐसीयास आमची निष्ठा स्वामींचे चरणारविंदीं दुसरी नाहीं. आह्मीं लेंकरें; स्वामी सर्व प्रकारें कृपा करून चालवितात; दौलत कारभार सर्व स्वामींच्या आशीर्वादाचा प्रताप; आह्मी आज्ञांकित असतां स्वामी शब्द लावून लिहितात हेंच अपूर्व आहे. ये विसींचा विस्तार कागदीं पत्रीं काय ल्याहावा? स्वामींच्या चरणावलोकनास येणेंचें आहे ते समयीं सर्व सेवेसी निवेदन करूं. स्वामी कृपा करतील. रामचंद्र हरी याजकडीलही विनंति करणें ते दर्शनसमयीं करून स्वामी आज्ञा करतील त्याप्रमाणें वर्तणूक करूं. किनखापाविसीं आज्ञा केली त्यास येथें किनखाप उंच नाहीं. पुण्याहून आणून दर्शनसमयीं प्रविष्ट करूं. वरकड रा० पिलाजी जाधवराव व रामचंद्र हरी यांजकडील स्वामींनीं मजकूर लिहिला तो कळला. स्वामींनीं आज्ञा केली तें कळलें. आह्मी स्वामींच्या आज्ञेखेरीज नाहीं. सारांश स्वामी ईश्वरस्वरूप आहेत. स्वामींच्या चरणांविना दुसरें दैवत नाहीं. आमचें न्यून असेल तें स्वामींनीं पूर्ण करावें [हें] उचित आहे. तदनुरूप स्वामी करतीलच. करावें. शालजोडी मुबदला पाठविली आहे. कृपा करून घेतली

---

१ भाद्रपद शुद्ध अष्टमी मंगळवारः—ता० १६ आगष्ट इ. स. १७४३. मागील पेशव्यांचें पत्र गेल्यानंतर स्वामींकडून आलेलें हें उत्तर आहे. पेशव्यांनीं जी शालजोडी पाठविली ती कसरीनें खाल्ली होती, ह्मणून ती स्वामींनीं परत पाठविल्याचाही उल्लेख आहे. ह्या पत्रावरून स्वामी पेशव्यांवर कोपयुक्त झाल्याचें दिसतें. अद्यापि पेशव्यांची भेट झाली नाहीं. हें पत्र साताराच्या मुक्कामचें असावें.

पाहिजे. अपूर्व वस्त न पाठविली ह्मणून लिहिलें, त्यास यंदाचे स्वारीचा अर्थ विदित आहेच. तथापि स्वामींचे आज्ञेस अंतर न करावें हा निश्चय आहे. सर्वांविसीं लेंकरास भरंवसा स्वामींचा आहे. वाईट बरे तरी स्वामींचे आहों हे विनंति.

[लेखांक ६६] श्री.

श्रीमत् महाराज राजश्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसी.

चरणरज बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक विज्ञापना येथील कुशल स्वामींचे आशीर्वादें यथास्थित असों विशेष. चिरंजीव राजश्री जनार्दनपंत[1] यांचें लग्न वैशाख बहुल पंचमीस योजिलें असे; तर स्वामींनीं कृपा करून कार्य सिद्धीस पावविलें पाहिजे. पहिलें विनंतीपत्र सेवेसी पाठविलें आहे; परंतु प्रविष्ट झालें असेल नसेल नकळे. यास्तव हल्लीं विज्ञप्ति लिहिली आहे. आह्मी लेंकरें, स्वामींनीं कृपा सर्व प्रकारें करावी हें उचित असे. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विज्ञापना.

[लेखांक ६७] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसी:—

चरणरज बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक विज्ञापना येथील कुशल वैशाख[2] शुद्ध चतुर्दशी रविवारपर्यंत स्वामींच्या आशीर्वादेंकरून

---

१ जनार्दनपंत:—बाळाजी बाजीरावांचे सर्वांत धाकटे बंधु. ह्यांचें लग्न वैशाख शुद्ध ५ ह्मणजे ता० ६ एप्रिल इ. स. १७४४ रोजीं झालें. वधू रामाजी नाईक भिडे यांची कन्या सगुणाबाई. (हे जनार्दनपंत भाद्रपद शुद्ध ७ ता० ८ सप्तंबर इ. स. १७४९ रोजीं सातारा येथें मृत्यु पावले.)

२ वैशाख शुद्ध चतुर्दशी रविवार:—मोडकांच्या जंत्रींत हा वार बरोबर जमत नाहीं. पत्राच्या संदर्भावरून तें जनार्दनपंतांचें लग्न झाल्यानंतर लिहिलें असावें असें दिसतें. त्यावरून त्याची मिति ता० १४ एप्रिल इ. स. १७४४ रोज शनिवार ही बरोबर जमते.

यथास्थित असे विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन संतोष जाहला. स्वामींनीं बुद्धिवादपुरस्सर मागील पुढील कुल गोष्टी पत्रीं लेखन करून विशदें आज्ञा केली व खंडोजी साळवी आला, त्यांणीं स्वामींची आज्ञा सांगितली त्यावरून सविस्तर कळलें. ऐशीयास आह्मी स्वामींचीं लेंकरें; आह्मांस स्वामींच्या चरणारविंदाव्यतिरिक्त दुसरें दैवत नाहीं. स्वामी ईश्वरी अंश आहेत. आपल्या चरणांजवळ आमचा दुजा भाव नाहीं ह्मणोन प्रतिपत्रीं विनंति कायावाङ्मनसा स्वामींस लिहिलें असतां स्वामी रुष्टभावें आज्ञा करितात या गोष्टीस आमचा उपाय काय? तीर्थरूप कैलासवासी थोरले नाना व राव व आपा निष्ठापूर्वक श्रीसीं वर्तत आले त्यापेक्षां विशिष्ट विनीतभावें वर्तावें हीच इच्छा माझी आहे. दुसरा विचार असेल तर स्वामींच्या चरणाची शपथ असे. प्रसाद दिल्हा तो माघारा देणें ह्मणोन आज्ञा तर हे दौलत यत्किंचित् काडीपर्यंत स्वामींची आहे. स्वामींनीं ठेविली, जतन करीन. पावशेर अन्न व वस्त्रपात्र उपभोग करितों तेवढेंच आमचें. वरकड सर्व स्वामींच्या आशीर्वादाचा प्रताप आहे. स्वामी उपरोधिक लिहितात तर वडील आहां. लेंकरूं मांडीवर हगल्यास वडील मांडी तोडतील ऐसें जाहलें नाहीं. स्वामीही करणार नाहींत. आह्मी अपराधी तरी स्वामींचेच. स्वामींविना दुसऱ्यास करुणा येणें अथवा आपले मुलाचा गौरव करणें हें सर्व स्वामींकडेच आहे. दुसऱ्यावरी आमच्या माणसाची सत्ता होती व तुझ्या + + + आमचे माणोस दुसऱ्यास मारीत होते त्याची छळणा तुह्मीं केली ह्मणोन, तर स्वामींच्या चरणाजवळ माणसें चाकरी करितात व मजपाशीं लोक चाकरी करितात ते सर्व स्वामींचेच आहेत. मी स्वामींचा आज्ञांकित. तेथें व येथें सेवक आहेत ते सर्व माझेच समजतों. मीं आपले माणसास कांहीं एक गोष्ट सांगितल्यास स्वामींच्या दर्पास जपून होईल हे काय गोष्ट आहे? मी

जीवें प्राणें स्वामींचे कार्यास हजीर आहें. जो स्वामींच्या चरणांजवळ अमर्यादेनें वर्तेल त्यास मर्यादापूर्वक वर्तवावयासच मजला स्वामींनीं ठेविलें आहे. येविसींची स्वामींनीं चिंता न करावी. मकसुदाबादी[1] टाकण चलाख पाठविणें, व्याली घोडी पहिली तुह्मांस दिली तिचा मुबदला पाठविणें ह्मणोन आज्ञा, त्याजवरून चिरंजीव राजश्री सदोबांपासीं[2] टाकण चांगला चलाख होता तो जीन सामान सरंजामसुद्धां पाठविला आहे; स्वामींनीं ठेवावा. सारांश मी स्वामींचें लेंकरूं; मजपासून अंतर कांहीं पडेल तरी आपण क्षमा करावी व कृपा करावी. हें सर्व सामर्थ्य स्वामींस आहे. चिरंजीव राजश्री जनार्दन याच्या लग्नाची त्वरा जाहली तो अर्थ पहिला सेवेसी लिहिलाच आहे. प्रस्तुत स्वामींस वस्त्रें

| कुडती बादली | शालजोडी | किनखाप |
|---|---|---|
| १ | १ | १ |

एकूण तीन सनगें पाठविलीं असेत. कृपा करून घेतलीं पाहिजेत. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति.

[लेखांक ६८] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

चरणरज बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक विज्ञापना येथील कुशल ता० मार्गशीर्ष[3] शुद्ध चतुर्थीपर्यंत स्वामींचे आशीर्वादेंकरून

---

१ मकसुदाबादी— मुर्शिदाबादी घोड्या फार चपळ अशी पूर्वीं समजूत असावी.

२ सदोबाः—सदाशिवरावभाऊ, चिमाजी आपांचे चिरंजीव.

३ मार्गशीर्ष शुद्ध चतुर्थीः—ता० २७ नोव्हेंबर इ. स. १७४४ मंगळवार. ह्या पत्राखालीं पैवस्तीची ता० छ० १० जिल्काद मार्गशीर्ष शुद्ध ११ सन खमस अर्बैन मया व अलफ (ता० ४ डिसेंबर इ. स. १७४४) ही बरोबर दिल्यामुळें ह्या पत्राची तारीख सिद्ध आहे.

 

यथास्थित असे विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन संतोष जाहला. घोडीविसीं आज्ञा केली त्यास स्वामींचे मर्जीप्रमाणें घोडी पाठविली आहे. चित्तास आलिया ठेविली पाहिजे. घांटेविसीं आज्ञा केली त्याजवरून स्वामींचे आज्ञेप्रमाणें घांट वसईहून देवविली आहे. येऊन पावेल. वरकड विहीर मौजे यवतास [?] होती तिचें काम लावलियाचा मजकूर विस्तारें लिहिला तरी स्वामी पुण्यवान् आहेत जें चित्तावर धरितील तें करतील. **नारो राम** यास तारापुरची मजमू आहे त्याचा नाश बहुत जाहला. त्याचेविसीं स्वामींनीं कितेक आज्ञा केली तरी स्वामींचे आज्ञेपेक्षां अधिक काय? परंतु **नारो राम** यास येथें पाठवून द्यावें. त्याचें वर्तमान मनास आणून त्यास ताकीद पाहिजे तसी देऊं. **लक्ष्मण राम** व **गोविंद राम** यांविसीं आज्ञा केली तरी स्वामींची ज्यावरी अवकृपा जाहली त्याचें इष्ट कधीं होणार? स्वामी ईश्वरस्वरूप आहेत. आह्मी आज्ञांकित असों. घोडी रोड आहे ह्मणून स्वामी वाईट ह्मणतील तर न ह्मणावी. ताजी जाहलियावर कशी आहे तें दिसोन येईल. कदाचित् वाईट निघाली तर सेवक सेवेतें येईल तेव्हां जशी मर्जी असेल तशी मिळवून देईल. स्वामींचे आशीर्वादेंकरून विजय मात्र उत्तमच होईल. सर्व प्रताप स्वामींचे कृपेचा आहे हे विनंति.

पैवस्ती अंक छ० १० जिल्काद
मार्गशीर्ष शुद्ध ११ सन खमस
अर्बैन मया व अलफ.

[लेखांक ६९] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसी:—

चरणरज बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक विज्ञापना येथील

कुशल ता० [1]अधिक शुद्ध ११ एकादशीपर्यंत स्वामींच्या आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन संतोष जाहला. स्वामींनीं चरणरजास कितेक आशीर्वादपत्रीं गौरवून आज्ञा केली, तरी मी लेंकरूं स्वामींचें आहे. सर्व भूषण स्वामींचेंच आहे.

रंगोपंत अकलेकर याचे ज्योतिष कुलकर्ण करून देणें ह्मणजे काशींत मज रत्नाभिषेक केल्यासारखा होईल ह्मणोन आज्ञा, ऐशास स्वामींचे आज्ञेपेक्षां विशेष काय आहे? इनसाफाचे वाटेनें वाजवी होईल तें करूं.

मध पांढरा वजन आदमण, फणसपोळी ८। पावशेर स्वामींनीं कृपा करून पाठविली ते पावली.

रेशीम कांकडे ८ एकूण वजन पक्के ८८॥ अदसेर पाठविले असे; याच्या मुबदला मखतुल रेशीम पाठविणें ह्मणोन आज्ञा त्यास शोध येथें केला; मखतुल रेशीम उत्तम नाहीं. रेशीम मखतुल आलियावर पाठवून देऊं.

ज्याचे मनसुबींत आमचें नांव आढळत जाईल त्यास आह्मांकडे पाठवावें, आह्मी मनसुबी विल्हेस लावीत जाऊं ह्मणोन आज्ञा, त्यास आपले चाकराची मनसुबी असेल ते स्वामींकडे पाठवीत जाऊं.

सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

१ अधिक शुद्ध एकादशी:—स्वामींच्या कारकीर्दींत इ. स. १७४० पासून इ. स. १७४५ पर्यंत अधिक महिने दोन येतात. एक अधिक श्रावण शके १६६३, व एक अधिक आषाढ शके १६६६. ह्यावरून पाहतां अनुक्रमें ता० १३ जुलई इ. स. १७४१ सोमवार, व ता० ९ जून इ. स. १७४४ शनिवार ह्या दोन मितींस अधिक शुद्ध एकादशी पडते. ह्यांपैकीं कोणती मिति निश्चित करावी हें संशययुक्त आहे.

[लेखांक ७०]* श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसी:—

चरणरज बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक विज्ञापना येथील कुशल ता० अश्विन बहुल अष्टमीपर्यंत स्वामींचे आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें पावलें. रंगोबा त्रिंबक अकलेकर यांची स्थापना पूर्ववत्प्रमाणें करणें ह्मणोन आज्ञा, ऐशीयास स्वामींचे आज्ञेपेक्षां विशेष काय आहे. इनसाफाचे सबब जें वाजवी होईल तें लक्षप्रकारें करूं हे विज्ञापना.

[लेखांक ७१] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसी:—

चरणरज बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक विज्ञापना येथील कुशल ता० आषाढ बहुल पंचमीपर्यंत स्वामींचे आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन परम संतोष जाहला. टाकण धाडला तो कार्याचा नाहीं, याजकरितां पाठविला असे; तरी ठेवून मोबदला बसावया योग्य घोडे पाठविणें ह्मणोन आज्ञा, त्यास स्वामींनीं टाकण पाठविला तो पावला. स्वामींच्या मर्जीस येई असें घोडें योजून मागाहून पाठवून देतों. स्वामीचित्तास येई ऐसीच घोडी पाठवूं. स्वामींनीं रुपयांचा संक्षेप आज्ञा केली कीं लोकांकडील तुह्मीं देविले तेच मान्य केले, परंतु तुह्मी आमचें वचन मोडितां याजवरून विपर्यास वाटतो ह्मणोन, तर स्वामी आह्मांस ईश्वरस्थानीं आहेत. आह्मी स्वामींचें वचन मोडूंसें काय आहे? मी स्वामींचें लेंकरूं आहे. सर्वप्रकारें कृपा करणार स्वामी समर्थ आहेत. आठीदहा

* लेखांक ७०।७१।७२।७३।७४।७५ ह्या पत्रांच्या मिति, वार न दिल्यामुळें, बरोबर निश्चित करितां येत नाहींत.

दिवशीं कृष्णातीरीं समाधीस जाऊं ह्मणोन आज्ञा, तर उत्तम आहे. श्रीचें वार्षिकच आहे. स्वामी संपादतील. नरसो माणकेश्वर हातगांवकर याचेविसीं आज्ञा केली तरी त्यास पाठवून द्यावें. धंदा सांगून चालवूं. येसू मेखर शिंपी याजकडील कर्जाची आज्ञा केली त्यास ताकीद केली आहे. स्वामींकडील कर्ज त्याचे वस्तु ठेववते असें नाहीं. लवकरच वारून देईल. हस्तीदाताविसीं राजश्री दादोबास आपण आज्ञा केली त्याजवरून तलास करून संग्रहीं होता तो वजन पक्के ८८४ चार शेर पाठविला आहे. पावलियाचें उत्तर पाठविलें पाहिजे. स्वामीयोग्य गरीब घोडा मेळवून सेवेसी पाठवितों हे विज्ञापना.

[लेखांक ७२] श्री.

श्रीमंत महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

चरणरज बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक विज्ञापना येथील कुशल ता० कार्तिक बहुल त्रयोदशीपर्यंत स्वामींचे आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन संतोष जाहला. राजश्री सयाजी कनोजे याचेविसीं स्वामींनीं कितेक आज्ञा केली त्यांत मुख्यार्थ हाच कीं सयाजीस सातसें रुपये निव्वळ पावणें, कडें व दोन वस्त्रें देणें, कोणें जागा चाकरी करणें तो जागा नेमून पाठविणें ह्मणजे सयाजीस पाठवूं ह्मणोन आज्ञा, त्यास स्वामींचे आज्ञेपेक्षां आह्मांस जोड काय आहे? व सयाजी कनोजा पदरीं बाळगून त्याचें चालवावें ऐसाच तो मनुष्य आहे. लक्षप्रकारें चालवूं. परंतु आपण सातसें रुपये निव्वळ व कडें व दोन वस्त्रें लिहिलीं या हिशेबें हिशेब फार होतो. आमच्या हशमांत इतकी तैनात कोणासही नाहीं. स्वामी ईश्वरस्वरूप, स्वामींची आज्ञा परमवंद्य मानोन पांचसें रुपये स्वामींस विनंतीं लिहिले तेच बहुत आहेत. स्वामींचे चरणाजवळ बहुत बोलावें आणि नव्हेसें जाहलें तर स्वामींसीं शब्द लावावा अशी विनं-

तिच आह्मी करीत नाहीं. स्वामींजवळ बोलावें ते सत्यप्रतिज्ञ बोलावें या अन्वयें विनंति करितों. सयाजीस निव्वळ पांचशें रुपये व दोन वस्त्रें पाठवूं. सयाजींनीं वसईस राजश्री शंकराजी केशव यांजपासीं चाकरी करावी. ते त्याचें चालवितील, सारांश, आह्मी लेंकरें स्वामींचीं; आह्मांवरी स्वामींची दया पूर्ण आहे ती दिनप्रतीनें विशेष करून घ्यावी हें कायावाङ्मनसा चिंतीत आहें. तदनुरूप श्रीकृपें घडेल. स्वामींनीं सयाजी कनोजे यास समाधान करून अति सत्वरें पाठविलें पाहिजे. सारांश, लहानसहाना गोष्टीसाठीं लेंकरावर राग मनांत आणावा असें नाहीं. आह्मी सर्व प्रकारें स्वामींचीं लेंकरें आहों. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[ लेखांक ७३ ] श्री.

श्रीमंत महाराज राजश्री परमहंस स्वामींचे सेवेसी:—

चरणरज बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक विज्ञापना येथील कुशल ता० छ मोहरमपर्यंत स्वामींचे आशीर्वादें यथास्थित असे विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन संतोष जाहला. याच रीतीं सदैव आशीर्वादपत्रीं सांभाळ करणार स्वामी समर्थ आहेत. कित्येक आशीर्वादपत्रीं आज्ञा लिहिली तरी स्वामींचे आज्ञेविरहित दुसरा विचार काय आहे ? कर्जाबाबत तूर्त दहा हजार रुपये पाठवून द्यावयाविसीं आज्ञा व पाचा आठ व मोहरा आठ पाठविणें ह्मणून आज्ञा, तरी दहा हजार रुपये स्वामींस प्रविष्ट करावे ह्मणून चिरंजीव राजश्री सदोबास पुण्यास लेहून पाठविलें आहे. ते पाठवितील. कदाचित् त्यास अनुकूल न पडेल तरी येथून तरतूद करून सदरील ऐवज स्वामींस प्रविष्ट होईसारखा करूं. यास अंतर न पडे. पाचा व मोहरांविसीं तरी आह्मी स्वारीहून पुण्यास आल्यानंतर [करूं]. स्वामींचे आज्ञेविरहित दुसरी जोड काय आहे ? सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक ७४] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसी:—

चरणरज बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक विज्ञापना ता० छ० २८ जमादिलावल पावेतों महाराजांचे कृपेंकरून यथास्थित असे विशेष. स्वामींनीं कृपा करून पत्र पाठविलें तें पावलें. वर्तमान सविस्तर कळलें. पांच हजार रुपये व्याजाचा मजकूर लिहिला तरी व्याजाचा हिशेब एकंदर केला त्यामध्यें पांच हजार रुपयाचें व्याजाचा आला आहे. तें वृत्त रा० जगन्नाथ चिमणाजी यांस ठावकें आहे. त्यांपैकीं दोनशें वीस रुपये पाहिजेत तरी तसेंच लिहून पाठवावें. रुपये पाठवून देऊं. उदेपूरचे सनदेविसीं लिहिलें तरी जुनी सनद पाठवून द्यावी. त्याप्रमाणें नवी सनद ज्याचे नांवें पाहिजे त्याचे नांवें पाठवून देऊं. समाधीमध्यें तुह्मांवांचून निजध्यास नाहीं, तुमचें मन साक्षीस येईल तेव्हां खरें, ह्मणून लिहिलें तरी स्वामींचे मनांत आमचा निजध्यास आहे. स्वामींची दया पूर्ण आह्मांवरी आहे, तन्मुळें यश, कीर्ति, लौकिक उत्तम प्रकारें होतो हें पुरतें आमचे प्रत्ययास आलें आहे. स्वामींखेरीज आह्मांस अन्यत्र दैवत नाहीं. आमचा निजध्यास रात्रंदिवस स्वामींचे पायासींच आहे. दुसरा अर्थ किमपि नाहीं. स्वामींचाही आमचे ठायीं दुसरा विचार नाहीं. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक ७५] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसी:—

चरणरज बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक विज्ञापना ऐशी जे, स्वामींनीं चिठी पाठविली तेथें कित्येक खेदयुक्त पर्याय लिहिला, तो कळला. ऐशियास आह्मी स्वामींचीं लेंकरें; आह्मांस इतके पर्याय स्वामींनीं लिहावे हें काय आहे? आह्मीं स्वामीखेरीज आहों असें नाहीं. जशी आमची निष्ठा पायांशीं असेल तदनुरूप फल [मिळेल]. पत्रीं काय ल्याहावें हे विज्ञापना.

# सदाशिव चिमणाजी ऊर्फ भाऊसाहेब.

[लेखांक ७६] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

चरणरज सदाशिव चिमणाजी कृतानेक विज्ञापना येथील कुशल तागाईत भाद्रपद[1] बहुल षष्ठी बुधवारपर्यंत स्वामींचे आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र सोमाजीबराबर पाठविलें तें प्रविष्ट होऊन संतोष जाहला. पसमी थानें आह्मांकरितां पाठविलीं तीं आह्मांयोग्य नव्हेत ह्मणोन फिरोन पाठविलीं असेत, घेऊन उत्तम वस्त्रें पाठवणें, ह्मणोन कितेक आज्ञा केली. ऐसीयास स्वामींचे आज्ञेपेक्षां आह्मांस अधिकोत्तर काय आहे? परंतु समयीं तींच थानें होतीं, तीं पाठविलीं होतीं. स्वामींच्या चित्तास न आलीं, फिरोन पाठविलीं, उत्तम केलें. हल्लीं उत्तम पसमी थानें ४ चार सोमाजीबराबर पाठविलीं असेत. घेऊन उत्तर पाठविलें पाहिजे. "बरवाजी ताकपीर यानें आमची हेलणा केली आहे. अतःपर कल्याणची स्वारी नेमिली आहे. घराचें घर व परगण्याचा परगणा सोडणार नाहीं. यामुळें तुह्मांवर कृपा अथवा कोप होईल. श्री तुह्मांवर संकटीं पावतो आणि तुह्मी आह्मांसीं दोन भाव धरितां हें उत्तम नसे. कल्याण, भिंवडी, साष्टी येथील भिक्षा रुपये पांच हजार पाठवून देणें" ह्मणोन आज्ञा; त्यास स्वामी ईश्वरस्वरूप, स्वामींची हेलणा करीसा पृथ्वींत तो कोणी नाहीं. तेथें बरवाजी ताकपीर यांनीं स्वामींची हेलणा करावीसें त्याचें सामर्थ्य काय आहे? कल्याण, भिंवडी प्रांतें जाऊन घराचें घर व परगण्याचा परगणा सोडवणार नाहीं म्हणोन तर संपूर्ण प्रजा स्वामींची. त्यामध्यें कोंकणप्रांतची प्रजा केवळ स्वामींच्या कच्च्या धाग्याची. त्याजपासून

---

१ भाद्रपद बहुल षष्ठीं बुधवारः—ता० १२ सप्तंबर इ. स. १७३९.

स्वामी घेतील. ते देतील. स्वामींची आज्ञा उल्लंघन करीसा कोण आहे? परंतु कोंकणच्या प्रजेची उपजीविका सर्व मेहनत करून भाजावें, कष्ट करावे, तेव्हां फळात्कारास येतें. यंदा पर्जन्य चैत्रमासापासून पडूं लागला, तन्मुळें राबराबाट प्रजेचें भाजितां राहिलें. किंचित् राब केलें, पेरलें, त्यास अलीकडे पाऊस नाहीं. याप्रकारें रयतेची अवस्था आहे. सर्वजाण स्वामी आहेत. प्रजा स्वामींची व आह्मी स्वामींचे असों. सविस्तर अर्थ तीर्थरूप राजश्री नानांस लिहिला आहे. तेथून उत्तर आल्याउपरीं स्वामींचे सेवेसी लिहून पाठवूं. आह्मी लेंकरें स्वामींचीं. आमचा सर्वप्रकारें सांभाळ करावयास स्वामी समर्थ आहेत. हा मामला दौलत सर्व स्वामींची आहे. स्वामींच्या चरणांजवळ दुसरा भाव आमचा तिळतुल्य नाहीं. स्वामींचा अभयहस्त आमच्या मस्तकीं आहे. त्यास आणिकासारिखें स्वामींच्या चित्तांत येणेंच नाहीं. "सयाजी कनोजे यास पांचशें रुपये द्यावयाचें वचन नानांचें आहे. त्याच्या मुबदला गोविंद केशव पाठविला आहे, याची उपेक्षा न करणें. तुह्मी ह्मणाल कीं हुद्दा सांगणें अगर वेतन देणें तें नानांचे हातीं, तर नाना येत तंवर आपणाजवळ यास ठेऊन रोजमरा देणें, पुढें नाना आल्यावर हुद्दा सांगणें तो सांगतील" ह्मणोन आज्ञा; तर स्वामींच्या आज्ञेप्रमाणें गोविंद केशव यास ठेऊन घेतलें. रोजमरा आज्ञेप्रमाणें देत जाऊं. दोनशें बैलांचे[१] दस्तक व चाळीस खंडी मिठाविषयीं आज्ञा केली त्यावरून दस्तक व मिठाची सनद पाठविली आहे. सेवेसी प्रविष्ट होईल. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

१ स्वामींच्या कोठीचे दोनशें बैल असत. ते देशांतून कोकणांत जाऊन मीठ वगैरे पदार्थांचा व्यापार करीत असत. त्यांच्यावर कोठेंहीं जकात पडूं नये ह्मणून सरकारांतून दस्तक ह्मणजे हुकूम मिळत असे. मोंगल व हबशी ह्यांच्या राज्यांतही स्वामींच्या बैलांस मुभा असे.

[लेखांक ७७] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

चरणरज सदाशिव चिमणाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल ता० चैत्र[1] शुद्ध दशमी बुधवारपर्यंत स्वामींच्या आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन संतोष जाहला. "घोड्यावरून तुह्मी पडोन हात दुखवला होता, यास्तव चित्त सचिंत जाहलें होतें. त्यास तुह्मांस समाधान वाटोन पुण्यास आलेसें ऐकून संतोष जाहला. तुह्मांस वज्रकवच[2] पाठविलें आहे. स्वारी चाकरीस अंगीं घालीत जाणें" ह्मणोन कितेक आज्ञा केली. ऐसीयास आमची सर्वप्रकारें चिंता स्वामींस आहे. स्वामी ईश्वरस्वरूप. स्वामींची कृपा आह्मांवर पूर्ण आहे. तदन्वयेंच प्राप्त जाहला श्रम स्वल्पसाहासें व स्वामींच्या स्मरणमात्रें परिहार होतो, व जाहला. आह्मांस स्वामींच्या चरणांविना दैवत दुसरें काय आहे? पिंपळनेरकर रामचंद्र हरी कारकून दि॥ कवडे यानें रुपये ५० पन्नास व वस्त्रें दोन देऊं केलीं तीं आणवून पाठवणें ह्मणोन आज्ञा, त्यास मशारनिल्हेकडे माणोस पाठऊन सदरहू आणून सेवेसी पाठवूं. महाराजांनीं पालकी दिल्ही, पालकींत बसविलें ह्मणोन, तरी स्वामींस पालकी दिल्ही याचें अपूर्व काय आहे? स्वामी थोरच आहेत. देवाची पालकी सामानसुद्धां पाठवणें ह्मणोन आज्ञा, त्याजवरून पालकी सामानसुद्धां सोमाजीबरावर पाठविली असे. सामानाची याद अलाहिदा असे. त्याप्रमाणें पालकी पावलीयाचें उत्तर पाठवावें. रा० शंकराजी केशव ह्यांनीं दोन हजार

---

१ चैत्र शुद्ध दशमी बुधवारः—ता० २६ मार्च इ. स. १७४०.

२ वज्रकवचः—स्वामी पेशव्यांस निरनिराळे युद्धप्रसंगाचे पोषाक पाठवीत असत. ते प्रासादिक समजून लढाईच्या वेळीं पेशवे ते परिधान करीत असत. वज्रकवच ह्मणजे शिरस्त्राण असावें असें दिसतें.

रुपये पाठविले, आणखी नाहीं ह्मणतात, तर त्यास लिहून तीन हजार आणवून पाठवणें ह्मणोन आज्ञा; त्यास स्वामींची आज्ञा अमान्य करीसा कोण आहे? परंतु तेथील विचार ह्मणावा तर सालांत लोकांस चार महिने पावले. त्यांतच कापड अडसेरीवर मात्र चाकरी करितात. त्याजपासून रुपया मागावयासच बोलतां नये. तथापि मशारनिल्हेंनीं स्वामींचे आज्ञेप्रमाणें दोन हजार रुपये पाठविलेच आहेत. अतःपर स्वामींनीं त्यांजवरी कृपा करावी. स्वामींचे आज्ञांकित आहेत. हरएक समयीं त्यांची सेवा न घडेसी नाहीं. कृपा करणार महाराज समर्थ आहेत. "खंडू खोल्या शिंपी संगमनेरकर धावडशीस राहतो. यास आह्मीं पांच हजार रुपये कर्ज दिल्हे. त्याची निकड त्यास लाविली. त्यानें संगमनेरास अकराशें रुपयांचीं कुळें लिहून दिलीं आहेत. तरी सादतखानास[1] पत्र व शाहणा माणोस शिपाई पाठवून सदरहू रुपये वसूल करून आणून पाठवणें" ह्मणोन आज्ञा; तर आज्ञेप्रमाणें संगमनेरास माणसें वसुलास पाठवून देतों व सादतखानास लिहून पाठवितों. परंतु तेथील विचार आहे तो सोमाजी स्वामींचे सेवेसी विदित करील. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक ७८] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसी:—

चरणरज सदाशिव चिमणाजी कृतानेक विज्ञापना येथील कुशल ता० वैशाख शुद्ध त्रयोदशी[2] गुरुवासरेंपर्यंत स्वामींचे आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. स्वामींनीं घांटा व पेट्यांविसीं आज्ञा केली होती त्या-

---

१ सादतखानः—संगमनेर जिल्हा अहमदनगर हा प्रांत त्या वेळीं निजामाकडे असल्यामुळें सादतखान मोंगलांच्या तर्फे कोणी अधिकारी तेथें असावा असें दिसतें.

२ वैशाख शुद्ध त्रयोदशी गुरुवारः—ता० ६ मे इ. स. १७४२.

जवरून घांटा व पेट्या दोन रा० जगजीवनपंत याजबरोबर पाठविल्या असेत; सेवेसी प्रविष्ट जाह्ल्याचें उत्तर पाठविलें पाहिजे. तीर्थरूप कैलासवासी आपांनीं स्वामींजवळ दोन घांटा व दोन पेट्या द्यावयाचें मान्य केलें तें वचन अन्यथा कैसें होईल ? सर्व स्वामींचा आशीर्वाद आहे. तत्प्रभावें-कडून केल्या वचनास अंतर होणार नाहीं. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[ लेखांक ७९ ] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

चरणरज सदाशिव चिमणाजी कृतानेक विज्ञापना येथील कुशल ता० ज्येष्ठ[1] बहुल सप्तमी इंदुवारपर्यंत स्वामींच्या आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन संतोष जाह्ला. "तुळाजी आंगरे याजवर श्रीचा कोप जाह्ला. त्याचा विनाशकाल आला. नागोजी आंगरे यांनीं जयवंतगड व अंबेकवसाठवलीची गढी घेतली. आह्मी पालगड रसालगड घेणें. श्री तुह्मांस यश देतच आहे" ह्मणोन आज्ञा, त्यास स्वामींचा कोप मशारनिल्हेवर जाह्ला तेच समयीं त्यास विनाशकाळ प्राप्त झाला. नागोजी आंगरे यांणीं तीन जागा घेतलियाचें अपूर्व नाहीं. जे जे स्वामींच्या चरणाजवळ मूर्ख वर्ततील त्यांची गत याचप्रमाणें आहे. पालगड रसालगडाविसीं आज्ञा केली, "श्री तुह्मांस यश देतच आहे. काय करणें तें स्वामींची आज्ञा, शिरसा ( मान्य ) आहे. जें स्वामी चित्तांत आणतील तें करतील. या गोष्टीचा चमत्कार पाहावा असें नाहीं. पांढऱ्याकडील ठाणीं किती घेतलीं तें लिहिणें ह्मणोन आज्ञा तर ठाणें बावळे व मोडनिंबोणें करमळ्यापासून तिही तिही कोसांवर ठाणीं आहेत. विदित जाह्लें पाहिजे. पांढरे स्वामींचे आशीर्वादेंकरून हतवीर्य जाह्ले. तीर्थस्वरूप राजश्री नाना यश पाऊन येतील ह्मणोन स्वामींनीं

---

१ ज्येष्ठ बहुल सप्तमी इंदुवारः—ता० २४ इ. स. १७४२.

आज्ञा दिल्ही आहे तरी हें सर्व स्वामींच्या आशीर्वादाचें [फल] आहे. येथील न्यून पूर्ण करावें हें स्वामींस अगत्य, तेथें आह्मांस चिंता काय आहे? हेमगर्भ दोन तोळे उत्तम पाठविणें ह्मणोन आज्ञा, तर हेमगर्भाचा यत्न फार केला, परंतु चांगला न मिळे; तथापि एकापाशीं हेमगर्भ उत्तम पाहून अकरा मासे पाठविला. सेवेसी प्रविष्ट जाहलियाचें उत्तर पाठवावें. टोप्यांस मखमल तीन गज व गुळ वजन पक्का तीन मण नारायण गांवचा पाठविणें ह्मणोन आज्ञा, तर मागाहून पाठवून देतों. नारायण गांवास यंदा ऊंस जाहला नाहीं, सर्वत्र पर्जन्यानें घालविलें, स्वामींसही विदित आहे. परंतु स्वामींचा गुळ दिल्हा पाहिजे. त्यास राजश्री सदोबापासून देवविला आहे. घेतला पाहिजे. मखमल गज ३ तीन रेशमी पाठविली आहे. सेवेसी प्रविष्ट जाहल्याचें उत्तर पाठवावें. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक ८०] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

चरणरज सदाशिव चिमणाजी कृतानेक विज्ञापना येथील कुशल ता० श्रावण[१] शुद्ध तृतीया भृगुवारपर्यंत स्वामींचे आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. ती० राजश्री नाना यांस श्रावण शुद्ध द्वितीया[२] गुरुवारीं दोन घटका दिवस बाकी असतां पुत्र[३] झाला. हें संतोषाचें वृत्त स्वामींस कळावें याजकरितां लिहिलें आहे. वरकड तीर्थरूपांकडील पत्रें आलीं तीं सेवेसी पाठविलींच आहेत. सर्वदा आशीर्वादपत्रीं सांभाळ करीत गेलें पाहिजे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

१ श्रावण शुद्ध तृतीया भृगुवारः—ता० २३ जुलई इ. स. १७४२ शुक्रवार.

२ श्रावण शुद्ध द्वितीया गुरुवारः—ता० २२ जुलई इ. स. १७४२ गुरुवार.

३ हा पुत्र विश्वासराव. हा पानिपतच्या लढाईत मारला गेला.

[लेखांक ८१] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

चरणरज सदाशिव चिमणाजी कृतानेक विज्ञापना येथील कुशल ता॰ [1]माघ बहुल तृतीया इंदुवासरेपर्यंत स्वामींच्या आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन संतोष जाहला. पत्र पाठवीत नाहीं व वर्तमान लिहित नाहीं, तुमचे वडील कोणे तऱ्हेनें वर्तत होते ह्मणून कितेक शब्द लावून आज्ञापिलें, ऐशास स्वामींचे चरणारविंद अहर्निशीं चित्तांत आणून स्वामींचे पाय दैवत समजतों. तेथें स्वामींस पत्र न लेहूं हें कैसें घडेल? [2]गंगास्नानाचे उद्देशें स्वार जाहलों, घोडनदी उतरली; यावरी शरीरीं ज्वरादिक पीडा प्राप्त जाहली; दहावीस रोज श्रमी केलें. प्रस्तुत स्वामींच्या आशीर्वादेंकरून आरोग्य आहे. व्यथेमुळें स्वामींस पत्र गेलें नाहीं तरी स्वामींनीं लेंकरावर कृपा करून क्षमा केली पाहिजे. मी सर्व प्रकारें चरणरज स्वामींचा आहें. स्वामींनीं आपले ह्मणवून अभयहस्त मस्तकीं ठेविला आहे तेविषयींचा अभिमान स्वामींस आहेच. तेथें आह्मीं विस्तारें विनंति लिहिजेसी नाहीं. बापुजी मेघश्याम याजकडे रुपये ५० पन्नास व रामचंद्रपंत मु॰ पिंपळनेर दिंमत कवडे याजकडे रुपये ५० पन्नास व दोन वस्त्रें आणवून पाठविणें ह्मणोन आज्ञा तर बापुजी मेघश्याम तीर्थरूप राजश्री नानाबरोबर आहेत. येविसीं तीर्थरूपांस लिहिलें आहे. ते रुपये घेऊन पाठवितील. रामचंद्रपंत पिंपळनेरकर याजकडील प-

---

१ माघ बहुल तृतीया इंदुवासरः—ता॰ ३१ जानेवारी इ. स. १७४३.

२ गंगास्नानाच्या उद्देशानें सदाशिवराव भाऊ पुण्याहून छ॰ ३ जिल्काद ह्मणजे ता॰ २० दिसेंबर इ. स. १७४२ रोजीं निघाले, ते गंगास्नान करून छ॰ १० मोहरम ह्मणजे ता॰ २४ मार्च इ. स. १७४३ रोजीं पुण्यास परत आले. भाऊसाहेबांच्या बरोबर रघुनाथराव व जनार्दनपंत हेही होते.

न्नास, वस्त्रें दोन, आणावयास जासूद पाठविला असे. येतील ते क्षणीं सेवेसी पाठवून देतों. पालकीविशीं विषदें आज्ञा केली, त्यास पालकी उत्तम तबकडी सामान तयार करविलें आहे. आह्मी इकडे आलों या गलबलीमुळें रवाना करितां राहिली. अतःपर आह्मी पुण्यास येतेक्षणीं पालकी सेवेसी पाठवून देतों. स्वामींच्या आज्ञेपेक्षां आह्मांस विशेष काय आहे? कुलाबीयाकडून स्वारी करून आलों तन्मुळें वाट सरली, तरी वाटेचें औषध पाठविणें ह्मणोन आज्ञा, त्यास आह्मांबरोबर वैद्य नाहींत. पुण्यास वैद्य आहेत. वाटेचें औषध स्वामींचे सेवेसी पाठविण्याविसीं राजश्री जिवाजी गणेश यांस लिहिलें आहे. ते वैद्यापासून औषध घेऊन सेवेसी पाठवितील. वारुगडाखालीं तळें खणावयाचें काम लाविलें आहे तरी तुह्मांकडे श्रीचें[१] कर्ज आहे त्याचें व्याज एक वर्षाचें रुपये ८,१०० आठ हजार एकशें पाठवून देणें ह्मणोन लिहिलें, तर स्वामींची आज्ञा ते शिरसा ( वंद्य ), परंतु यंदाचा विचार आहे तो सेवेसी विदित असे. त्याहीमध्यें हिशेब कितेब कुल तीर्थरूपांबरोबर गेले आहेत. तीर्थरूप दोना महिन्यांनीं माघारे येतील आणि स्वामींनीं लेहून पाठवावें. आह्मी येविशीं तीर्थरूपांस विनंति करणें ती करूं. स्वामींचे सेवेसी आह्मी अंतर करूं ऐसें नाहीं. सारांश, स्वामींची सेवा सर्वदा घडावी यापरतें दुसरें अभीष्ट समजत नाहीं. प्रस्तुतही आज्ञेप्रमाणें तीर्थरूपांस लिहिलें आहे. तीर्थरूप येत तों कृपा केली पाहिजे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

१ श्रीचें कर्जः—श्रीभार्गवरामाच्या नांवें स्वामींचें पेशव्यांकडे कर्ज होतें त्याचें एका वर्षाचें व्याज ८१०० रुपये झालें त्यावरून कर्जाचा अदमास करितां येईल. एवढी मोठी रकम स्वामींनीं अडचणीच्या प्रसंगीं पेशव्यांस दिली ही लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे.

[लेखांक ८२]*    श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

चरणरज सदाशिव चिमणाजी कृतानेक विज्ञापना येथील कुशल चैत्र शुद्ध अष्टमीपावेतों स्वामींचे कृपावलोकनेंकरून यथास्थित असे विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट जाहलें. कित्येक रागेजोन लिहिलें तें कळलें. ऐशीयास, स्वामी आह्मांस सर्वप्रकारें वडील; स्वामींच्या पायाविना दुसरें दैवत नाहीं. कैलासवासी वडिलांवरी स्वामींनीं कृपा केली, तैसीच कृपा स्वामी आह्मांवरही दिवसेंदिवस अधिक करतील ऐसा पूर्ण भरंवसा स्वामींच्या पायांचा असतां, स्वामींनीं यद्यपि रुष्टतेनें लिहिलें तत्रापि तीं स्वामींचीं प्रसादवचनें सेवकास श्रेयस्कर आहेत. प्रस्तुत स्वामीकारणें वस्त्रें पाठविलीं आहेतः—

दुपेटा चांदणी पैठणी किनारा आस्वली १ पासोडी पैठणी १
किनखाब बेलदार १ शालजोडी १

येणेंप्रमाणें चार वस्त्रें सेवेसी पाठविलीं आहेत. कृपा करून अंगीकार केला पाहिजे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक ८३]    श्री.

श्रीमत् महाराज राजश्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

चरणरज सदाशिव चिमणाजी साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल माघ शुद्ध पंचमीपर्यंत स्वामींचे आशीर्वादेंकरून यथास्थित असों विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें शिरसा वंदिलें. पै-

---

* लेखांक ८२।८३।८४ ह्या पत्रांच्या मिती, वार न दिल्यामुळें बरोबर लावितां येत नाहींत. लेखांक ८४ ह्या पत्रामध्यें स्वामींनीं वार्धक्याचा उल्लेख केला आहे, त्यावरून ते इ. स. १७४४ किंवा इ. स. १७४५ ह्या दोन सालांतलें ह्मणजे अखेरचें असावें असें अदमासानें ह्मणतां येईल.

कियाविषयीं स्वामींनीं आज्ञा केली, ऐशियास प्रस्तुत येथें ओढीचा प्रसंग असे तो काय ल्याहावा! स्वामींनीं पैकियाविषयीं चार महिने कृपा करावी. तीर्थरूप राजश्री नाना स्वारी करून आलियावरी स्वामी आज्ञा करतील त्याप्रमाणें वर्तणूक करतील. सारांश, हा मामला स्वामींच्या आशीर्वादाचा आहे. उभयतां तीर्थरूप असतां यथास्थित चालले, त्याप्रमाणें किंबहुना त्याहून विशेष चालावें हें स्वामींस आवश्यक आहेच. स्वामीही कृपा करणें ते करतील व करावी [ हें ] उचित असे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[ लेखांक ८४ ] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

चरणरज सदाशिव चिमणाजी कृतानेक विज्ञापना येथील कुशल ता० माघ शुद्ध त्रयोदशीपर्यंत स्वामींचे आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन संतोष जाहला. घोडी फिरोन पाठविली आणि पैशाची आज्ञा केली, पैका न पाठविला, त्याजवरून कितेक उदासीनतेनें आज्ञा केली; ऐशास स्वामी ईश्वरस्वरूप आहेत. स्वामींच्या चरणांजवळ तीर्थरूप व आह्मी निष्ठापूर्वक वर्ततों. स्वामी परंपरागत कृपा करीत आले आहेत. ततोप्यधिक कृपा संपादून घ्यावी हेच इच्छा तीर्थरूपांची आहे. घोडी स्वामींस उत्तम द्यावी यापरतें अधिकोत्तर काय आहे? घोडीचा विषय तो काय आहे? स्वामींच्या आज्ञेपेक्षां अधिक नाहीं. तीर्थरूप आलियावर लक्षप्रकारें घोडी देतील. हे दौलत संपदा सर्व स्वामींचे आशीर्वादाची आहे. आह्मी स्वामींचे आज्ञांकित असो. वरकड आपले वार्धक्यपणाचा अर्थ लिहिला तरी स्वामींचें पुण्यशरीर आहे. स्वामींचे मागें आह्मी सर्वही आज्ञांकित आहों. आपले आज्ञेनुरूप सर्वही घडेल. सारांश, आह्मी स्वामींचीं लेंकरें असों. सदैव आशीर्वादपत्रीं परामर्ष करीत जावा. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

# रघुनाथ बाजीराव.

[लेखांक ८५] श्री.

श्रीमत् श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

चरणरज रघुनाथ बाजीराऊ कृतानेक सा० नमस्कार विनंति स्वामींच्या कृपावलोकनेंकरून आशीर्वादप्रभावें माघ[1] वद्य १२ पर्यंत वर्तमान यथास्थित असे विशेष. तीर्थस्वरूप राजश्री नाना यांची स्त्री सौभाग्यवती मातुश्री गोपिकाबाई वहिनी माघ वद्य एकादशी सहद्वादशी मंदवारीं प्रातःकालींच्या अकरा घटिका दिवसास प्रसूत होऊन पुत्र जाहला[2]. स्वामींचे आशीर्वादाचें फल आहे. सर्वांस संतोष जाहला. संतोषवृत्त स्वामींचे सेवसी विदित व्हावें याकरितां पत्र पाठविलें आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

१ माघ वद्य १२:–ता० १७ फेब्रुवारी इ. स. १७४५. रविवार.

२ छ० २५ मोहरम ता० १६ फेब्रुवारी इ. स. १७४५ रोज शनिवार अकरा घटिका दिवसास गोपिकाबाई प्रसूत होऊन थोरले माधवराव पुत्ररत्न निपजलें. त्यांची मकर रास होती.

# पुरवणी पत्रें.[1]

## शाहूमहाराज.

[ लेखांक ८६ ] श्री.

श्रीसकलतीर्थस्वरूप श्रीमत् परमहंस स्वामींचे सेवेसीः—

अपत्यसमान शाहुजी राजे कृतानेक दंडवत विज्ञप्ति. येथील कुशल वैशाख बहुल द्वितीया भृगुवासर[2] यथास्थित असों विशेष. स्वामींनीं कृपा करून आशीर्वादपत्र पाठविलें, पाहून संतोष जाला. शरीरीं सावकाश नाहीं ह्मणून ऐकतों ह्मणून लिहिलें, तरी ज्वराची कांहीं पीडा जाली होती; त्यास प्रस्तुत कांहीं सावकाश वाटतें. आपण श्रीची विभूति व तीर्थ पाठविलें तें वंदिलें. या उपरी आरोग्य होईल. चिंता नाहीं. वरकड विस्तार संभाजी नारायण जबानीं सांगतां विदित होईल. बहुत काय लिहिणें.

[ लेखांक ८७ ] श्री.

श्रीसकलतीर्थरूप श्रीमत् परमहंस स्वामींचे सेवेसीः—

अपत्यसमान शाहुजी राजे कृतानेक दंडवत विनंति उपरी मीर शिकार पांखरें धरून आणावयास पाठविले असेत. हे धरून आणतील. यांस स्वामीकडील दुसरे कोणी उपद्रव देतील त्यांस ताकीद केली पाहिजे. विनंति.

---

१ हीं पत्रें मागील पत्रें छापून निघाल्यानंतर श्रीब्रह्मेंद्रस्वामी यांच्या इनाम गांवांपैकीं पिंपरी येथील इनामदार श्रीमंत रा. रा. कृष्णराव पांडुरंग ऊर्फ आपासाहेब भागवत यांचेकडून मिळालीं आहेत. हीं मागील क्रमास अनुसरून पुरवणीरूपानें येथें दिलीं आहेत.

२ वैशाख बहुल द्वितीया भृगुवासरः–ता० २९ एप्रिल इ. स. १७४३, शुक्रवार.

[ लेखांक ८८ ]　　　　श्री.

श्रीसकलतीर्थस्वरूप श्रीमत् परमहंस श्री स्वामींचे सेवेसीः—

अपत्यसमान शाहुजी राजे कृतानेक दंडवत विनंति येथील कुशल पौष बहुल षष्ठी स्वामींचे आशीर्वादें यथास्थित असों विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र व श्रीचा प्रसाद संक्रमणाचे तीळ शर्करायुक्त पाठविले ते व आम्रफळें ६ सहा पाठविलीं तीं आज्ञेप्रमाणें स्वीकारलीं. वरकड वर्तमान खंडोजी साळवी याचे शरीरीं अनारोग्याचें सांगितलें त्यावरून रा० बहिरो रघुनाथ यांस सेवेसी पाठविले असेत. सविस्तरें याबद्दल वर्तमानाची आज्ञा निरोपिली पाहिजे. सेवेसी विनंति.

[ लेखांक ८९ ]　　　　श्री.

श्रीसकलतीर्थस्वरूप श्रीमत् परमहंस श्री स्वामींचे सेवेसीः—

अपत्यसमान शाहुजी राजे कृतानेक दंडवत विज्ञति येथील कुशल त्तृत्त ता० शुद्ध तृतीया भानुवासर स्वामींचे आशीर्वादें यथास्थित असे विशेष. बहुत दिवस आशीर्वादपत्रदर्शनाचा लाभ होत नाहीं, याकरितां चित्त सापेक्षित असे. तरी कृपा करून सर्व आशीर्वादपत्रीं परामर्ष करावया स्वामी समर्थ आहेत. स्वामींच्या सेवेसी ऊर्ण वस्त्रें जोडी १ एक खंडोजी यादव हुजरे याजबरोबरी पाठविली आहे. कृपा करून घेतली पाहिजे. विनंति.

## छत्रपतींच्या राण्या.

[ लेखांक ९० ]　　　　श्री.

तीर्थस्वरूप श्री परमहंस स्वामींचे सेवेसीः—

अपत्यसमान सौभाग्यादिसंपन्न सखवारबाई दंडवत विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लिहिणें. यानंतर तुह्मीं आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट जालें. लिहिलें वर्तमान कळों आलें. पालखीच्या सरंजामास गांव द्यावा ह्मणोन लिहिलें, ऐशास राजश्री स्वामींनीं एक चावर जमीन देणें ह्मणून करार केला आहे. पांगारे गांव देत नाहींत

व बाळंभट वैद्याचा मजकूर लिहिला, ऐशास हा राज्यभाराचा प्रश्न, आपण देवऋषी, यांत मन घालावें ऐसें नाहीं. त्याहीमध्यें ज्याचा धंदा त्याजकडे करार केला तो फिरवितां नये. येविसींचा सकळ अर्थ भेटी-अंतीं कळेल. श्रीचा प्रसाद पाठविला तो प्रविष्ट जाला. अत्यादरें स्वीकार केला. बहुत काय लिहिणें, कृपा निरंतर असों दीजे हे विज्ञप्ति.

[लेखांक ९१] श्री.

तीर्थस्वरूप श्री परमहंस स्वामींचे सेवेसी:—

अपत्यें सौभाग्यादिसंपन्न सखवारबाई दंडवत विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लिहिणें. यानंतर हसा घिसाडी याचा कजिया होता तो मनास आणून विल्हेस लावावयाबद्दल तुह्मीं एकदोन वेळां लिहिलें, त्यास तुमच्या लिहिल्यावरून घिसाडी मजकूर तुह्मांकडे पाठविला आहे. त्याचा तुह्मीं इनसाफ करावा. तें न करितां त्याच्या पायांत बेडी घातली ह्मणून कळों आलें. ऐशास, आह्मी तुह्मांकडे पाठविल्यावरी तुह्मीं पायांत बेडी घालावी हें अनुचित गोष्टी आहे. हल्लीं दरवाजाच्या इमारतीचें काम बंद झालें आहे, याकरितां घिसाडी हुजूर आणविला असे, तर पत्रदर्शनीं त्या समागमें आपणाकडील माणूस देऊन पाठवून देणें. हुजूर मनसुफी मनास आणून विल्हेस लाविलें जाईल. पत्र-दर्शनीं पाठविलें पाहिजे. निरंतर आशीर्वादपत्रीं सांभाळ केला पाहिजे. हे विनंति.

पै॥ छ० ८ सफर[1] सन खमस अर्बैन मया व अलफ.

[लेखांक ९२] श्री.

तीर्थस्वरूप श्री परमहंस स्वामींचे सेवेसी:—

अपत्यें सौभाग्यादिसंपन्न सखवारबाई दंडवत विनंति उपरी येथील

---

१ छ० ८ सफर सन खमसअर्बैन:–ता० ३१ मार्च इ. स. १७४५, रविवार

कुशल जाणून स्वकीय लेख करीत गेलें पाहिजे. यानंतर स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें पावलें. सुखरूप आश्रमास पावलों ह्मणून लिहिलें त्यावरून बहुत समाधान जालें. प्रसाद द्राक्षें पुडा पाठविला तो पावला. हे विनंति.

[लेखांक ९३] श्री.

तीर्थस्वरूप श्रीमत् परमहंसस्वामी स्वामींचे सेवेसी:—

अपत्यें सौभाग्यादिसंपन्न सखवारबाईसाहेब दंडवत विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष तुह्मीं आशीर्वादपत्र पाठविलें ते उत्तम समयीं प्रविष्ट होऊन संतोष जाला. लिहिलें कीं, परशरामीं राजश्री तुळाजी आंगरे सरखेल यांणीं ब्राह्मण ठेविला आहे त्यास पत्र पाठवून बाहेर काढवावा ह्मणून, तरी आह्मीं पत्र ल्याहावें, त्याचा प्रांत लागला तर उत्तम; नाहीं तरी विचार करावा लागेल. ऐशास त्याजकडून राजश्री विश्वनाथभट रवाना केले आहेत. सरखेल लौकरची येणार आहेत. ते आलियावरी आपल्या विचारानुरूप त्यास सांगून त्याचा विचार केला जाईल. व शालेचे जोडीविषयीं लिहिलें तर राजश्री शिवाजी हरी यास आज्ञा केली आहे. पाहून देतील. दुलयाचा मजकूर लिहिला तरी दुलया सिद्ध आहेत. कोणी पाठवून घेऊन जाव्या. सदैव पत्र पाठवून संतोषवीत असलें पाहिजे. आज्ञेप्रमाणें जाहले कामाचेही चालीस लाविलें. नमस्काराचे ब्राह्मण तर पहिल्यापासून चालत आहेत. कांहीं चिंता नाहीं. बहुत काय लिहिणें हे विनंति.

[लेखांक ९४] श्री.

तीर्थस्वरूप श्री परमहंस स्वामींचे सेवेसी:—

अपत्यें सौभाग्यादिसंपन्न सखवारबाई चरणावरी मस्तक ठेवून साष्टांग दंडवत विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लिहिणें. या

नंतर स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें पावोन लिहिलें वर्तमान कळों आलें. पालखीच्या सरंजामास मौजे घारगांव देविलें पाहिजे ह्मणून लिहिलें, ऐशास घारगांव स्वामींपेक्षां अधिकोत्तर आहे ऐसें नाहीं; परंतु मौजे मजकूर आमचा वतनी गांव याकरितां देतां नये. राजापूर प्रांतें एक गांव सरंजामाबद्दल देतों ह्मणून राजश्री स्वामींनीं करार केला. सनदा पाठवून देतील. समाधान असों देणें. निरंतर आशीर्वादपत्र पाठवून सांभाळ केला पाहिजे. बहुत काय लिहिणें हे विनंति.

[लेखांक ९५] श्री.

श्रीमत् श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

अपत्यें सौभाग्यादि संपन्न सखवारबाईसाहेब दंडवत विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करावयास आज्ञा केली पाहिजे. यानंतर स्वामींनीं आज्ञापत्र पाठविलें तें पावलें. मौजे रोपले ता० हवेली परांडे हा गांव मोंगलाई तर्फेनें राजश्री जानोजीराव निंबाळकर याजकडे आहे, तर त्यास पत्र पाठवून गांव मोंगलाई तर्फेनें मागून घेऊन सनदा आणून आमचे स्वाधीन करणें ह्मणून लिहिलें, तर तो निजामनमुलकाचा एखत्यार आहे. तो गांव मोंगलाई तर्फेनें कांहीं येत नाहीं. त्याहीमध्यें आमचा खालसाही नाहीं. बाबुजी पैठणकर याजकडे सत्तावीसशें रुपये आहेत ते ताकीद करून देवणें ह्मणून लिहिलें; तर प्रस्तुत तो पारिखा आहे. त्याहीमध्यें राजश्री येसाजी भोंसले यांणीं रुपये देतों ह्मणून करार केला आहे. ते आलियावर त्यास सांगून आधीं आपले रुपये देववून उपरांतिक दुसऱ्याचे वारील. कुरणाचा मजकूर लिहिला तर आह्मीं खासगत खिलारास राखिलें आहे तें देतां येत नाहीं. कापतेसमयीं पांच हजार गवत अगत्यच असलें तर देऊं. कळलें पाहिजे. बहुत काय लिहिणें हे विनंति.

[लेखांक ९६] श्री.

तीर्थरूप श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

अपत्यसमान सौभाग्यादिसंपन्न सखवारबाई कृतानेक दंडवत विनंति येथील कुशल जाणोन स्वकीय आज्ञा लेखन केली पाहिजे विशेष. तुह्मांकारणें जामवार बादली सोनेरी १ एक पाठविली आहे. घेऊन उत्तर पाठविलें पाहिजे. बहुत काय लिहिणें हे विज्ञप्ति.

[लेखांक ९७] श्री.

तीर्थस्वरूप श्री परमहंस स्वामींचे सेवेसीः—

अपत्यें सौभाग्यादिसंपन्न सखवारबाई चरणावरी मस्तक ठेवून साष्टांग दंडवत विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लिहिलें पाहिजे. यानंतर स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें पावलें. मौजे दाळिंबे येथील पाटिलकीचा मजकूर तपशिलें लिहिला; ऐशास आपल्या लिहिल्यावरून राजश्री बाळाजी पंडित प्रधान यांस पत्र लिहिलें आहे व राजश्री दादोबासही ताकीद केली आहे. ते मनसुबी फिरविणार नाहींत. बहुत काय लिहिणें, कृपा निरंतर असों दीजे हे विनंति.

[लेखांक ९८] श्री.

तीर्थस्वरूप श्री परमहंस स्वामींचे सेवेसीः—

अपत्यें सौभाग्यादिसंपन्न सखवारबाई दंडवत विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लिहिणें. यानंतर स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें पावलें. कासाराच्या व कृष्ण जोशाच्या कर्जाचा मजकूर लिहिला ऐशास त्याची मनसुबी तहकूब जाली होती, परंतु आपल्या लिहिल्यावरून सध्या क्रिया त्यास नेमिली आहे. क्रियाही होईल. कळलें पाहिजे. निरंतर आशीर्वादपत्रीं सांभाळ केला पाहिजे. बहुत काय लिहिणें हे विनंति.

[लेखांक ९९] श्री.

तीर्थस्वरूप श्रीमत् परमहंस स्वामी स्वामींचे सेवेसी:—

अपत्यें सौभाग्यादिसंपन्न सखवारबाई साहेब दंडवत विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करीत असलें पाहिजे. विशेष:—स्वामींनीं पत्र पाठविलें तें उत्तम समयीं प्रविष्ट होऊन समाधान जालें. पेस्याही लौकरच येतील. वचनाप्रमाणें पैका पाठवून द्यावा ह्मणून आज्ञा, ऐसीयासी पैक्याचा अर्ज राजश्री स्वामींस केला नव्हता. याउपरी अर्ज करून पैका मागून घेऊन पाठवून दिल्हा जाईल. कळलें पाहिजे. बहुत काय लिहिणें हे विनंति.

[लेखांक १००] श्री.

तीर्थस्वरूप श्री परमहंस स्वामींचे सेवेसी:—

अपत्यें सौभाग्यादिसंपन्न सखवारबाई दंडवत विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लेखन करणें. यानंतर तुह्मीं आशीर्वादपत्र पाठविलें तें पावलें. रुपये पाठविणें ह्मणून लिहिलें, त्यास प्रस्तुत आह्मीं मोबदला करून पाठवावे तर आह्मी मोहिमेच्या प्रसंगाकरितां पाठवावयास गांठ पडत नाहींत. राजश्री स्वामींनीं मान्य केलें [तर] त्यांजकडून विचारेंकडून घेऊन पाठवितों. अंतर होणार नाहीं. गांवचा मजकूर लिहिला तर स्वामींच्या हातावरी उदक घातलें आहे, त्यास तें कार्य फत्ते जाहलियावरी आंगऱ्या हुजूर येईल, उपरांतिक त्याजपासून ठीक करून घेऊन स्वामींस अर्पण केला जाईल. कामेंविशीं अंतर तिळमात्र होणार नाहीं. संदुखा २ दोन पाठविल्या आहेत, घेऊन उत्तर पाठवणें ह्मणून लिहिलें, तर संदुखा उत्तम आहेत; पावल्या. वोढणाही यांना पाठविणें ह्मणून लिहिलें, तर त्याची तरतूद करून पाठवूं. आंगऱ्याकडील साहित्याचा मजकूर लिहिला, त्यास विचारेंकडून त्याची तरतूद करून पाठवूं; परंतु पर्जन्याचा तोटा आहे याकरितां होतां होईल त्यास अंतर होणार

नाहीं. समाधान असों देणें. राजश्री शिवाजीपंतांनीं आपाजी आंगरे यांस सरखेलीचीं वस्त्रें बावा देवीत होते ह्मणून तुळाजी आंगरे यांस लिहिलें त्यावरून ते आह्मांवरी फार श्रमी आहेत ह्मणून लिहिलें. त्यावरून आह्मीं शिवाजीपंतास विचारिलें आणि त्यांणीं तुमच्यावरी हात ठेविला. त्याजपासून कांहीं अंतर नाहीं. तुह्मीच कोणाजवळ बोललां असाल तें कर्णोपकर्णी त्यांस कळलें असेल तर कळेना. डौर गोसावी याचा मजकूर लिहिला तर ते ३ गांव आह्मांकडे नाहींत. त्यांचा जातीचा कजिया आहे. ते व ते समजतील. आमचे चिठीनें मना होत नाहींत याकरितां चिठी पाठविली नाहीं. जाणिजे, बहुत काय लिहिणें हे विनंति.

[लेखांक १०१] श्री.

तीर्थस्वरूप श्री परमहंस स्वामींचे सेवेसीः—

अपत्यसमान सौभाग्यादिसंपन्न सखवारबाई दंडवत विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लिहिणें. यानंतर आपण पत्र पाठविलें तें पावोन लिहिलें वर्तमान कळों आलें. गोवलकोट अंजनवेल येथील मजकूर तपशिलें लिहिला, ऐशास आपले आशीर्वादें व श्रीचे कृपेंकडून फत्ते होईल. कांहीं स्वामींनीं फिकीर न करणें. निरंतर आशीर्वादपत्रीं सांभाळ केला पाहिजे.

[लेखांक १०२] श्री.

श्रीमत् परमहंस स्वामी स्वामींचे सेवेसीः—

अपत्यें सकल सौभाग्यादिसंपन्न सखवारबाईसाहेब दंडवत विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करीत असलें पाहिजे. यानंतर स्वामींनीं पत्र पाठविलें तें पावोन सकल वर्तमान श्रवण जालें. ऐसीयास उदकपैकीं च्यार हजार रुपये राहिले ते पाठवणें ह्मणून आज्ञा केली, तरी ते रुपये राजश्री स्वामींकडून यावे, ऐशास अ-

द्याप आले नाहींत. याउपरी स्वामींच्या लिहिल्यावरून आजी हटकून थोडे बहुत रुपये तूर्त मागून घेऊन पाठवून देऊं. वरकड इंग्रज फिरंगी व सांवत आरमार सुद्धां आह्मांस सामील आहेत तरी गोवलकोट व अंजनवेली आमचे स्वाधीन करणें, घेऊन देऊं, ह्मणून लिहिलें तर उत्तम गोष्ट आहे. इंग्रज व फिरंगी व सांवत यांसी पत्रें पाठवून बोलल्याप्रमाणें सामील होऊन खामखा घेऊन देतील ऐसा करार असेल तर त्याचे वकील हुजूर मातबर असतील ते आणून हुजूर पाठवून द्यावे; ह्मणजे त्यास याच कराराच्या गोष्टी पुसोन एक मातबर वकील ठेवून घेऊन विल्हे लाविलें जाईल. त्याहीमध्यें ह्या राज्यभाराच्या गोष्टी आहेत. केवळ राजश्री स्वामींवांचून होतात ऐसा अर्थ नाहीं. हें आपणही जाणतात. या मागें या गोष्टीचा उद्योग स्वामींनीं चित्तांत आणिला नव्हता. आजी अशा गोष्टी जाल्या तेव्हां शत्रूचा नाश हरप्रकारें तरी होईल हा स्वामींचा आशीर्वादच जाहला. आतां आपण करूं ह्मणोन लिहिलें तर तेंही बहुतच उत्तम. परंतु या कार्यास जे अनुकूल होणार त्यांस पत्रें पाठवून, त्यांचें मातबर कोणी आणवून, राजश्री स्वामींसीं त्यांचा करार करवून, त्यांस येथें ठेववून स्वामींचे आज्ञेनें जें कर्तव्य तें केलें पाहिजे. महालतर्फेनें राज्यकारभार होत नाहीं. बहुत काय लिहिणें हें विनंति.

[लेखांक १०३] श्री.

तीर्थस्वरूप श्री परमहंस स्वामींचे सेवेसीः—

अपत्यें सौभाग्यादिसंपन्न मातुश्री सखवारबाई व सगुणाबाई दंडवत विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लिहिणें. यानंतर स्वामींकडील आशीर्वादपत्र येऊन सांभाळ घेत नाहीं; तर ऐसें केलें न पाहिजे. निरंतर कुशलवृत्त लिहून आशीर्वादपत्रीं सांभाळ केला पाहिजे. प्रस्तुत आपल्या शरीरीं सावकाश वाटत नाहीं ह्मणून वर्तमान ऐकिलें,

त्यावरून चित्तास बहुत खेद जाला. याउपरी आरोग्यतेचें वर्तमान लिहून पत्रद्वारें संतोषवीत जाणें. बहुत काय लिहिणें.

[लेखांक १०४] श्री.

तीर्थस्वरूप राजश्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

अपत्यसमान सौभाग्यादिसंपन्न मातुश्री बाईसाहेब साष्टांग दंडवत विनंति येथील कुशल वैशाख[1] शुद्ध पूर्णिमा सौम्यवार जाणून स्वकीय लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष शरीरभावनेचें वर्तमान तरी आशीर्वादें कुशल असे. यानंतर राजश्री स्वामींच्या शरीरीं दोन तीन दिवस सावकाश वाटत नाहीं. आपल्या आशीर्वादेंकरून आरोग्य होईल. वरकड वर्तमान यथास्थित असे. छ १३ रबिलावल बहुत काय लिहिणें हे विनंति.

[लेखांक १०५] श्री.

श्रीमत् तीर्थस्वरूप परमहंसबावा स्वामींचे सेवसीः—

अपत्यसमान सौभाग्यादिसंपन्न मातुश्री बाईसाहेब दंडवत विनंति येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करावयासी आज्ञा केली पाहिजे विशेष. पत्र पाठविलें तें प्रविष्ट जालें. कित्येक ममतापुरस्कर लिहिलें. ऐसीयास स्वामींनीं कृपा केली ते समयीं सर्व सिद्धि मनोदयानुरूप घडोन आल्या, ऐसाच दृढतर निश्चय धरिला तो मनोमन साक्ष असे. स्वामींची कृपा पूर्ण असतां मनोदय पूर्ण न होय ऐसें काय आहे? आपला तो भावार्थ स्वामींच्या पायाव्यतिरिक्त आहे ऐसें नाहीं. वरकड चित्त उदास जालें, निरोप दिल्हा तरी श्री रामेश्वरास जाऊं, ह्मणून लिहिलें, तरी स्वामींनीं निश्चय केला आहे तो सिद्धीस पाविल्याविना आपलें जाणें श्रीस कैसें होईल व आमच्यानेंही निरोप कैसा देवतो? तथापि

---

१ वैशाख शुद्ध पौर्णिमा सौम्यवासरः—ता० २७ एप्रिल इ. स. १७४३, बुधवार.

आह्मीं जावें ह्मणून लिहिलें, तरी स्वामींनीं अभिमान धरिला तो सिद्धीस गेल्याव्यतिरिक्त स्वामींचेंही जाणें होत नाहीं हा आपण निश्चय मानिला आहे. प्रासादिक वस्त्र दुलई पाठविली आहे हे कोणास न देणें ह्मणून लिहिलें, ऐसीयास प्रासादिक वस्त्र कोणास देत नाहीं. अंगीकार करून ठेविली असे. छ १७ शाबान बहुत काय लिहिणें हे विनंति.

[ लेखांक १०६ ] श्री.

श्रीमत् तीर्थस्वरूप परमहंसबावा स्वामींचे सेवेसी:—

अपत्यें सौभाग्यादिसंपन्न सगुणाबाई चरणावर मस्तक ठेऊन दंडवत प्र० विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करीत असलें पाहिजे. विशेष—आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट जालें. पत्रीं कित्येक ममतापुरस्कर लेख केल्या, बहुत समाधान जालें. चांदणी पातळाविशीं लिहिलें त्यावरून शालू चांदणी किंमतदार कमळाजी वाघमारा याजबराबरी एक पाठविला असे. प्रविष्ट जालीयाचें उत्तर पाठविलें पाहिजे. बहुत काय लिहिणें, कृपा असों द्यावी हे विनंती.

[ लेखांक १०७ ] श्री.

श्रीमत् परमहंस स्वामींचे सेवेसी:—

प्रति सौभाग्यादिसंपन्न मातुश्री बाईसाहेब दंडवत उपरी पत्र पाठविलें प्रविष्ट होऊन लेखनार्थ अवगत जाला. रविवार समाधीहून धावडशीस समारंभें जावें लागतें तरी नगारीयासी हत्ती अथवा उंट पाठविणें ह्मणून लिहिलें; तरी समानसुद्धां उदईक मंदवारीं दोन प्रहरा पाठवून देऊं. आपणास कळावें. जबानीं भिकू सांगतां कळों येईल. बहुत काय लिहिणें.

[लेखांक १०८] श्री.

श्री परमहंस स्वामींचे सेवेसीः—

अपत्यसमान सौभाग्यादिसंपन्न मातुश्री बाईसाहेब दंडवत विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लिहिणें. विशेष—सोमाजीबरोबरी पत्र पाठविलें तें प्रविष्ट जालें. श्रीचा प्रसाद पादुका पाठविल्या त्या प्रविष्ट जाल्या. रा० रघुजी भोंसले यांजकडे वाचादत्त रुपये तीन हजार येणें; ऐसीयासी येथून जासूद जोडे जाताती, त्या समागमें रा० रघुजी भोंसले व रा० भास्कर राम यांस ताकीदपत्रें पाठविलीं जावील. बहुत काय लिहिणें हे विनंति.

[लेखांक १०९] श्री.

तीर्थस्वरूप राजश्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

अपत्यसमान सौभाग्यादिसंपन्न मातुश्री बाईसाहेब दंडवत विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लिहिलें पाहिजे. विशेष भिकू-बराबरी पत्र पाठविलें, लिहिलें वर्तमान कळलें. गुलाबकंदाविशीं लि-हिलें, त्यावरून गुलाबकंद वजन पक्के ८८१ शेर पाठविला, तो घेणें. यानंतर वेदमूर्ति धोंडभट काशीकर हे भले ब्राह्मण, यासमागमें रा० सोनाजी बावाच्या अस्थी रवाना कराव्या ह्मणून लिहिलें, तरी चिरंजीव बरानजी मोहिते स्वारीस गेले आहेत; त्यांणीं काय रवानगीचा विचार केला आहे कळलें नाहीं. स्वारीहून आलीयावरी त्यांस पुसोन जो जाब होणें तो होईल. छ० २५ जिल्हेज बहुत काय लिहिणें हे विनंति.

[लेखांक ११०] श्री.

तीर्थस्वरूप श्री परमहंस स्वामींचे सेवेसीः—

अपत्यसमान सौभाग्यादिसंपन्न विरूबाई कृतानेक साष्टांग दंडवत विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लिहिणें. यानंतर, आपण

आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट जालें. दोन हजार रुपये दिल्हे त्याचे दस्तुरीविशीं लिहिलें; ऐशास राजश्री स्वामींनीं दस्तुरीची पद्धत राज्यांत घातली त्याप्रमाणें चालतें. परंतु स्वामींनीं लिहिलें त्यावरून जरूर जाणून रु० १२५ सवाशें पाठविले आहेत. ते घेऊन पावल्याचें उत्तर पाठवणें. काशीफळें आह्मांकारणें सुमारें ४ चार पाठविलीं तीं पावलीं. बहुत काय लिहिणें, कृपा निरंतर असों दीजे हे विनंति.

पौ० छ[1] २३ माहे रबिलावल सन सबा.

[लेखांक १११] श्री.

तीर्थस्वरूप श्री परमहंस स्वामींचे सेवेसीः—

अपत्यानुरूप सौभाग्यादिसंपन्न विरूबाई कृतानेक सा० दंडवत विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लेखन करीत गेलें पाहिजे. यानंतर, केरोजी सोनवणी याचा व येसाजी सोनवणी मौजे वीरमाडें या उभयतांचा कजिया होता, तो स्वामींनीं गोतन्याय मनास आणून चौघांचे साक्षीनिसीं निर्वाह करून निवाडा केला. त्याचें लिहिलें यांस दिल्हें; याचें लिहिलें त्यांस दिल्हें; आणि आह्मांसही हुजूर लेहून पाठविलें. ऐसें असतां प्रस्तुत केरोजीच्या सासऱ्याच्या घरीं येसाजीचा भाऊ गिरजा व ह्मलोजी माळी जाऊन बैसले आहेत. मागती कजिया सांगतात ह्मणून हुजूर विदित जालें. तर ये गोष्टीचा निवाडा जाला असतां मागती त्यास लबाडी करावयास दरकार काय आहे ? याउपरी येसाजीस व ह्मलो माळ्यास हुजूर आणविलें असे. तर पत्रदर्शनीं उभयतांस पाठवून देणें. बहुत काय लिहिणें, कृपा असों दीजे. वरकड सविस्तर कावजीमुखवचनें निवेदन करितां श्रुत होईल हे विनंति.

---

१ छ० २३ माहे रबिलावल सन सबाः—ता० २२ जुलई इ. स. १७३६, गुरुवार.

[लेखांक ११२] श्री.

तीर्थस्वरूप श्री परमहंस स्वामींचे सेवेसीः—

अपत्यें सौभाग्यादिसंपन्न विरूबाई कृतानेक साष्टांग दंडवत विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लेखन करावया आज्ञा केली पाहिजे. यानंतर आपण खंडोजीबरोबरी आशीर्वादपत्र पाठविलें तें उत्तम समयीं प्रविष्ट होऊन लेखनार्थ अवगत जाला. गांवाविशीं लिहिलें, ऐशास राजश्री स्वामींनीं रा० अंबाजीपंतास आज्ञा केली आहे. त्यास, रा० बाजीराऊ पंडित प्रधान असले पाहिजेत. ते निजामाच्या भेटीस गेले आहेत. ते आलीयावरी पारपत्य होईल. येविसीं सविस्तर वृत्त राजश्री स्वामींनीं लिहिलें आहे त्यावरून कळों येईल. श्रीचा प्रसाद फणसपोळी व मेवा पाठविला तो प्रविष्ट जाला. श्रुत होय. २५ साबान. बहुत काय लिहिणें हे विनंति.

हेच पत्रीं अपत्यें बसवंतराऊ खासखेल चरणावरी मस्तक ठेऊन सा० दंडवत विनंति लिहिलें परिसिजे. लोभ असों दिल्हा पाहिजे हे विज्ञप्ति.

[लेखांक ११३] श्री.

तीर्थस्वरूप श्री परमहंस स्वामींचे सेवेसीः—

अपत्यसमान सौभाग्यादिसंपन्न विरूबाई कृतानेक साष्टांग दंडवत विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वामींनीं निजानंदलेखन केलें पाहिजे. यानंतर स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन लेखनार्थ अवगत जाला. श्रीचा प्रसाद पाठविला तो प्रविष्ट जाला. यानंतर फलटण देशच्या गांवचा मजकूर लिहिला कीं, साबाजी नाईक यांस आपलें पत्र व माणूस पाठवून गांवास कौल आणवावा, तो कळों आला. ऐशास त्यांचें आमचें रहस्य काय आहे तें तुह्मांस ठाऊक आहे. प्रस्तुत जामातामुळें अधिकोत्तर प्रसंग आहे आणि आह्मी त्यांस पत्र एकंदर लिहीत नाहीं. याकरितां आपल्या गांवाविसीं माणूस व पत्र पाठ-

वितां येत नाहीं. तैसाच प्रसंग असता तर अगत्यरूप कार्य केलें जातें. आह्मांस आणखी प्रसाद पाठवाल तो खाऊं. कळलें पाहिजे. निरंतर आशीर्वादपत्रीं सांभाळ केला पाहिजे. तुह्मांस कळेल तसें गांवचें पारिपत्य करणें. बहुत काय लिहिणें हे विज्ञप्ति.

# पेशवे.

## बाजीराव.

[लेखांक ११४] श्री.

श्रीमत् महाराज राजश्री श्री परमहंस परशराम स्वामींचे सेवेसीः—

आज्ञाधारक बाजीराऊ कृतानेक विज्ञापना ऐसीजे, स्वामींचे रुपये × × × × याचा हवाला वाडीचे मुक्कामीं घेतला. त्यास, स्वामींनीं अंतोबा व खंडोजी ऐसे पत्रें देऊन पाठविले. त्यांस एक दोन चार दिवस येथें लागले. त्याउपरी तीर्थरूप रा० नानांनीं ऐवज व पत्रें पाठविलीं तींच पाठविलीं आहेत. व त्याखेरीज येथें जे तरतूद जाली ते एकूण मोहरा ४१ एकेचाळीस पाठविल्या. त्याखेरीज तरतूद जाली नाहीं. आह्मीं जर स्वामींच्या कार्यास अनमान केला असेल तरी स्वामींच्या पायाची शपथ असे; व येथील सविस्तर वृत्त आमचें अंतोबा सांगतां कळों येईल. विदित जालें पाहिजे. व बाकी ऐवज जो राहिला तोही मागून एका मासाअलीकडेच पाववूं. अंतर सहसा पडणार नाहीं. मोहरा पावलीयाचा जाब पाठवून द्यावया आज्ञा केली पाहिजे. अंतो-

---

१ विरूबाई ही शाहूमहाराजांची राख होती. तिच्या पोटीं राजसबाई नामक एक कन्या झाली होती. हिजला शाहूमहाराजांनीं जातीकडून शुद्ध करवून घेऊन मल्हारराव कदम बांडे कोपरेळकर यांस दिली होती. परंतु ह्या गोष्टीस मलवडीकर घाटगे व फलटणचे निंबाळकर हे विरुद्ध होते. त्यामुळें त्यांचें व शाहू महाराजांचें सौरस्य कमी झालें होतें. ह्या प्रसंगाचा ह्या पत्रांत उल्लेख असावा असें वाटतें.

बास व खंडोजीस खर्च देविलें तें दिल्हें. विदित जालें पाहिजे हे विज्ञापना.

[लेखांक ११५] श्री.

श्रीमत् महाराज श्री स्वामींचे सेवेसी:—

चरणरज बाजीराऊ बल्लाळ प्रधान कृतानेक विज्ञापना येथील कुशल श्रीकृपें ता० छ० २१ जिल्काद पावेतों असे विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें कुलाबीयाचे मुक्कामीं पावलें. लेखनार्थ कळला. ऐसीयास जे वर्तणूक कर्तव्य ते स्वामींचे आज्ञेनुरूपच करूं. वरकड येथील वर्तमान तरी, आह्मी कुलाबीयाहून आलों; परवा कसबे पुणें

१ ह्या पत्राचे मागें खालील मजकूर लिहिला आहे त्यांतील सनावरून व पत्रांत तीर्थरूप रा० नाना (बाळाजी विश्वनाथ) ह्यांचा नामनिर्देश केला आहे त्यावरून हें पत्र बाळाजी विश्वनाथ हयात असतांना लिहिलेलें आहे असें दिसतें. सन सबा ह्मणजे सबा अशरीन (इ. स. १७१६–१७) हें साल असावें. ह्या वेळीं स्वामी परशरामाकडेच होते. तेव्हां त्यांनीं पेढें येथील सोनारांकडून मोहरांची परीक्षा करविली हेंही युक्त दिसतें. स्वामी खमस अशरीन ह्मणजे इ. स. १७२४–२५ मध्यें वरघांटें आले (ब्रह्मेंद्रस्वामींचें चरित्र का. सं. पृ. १३).

जमा छ० १८ जमादिलावल सन सबा पारीख कर्दे गु॥ येसशेट सोनार मौजे पेढे, मोहरा ४१ एकूण एकबेर्जी रुपये.

२८८ प्रत अवरंगशाही बहादुरशाही मोहरा २४ दर १२ प्रमाणें.
३४॥ प्रत मोहरा पाडेकार (?) दर ११॥.
१६६। प्रत नव्या १४ दर ११॥≈.

४८८॥। ४१
२११। छ० ९ जमादिलाखर गु॥ खंडू मोहरा १७ दर १२

७००. प्रमाणें २०४ व रोख ७।.

२ छ० २१ जिल्काद—ता० ७ मार्च इ. स. १७३५, शुक्रवार.

येथें दाखल जाहलों. आपणास कळावें यास्तव लिहिलें आहे. स्वामींनीं आपलेकडील वर्तमान सदैव लिहिलें पाहिजे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

पै॥ छ० २२ जिल्काद शनिवार.[1]

[लेखांक ११६] श्री.

श्रीमत् महाराज परमहंस श्री स्वामींचे सेवेसीः—

चरणरज बाजीराऊ बल्लाळ प्रधान कृतानेक विज्ञापना येथील कुशल ता० छ० २९ रमजान[2] जाणून निरंतर आशीर्वादपत्रीं सांभाळ केला पाहिजे. विशेष आपली आज्ञा घेऊन पुण्यास आलियावरी फौजबंदी करून.........मजल दरमजल माळवा प्रांतें आलों......(येथील मजकूर फाटला आहे.)...नवाब चाल करून आले. त्याची आमची सान्निधता होतांच स्वामींच्या आशीर्वादाचे प्रतापें नवाब भुपाळच्या आसऱ्यास गेले. छ० ३ रमजानीं भुपाळास गोटावरी चालून जाऊन युद्ध केलें व निरंतर युद्ध छ० २६ रमजान पावेतों जाहलें. दाणापाणी बंद केलें. मोठी महागाई जाहली. रुपयास एकशेर अन्न न मिळे. तेव्हां नवाबांनीं मध्यस्त पाठवून स्नेह संपादिला. माळवा आह्मांस मेहेरबान होऊन दिल्हा. पातशाही सनद करून द्यावयाची मान्य केली. तमाम राजे भेटीस पाठविले. मोठा समारंभ जाहला. सारांश, स्वामींचा आशीर्वाद मस्तकीं व धण्याचा पुण्यप्रताप पदरीं, तन्मुळें यशप्राप्ति होऊन कार्यभागही जाहला. पुढेंही स्वामींचे आशीर्वादें जें जें होणें तें उत्तमच होईल. स्वामींस कळावें यास्तव लिहिलें आहे. स्वामींनीं निरंतर आशी-

---

१ छ० २२ जिल्काद शनिवार—ता० ८ मार्च इ. स. १७३५.

२ छ० २९ रमजानः—ता० १० जानेवारी इ० स० १७३८, रोज मंगळवार. लेखांक ३६ ह्या पत्रानंतर हें पत्र लिहिलें आहे असें दिसतें.

३ ह्या प्रसंगाचें सविस्तर वर्णन लेखांक ३५ मध्यें आहे.

वांदपत्रीं सांभाळ केला पाहिजे. सर्व होणें तें आपले आशीर्वादें होतें. पैका मिळोन कर्जापासून मुक्त होऊं व वसईचें कार्य होई तें करणार स्वामी समर्थ आहेत. सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ति.

[लेखांक ११७] श्री.

श्रीमत् परमहंस परशरामबावा स्वामींचे सेवेसीः–

अपत्यें बालकें चरणरज बाजीराऊ कृतानेक विज्ञापना. येथील क्षेम ता॰ वैशाख[1] शुद्ध प्रतिपदा रविवार यथास्थित असे. विज्ञापना–महाराजांनीं पत्र पाठविलें तें पाऊन अर्थ सविस्तर कळला. त्यास, भलते गोष्टीची तांतडी न करावी. जें होणें तें स्वामींचे मनोगतानुरूपच होईल. येथील अर्थही लिहितां पुरवत नाहीं. सांगोन पाठवूं त्यावरून कळेल. जितकी सेवा केली तितकी निर्फळ आहे. सेवेसी श्रुत होय. आतां देशत्यागास जावें, किंवा घरीं कवाडें अडकावून बसावें, किंवा ईश्वरचरण जवळ करावें ऐसे अर्थ दिसतात. जो अर्थ घडेल तो लिहून पाठवूं हे विज्ञप्ति.

[लेखांक ११८] श्री.

श्रीमत् परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

चरणरज बाजीराऊ बल्लाळ प्रधान साष्टांग नमस्कार विनंति येथील

---

१ वैशाख शुद्ध प्रतिपदा रविवारः—ही मिति रा. मोडक यांच्या जंत्रीमध्यें बरोबर मिळत नाहीं. तथापि मजकुराच्या संदर्भावरून बाजीराव कर्जग्रस्त झाले होते त्या प्रसंगाचें हें पत्र असावें असें दिसतें. त्यावरून पाहतां, इ. स. १७३८ ह्या सालीं वैशाख शुद्ध द्वितीया दोन असल्यामुळें प्रतिपदा रविवारीं असण्याचा संभव आहे. तेव्हां तें साल ग्राह्य धरिलें तर ह्या पत्राची मिति ता० ९ एप्रिल इ. स. १७३८ ही असूं शकेल.

कुशल ता० ज्येष्ठ शुद्ध नवमी भोमवार मुकाम सातारा सुखरूप असो विशेष. काल इंदुवारीं भुइंजेस होतों. राजदर्शन घ्यावयाचा काल मुहूर्त होता. त्यास, भुइंजेहून धावडशीस स्वामींची भेट घेऊन पुढें राजदर्शनास जावें ऐसा विचार करून येत होतों. त्यास, राजश्री स्वामी चंदनवंदनाकडे आले; यामुळें तिकडे जावें लागलें. तेथें जाऊन जरंड्याजवळी भेट घेऊन काल चार घटका रात्रीस राजश्री स्वामीसमागमें सातारा आलों. सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ति.

[ लेखांक ११९ ] श्री.

श्रीमत् परमहंस श्री स्वामींचे सेवेसी:—

चरणरज बाजीराव बल्लाळ प्रधान कृतानेक विज्ञापना येथील कुशल ता० छ १२ सवाल पावेतों स्वामींचे आशीर्वादें यथास्थित असे विशेष. आजी छ० मजकुरीं चिरंजीव रा० आपाचें पत्र आलें कीं, माहिमास मोर्चे छ० २९ रमजानीं लाविले, त्यास छ० ९ सवालीं माहिम हस्तगत जाहलें. तैसेंच रा० राणोजी शिंदे यांणीं खताळवाडें व डाहाणु हे दोनी जागा घेतल्या. संतोषाचें वर्तमान स्वामींस कळावें यास्तव लिहिलें आहे. सारांश, स्वामींचा कोप फिरंगी यावरी जाहला असतां त्याचें बरें होईल हें सर्वथा घडणारें नाहीं. आपण साक्षात् ईश्वर अ-

---

१ ज्येष्ठ शुद्ध नवमी भोमवारः—ता० १६ मे इ. स. १७३८ मंगळवार.

२ भुइंजः—वाईजवळ लहानसें गांव आहे.

३ चंदन वंदनः—हे डोंगरी किल्ले सातारा जिल्ह्यांत आहेत.

४ जरंडाः—हा डोंगर सातारा जिल्ह्यांत कोरेगांव तालुक्यांत आहे. रामदासस्वामींनीं संस्थापित केलेल्या मारुतीचें स्थान येथें फार प्रसिद्ध आहे.

५ छ० १२ सवालः—ता० १२ जानेवारी इ० स० १७३९ शुक्रवार.

६ छ० २९ रमजानः—ता० ३० दिसेंबर इ० स० १७३८ शनिवार.

७ छ० ९ सवालः—ता० ९ जानेवारी इ० स० १७३९ बुधवार.

वतार. जें चित्तांत स्वामींच्या येतें व मुखेंकरून वक्तृत्व होतें, तें घडून येतेंच येतें. वसई हस्तगत होईल ह्मणून स्वामी बोलिले आहेत, तदनुरूप वसई हस्तगतच होईल यांत संदेह नाहीं, व आह्मांस सर्व भरंवसा स्वामींचे आशीर्वादाचा, त्यास आशीर्वाद आमचे मस्तकीं व कृपाही विशेष, तेणेंकरून जें करूं तें सिद्धीस पावेल. यानंतर स्वामींचीं दोन तीन पत्रें आलीं त्यास कांहीं हर्षाचें वर्तमान स्वामींस लिहावें यास्तव जाब पाठविले नाहींत. स्वामींचा आशीर्वाद फलकारास आला. हें हर्षाचें वर्तमान ऐकून स्वामींस हर्ष होणार यास्तव येविसीं लिहिलें आहे. वसई आदिकरून राहिलीं स्थळें तीं स्वामींच्या आशीर्वादें हस्तगत होतील. विदित जाहलें पाहिजे. आह्मी स्वामींचीं लेंकरें आहों. जें होणें तें आपले प्रतापें होतें. तारापूर व केळवें येथें रोकडे मोर्चे लागतां तींही स्थळें स्वल्पकाळें आपले आशीर्वादें हस्तगत होतील. तदुपर वसईचे कार्याची पैरवी आपले आज्ञेप्रमाणें होईल. आपण वसई फत्ते होते ह्मणून अभय दिलें त्याप्रमाणें अचिरकालेंच होईल. यांत संदेह नाहीं. सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ति.

[लेखांक १२०] श्री.

श्रीमत् महाराज श्री स्वामींचे सेवेसीः—

चरणरज बाजीराऊ बल्लाळ प्रधान कृतानेक विज्ञापना. येथील कुशल श्रीकृपें यथास्थित असे विशेष. स्वामींकडून सोमाजी आला होता, त्यास, स्वामींनीं त्याजला माणूस पाठवून माघारा नेला. तोही न पुसतां गेला. ऐशीयास स्वामींच्या तों चित्तांत राग बहुत आला आहे. ऐशीयास आह्मांस सर्वस्वें स्वामी वडील. आह्मीं लेंकरें. दुसरी गोष्ट देव दैव तर आह्मांस स्वामी. अनन्यभावें आमची निष्ठा पायांजवळ. या गोष्टीस स्वामी अंतरसाक्ष असोन आमचा राग चित्तांत आणावा ऐसा नाहीं. यद्यपि वेळनसार आला असला तरी क्षमा करून कृपा

करणार स्वामी वडील आहेत. सांप्रत चिरंजीव रा० दादोबा सेवेसी येऊन विनंति करितील, ते मान्य करून सदयपणें अभयपत्र पाठवायासी आज्ञा केली पाहिजे. स्वामींचे आशीर्वादें वसई फत्ते जाहली हे मोठीच गोष्ट जाली. परंतु लष्करची खराबी जाली व कर्ज जालें तें लिहितां पूर्वत नाहीं. आह्मी कोण्या गोष्टीची चिंता करीत नाहीं. सर्व चिंता आपल्यास आहे. बुडालें तरलें सर्व आपलें आहे. आह्मी लेंकरें. ज्याणें झाड लाविलें तोच वाढवील. रक्षण तोच करील. आपण वडील मायबाप आहांत. मी सर्वस्वी अन्यायी, तरी तुमचा ह्मणवितों. कृपा करणार स्वामी समर्थ आहेत. जें आहे हें सर्व स्वामींचे आशीर्वादाचेंच आहे व सर्व स्वामींचेंच आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक १२१] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंस स्वामींचे सेवेसीः—

चरणरज बाजीराव बल्लाळ प्रधान कृतानेक नमस्कार विनंति येथील क्षेम श्रीचे आशीर्वादें ता० छ० ६ जमादिलाखर यथास्थित असे. विनंति— श्रीचें आशीर्वादपत्र आलें. तेथें कित्येक निषेध नवाबाचे दर्शनास जाऊं नये ह्मणून केलें तें यथार्थच आहे. परंतु राजश्रीचे आज्ञेस इलाज काय आहे ? आह्मांस श्रीची आज्ञा प्रमाण. जितका आपला यत्न न जाण्याचा तितका करितों. ऐसें असतां जें घडेल तें घडो. सर्व संकट निवारण करणार श्री समर्थ आहां. दुभत्याविशीं लिहिलें तरी येथेंही ह्मैस एक व्याली नाहीं. दुभतीयाचें मानसिकच आहे. पालखीचा मजकूर लिहिला तरी पूर्वी जिवबाबरोबर विनंति सांगून पाठविली आहे. पुढें श्रीचे दर्शनानंतर जे विनंति कर्तव्य ते करूं. विदित जालें पाहिजे. नवाबाकडे जाणें तों प्राप्त जालेंसें दिसतें. न जावें तरी खावंद इतराज होतात. जावेंसें तों मनःपूर्वक नाहीं. कार्यही नाहीं आणि विश्वासही नाहीं. परंतु जाणें होतें खरें. बरें, सर्व चिंता आपल्यास आहे. आणीक

आठ दहा दिवस घोळितो. परंतु माझें लेंकराचें संरक्षण सर्व स्वामींचे हातीं आहे. आपल्यास कळेल तसें करावें. चिरंजीव आपानें कवळा-नारिंग हजारा (?) आपल्याकडे लावावयासाठीं पाठविलें, तें पाठविलें आहे. घेऊन उत्तर पाठविलें पाहिजे. नारिंग एकच आपल्याकरितां पाठविलें तें पाठविलें असे. आह्मी तों जाण्याचे संकटांत पडलों आहों. कांहीं उपाय सुचत नाहीं ! योग काय आहे कळत नाहीं ! परंतु सर्व चिंता आपल्यास आहे. तेथें मीं चिंता करून काय होणें आहे ? सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ति.

[लेखांक १२२] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसी:—

अपत्यें बाजीराव बल्लाळ प्रधान साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल आश्विन शुद्ध तृतीयापर्यंत स्वामींचे आशीर्वादेंकरून असे विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें पावोन संतोष जाहला. किनखाप व दुपेटे उत्तम पाठवणें अथवा रुपये पाठवणें ह्मणोन आज्ञा केली; त्याजवरून रुपये ४०० चारशें खंडोजीबराबर पाठविले आहेत. सेवेसी प्रविष्ट जालीयाचें उत्तर पाठवावयास आज्ञा करणार स्वामी समर्थ आहेत. सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ति.

[लेखांक १२३] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसी:—

चरणरज बाजीराव बल्लाळ प्रधान कृतानेक विज्ञापना येथील कुशल ता० कार्तिक शुद्ध तृतीयापर्यंत स्वामींचे आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें पावलें. राम ठाकुर वाडीकर याजपासीं पूर्वीं आह्मीं पालकी निमित्त पन्नास रुपये दिल्हे होते, तो वारला; पालकी आली नाहीं. त्याचा पुत्र गोविंद राम

ठाकुर प्रस्तुत तुह्मांजवळ आला आहे. तरी याजपासून पन्नासा रुपयांचे सासे(?) रुपये घेऊन पाठवणें ह्मणून लिहिलें तें कळलें. ऐशास गोविंद राम ठाकुर यास बोलाऊन स्वामींचे आज्ञेप्रमाणें सांगितलें. त्यास त्यांणीं उत्तर केलें कीं, बावांनीं पालकीनिमित्य पन्नास रुपये राम ठाकुर यापाशीं दिल्हे होते हें आपणास कांहीं ठावकें नाहीं. आपला बाप निवर्तला तेव्हां आपण साता महिन्यांचा होतों. आपला वडील भाऊ नारो राम वाडीस होता तेव्हां बावांचे चरण दोन तीन वेळां वाडीस पाहिले; परंतु ते वेळेस बावा कांहीं बोलले नाहींत. हंबीरराव मोहित्यापासून बावांचें येणें वाडीस न जाहलें, परंतु अलीकडे चौदा वर्षें देशांत नांदतो परंतु बावा कांहीं बोलिले नाहीं. आपला वडील भाऊ नारो राम मरून सात वर्षें जालीं. त्यांणीं कांहींएक मजकुर कधींही बोलिला नाहीं. बेल तुळशी उचलून द्यावयाचा अर्थ, तर आपण कशावरून बेल तुळशी उचलून द्याव्या? आपणास कांहींच ठावकें नाहीं. बावा ईश्वरस्वरूप आहेत. आज्ञा करितील तर पन्नास रुपये पाठवून देईन ह्मणून उत्तर केलें. विचार करून पाहतां गोविंद रामास कांहीं ठाऊक नाहीं. यांणीं बेल तुळशी कैशा उचलून द्याव्या? स्वामींची आज्ञा उल्लंघन न करावी या विचारें स्वामी आज्ञा करतील तर पन्नास रुपये याजपासून घेऊन पाटवून देऊं. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक १२४] श्री.

श्रीमत् महाराज श्री स्वामींचे सेवेसीः—

चरणरज बाजीराऊ बल्लाळ प्रधान कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें पावोन बहुत समाधान जाहलें. वेदमूर्ति राजश्री बापुभट यांस वर्षासन पावत असतें, त्यास यंदा पावलें नाहीं; तरी यांस ऐवज प्रविष्ट करणें ह्मणून आज्ञा केली. ऐसीयास भट गोसावी यांसी वर्षासन पावत असतें तें यंदा पावलें

नाहीं हें यथार्थच; परंतु सांप्रत वोढीच्या प्रसंगामुळें अनुकूल पडिलें नाहीं. श्रावणमासीं अनुकूल पडेल तेव्हां वेदमूर्तीस प्रविष्ट करूं. अंतर पडणार नाहीं. विदित जाहलें पाहिजे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक १२५] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

चरणरज बाजीराव बल्लाळ प्रधान कृतानेक नमस्कार विज्ञापना. येथील कुशल ता० आश्विन बहुल सप्तमीपर्यंत स्वामींचे आशीर्वादें-करून यथास्थित असे विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें पावलें. नारो गणेश यांस कोंकणांत हुद्दा सांगणें आणि नारो कृष्ण यांणीं पहिले थोरथोर हुद्दे केले आहेत याजकरितां यांस वरघांटें हुद्दा सां-गणें ह्मणून आज्ञा, ऐशास स्वामींच्या आज्ञेप्रमाणें उभयतांस हुद्दे सांगोन वेतन करून एकास कोंकणांत व एकास वरघांटें रवाना करूं. स्वामींचे आज्ञेपेक्षां अधिकोत्तर काय आहे ? स्वामींनीं प्रसाद श्रीफल पाठविलें तें पावलें. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक १२६] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

अपत्यें बाजीराऊ बल्लाळ प्रधान कृतानेक विज्ञापना येथील कुशल माघ बहुल द्वितीयापर्यंत स्वामींचे आशीर्वादें करून असे विनंति. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तेथें आज्ञा कीं, मौजे ढवळपुरी परगणे पारनेर या गांवाविशीं आज्ञा केली, ऐशास मौजे मजकूर रा० तावजी थो-रात याजकडे आहे त्याप्रमाणें करारच असे. बाबतीचा तगादा परगणे मजकुरचे कमाविसदार मौजे मजकुरास करीत होते त्यासही ताकीद-पत्र दिल्हें आहे. त्याउपरी मौजेमजकुरास सालमजकुरीं इकडील उपसर्ग लागणार नाहीं. आह्मांस स्वामींची आज्ञा ते प्रमाण असे. मुंढवे-

कराचे मनसुबीविशीं लिहिलें तर त्याचीही मनसुबी मनास आणून जें वर्तमान असेल तें सेवेसी लिहून पाठवूं हे विज्ञापना.

[ लेखांक १२७ ] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसी:—

अपत्यें बाजीराव बल्लाळ प्रधान साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल ता० कार्तिक शुद्ध प्रतिपदापर्यंत स्वामींचे आशीर्वादेंकरून यथास्थित असों विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें पावोन संतोष जाला. राजश्री नामाजी धोंडदेव व हरि विठल या उभयतांविशीं बहुत अवश्यक-पुरस्सर आज्ञा केली, ऐशास उभयतांस धंदे लाऊन चालवितों ह्मणोन स्वामींचे समक्ष मान्य केलें आणि त्यास अंतर पडेल हे गोष्टी सर्वथैव होणें नाहीं. आह्मांस स्वामींचे आज्ञेपेक्षां दुसरें अधिकोत्तर काय आहे? उभयतांचें चालवायास अंतर होणार नाहीं. स्वारीस नेणें जाहलें तरी स्वारीचें साहित्य करून नेऊं. विदित जाहलें पाहिजे, कृपा केली पाहिजे, हे विज्ञापना.

## चिमणाजीआपा.

[लेखांक १२८] श्री.

श्रीमत् परमहंसबावा स्वामींचे सेवेसी:—

अपत्यें चिमाजीनें कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति उपरी येथील कुशल ता० [1]आश्विन शुद्ध तृतीया मंदवार पावेतों यथास्थित असों विशेष. स्वामींनीं कृपाळु होऊन पत्र पाठविलें तें पावोन बहुतसें समाधान जालें. सारांश, जंजिरीयाची मसलत सोडून न यावें येविशीं कित्येक पर्याय लेहून आज्ञा लिहिली, ऐसीयास, जंजिऱ्याचें दर्शन घ्यावें, देवब्राह्मणाचा आशीर्वाद न घ्यावा, हे गोष्ट कोणाचे चित्तांत येईल कीं

१ आश्विन शुद्ध तृतीया मंदवारः—ता० २९ सप्तंबर इ. स. १७३३. ?

काय ? परंतु आतां जंजिरा बळावत चालला. चहुंकडून साहित्य येत चाललें यामुळें मनसबा कठीण प्राप्त जाला आहे. बरें, जे गोष्ट नजरेनें पाहावी ते आह्मांस कळती. होणार अर्थ कांहीं आह्मांस कळत नाहीं. होणार अर्थ स्वामींच्या ध्यानांत आलाच असेल; त्याचप्रमाणें योग घडून जें कार्य होणें, यश येणें, तें स्वामींच्या आशीर्वादें येईल. सकलादेविसीं लिहिलें त्यास, सकलाद येथें उदंड यत्न केला, परंतु मिळत नाहीं. याकरितां रा० अंबाजीपंतास लिहिलें. जर सातारा मिळाली तर घेऊन पाठवितील. मुद्दल पैका स्वामींचा व यास व्याजाचा ऐवज देणें राहिला आहे, त्यास व्याज कां देत नाहीं ह्मणून लिहिलें, तर स्वामींच्या वचनाप्रमाणें आह्मी चालत आहों. त्यांत अंतर करीत नाहीं. मुदत केली आहे त्याप्रमाणें ऐवज देतों. हे विनंति.

[लेखांक १२९] श्री.

श्रीमत् महाराज राजश्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसी:—

अपत्यें चिमणाजी बल्लाळ कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल [1]आषाढ शुद्ध त्रयोदशीपर्यंत स्वामींचे आशीर्वादेंकरून असों विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन लेखनार्थश्रवणें संतोष जाहला. [2]शामलाचे यशाचा अर्थ स्वामींनीं लिहिला, ऐशास आह्मी स्वामींचे आज्ञांकित. यश हानि सर्व स्वामींचें. येविसींचें संकट स्वामींसच. आह्मांस स्वामींचे चरण निजदैवत आहे. स्वामींनीं सुदर्शन शामलावरी प्रेरिलें तत्प्रभावें शामल विलयास गेला. यश स्वामींचेंच आहे. पाऊणशा रुपयांचा तांब्या करून पाठवायाविशीं आज्ञा केली, तरी आज्ञेप्रमाणें तांब्या करून पाठवून देतों. राधाई थो-

---

१ आषाढ शुद्ध त्रयोदशी:–ता० ९ जुलई इ. स. १७३६ शुक्रवार.

२ शामल:—जंजिऱ्याचा हबसी शिद्दी सात. ह्याची व चिमाजी आपाची लढाई होऊन तो ठार मारला गेला.

रांत इचें चालवायाविशीं आज्ञा, त्यास स्वामींचे आज्ञेप्रमाणें तिचें चालविलें जाईल. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

पै० छ० १८ रविलावल[1] सन सबा.

[लेखांक १३०] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसी:—

चरणरज चिमणाजी बल्लाळ चरणावरी मस्तक ठेवून सा० नमस्कार विनंति येथील क्षेम ता० छ० २२ रमजान[2] पावेतों स्वामींचे कृपेंकरून यथास्थित असो. यानंतर छ० १८ रमजानीं रा० लिंबाजी अनंत व मानाजी आंगरे यांनीं कुलाबा व हिरा बुरूज व खांदेरी हस्तगत केलीं. वरकड किल्यांचीं राजकारणें आलीं. त्यांचा बंदोबस्त करावयास्तव तीर्थरूप रा० राव छ० २१ रोजीं फौजेसहवर्तमान गेले आहेत. कुलाबीयास जाऊन तेथील बंदोबस्त करून वरकडही जें कार्य होणें असेल तें होईल. तीर्थरूप मातुश्रीबाई[3] श्रीमहायात्रेस सवाईजीचे[4] पुरोहित आले होते त्या समागमें छ० २३ मिनहूस जातील. सेवेसी कळावें म्हणोन लिहिलें आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक १३१] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसी:—

चरणरज चिमणाजी बल्लाळ कृतानेक विज्ञापना. येथील वर्तमान ता० माघ शुद्ध चतुर्थी[5] पावेतों महाराजांचे कृपेंकरून पत्र पाठविलें तें उत्तम समयीं पावोन बहुत आनंद जाहला. शरीरीं आरोग्यता जाहली

---

१ छ० १८ रविलावल सन सबा:—ता- १७ जुलई इ. स. १७३६ शनिवार.

२ छ० २२ रमजान:—ता० १३ जानेवारी इ. स. १७३७ गुरुवार.

३ मातुश्रीबाई:—राधाबाई—चिमाजीआपांची आई.

४ सवाईजी:—सवाई जयसिंग—जयपूरचे राजे.

५ माघ शुद्ध चतुर्थी:—ता. २३ जानेवारी इ. स. १७३७.

ह्मणोन लिहिलें तर उत्तम गोष्ट जाह्ली. परम आनंद जाह्ला. "कांहीं आक्षेप उभयतांवरी देखिला आहे. विरोबाबराबरही पत्र पाठविलें आहे. त्या पत्राचे उल्लेख चित्तांत आणून एकशें तीन रुपये पत्रदर्शनीं पाठवून देणें. आणखी एक होम दुसरा होम करूं. एक होम ब्राह्मणद्वारा मेरूस[1] केला. हा होम मीं स्वतःच करीन. नीलवर्णी ताफता याचे गज होमांत घालावयास पाठवून देणें. जायफळ व जायपत्री व लवंगा व मिरें यांचा होम करावा लागतो. तो जिन्नस कोठीस आहे. तुह्मीं पाठवावा नलगे" ह्मणून आज्ञा. वेदमूर्ति रा० वीरेश्वरभट पुण्याचे मार्गें गेले; आह्मी प्रस्तुत पाटस तर्फेत आहों; यामुळें पत्र यावयास विलंब लागला. तेंही पत्र मागाहून येऊन पावेल. परंतु तें पत्र यावयास विलंब लागला यास्तव हल्लीं एकशें तीन रुपये व पांच गज नीलवर्णी ताफता सेवेसी पाठविला आहे. हा घेऊन होम स्वामींचे विचारें जैसा करावयाचा असेल तैसा केला पाहिजे. स्वामी ईश्वरी अंश, तन्मुळें पुढील भविष्य स्वामींस कळतें. दुसरीयास ऐसें कैचें कळणार! "चिरंजीव बाजीराऊ यांस लेहून पाठवणें जे, त्या प्रांतें गेले आहां. ज्येष्ठमासपावेतों कोणाचा विश्वास न धरणें. कोणा परकीयाचे हातचें व त्याचे घरीं जेवण, पाणी, विडा कांहींच न घेणें. तैसेंच तुह्मीं व तुमचे उभयतांचे पुत्र देखील याचप्रमाणें कोणाचा विश्वास न धरणें. बहुत सावधपणें असत जाणें. ज्येष्ठमास गेलीयावरी मग पुढें तुह्मांस बहुत दिवस कोणाचें भय नाहीं. राज्याराम चिरकाल कराल" ह्मणून आज्ञा, तर आपले आज्ञेप्रमाणें वर्तणूक करितील; व आह्मी व चिरंजीव, स्वामींचे आज्ञेप्रमाणें वर्तणूक करूं. स्वामींचा आशीर्वाद आमचे मस्तकीं आहे तेणेंकरून आह्मांस

---

१ मेरु:-मेरुलिंग हें एक शंकराचें रमणीय स्थान धावडशीनजीक एका डोंगरावर आहे. येथील हवा व पाणी फार आरोग्यकर असून येथें तपस्वी जनांस समाधान वाटण्यासारखी शांतता व सृष्टिसौंदर्य वसत आहे.

कोणे गोष्टीची चिंता वाटत नाहीं. आपण आमचे ईश्वरच आहां. दुसरा अर्थ आहे असें नाहीं. स्वामींनीं आज्ञा लिहिली त्याप्रमाणेंच वर्तणूक करूं. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक १३२] श्री.

श्रीमत् परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

अपत्यें चिमाजीनें कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति उपरी येथील कुशल तागाईत पौष[1] शुद्ध त्रयोदशी स्वामींच्या कृपावलोकनेंकरून यथास्थित असे विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें पावोन बहुत समाधान जालें. तीळ शर्करा पाठविली ती पावली. स्वामी बालकांचा गौरव स्मरण करून करतात तेणेंकरून आनंद होतो. तो पत्रीं काय ह्मणून लिहावा? सारांश, स्वामी चित्तापासून कृपा करितात तेणेंकरून दिवसेंदिवस कल्याण अधिकोत्तर होतें. तीर्थरूप रा० राऊ नर्मदा उतरून गेले. मजल दर मजल वोडशास जातील. रा० मल्हारजी होळकर व राणोजी शिंदे यांनीं मेहनत करून स्वामींच्या आशीर्वादें एक दोन ठाणीं प्रवाशांचीं मातबर हस्तगत केलीं ह्मणून त्यांचीं पत्रें रायास आलीं होतीं. पुढें रायाकडील वर्तमान येत जाईल तें वरचेवर स्वामींचे सेवेसी लेहून पाठवूं. वरकड "कित्येकांस कित्येक प्रकारें दगे करणारांनीं केले आहेत, याकरितां सावध राहत जाणें. शामलाकडील कोणी येत जाईल त्याचा विश्वास धरीत न जाणें." ह्मणून आज्ञा लिहिली व निरोप सांगोन पाठविला तोही कळला. तर स्वामींचे आज्ञेप्रमाणेंच वर्तणूक करूं. मानाजी आंगरे यांजवर लोभ करीत जावा ह्मणून आज्ञा, तर ते आह्मांसीं सुधे वर्ततात ऐसें वर्तलें तर त्यावर लोभच आमचा आहे. ताफता पांच गज पाठ-

---

१ पौष शुद्ध त्रयोदशीः—ता० ३ जानेवारी इ. स. १७३७ सोमवार.

वावा ऐसी आज्ञा, त्यास ताफता मेळवून पाठवून देऊं. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.[1]

[लेखांक १३३] श्री.

श्रीमत् परमहंस स्वामींचे सेवेसी:—

अपत्यें चिमाजीनें कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति उपरी येथील कुशल ता० छ १५ सवाल[2] माघ वद्य द्वितीया शनवार स्वामींच्या कृपावलोकनेंकरून यथास्थित असे विशेष. आज[3] श्री भुलेश्वर येथील देवालयाची इमारत पहावयास आलों. वरील इमारत हिंडून फिरोन अवघी पाहिली. उत्तम प्रकारें इमारत जाहली आहे. कामही उत्तमप्रकारें चालत आहे. गांवाजवळील तळेंही पाहिलें. चांगली इमारत झाली आहे. पाणीही चांगलें आहे. पुढें यापेक्षां विशेष पाणी होईल. तळ्याजवळ दोन प्रहर राहिलों. कारखान्याचे लोक गवंडे पाथरवट व मजुरी व नारोपंत व कृष्णाजीपंत व लखमोजी नाईक ऐसे अवघे जणांस बोलावोन समाधानाच्या गोष्टी सांगणें त्या सांगितल्या. उत्तमप्रकारें जपून सारा दिवस काम करीत जाणें; जर कामास चुकाल तर मुलाहिजा करणार नाहीं आणि जपून काम करा म्हणजे बावास विनंति करूं आणि सर्वप्रकारें तुमचें बरेंच करणें तें करूं; ऐसें कितेक समाधा-

---

१ लेखांक ४६ च्या पूर्वींचें हें पत्र असावें असें वाटतें. लेखांक ४६ मध्यें बाजीराव नर्मदा उतरून वोडशास पावले असतील असा उल्लेख आहे. पृष्ठ ७१ मधील २ री टीप पहा.

२ छ० १५ सवाल माघ वद्य द्वितीया शनवार:—ता० ५ फेब्रुवारी इ० स० १७३७.

३ लेखांक ४६ ह्या पत्रामध्यें स्वामींनीं चिमाजी आपांस भुलेश्वरास जाऊन तेथील देवालयाचें काम वगैरे पाहण्याबद्दल आज्ञा केल्याचा उल्लेख आहे. त्याप्रमाणें चिमाजी आपांनीं तेथें जाऊन तेथील सर्व व्यवस्था पाहिल्याची हकीकत ह्या पत्रांत दिली आहे.

नपूर्वक सांगणें तैसें सांगितलें. तळ्याजवळ राहिलों. आह्मी उपाशींच येथें आलों. सामग्री जी लागली ती येऊन घेऊन जितके लोक समागमें होते तितक्यांसहित भोजन करून सायंकाळीं स्वार होऊन गेलों. गोविंदपंतही जेजुरीस गेले होते. तेही धांवून आले. XXXX देवळावर चुना घालावयाचें काम आहे, त्यास माती घालावी किंवा चुनाच अगदीं घालावा ऐसें आह्मांस विचारिलें. त्यास माती न घालावी, चार दिवस अधिक लागले तर लागूं द्यावे, परंतु अगदीं चुनाच घालणें ह्मणून सांगितलें असे. हे विनंति.

[ लेखांक १३४ ] श्री.

श्रीमत् परमहंस भार्गवरामबावा स्वामींचे सेवेसीः—

अपत्यें चिमाजीनें कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील क्षेम ता० पौष[1] शुद्ध प्रतिपदा स्वामींच्या कृपावलोकनें मुकाम तापीतीर परगणे वरणगांव यथास्थित असे विशेष. तीर्थरूप रा० राऊ[2] खरगोणांवरून[3] पुनाशांजवळ[4] नर्मदा उतरून गेले. रा० आवजी कवडे देखील ऐशी हजार घोडे समागमें आहे. निजामनमुलुक सिरोंजेजवळ[5] आले आहेत.

---

१ पौष शुद्ध द्वितीयाः–ता० ११ दिसेंबर इ. स. १७३७ रविवार.

२ बाजीरावांची निजामउल्मुलुकावरील ही स्वारी होय. ह्या स्वारीची हकीकत लेखांक ३३।३४।३५।३६ ह्या पत्रांमध्यें आली आहे. ह्या स्वारीस बाजीराव चिमाजी आपांसह छ० ११ रजब ह्मणजे ता० २५ आक्टोबर इ. स. १७३७ रोजीं निघाले. ते छ० १० साबान ह्मणजे ता० २२ नोव्हेंबर रोजीं सांगवी प्रांत माळवा येथून भोपाळाकडे वळले व आपा परत खानदेशांत येऊन तारापूर साष्टी इकडे आले.

३ खरगोणः–हें नेमाड जिल्ह्यांत एक गांव आहे. हें सांप्रत होळकरसरकारच्या ताब्यांत आहे.

४ पुनासाः–हें नेमाड जिल्ह्यांत नर्मदेच्या कांठीं एक लहानसें गांव आहे.

५ सिरोंजः–हें टोंक संस्थानांत एक शहर आहे.

त्याजबराबर त्याचे पुत्र गाजुद्दीनखान व बोडसेकर व दतियेकर व जयसिंगाचा पुत्र व अहीर व रोहिला देखील पन्नास हजार फौज जमा आहे. सादतखानाचा भाचा व कोट्याचा राजा[1] वीसहजार फौज आणिक येणार आहे. रायांची त्याची गांठ लौकरच पडावी ऐसें आहे. माळव्याच्या सुभ्यांत रायांस उतरूं न द्यावें ऐसें पातशाहापासीं मान्य करून आले आहेत. स्वामींचा आशीर्वाद मस्तकीं आहे तेणें करून परिणाम उत्तम प्रकारेंच होईल. कांहीं फिकिर वाटते ऐसें नाहीं. सांप्रत आह्मी येथें आहों. औरंगाबादेस सुलतानजी जानोजी[2] वगैरे मोंगली फौज दहा बाराहजार जमा आहे. आह्मी लौकरच गंगातीरास येऊं. विदित व्हावें ह्मणून लिहिलें असे. कृपा केली पाहिजे हे विज्ञापना.

[लेखांक १३५] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

अपत्यें चिमणाजी बल्लाळ साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल ता० माघ[3] शुद्ध दशमीपर्यंत स्वामींचे आशीर्वादेंकरून असे विशेष. तीर्थरूप रा० रायांचा व नवाबाचा सलुख जाहला. तीर्थरूपांचीं पत्रें छ० २७ रमजानचीं[4] आलीं त्यांची नक्कल पाठविली आहे त्याजवरून कळेल. सारांश, स्वामींचा आशीर्वाद तीर्थरूपांचे मस्तकीं पूर्ण आहे. तत्प्रभावेंकडून निजामनमुलुक हतगर्व होऊन सलुख केला, हे गोष्टी लहान सामान्य जाली ऐसें नाहीं. सविस्तर स्वामींस विदित व्हावें यास्तव लिहिलें असे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

१ कोट्याचा राजाः-दुर्जनसाल (इ. स. १७२४—१७४७).

२ सुलतानजी जानोजीः-निजामाकडे जाऊन मिळालेली ही निंबाळकर मंडळी होत. रावरंभा नांवानें ह्यांचें घराणें अद्यापि हैद्राबादेकडे प्रसिद्ध आहे.

३ माघ शुद्ध दशमीः-ता० १९ जानेवारी इ. स. १७३८ गुरुवार.

४ छ० २७ रमजानचें पत्र-लेखांक ३५ पहा. ह्यांत निजामाच्या व पेशव्यांच्या सलुखाचें सविस्तर वर्णन आहे.

[लेखांक १३६] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

अपत्यें चिमाजीनें साष्टांग नमस्कार विज्ञापना येथीस कुशल ता० वैशाख[1] शुद्ध चतुर्दशीपर्यंत स्वामींचे आशीर्वादेंकरून असे विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन संतोष जाहला. "नवापुरास नौबत आहे ते हत्तीवर घालून श्रीस पावती करूं ह्मणोन चिरंजीव रा० रायांनीं मान्य केलें आहे तरी नौबत पाठवणें, व रा० अंतोबा नाईक गुडे यांजकडे पैका आहे तो वसूल करून पाठवून देणें" ह्मणोन आज्ञा. ऐशीयास, येविसींचें आह्मांस स्मरण आहे. स्वामींचे आज्ञेपेक्षां आह्मांस अधिकोत्तर काय आहे? त्याजकडे मुजरद जासूद पाठवणें ते पाठविलेच आहेत; परंतु जासुदांनीं दो गोष्टींचा निर्वाह होऊन येईल न येईल तें सेवेसी विदित आहे. तीर्थरूप रा० राव ते मार्गें आले तरी नौबत बराबर आणतील व अंतोबा नाईक गुडे याजकडीलही पैका वसूल घेतील. कदाचित् रायांचें तिकडून येणें न जालें आणि आमची त्यांची गांठ पडली तरी स्वामींचे आज्ञेप्रमाणें आह्मी निर्वाह करून घेऊन सेवेसी प्रविष्ट करूं. घांटा २ व पेट्या २ दोन पाठवावयाविशीं आज्ञा केली त्यास, स्वामींचे आज्ञेप्रमाणें घांटा व पेट्या सेवेसी पाठवून देऊं. दुलया २ एक सोंवळ्याची व वोवळ्याची पाहिजे, त्यांपैकीं सोंवळ्याची दुलई पाठविली ते पावली व वोवळ्याची राहिली ते पाठवणें ह्मणोन आज्ञा; त्यास आज्ञेप्रमाणें चिरंजीव रा० नाना यांस लिहिलें आहे. ते सेवेसी दुलई पाठवितील. "श्रीचा प्रसाद पांढरा मध घट १ एक पाठविला असे; घेणें. आणखी यत्न केला आहे, आला ह्मणजे पाठवून देऊं" ह्मणोन त्यास, स्वामींनीं पांढरा मध १ एक घट पाठविला तो पावला. आणखी पाठवणें तो स्वामी कृपा करून पाठवितीलच. पंच-

---

१. वैशाख शुद्ध चतुर्दशीः–ता० २२ एप्रिल इ. स. १७३८ शनिवार.

वीस मोत्यें दर मोतीं रुपये २ दोन प्रमाणें पाठवणें ह्मणोन, तरी स्वामींचे आज्ञेपेक्षां विशेष काय आहे ? मोतीं घेऊन सेवेसी पाठवितों. पांचशेर कृष्णागर पाठवून देणें ह्मणोन आज्ञा तरी, प्रस्तुत संग्रहीं नव्हता. मुंबईहून आणून सेवेसी पाठवून देऊं. "यश संपादोन सुखी आलेत हें वृत्त अवगत होऊन कोटिशः संतोष जाहला. आह्मांस द्रव्याची इच्छा नाहीं, तुमची कीर्ति ऐकोन परम सुखी आहों" ह्मणोन कित्येक आज्ञापिलें; तरी सर्व स्वामींचे आशीर्वादाचा प्रताप आहे. स्वामी ईश्वरतुल्य आहेत. आह्मां लेंकरांस भूषण देऊन पत्रीं आज्ञा करितात हें स्वामींचे थोरपणास उचित आहे. सर्व स्वामींचे आज्ञेनुरूप होतें. स्वामी ज्यावरी कृपा करून करवितात त्याचे हस्तें घडून येतें इतकाच अर्थ. आह्मी स्वामींचे आज्ञांकित असों. तीर्थरूप रा० रायांचीं पत्रें छ० २६ जिल्कादचीं[1] आलीं. कोट्योंचा[2] तह करून अहिरवाडीयांतून दतिया वोडसें प्रांतें गेले. स्वा-

[1] छ० २६ जिल्कादः—ता० ७ मार्च इ. स. १७३८ रोज मंगळवार. हें पत्र आह्मांस उपलब्ध झालें नाहीं!

[2] बाजीराव निजामाचा पराभव करून कोट्यास गेले. तेथील राजा दुर्जनसाल हा निजामउल्मुलुकाच्या बाजूचा होता, परंतु निजामचा पराभव होतांच तो बाजीरावांस येऊन भेटला. त्याच्या साह्याकरितां बाजीराव कोट्यास गेले व तेथील नहरगड किल्ला एका मुसलमानानें बळकाविला होता तो त्याजकडून घेऊन दुर्जनसालास परत दिला. दुर्जनसालानें संतुष्ट होऊन बाजीरावांशीं मित्रत्व जोडिलें. ही हकीकत टॉड यांच्या 'राजस्थानाच्या इतिहासांत' दिली आहे. परंतु त्यांत ह्या मोहिमीचा सन संवत् १७९५ ह्मणजे इ. स. १७३९ हा दिला आहे. त्याबद्दल शंका आहे! टॉड साहेबांच्या ह्मणण्याप्रमाणें इ. स. १७३९ हें साल ग्राह्य मानिलें तर ह्या पत्राची तारीख ११ मे इ. स. १७३९ रोज शुक्रवार ही पडते. परंतु ह्या तारखेस चिमाजी आपा वसईच्या लढाईत होते असें लेखांक ५२ वरून सिद्ध आहे व प्रकृत पत्रांत तर चिमाजी आपा स्वारींतून 'यश संपादोन सुखी आले' असा स्पष्ट उल्लेख आहे तेव्हां ह्या पत्राचें साल इ. स. १७३८ हेंच असावें असें व्यक्त होतें.

मींस पत्र होतें तें पाठविलेंच आहे. तें सेवेसी प्रविष्ट होऊन विदित होईल. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.[1]

[ लेखांक १३७ ] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

चरणरज चिमणाजी बल्लाळ कृतानेक विज्ञापना ता० छ० २३ रबिलाखर[2] पावेतों यथास्थित असें विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें पावलें. वर्तमान सविस्तर कळलें व सोमाजीनें जबानीनें सांगितलें त्यावरूनही कळलें. भाग्य व यश जें आहे तें सर्व आपले आशीर्वादाचें आहे. दुसरा विचार नाहीं. वारंवार कागदीं लिहावें ऐसें काय आहे? चित्तांमध्यें सदैव निजध्यास आहे. आपले आज्ञेखेरीज आजतागाईत वर्तलों नाहीं व पुढेंही आपली आज्ञा उल्लंघणार नाहीं. रा० रामचंद्र मल्हार यांजपासून स्वामींचे आज्ञेप्रमाणें पंचवीस हजार रुपये घेतों ह्मणून पूर्वी लेहून पाठविलें आहे. वर वर ल्याहावें ऐसें काय आहे? जगजीवन धोंडोंपंताचे लेंक यास पाठवून द्यावें त्याचें चालवूं. तुळाजी[3] आंगरे याजविसीं लिहिलें तरी त्याची बेडी काढावयाचें आमचे हातीं

---

१ ह्या पत्रांत नवापूरच्या नौबतीचा उल्लेख असून ती बाजीराव स्वारींतून परत येतांना आणतील असें चिमाजी आपांनीं दर्शविलें आहे; परंतु बाजीरावांची स्वारी त्या मार्गें न आल्यामुळें स्वामींस नौबत मिळाली नाहीं. त्यावरून पुनः स्वामींचा व बाजीरावांचा पत्रव्यवहार जाहल्याचें लेखांक ३७ वरून दिसून येईल.

२ छ० २३ रबिलाखरः–ता० १९ जुलई इ. स. १७३९ गुरुवार.

३ तुळाजी आंगरेः–हा कान्होजी आंगरे यांची दुसरी बायको गहिनाबाई हिचा पुत्र. मानाजी आंगरे हा गादीवर असल्यामुळें त्याचें व तुळाजीचें वैमनस्य येऊन मानाजीनें पेशव्यांस अनुकूल करून घेऊन तुळाजीशीं युद्ध केलें व त्यास कैदेंत टाकिलें. तुळाजी पुढें ब्रह्मेंद्रस्वामींस शरण गेला त्यावरून त्याची बेडी काढण्याबद्दल स्वामींनीं पेशव्यांस लिहिलें आहे. स्वामींचा व आंगऱ्यांचा पत्रव्यवहार फार होता.

आहे. बेडी आह्मी काढवूं. सोडावयाची आज्ञा राजश्री स्वामींची पाहिजे. राजश्री स्वामींस विनंति करूं. त्यांणीं सोडावयाची आज्ञा दिली तरी सोडून देऊं. द्राक्षें नवीं पक्का ८॥ अदसेर व जुनीं द्राक्षें गोड पक्का ८८॥ एकूण एकशेर, व मिरें आंगरी पक्का ८८॥ अदसेर पाठविलीं तीं पावलीं. डोंगरी मिरींयाचें प्रयोजन नाहीं. तीं न पाठवावीं. गोपाळ रामराव याचे वतनाविशीं रा० बरवाजी ताकपिरास पत्र लेहून पाठविलें आहे. वरकड सविस्तर वर्तमान जबानीं सोमाजी सांगतां कळों येईल. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना. मेरूलिंगास श्रावणमासीं अनुष्ठानास दानें करावयाची आज्ञा सोमाजी समागमें सांगोन पाठविली, त्यावरून सोमाजी समागमें रुपये १० दक्षिणा ब्राह्मणांस, ५ भोजनास ब्राह्मणांस, एकूण पंधरा रुपये पाठविले आहेत; घेतले पाहिजेत. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक १३८] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

चरणरज चिमणाजी बल्लाळ व बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल ता० भाद्रपद[1] बहुल तृतीयापर्यंत स्वामींच्या आशीर्वादें + + + + (फाटलें आहे) असे विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन संतोष जाहला. पशमी थानें २ दोन पाठवावयाविसीं आज्ञा केली याजवरून पशमी थानें २ दोन पाठविलीं आहेत. घेऊन पावलीयाचें उत्तर पाठवावें. रामचंद्र मल्हार यांजकडील पंचवीस हजार रुपये घ्यावयाविसीं विशदें (विषादें ?) आज्ञा केली ऐसीयास मशारनिल्हेकडील सदरहू रुपये आह्मी घेतों. घेतलेच ऐसें समजावें. स्वामींसीं आह्मीं बोललीयावर हयगय करूं हें सर्वथैव होणार नाहीं. मशारनिल्हेकडील रुपये आह्मीं घेतले. कळलें पाहिजे.

---

१ भाद्रपद बहुल तृतीयाः—ता० ९ सप्तंबर इ. स. १७३९ रविवार.

हरि विठल याचें चालवावें, बाकी राहिली असेल ते त्याची त्यास देऊन वेतन भरून द्यावें ह्मणून, तर स्वामींची आज्ञा शिरसा वंद्य आहे. त्याचे वेतनपैकीं बाकी राहिली असेल ते त्यास पावती करूं. गोविंद राम ठाकुर याजकडील पालखीबाबत रुपये १२५ सवाशें पाठवून द्या-वयाविशीं आज्ञा, त्यावरून रुपये १२५ सवाशें नारोजी समागमें पाठ-विले असेत. घेऊन गोविंद राम याचे नांवें उत्तर पाठविलें पाहिजे. दसरा जाहलीयावर पुण्यास येऊं नंतर कारकुनाची व शहरची व सर-दार तिघे खेरीज करून भिक्षा करून देणें ह्मणून आज्ञा, त्यास स्वामींचें येणें जाहलीया आपले पाय आमच्या दृष्टीस पडतील. येणेंकरून आमचें अभीष्टच आहे. परंतु यंदाचा विचार कोणे प्रकारचा आहे, लष्कर कोठपर्यंत गेलें होतें, मिळवून काय आलें, किरकोळ शिपायांची व सर-दारांची अवस्था काय आहे, तें परस्पर स्वामींस श्रुत जाहलेंच असेल. आह्मीं लिहावें ऐसें नाहीं. स्वामींचे आशीर्वादेंकरून सर्व उत्तमच होईल. तदोत्तर स्वामींच्या सेवेसी कोणी अंतर करील ऐसें नाहीं. यावर स्वामींची आज्ञा ते प्रमाण. थोर थोर सरदार तों नियताप्रमाणें पाठवी-तच आहेत. नारो कृष्ण यांस परगणियाचा हुद्दा सांगोन वेतन बरेंच करणें ह्मणून आज्ञा, तर लक्ष प्रकारें मशारनिल्हेस परगणियाचा हुद्दा सांगोन वेतन बरें करून सर्वप्रकारें चालवूं. अंतर होणार नाहीं. बहुत काय लिहिणें सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक १३९] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

अपत्यें चिमाजीनें कृतानेक नमस्कार विज्ञापना येथील कुशल ता० भाद्रपद[1] बहुल चतुर्थीपर्यंत स्वामींचे आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. स्वामींनीं दोन आशीर्वादपत्रें पाठविलीं तीं पावोन संतोष जा-

---

१ भाद्रपद बहुल चतुर्थीः—ता० १० सप्तंबर इ. स. १७३९ सोमवार.

ह्ला. व्यथेनें फारच पीडिलें [?] तें वृत्त सोमाजीनें स्वामींस विदित केलेंच असेल. अलीकडेही खोकल्यानें हैराण केलें होतें, परंतु स्वामींचे आशीर्वादेंकरून आरोग्य आहे. वसई साष्टीहून निघोन मजल दरमजल भाद्रपद[1] शुद्ध त्रयोदशीस पुण्यास आलों. स्वामींनीं पत्रीं कितेक आज्ञा केली, ऐशीयास पहिलेही स्वामींची आज्ञा उल्लंघिली नाहीं व पुढेंही आपले आज्ञेचा अव्हेर न व्हावा हेंच कायावाङ्मनसा आमच्या चित्तांत आहे. एतद्विषयींची विनंति XXX रायांनीं स्वामींजवळी केली आहे; तरी सोमाजी अथवा खंडोजीस येथें पाठवावयाची आज्ञा करणार स्वामी समर्थ आहेत. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना. येथें येतांच सेवेसी विनंतिपत्र पाठवावें परंतु खोकल्यानें शरीरास फारच पीडा केली आहे, अद्यापही उतार नाहीं, यामुळें चार दिवस अंतर पडलें. XXXX विघ्नें आलीं तितकींही दूर झालीं. पुढेंही स्वामींच्या आशीर्वादें शरीरआरोग्य होईल. स्वामींच्या आशीर्वादापेक्षां दुसरी जोड जाणत नाहीं. स्वामी माय बाप देव ऐसेच जाणतों. स्वामींही लेंकराप्रमाणें कृपा करीत आले आहेत. पुढेंही स्वामी मज लेंकराचें प्रतिपालन करणार समर्थ आहेत. हे विज्ञापना.

[लेखांक १४०] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

चरणरज चिमणाजी बल्लाळ कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल तागाईत आश्विन[2] बहुल नवमीपर्यंत स्वामींचे कृपेंकरून यथास्थित असे विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन संतोष जहाला. घोड्यांस पाषाणा जाहला यास्तव लहान घो-

---

१ भाद्रपद शुद्ध त्रयोदशीः—ता० ४ सप्तंबर इ. स. १७३९ मंगळवार. ह्या दिवशीं चिमाजी आपा वसईची मोहिम फत्ते करून पुण्यास आले.

२ आश्विन बहुल नवमीः—ता० १५ आक्टोबर इ. स. १७३९ सोमवार.

ड्यावर बैसोन धावडशीस आलों. लहान्या घोड्यामुळें शरीर फार श्रमी जाहलें ह्मणून लिहिलें तें कळलें. लहान्या घोड्यामुळें स्वामींचें शरीर फार श्रमी जाहलें असेल संशय नाहीं. तथापि स्वामी ईश्वरी स्वरूप जाणून सर्व निभाऊन नेतात. अन्यत्र सोसेल ऐसें नाहीं. स्वामींनीं मोत्यांचा मजकूर लिहिला, ऐशास मोत्यें आह्मीं आज विकत घेतलीं नाहींत. पहिलीं घेऊन जामदारखाना ठेविलीं होतीं. पहिली किंमत पडली होती ते स्वामींस विदित केली. अन्यथा स्वामींजवळ आह्मीं बोलावें ऐसी आमची निष्ठा स्वामींचे चरणारविंदीं नाहीं. तुळाजी आंगरे याची बेडी तोडावयाविसीं आज्ञा केली त्यास पहिली, आपली आज्ञा जाहली तेव्हांच लिहिलें. बेडी तोडविली. हल्लींही नि-क्षून ताकीद बेडी तोडावयाविसीं लेहून पाठविली आहे. गंगाजल-निर्मळ उमाबाई[1] यांनीं सन्मानें पूजा केली याचा अर्थ लिहिला, तर स्वा-मींची पूजा यथाविधि केली याचें अपूर्व काय आहे? त्यांणीं निष्ठा-पुरःसर पूजा करावी यांतच त्यांचें कल्याण आहे. घोडी उत्तम, शिं-गरवट, चार लोक मानवत ऐसी पाठवणें ह्मणोन आज्ञा, तरी स्वामींस घोडी पाठवूं ते उत्तम, स्वामींचे चित्तास येईल ऐसीच पाठवूं. गणप-तरायांनीं पूजा केली याचें लिहिलें, तर गणपतरायांनीं स्वामींचा आशीर्वाद प्रशस्तवदनेंकरून घ्यावा हेंच त्यास श्रेयस्कर. तदनु-रूप त्यांणीं केलें, फार उत्तम आहे. जगन्नाथ धोंडदेव यांचें बरव्या रीतीनें चालवणें ह्मणून आज्ञा, तरी स्वामींचे आज्ञेपेक्षां आह्मांस दुसरें विशेष काय आहे? स्वामींस अगत्य त्याचें आहे, तदनुरूप लक्ष प्रकारें त्याचें चालवूं. पुढें शुभचिन्हें स्वामींचे चित्तांत येऊन निशाण पाठ-विलें तें पावलें. आज्ञेप्रमाणें हत्तीवर आरोहण करून पुढें चालवूं. सोनजी व बाळकोजी यांस वस्त्रें देणें, पासोडी देणें ह्मणून आज्ञा,

---

१ उमाबाईः—सुप्रसिद्ध उमाबाई दाभाडे.

त्याप्रमाणें वस्त्रें पासोडी दिल्ही. तुमचे शरीरीं उत्तम प्रकारें व्हावें याजकरितां श्रीची प्रार्थना करीन व अनुष्ठान करीन, आणि तुमचें शरीर बरें करीन ह्मणोन पूर्ण अभयपूर्वक आज्ञापिलें, तर स्वामी साक्षात्कार ईश्वर आहेत. स्वामींचे मुखांतून आमचें बरें–आमचें शरीर उत्तम प्रकारें करावयाचें–निघालें तेव्हांच आमचें शरीर उत्तम जाइलीयाची शकूनगांठ बांधिली. अत:पर येविसीं स्वामी श्रीजवळ प्रार्थना करणें ते स्वामी करितील. स्वामींचे चरणारविंदाव्यतिरिक्त दुसरें दैवत आह्मांस काय आहे ? सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[ लेखांक १४१ ] श्री.

श्रीमत् परमहंस स्वामींचे सेवेसी:—

अपत्यें चिमाजीनें कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति उपरी येथील कुशल ता० ज्येष्ठ[1] शुद्ध तृतीया मुक्काम किल्ले[2] पाल स्वामींच्या कृपावलोकनें यथास्थित असे विशेष. रायाचें विपरीत वर्तमान श्रुत जालीयावर स्वामींनीं बहुत शोक आरंभिला आहे; गोमूत्र टाकिलें आहे; "बाजीसारिखा शिष्य गेला, याउपर या मुलखांतून जावें किंवा प्राण सोडावा, काय करावें तें लिहिणें" ह्मणून पत्रीं लेहून पत्र चिरंजीव रा० दादोबाजवळ दिल्हें, तें त्यांनीं पाठविलें तें काल पावलें. त्यावरून आह्मी दुःखाच्या सागरांत मग्न जालों ! एक तीर्थरूप मस्तकीं आमच्या होते ते गेले ! बरें ! होणारास इलाज नाहीं ! स्वामी रायाच्या आमच्या सर्वांच्या मस्तकीं आहेत. त्या आश्रयेंकरून आजपावेतों कालक्रमणा केली. यश कीर्ति सर्व प्राप्त जालें. आतां स्वामींनीं येविसीं उदासीनता चित्तीं आणल्यावर आह्मी या मुलखांत राहून काय करणार आणि आमचा परिणाम काय लागणार तें कळतच आहे ! तेव्हां स्वामी जातील

---

१ ज्येष्ठ शुद्ध तृतीया:–ता० १७ मे इ. स. १७४० शनिवार.

२ किल्ले पाल:–हा किल्ला कुलाबा जिल्ह्यांत भोर संस्थानांत आहे.

तिकडे उठोन जावें, अगर स्वामींच्या समागमें कोठें येवेल ? यावयाचें सामर्थ्य कैचें ? तेव्हां सर्वस्वास पाणी सोडून आयुष्याचे दिवस मात्र घालवावे ऐसें आह्मांस प्राप्त जालेंसें जालें. जर स्वामींनीं चित्त स्थिर करून आजपावेतों आह्मांवरी कृपाकटाक्षें पहात आले तैसेच कृपाकटाक्षें पाहाल, आहां तैसेंच स्वस्थचित्तें राहाल, तर चिरंजीव रा० नानास बाजीरायाचे जागा आहे. स्वामींची कृपा मस्तकीं असलीयावर यापेक्षां अधिकपणें स्वामींच्या शिष्यत्वपणाचें नांव राखील. उमेद तों आमची या प्रकारची आहे. सर्व उमेद हिंमत स्वामींच्या आशीर्वादाच्या बळाची आहे. स्वामींनीं नानावर, आह्मांवर, सर्व बालकांवर नजर देऊन संतोषरूप राहावें. उदासीनता सोडावी. स्वामींचें चित्त स्थिर असलें ह्मणजे आमच्या कल्याणाची वृद्धि होईल, यास्तव सर्वथा उदासीन न व्हावें. निरंतर बालकांचे मस्तकीं स्वामींचा आशीर्वाद असल्यावर काय न्यून होणार ? सर्वप्रकारें ऊर्जितच होईल. यांत संशय नाहीं. या पत्राचें उत्तर "चित्त स्वस्थ जालें, उदासीनता सोडिली" ऐसें पाठविलें पाहिजे. आह्मांस नानास उत्तम करून दाखविल्याखेरीज तुह्मीं उदासीनता चित्तांत आणल्यानें उत्तम दिसाल कीं काय ? हा विचार स्वामींनींच चित्तांत आणावा. स्वामी सर्व जाणत आहेत. कृपा केली पाहिजे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.[1]

[लेखांक १४२] श्री.

श्रीमत् महाराजश्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

चरणरज चिमणाजी बल्लाळ साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल ज्येष्ठ[2] शुद्ध त्रयोदशी सौम्यवासरपर्यंत स्वामींचे कृपावलोकनें

---

१ ह्या पत्रावरून स्वामींचें बाजीरावावरील अकृत्रिम प्रेम व्यक्त होतें. हें पत्र वाचून कोणाच्या अंतःकरणांतून शोकरसाचे पाझर फुटणार नाहींत ? गुरु-शिष्यप्रेमाचा अपूर्व मासला ह्या पत्रावरून दिसून येतो.

२ ज्येष्ठ शुद्ध त्रयोदशीः—ता० २८ मे इ. स. १७४० बुधवार.

यथास्थित असे विशेष. स्वामींनीं कृपा करून आशीर्वादपत्र पाठविलें तें पावलें. रायाचें वर्तमान ऐकोन श्रम विशेष जाहले. तुह्मीं विवेक करून खेदाचें निराकरण करणें ह्मणोन आज्ञा, तरी जाहले गोष्टीस उपाय नाहीं ! खेद करून काय होणें ? पुढें स्वामींचा आशीर्वाद मस्तकीं आहे तदनुरूप होणें तें होईल. प्रसाद शालजोडी पाठविली ते पावली. पहिले राऊ तुमच्याच आशीर्वादाचे बळेंकरून सर्व उद्योग करीत होते ते सिद्धीस जात होते. आतांही तुमचाच आशीर्वाद मस्तकीं आहे. त्या बळेंकरून चिरंजीव नानाचा आमचा परिणाम उत्तम लागेल यांत संदेह नाहीं. येवढें छत्र आमचे मस्तकीं असतां आह्मीं चिंता करावी ऐसें काय आहे ? कसेही अडचणीचे प्रसंग पडले ते तुमच्या कृपा-कटाक्ष-बळेंकरून निभाऊन परपार जाले. तैसेच आतांही सर्व प्रसंग पडतील ते परपार होऊं. स्वामींचे पाय आमचे मस्तकीं आहेत तोंपर्यंत कांहीं चिंता वागवीत नाहीं. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.[1]

[लेखांक १४३] श्री.

श्रीमत् परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

अपत्यें चिमणाजी बल्लाळ व बाळाजी बाजीराऊ कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति उपरी काल[2] शनिवारीं भोंईजेजवळ नदी उतरून

---

१ मागील पत्रांत व ह्या पत्रांत मौजेचा विरोध दृष्टीस पडतो. मागील पत्रांत स्वामींचा अनावर शोक पाहून त्यांचें चिमाजी आपांनीं सांत्वन केलें आहे व ह्या पत्रांत स्वामींनीं चिमाजी आपांचें समाधान केलें आहे. भक्तीची मौज आहे !

२ ता० ८ जून इ. स. १७४० रविवार रोजीं चिमाजी आपा व बाळाजी बाजीराव पेशवाईचीं वस्त्रें घेण्याकरितां सातान्यास आले. आदले दिवशीं ह्मणजे ता० ७ जून रोजीं (शनिवारीं) ते भुईंजेस राहिले. भुईंज हें वांई तालुक्यांत कृष्णातीरीं पुणें-सातारा रस्त्यावर एक गांव आहे. हें पत्र स्वारींतूनच लिहिलें आहे. ह्यानंतर तीन दिवसांनीं ह्मणजे बुधवारीं १० घटिका दिवसास बाळाजी बाजीरावास पेशवाईचीं वस्त्रें मिळालीं.

नदीतीरीं राहिलों. आज राजदर्शन घ्यावयास मुहूर्त आहे. सातारीयास जाऊन दर्शन घेऊं. स्वामींच्या कृपावलोकनेंकरून तेथील धंदा उरकलीयावरी, स्वामींचे पाय पहावयास येऊन, स्वामींचा आशीर्वाद मस्तकीं घेऊन जाऊं. स्वामींच्या बागांत भाजी तो नाना प्रकारची असतच आहे. थोडी थोडी एका दो दिवसांनीं पाठवावयास आज्ञा करणार स्वामी समर्थ आहेत. स्वामींच्या आशीर्वादाची भाजी खादल्यानें शरीरास बहुत हितकारक असे, यास्तव ही विनंति लिहिली असे. स्वामी कृपा करणार समर्थ आहेत. चिरंजीव जनार्दन बाजीराऊ व काशीबाई लष्करासमेत पुण्यास पावली. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक १४४] श्री.

श्रीमत् महाराजश्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

चरणरज चिमणाजी बल्लाळ व बाळाजी बाजीराऊ कृतानेक विज्ञापना येथील क्षेम ता० ज्येष्ठ[1] वद्य एकादशी मुकाम सातारा येथें स्वामींचे कृपेंकरून सुखरूप असों विशेष. आपण कृपा करून पत्र पाठविलें तें पावोन वर्तमान सविस्तर कळलें. कित्येक संसारिकांचे विचार आपण लेहून पाठविले ते सविस्तर कळले. आमचें बरें व्हावें हें आपले चित्तामध्यें आहे. तन्मुळें आपण लिहितात उत्तमच आहे. आपली आमची भेटही लौकरच होईल; तदनंतर जे आपण आज्ञा करितील त्याप्रमाणें वर्तणूक करूं. काल तृतीय प्रहरीं राजश्री स्वामींचें दर्शन जाहलें. आज प्रातःकाळीं राजश्री स्वामी आमचे घरास[2] आले होते. पुढें जें वृत्त होईल तें आपणास लेहून पाठवूं.

---

१ ज्येष्ठ वद्य एकादशीः—ता० ९ जून इ. स. १७४० सोमवार. चिमाजी आपांचें वरील पत्र गेल्यानंतर स्वामींकडून जें उत्तर आलें त्याचें हें प्रत्युत्तर दिसतें.

२ राजश्री स्वामी ह्मणजे शाहू महाराज पेशव्यांच्या भेटीकरितां त्यांच्या वाड्यांत आले. शाहू महाराज साताऱ्यास रंगमहालांत राहत असत. तेथून सांप्रत जो अदालत वाडा ह्मणून प्रसिद्ध आहे तेथें ते पेशव्यांस येऊन भेटले. ह्या वाड्यांत पेशवे राहत असत.

जें होणें तें आपले आशीर्वादेंकरून उत्तमच होईल. फणस १ कापा, १ वरका, काशीफळ काशीभोपळा १, केळघड केळीं सुमार ४१, केळफूल १, येणेंप्रमाणें पाठविलें तें पावलें. आपले प्रसादाची शाक भक्षूं ह्मणजे तेणेंकरून रोग सर्व दूर होतील. दोहों दिवसां, तीहीं दिवसां, शाकभाजी वरचेवर पाठवावयासी आज्ञा केली पाहिजे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना. बागांत होत जाईल त्यांतील पाठवणें तें पाठवीत जावी. विकत घेऊन पाठवावी ऐसें काय आहे? हे विज्ञापना.

अपत्यें बाळाजी बाजीराव कृतानेक विज्ञापना येथील वर्तमान तीर्थरूपांनीं सेवेसी लिहिलें आहे त्यावरून कळेल. हे विज्ञप्ति.

[लेखांक १४५] श्री.

श्रीमत् परमहंस स्वामींचे सेवेसीः—

अपत्यें चिमाजीनें कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति उपरी येथील कुशल ता० पौष शुद्ध द्वितीया स्वामींच्या आशीर्वादेंकरून सुखरूप असों विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें पावलें. रायाजी धोंडदेव याचें स्वामींस अगत्य ह्मणून त्याचेविसीं आज्ञा केली, तरी स्वामींचे आज्ञेपेक्षां अधिक काय आहे? त्याचें उत्तम प्रकारें चालविलें जाईल. नारो अनंताची बायको सोडावयाचें पत्र दिल्हें असे. जिवाजी देवरुख्याचीं माणसें जतन आहेत. "चिरंजीव रा० बाजीरायांनीं तांदुळ देऊं केले आहेत ते पाठविणें" ह्मणून आज्ञा, त्यास येथें बहुत तलास केला परंतु तांदुळ चांगले न मिळत. याकरितां रा० बापुजी गणेशास पत्र पाठविलें आहे. स्वामींची आज्ञा होईल तर तांदुळ तेथेंच खरेदी करून देतील, अगर स्वामींची आज्ञा जाली तर रुपये ८० ऐशी स्वामींस पावते करतील. सौभाग्यवती विरूबाई दर्शनास येणार, तेव्हां दोन

---

१ पौष्य शुद्ध द्वितीयाः—ता० १ जानेवारी इ० स० १७३९ सोमवार.

वस्त्रें बायकांस द्यावयास पाहिजेत ऐसा निरोप केसो गोंविद यांनीं सांगितला. त्यावरून शालू पातळें दोन पाठविलीं असेत. याखेरीज स्वामींस पांघरावयास किनखापाची दुलई करून पाठविली असे. सौभाग्यवती विरूबाईनें दोन हजार रुपये न मागतां दिल्हे ह्मणून लिहिलें, तर स्वामींचे सेवेस अंतर कोण करणार? वामनभटास नांवें तीनशें साठीची फारखती पाटविली ते पावली. स्वामींनीं आमची विनंति मान्य करून फारखती पाटविली [त्यामुळें] बहुत संतोषी जालों. साखर पक्का एकमण सातान्याहून देविली असे. पावती होईल. चुना चांगला पांचमण भुलेश्वरास पावता करविला असे. चुना येथें चांगला होत नाहीं. येथल्यापेक्षां जेजुरीस चांगला होतो; तेथून देविला असे. रा० बाजीराऊ जाते समयीं भेट न घेतां गेले ह्मणून आज्ञा, तर निरंतर स्वामींचे पायाचा निजध्यास त्यांस आहे. तेणेंचकरून कल्याण आहे. स्वामीही कृपाकटाक्षें पाहतात तेणेंचकरून कल्याण होतें. राधाबाई थोरातीण इचें स्वामींस अगत्य, त्यावरून नारो बाबाजीस ताकीद केली असे. पाथरवटाचे वाटेस जाणार नाहीं हे विज्ञापना.

[लेखांक १४६] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसी:—

चरणरज चिमणाजी बल्लाळ कृतानेक विज्ञापना तागाईत० छ० [1] १६ साबान पावेतों स्वामींचे कृपेंकरून असों विशेष. स्वामींनीं कृपा करून पत्र पाठविलें तें पावोन लिहिलें वृत्त सविस्तर कळलें. व्याजाचे रुपयांपैकीं दहा हजार रुपये तूर्त पाठवून देणें ह्मणून आज्ञा, ऐसीयास प्रस्तुत आमची वोढ पैकीयाची जाहली आहे. यास्तव प्रस्तुत पैका पाठवण्यास अनुकूल पडत नाहीं. परशरामपट्टी गांवगन्ना चित्तास येईल तरी करावी ह्मणून आज्ञा, तरी सर्व जें आहे तें स्वामींचे प्रतापाचें आहे. दुसरा

१ छ० १६ साबानः—ता० २७ आक्टोबर इ० स० १७४० सोमवार.

अर्थ आहे ऐसें नाहीं. कापडाचा मजकूर लिहिला तरी आपले आशीर्वादेंकरून कापडही मिळणें तें मिळतच आहे. घोडीचा मजकूर लिहिला तरी घोडी मागाहून पाठवून देऊं. जगजीवन धोंडदेव यांजविसीं लिहिलें तरी त्यास येथें पाठवून द्यावें. त्याचें उत्तम प्रकारें चालवूं. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक १४७] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

अपत्यें चिमाजीनें साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल आषाढ[1] बहुल सप्तमीपर्यंत स्वामींचे आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. स्वामींनीं रुप्याचे तांब्याविसीं आज्ञा केली याजवरून तांब्या पाऊणशें रुपयांचा तयार करवून सेवेसी पाठविला असे. वेऊन पावलीयाचें उत्तर पाठवावया आज्ञा केली पाहिजे. यानंतर स्वामींनीं तीर्थरूप रा० रायांस पत्र पाठविलें त्यांत आज्ञा कीं, चिमाजीनें माझी जाण न करितां अपमान केला ह्मणोन, तर स्वामी ईश्वरस्वरूप, देव स्वामी, धर्म स्वामी, मायबाप स्वामी. आह्मी लेंकरें चरणांकित. आह्मांपासून स्वामींचा अपमान होणें हेच गोष्ट अपूर्व आहे. इंद्रही अमरावतीहून उतरोन स्वामींचा अपमान करीन ह्मणेल तरी स्वामींचा पुण्य-प्रताप-तेजोद्भवापुढें तोही न्यून आहे. तेथें आह्मीं मानवी लेंकरें आपलीं. यांजपासून सेवेसी अंतर पडेल ऐसें नाहीं. मनाला समाधान वाटत नव्हतें तत्समयीं दोन हजारांनिमित्य स्वामींकडील कारकून आला होता, त्याजसीं बोलावें ऐसें मजमध्यें सामर्थ्य होतें नव्हतें तें त्यास परभारें विचारावें,

---

१ आषाढ बहुल सप्तमीः—ता० २९ जुलई इ० स० १७३६ सोमवार. लेखांक १२९ मध्यें रुप्याचा तांब्या पाठवून देतों असें चिमाजी आपानीं स्वामींस लिहिलें आहे त्याप्रमाणें तो पाठविल्याबद्दल ह्या पत्रांत उल्लेख आहे. त्यावरून ह्या पत्राची तारीख व सन बरोबर जमतो.

आणि अंतर पडलें असेल [असें] बरेंकरून स्वामी ह्मणतील तर सुखेंच आहे! ते गोष्टी नसतां स्वामी लेंकरावरी आरोप ठेवितील तरी स्वामी मायबाप आहेत. आह्मीं लेंकरेंच असों. वरकड जाण होणें न होणें तर हा सर्व आशीर्वाद स्वामींचा. स्वामींचे आशीर्वादेंकरून जें होणें तें होतें. त्यांत आमचें काय आहे? न्यून पूर्णाचे खावंदच स्वामी आहेत. जें आहे तें सर्व स्वामींचें. स्वामींचे आज्ञेखेरीज आह्मी कोणते आहों? सर्वाविसीं क्षमा करून कृपा करणार स्वामी समर्थ आहेत. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक १४८] श्री.

श्रीमत् परमहंस स्वामींचे सेवेसीः—

अपत्यें चिमाजीनें कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील क्षेम ता० मार्गशीर्ष वद्य दशमी मुकाम नजीक माहुली प्रांत कल्याण स्वामींच्या कृपावलोकनेंकरून यथास्थित असे विशेष. स्वामींनीं कृपा करून आशीर्वादपत्र पाठविलें तें पावलें. बाजीराऊ [येथें कागद फाटल्यामुळें अक्षरें दिसत नाहींत.] श्रावणमासीं समाधिविसर्जन-समयीं पैका वस्त्राचा पाठवीत असतां तो देखील सा हजार रुपये वर्षास पाठवीत जाणें ह्मणजे आणिक कांहीं मागणार नाहीं ह्मणून आज्ञा केली, ऐसीयास तीर्थरूप नानांचे ती वर्षा बाराशें पावत असतात त्याप्रमाणें पावतच आहेत. नानाअलिकडे जे जे समयीं स्वामींनीं आज्ञा करीत गेले ते ते वेळेस स्वामींची आज्ञा उल्लंघिली ऐसें नाहीं. दसऱ्यांत स्वामींचें आगमन जालें तेव्हां साराच जामदारखाना स्वामींचे पुढें ठेविला. स्वामींनींच सारा बक्षीस केला. आतांही सर्व दौलत जामदारखाना बिशाद स्वामींच्या आशीर्वादाची आहे. फलाणीच मोईन स्वामींनीं सांगावी ऐसें नाहीं. सारीच बिशाद स्वामींची

१ मार्गशीर्ष वद्य १०:—ता० १५ दिसेंबर इ० स० १७३८, सोमवार.?

आहे. पूर्वींच स्वामीपुढें उभी केलीच होती. आतांही सारी बिशाद स्वामींपुढें आहेच. घांट, पेट्या, स्वामीकडे रवाना करितों. येऊन पावतील. लवंग जायफळ साखर जायपत्री. .........[पाठवावया-विषयीं स्वामींनीं ?] आज्ञा केली, तर आषाढमासीं हा जिन्नस एकवेळ स्वामींकडे पाठविलाच आहे. पुढेंही आज्ञेप्रमाणें पाठवून देऊं. माळशिरसच्या पाटलाच्या पारपत्याविषयीं आज्ञा केली, त्यास सांप्रत आह्मीं दूर लांबलों आहों. भिवाजी गांवीं आहे कीं नाहीं हे तहकीकात करून आणवितों आणि तहकीक कळल्यावर स्वामींचे आज्ञे-खेरीज दैवत आहेसें नाहीं. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक १४९] श्री.

श्रीमत् परमहंसबावा स्वामींचे सेवेसी:—

अपत्यें चिमणाजी बल्लाळ कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति उपरी येथील कुशल ता० छ०[1] १८ रबिलावल स्वामींचे कृपेंकरून यथास्थित असे विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्रीं आज्ञा केली कीं, "बाबजी गायकवाड तुह्मांकडेस होता त्यास जखमा लागल्या आहेत ह्मणोन ऐकतों. त्यास, तो मेला किंवा जीवंत आहे हें लेहून पाठवणें. व संभाजी शेवगा, बाबजी मोरे मेले असतील (फाटलें आहे) वस्तभाव येसजी गायकवाड याचे हवाला करणें व येसजीस चाकर आपणाजवळ ठेवणें, ते मात पोख्ती करणें" ह्मणोन लिहिलें, ऐशास.........बाबजी गायकवाड व संभाजी शेवगा व बाबजी मोऱ्या हे तिघेही मयत जाहले. त्यांची वस्तभाव कांहीं राहिली नाहीं. जेथें मेले तेथेंच गेलीं. हल्लीं त्यांचे कबिल्यांची बेगमी जाहली पाहिजे याकरितां त्यांचे कबिल्यास सालीना मोईन रुपये ४० बाबजी गायकवाड, २५ बाबजी मोऱ्या, २० संभाजी शेवगा, एकूण पंच्याऐशी रुपये मोईन करून त्यांपैकीं हल्लीं ता० येसजी गाय-

१ छ० १८ रबिलावल:—ता० २ जून इ० स० १७४०, सोमवार. ?

कवाड रुपये २५ बाबजी गायकवाड, १५ बाबजी मोऱ्या, १० संभाजी शेवगा एकूण पन्नास रुपये पाठविले. सदरहुप्रमाणें स्वामींनीं ज्याचे त्यास प्रविष्ट करावे. वरकड असाम्या मेल्या त्याचे येसजी मागत होता. परंतु स्वामींनीं पत्रीं लिहिलें ........ व ठाणेंयाहूनही त्यांची नांवनिसी ........... आली नाहीं. तेथून लेहून येईल व स्वामी लिहून पाठवतील तेव्हां वरकडाचीही बेगमी करून देणें तें देऊं. येसजी गायकवाड यास चाकर करीत होतों, परंतु प्रस्तुत चाकर राहत नाहीं. महिन्या दोन महिन्यांनीं चाकर राहीन ह्मणतो. यास्तव निरोप दिल्हा असे. पुढें आल्यावरी चाकर करून ठेविला जाईल. बावजी गायकवाड याचे बायकोस लुगडें व मुलांस मुंडासें व बाबजी मोऱ्या याचे बायकोस लुगडें, मुलास मुंडासें, व संभाजी शेवगा याचे बायकोस लुगडें दिल्हें असे. प्रविष्ट करावें. येसजीस मुंडासें दिल्हें असे. सेवेसी श्रत होय हे विज्ञापना.

[लेखांक १५०] श्री.

श्रीमत् परमहंस महाराज श्री स्वामींचे सेवेसी:—

चरणरज चिमणाजी बल्लाळ कृतानेक विज्ञापना येथील कुशल श्री कृपें असे विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें पावलें. कोठीचे बैल कोंकणांत गेले होते त्याजपासून कमाविसदारांनीं रुपये ३९ एकूणचाळीस व आंगठी घेतली आहे ते देववावीं ह्मणून आज्ञा, त्यास कोणत्या कमाविसदारांनीं काय रुपये घेतले ते तहकीक करून आणावयास पत्र व माणूस मुजरद पाठविलें आहे. कोठीवाला स्वामींचा ठेवून घेतला आहे. कमाविसदारांनीं रुपये काय घेतले हें लिहून येईल. दस्तकाप्रमाणें बैल असतां रुपये घेतले असले तरी रुपये घेतले असतील ते पाठवून देऊंच. कदाचित् दस्तकाखेरीज जाजती बैल असले आणि त्यांज पासून हांशिलाचे रुपये घेतले असले तरी स्वामींस लिहून पाठवून आपली आज्ञा होईल त्याप्रमाणें वर्तणूक करूं. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक १५१] .श्री.

श्रीमत् परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

चरणरज चिमणाजी बल्लाळ कृतानेक विज्ञापना येथील वर्तमान ता० छ० १५ जिल्कादपावेतों स्वामींचे आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. स्वामींचे कोटीचे बैल कोंकणांत गेले होते, त्यांजपासून जकातीचे कमाविसदारानें जकात घेतली आहे ती कमाविसदारास ताकीद करून रुपये पाठवून देणें ह्मणून आज्ञा लिहिली होती. त्याजवरून स्वामीकडील मोरया कोठवळा याजबराबर आपलें माणूस देऊन जकातीचे कमाविसदाराकडे पाठविलें. त्यास, पेणेच्या बंदरीहून दस्तकाखेरीज किराण्याचे बैल जाजती आले होते ते, व दस्तकापूर्वी किराण्याचे बैल खोपवलीच्या मार्गें नेले त्याजपासून खोपवलीचे कमाविसदारांनीं आंगठी सोन्याची रामनामाची घेतली होती ती, येणेंप्रमाणें चौकसीकरितां ठिकाणीं लागले ते, खंडोजी साळवी महाराजांकडोन आला त्याजबराबर रुपये नक्त १२ बारा व आंगठी १ एक पाठविली आहे. परंतु दस्तकाखेरीज जाजती बैल गेले त्याचा हांशील वाजवी घ्यावा ऐसें आहे. त्यामध्यें स्वामींची आज्ञा होईल त्याप्रमाणें वर्तणूक करूं हे विज्ञापना.

[लेखांक १५२] श्री.

श्रीमत् परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

चरणरज चिमणाजी बल्लाळ कृतानेक विज्ञापना येथील वर्तमान छ० १५ जिल्काद पावेतों स्वामींच्या आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें पावलें. जिवाजी देवरुख्याचें वर्तमान लेहून पाठविलें तें सविस्तर कळलें. त्याचीं माणसें मौजे माळशिरसास आहेत तीं कैद करून पुरंधरास नेऊन ठेवणें ह्मणून आज्ञा केली; त्यावरून कोंडाजी यादव याजबराबर पांच माणसें देऊन पाठविला आहे. हा त्या बायका असतील त्या घेऊन किल्ले पुरंधरास

नेऊन अटकेंत ठेवील. येविर्सीं किल्लेमजकुरचे हवालदारास ताकीद करून पत्र पाठविलें आहे. व येविसीं डवल्या व रंभाजी निंबाळकर याचा लेक जानोजी निंबाळकर व सुलतानजी निंबाळकर यांस पत्रें लेहून पाठवणें ह्मणून आज्ञा, ऐसीयास आपले आज्ञेप्रमाणें त्यांस पत्रें लेहून पाठवितों. हे विज्ञापना.

## बाळाजी बाजीराव.

[लेखांक १५३] श्री.

श्रीमन्महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसी:—

चरणरज बाळाजी बाजीराव साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल ज्येष्ठ शुद्ध त्रयोदशी सौम्यवासर पावेतों कृपाकटाक्षें यथास्थित असे विशेष. स्वामींनीं कृपाकरून आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट काळीं मस्तकीं वंदिलें. "रायाचें वर्तमान ऐकोन श्रम विशेष जाहले. तुह्मींही विवेकेंकरून मन आवरणें व श्री भार्गव आमचे मस्तकीं आहे. पहिल्यापेक्षां विशेष कल्याण होईल" ह्मणून आज्ञा, तरी जहाले गोष्टीस उपाय नाहीं. खेद करून काय होणें? वरकड स्वामींचा आशीर्वाद मस्तकीं आहे तेणेंकरूनच आजिपावेतों उत्कर्ष होणें तो जाहला. तदनुरूपच स्वामींच्या आशीर्वादप्रतापेंकरून होणें तें होईल. प्रसाद चांदणी शेला पाठविला तो पावला. सर्व भरवसा स्वामींचे पायाचा आहे. विस्तार काय लिहिणें? सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक १५४] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसी:—

चरणरज बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक विज्ञापना येथील

---

१ ज्येष्ठ शुद्ध त्रयोदशी:—ता० २८ मे इ० स० १७४० बुधवार.

कुशल ता० [1]मार्गशीर्ष शुद्ध सप्तमीपर्यंत यथास्थित असे विनंति. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें पावोन बहुत समाधान जाहलें. "चिरंजीव रा० आपाचे शरीरीं व्यथा जाहली होती यास्तव चित्त स्वस्थ नव्हतें. तन्निमित्य श्रीची प्रार्थना केली. आपास आरोग्य होईल. चिंता न करणें." ह्मणोन लिहिलें तें कळलें. ऐशास स्वामींनीं कृपा करून तीर्थरूपांस आरोग्य होईल ह्मणून लिहिलें तेव्हां ईश्वरी कृपा जाहली. स्वामी ईश्वरस्वरूप आहेत ऐसें समजोन संतोषरूप असों. प्रसाद पाठविला तो पावला. वडिलांनीं आंगरेयाविसीं लिहिलें तर स्वामींचे आज्ञेपेक्षां आह्मांस अधिक काय आहे? तुळाजीस पुण्यासच आणविलें असे. बेडीही तोडविली आहे. स्वामींनीं कृपाकरून तीर्थरूपास आरोग्यता सत्वर होय तें केलें पाहिजे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक १५५] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

चरणरज बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक नमस्कार विज्ञापना येथील कुशल तागाईत [2]अधिक बहुल चतुर्थीपर्यंत स्वामींचे आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. स्वामींनीं सोमाजीबराबर आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन संतोष जाहला. "आमचा कंटाळा आला असेल तर आमचीं कामें राहतील. नसेल तर वार्षिक रुपये ६००० सहा हजार व जिन्नस पक्के सुगंध ८८५ व जायफळ ८८१ व लवंग ८८१ साखर बुरा ८३ पाठवणें" ह्मणोन आज्ञा ऐशास स्वा-

---

१ मार्गशीर्ष शुद्ध सप्तमीः—ता० १५ नोव्हेंबर इ० स० १७४० शनिवार. चिमाजी आपा साबान ह्मणजे कार्तिकाच्या महिन्यांत आजारी पडले व त्याच दुखण्यांत त्यांचा पौष महिन्यांत (शुद्ध १० रोज बुधवारीं) अंत झाला. त्याच दुखण्यांतील हें पत्र असावें हें उघड आहे.

२ अधिक (श्रावण) बहुल चतुर्थीः—ता० २० जुलई इ० स० १७४१ सोमवार.

मींस ईश्वरातुल्य आह्मीं मानितों. स्वामींचा कंटाळा आह्मांस यावा ऐसी निष्ठाच आमची स्वामींच्या पायांसीं नाहीं. बोलल्याप्रमाणें वर्तावें युक्तच आहे. त्याजवरून रुपये ६००० वार्षिकाचे; १०० सुगंध ८८५ व जायफळ ८८१ व लवंग ८८१ साखर बुरा ८३ एकूण शंभर रुपये पेशजीस स्वामींनीं करार केले ते; एकूण सहा हजार एकशें रुपये राजश्री दादोबापासून स्वामींस देविले आहेत. सालाबाद पावतात त्याप्रमाणें स्वामींचे सेवेसी पावतील. आठ पांचा दर रुपये १५ प्रमाणें व मोहरा ८ पाठवणें ह्मणोन आज्ञा, याजवरून सोमाजीबराबर रुपये १२० पाचा आठ दर १५ प्रमाणें, ११२ मोहरा ८ दर १४ प्रमाणें येणेंप्रमाणें दोनशें बत्तीस पाठविले आहेत. सेवेसी प्रविष्ट जाहलियाचें उत्तर पाठविलें पाहिजे. राजश्री जगजीवन धोंडदेव याची बेगमी करून घरास पाठवावे ह्मणून आज्ञा, त्यास तीर्थरूप कैलासवासी आपांनीं जगजीवन धोंडदेव याची नेमणूक केली असेल त्याप्रमाणें त्याची बेगमी करूं. स्वामींस अगत्य तेंच आह्मांस अगत्य आहे. दत्ताजी कनोजे यांचे पुत्र सयाजी कनोजे यांजविषयीं स्वामींनीं आज्ञा केली त्यास स्वामींनीं त्यांस आह्मांकडे पाठवून द्यावें. त्यांजपासून सेवा चाकरी घेऊन सर्वप्रकारें चालविलें जाईल. घोडियाविसीं लिहिलें त्यास पुण्याहून घोडे आणविले आहेत. आलियावर सेवेसी पाठवून देऊं. प्रसाद अंबर वस्त्र, मध घागर १ व गाडगें १ पाठविलें तें पावलें. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विज्ञापना.

[ पै ॥ छ० १७ जमादिलावल गु ॥ सोमाजी घाणेकर व खंडोजी साळवी सन इसन्ने. रुपये २३२ ]

[लेखांक १५६] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंस भार्गवरामबावा स्वामींचे सेवेसीः—

चरणरज बाळाजी बाजीराऊ प्रधान कृतानेक विज्ञापना येथील

वर्तमान तागाईत छे० २५ रबिलाखर पावेतों स्वामींचे आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. स्वामींचे वार्षिक पूर्वी तीर्थरूपांनीं रुपये ६१०० सहा हजार एकशें रुपये करार केले आहेत त्याप्रमाणें आह्मीं कबूल केले आहेत. यास तपशील:–६००० रुपये ऐन नक्त; १०० जिन्नस सुगंधराज वजन पक्कें ८५ व जायफळ वजन पक्कें ८१ व लवंग वजन पक्कें ८३ व साखर बुरा वजन पक्कें ३ एकूण किंमत करार. येणेंप्रमाणें सहाहजार एकशें रुपये श्रावण अखेर प्रतिवर्षीं देत जाऊं. सुरू सन खंमस आर्बैन मया व अलफ खेरीज. जगन्नाथ चिमणाजी याची असामी प्रांत पुणें येथें आहे त्यास वेतन रुपये ३०० तीनशें प्रांत मजकुरपैकीं पावत आहेत त्याप्रमाणें साल दरसाल पाववीत जाऊं. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[पै० छ २९ रबिलाखर सन खंमस आर्बाआर्बैन.]

[लेखांक १५७] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसी:—

चरणरज बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक विज्ञापना येथील कुशल स्वामींचे आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें पावलें. गुदस्ता मेरुलिंगास दोन ब्राह्मण अभिषेकास लाविले होते त्याप्रमाणें यंदा लावावे लागतात, त्यास पोटगी देखील दक्षिणा तेवीस रुपये द्यावे लागतात ह्मणोन लिहिलें तें कळलें. ऐशास गुदस्ता मेरुलिंगास अभिषेकास ब्राह्मण लाविले त्याप्रमाणें साल दरसाल लावावयाचा आह्मीं करार केला नाहीं, परंतु हल्लीं स्वामींनीं लिहिलें त्याजवरून सोमाजीहस्तें रुपये २३ तेवीस पाठविले आहेत. घेऊन मेरुलिंगास अभिषेक श्रावणमासीं करवावा. पुढें

---

१ छ० २५ रबिलाखर:—ता० २७ मे इ० स० १७४४, रविवार.

२ छ० २९ रबिलाखर:—ता० ३१ मे इ० स० १७४४, गुरुवार.

मेरुलिंगाचे ब्राह्मणांस आह्मीं दक्षिणा देणार नाहीं. तूप बारा मण व नव मण दारू व चार तोळे केशर कबूल केलें आहे तें देवणें ह्मणोन, तर केशर चार तोळे पाठविलें आहे. तूप व दारूच्या चिठ्या पुण्यास देत होतों, त्यास सोमाजी बोलिला कीं, तुह्मीं पुण्यास जाल तेव्हांच आह्मीं पुण्यास येऊन घेऊं. पशमी थानांविशीं आज्ञा, त्यास पुण्याहून थानें आलीं नाहींत. येतांच सेवेसी पाठवून देऊं. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[ लेखांक १५८ ] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

चरणरज बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक विज्ञापना ता० छ० १२ जिल्कादपर्यंत स्वामींचे कृपेंकरून येथील वर्तमान यथास्थित असे विशेष. आशीर्वादपत्र पाठविलें तें पावलें. रा० राणोजी शिंदे यांजकडील रुपयांचा मजकूर लिहिला तो कळला. ऐसेयास सदरहू रुपये आणावयास मशारनिल्हेकडे मुजरद जासूद पाठविला आहे. तो रुपये घेऊन लवकरच येईल. पाठवून देऊं. थोडक्या दिवसांसाठीं जलदी करावी ऐसें नाहीं. उदेपूरचे मजमूचे वेतनाचा मजकूर लिहिला तो कळला. त्याजवरून अडीचशें रुपये करार करून सनद पाठविली असे. विदित जाहलें पाहिजे. सर्वदा कृपापत्रीं आनंदवीत जावें. पहिले दोनशें होते ते आज्ञेप्रमाणें अडीचशें केले. राणोजी शिंद्याकडील रुपये सत्वरच येतील. विलंब लागणार नाहीं. हे विज्ञापना.

[ लेखांक १५९] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

चरणरज बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक विज्ञापना येथील कुशल ता० भाद्रपद शुद्ध चतुर्थीपर्यंत स्वामींचे आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें पावलें.

कचेश्वर गोविंद यांस किल्ले नारायणगड येथील कारखानिसी कडील फडणिसी आहे. सर्वांस अडसेरी पावते त्याप्रमाणें यांस अडसेरी करून सनद करून द्यावी; व लक्ष्मण कचेश्वर पाथरवटाचें लिहिणें लिहितो, त्यास ते ऐकत नाहीं, त्याची तैनात करून सनद पाठवावी ह्मणोन आज्ञा, ऐशास यंदा असामीची अथवा आणखी कांहीं आज्ञा करावी ऐसें नाहीं. पुढें आह्मीं स्वामींचें आज्ञेखेरीज नाहीं. स्वामींनीं कृपाच केली पाहिजे. सर्व स्वामींचे आहे. फार काय लिहावें हे विज्ञापना.

[लेखांक १६०] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

चरणरज बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक विज्ञापना येथील कुशल ता० भाद्रपद शुद्ध चतुर्दशीपर्यंत स्वामींचे आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें पावलें. "तुह्मीं श्रीचे दर्शनास जाणें. जें मागावयाचें तें मागणें. श्री तुह्मांस देईल. संदेह नाहीं." ह्मणोन आज्ञा केली ते शिरसा [मान्य] आहे. स्वामींचे आज्ञेप्रमाणें श्रीस जाऊन दर्शन घेऊन विनंति कर्तव्य ते करूं आणि आज्ञा घेऊन जाऊं. आह्मांस स्वामींचे पायाखेरीज काय आहे? सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक १६१] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

चरणरज बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक विज्ञापना येथील कुशल ता० आश्विन शुद्ध चतुर्थी पर्यंत स्वामींचे आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन संतोष जाहला. "तुमचा व रा० ज्ञानोजी निंबाळकर यांचा स्नेह आहे, तर त्यांजकडे दोघे भले माणूस पाठवून रोपले गांव

ता० हवेली परांडें येथील सनदा त्याजकडील आणून पाठवणें ह्मणजे तुह्मीं ह्मातारपणीं पालखींत बैसविल्याचें श्रेय तुमच्या पदरीं पडेल" ह्मणोन कित्येक लिहिलें तें कळलें. एशास स्वामींची आज्ञा ते प्रमाण, आमचा व जानोजी निंबाळकर यांचा स्नेह आहे खराच, परंतु आह्मीं मशारनिल्हेस लेहून पाठविलें आहे. स्वामींचे कार्यास आह्मांपासून अंतर होईल ऐसें नाहीं. त्याजकडून कार्य होऊन आल्यास उत्तमच आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

## सदाशिव चिमणाजी.

[लेखांक १६२] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

चरणरज सदाशिव चिमणाजी कृतानेक विज्ञापना. येथील कुशल ता० माघ शुद्ध चतुर्दशी रविवारपर्यंत स्वामींच्या आशीर्वादेंकरून यथास्थित असों विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन संतोष जाहला. स्वामींनीं कृपा करून ममतायुक्त आज्ञा केली ते शिरसा आहे. आह्मी लेंकरूं स्वामींचें असें व जें आहे तें स्वामींच्या आशीर्वादाचें आहे. समाधीचें वस्त्र शाल पाठविली ते पावली. आज्ञेप्रमाणें स्नानसंध्यासमयीं पांघरत जाऊं. रा० शंकराजी केशव व खंडोजी माणकर व बरवाजी ताकपीर यांस ताकीदपत्रें देवावीं ह्मणोन लिहिलें, त्याजवरूनआज्ञेप्रमाणें त्रिवर्गास ताकीदी पाठवितों. वरकड रा० पिलाजी जाधवराव यांज XXXX( फाटलें आहे ) घ्यावयाविसीं आज्ञा केली, तर, ते स्वारीस गेले आहेत. आलीयावर घडेल. स्वामींच्या मुखांतून निघालें तें अन्यथा कैसें होईल? सोनजी पाटील यांचे चालवावयाविसीं आज्ञा, तर, लक्षप्रकारें चालवूं. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

१ माघ शुद्ध चतुर्दशी रविवारः—ता० ७ फेब्रुवारी इ० स० १७४२.

[लेखांक १६३] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंस स्वामींचे सेवेसी:—

चरणरज सदाशिव चिमणाजी कृतानेक विज्ञापना येथील कुशल चैत्र[१] शुद्ध षष्ठी भोमवारपर्यंत स्वामींचे कृपेंकरून यथास्थित असे विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट जाहलें. घाटा व पेट्या आणविल्या आहेत त्या आल्या ह्मणजे पाठवून देतों ह्मणोन केसो बराबरी सांगून पाठविलें असतां अद्यापि आल्यानाहींत. यावरून तुह्मीं बोलतां व लिहितां तें अवघें लटिकें ह्मणून स्वामींनीं आज्ञा केली. ऐशास स्वामींजवळ आह्मीं लटिकें बोलावेंसें काय आहे ? स्वामींच्या पायाविना आह्मांस दुसरें दैवत नाहीं. घांटा व पेट्यांविशीं रा० शंकराजी केशव यांस पूर्वीं लेहून पाठविलें आहे व प्रस्तुतही लिहिलें आहे. घांटा व पेट्या येतील तेक्षणीं सेवेसी पाठवून देतों. स्वामींच्या पायांपासीं अंतर होणार नाहीं माळशिरसास वांसे देवविले आहेत ते अद्यापि पावले नाहीं. ह्मणोन आज्ञा, तरी रा० जिवाजी गणेस यांस सांगितलें आहे. अविलंबेंच वांसे प्रविष्ट करितील. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक १६४] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसी:—

चरणरज सदाशिव चिमणाजी कृतानेक विज्ञापना. येथील कुशल ता० चैत्र[२] बहुल तृतीया भानुवासरेपर्यंत स्वामींच्या आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन संतोष जाहला. देवास घांटा दोन व पेट्या दोन व पालखी तुमच्या तीर्थरूपांनीं देऊं केली ते हा काळपावेतों दिल्हें नाहीं ह्मणून मागें वर्तलीयाची साक्ष व प्रस्तुत अंतर पडल्यास कोप होईल ह्मणून

१ चैत्र शुद्ध षष्ठी भोमवार:—ता० ३० मार्च इ० स० १७४२.

२ चैत्र बहुल तृतीया:—ता० १२ एप्रिल इ० स० १७४२.

कित्येक विषादेंकरून आज्ञा केली तें सविस्तर कळलें. ऐशास स्वामींनीं आज्ञा केली तें यथार्थ आहे. स्वामी ईश्वरस्वरूप आहेत. वडिलीं स्वामींचे पाय अर्चून अभीष्ट करून घेतलें तदन्वयेंच स्वामीचरणारविंदीं निष्ठापूर्वक वर्तावें यांतून दुसरें आह्मांस विशेष नाहीं. व जें आहे तें स्वामींचे आशीर्वादाचें असे. स्वामींनीं अभय हस्त आमच्या मस्तकीं ठेविला. मीं लेकरूं स्वामींचें असतां मजवर कोप कैसा होईल व मजपासून स्वामींचे सेवेसी अंतर कैसें पडेल? स्वामींचे चरणाव्यतिरिक्त दुसरें दैवत जाणत नाहीं. घांटा व पेट्या व पालखीविशीं आज्ञा केली त्यास, पहिलें स्वामींचें पत्र याविशीं आलें तेच समयीं वसईस व साष्टीस लिहिलें आहे. घांटा व पेट्या येतील. अत:पर विलंब नाहीं. सेवेसी पाठवून देतों. वरकड वस्त्रें पाठवाययास विलंब लागला ह्मणोन कित्येक आज्ञा केली, तर मजपासून अंतर पडलें; क्षमा करावी. दोनशें वांसे भुलेश्वरास पाठवावयाविशीं व दारूविशीं रा० दादोबास आज्ञा केली, त्यास पहिली स्वामींनीं शंभर वांसेयाची आज्ञा केली त्याप्रमाणें भुलेश्वरास पाठविले. आणखी शंभर वांसे पाठवावयास लिहिलें तर आह्मांस स्वामींचे आज्ञेपेक्षां विशेष काय? शंभर वांसे पाठवितों व दारू वसईहून आणून पाठवितों. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक १६४] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसी:—

चरणरज सदाशिव चिमणाजी कृतानेक विज्ञापना, येथील कुशल ता० वैशाख शुद्ध त्रयोदशीपर्यंत स्वामींचे आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन संतोष जाहला. प्रसादाचीं वस्त्रें सोमाजीहस्तें पाठविलीं:—१ तिवट, १ शेला पैठणी, १ साडी, १ चोळखण, एकूण चार पाठविलीं तीं पावलीं. स्वामींचे आशीर्वादेंकरून लग्नसिद्धि जाहली. मौजे साकुर्डी येथील कुरणांतील पक

पिंपळदरा आमच्या घोडीं व गुरांस चरावयास दिल्हा, दोन वर्षें कुरण राखून चारिलें, हल्लीं तेथें गुरें घोडीं ठेवणार तरी नारोपंतास ताकीदपत्र देणें ह्मणोन. त्यावरून ताकीदपत्र दिल्हें आहे. पहिल्यापासून आपलेकडे कुरण चालिलें असेल त्याप्रमाणें चालेल. यमाजी ह्मसकर पाटील मौजे दाळिंबें याच्याविशीं आज्ञा केली तरी त्यास येथें पाठवावें. त्याचें वर्तमान मनास आणून आज्ञेप्रमाणें कौल देऊं. अनंतभट वगैरे ब्राह्मण यांस दक्षणा आठ जणांस द्यावयाविशीं आज्ञा केली त्याजवरून त्यांस दक्षणा देऊन रवाना केलें. परशरामीं ब्राह्मण एकटा (ढोंग) करून पैका मेळवून कर्ज आपलें वारितो, त्यानें लिहिलें न मानावें ह्मणोन, तरी स्वामी ईश्वरी अंश आहेत. सर्व स्वामींस विदित आहे. त्यांनीं (ढोंग) करणें काय! असो. आह्मांस स्वामींची आज्ञा प्रमाण आहे. वांसे शंभर व तुळया दहा द्यावयाविसीं आज्ञा केली, त्यास आमचा कारखाना साताऱ्यास नाहीं. असता तरी लक्षप्रकारें देववितों. येथून शिवार द्यावा तर जातो कसा? येरव्हीं स्वामींचे आज्ञेपेक्षां विशेष काय आहे! सुरवारी हिरड्याविसीं लिहिलें, तर यत्न करून मागाहून पाठवून देतों. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक १६५] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

चरणरज सदाशिव चिमणाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल ता० फाल्गुन शुद्ध चतुर्दशीपर्यंत स्वामींचे आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन संतोष जाहला. जगन्नाथ चिमणाजी याचेविसीं स्वामींनीं लिहिलें, तर, त्यास सातारीयाचे मुकामीं शंभर रुपये जाजती करून दिल्हे आहेत याचें स्मरण नव्हतें. स्वामींनीं सनदेची नक्कल पाठविली ते पाहिली. शंभर रुपये जाजती करून दिले प्रमाणच आहे.

त्याप्रमाणें तीनशें त्यास पावतील. आह्मी रा० बापुजीपंत यांस लिहून पाठवितों. तीर्थरूप राव व आपा यांचे निष्ठेचा अर्थ लिहिला तर त्यांची निष्ठा स्वामींचे चरणारविंदीं तैसीच होती. तदनुरूप त्यास फलादेश जाहला. तदन्वयेंच आमची निष्ठा स्वामींचरणारविंदीं आहे. देव धर्म सर्व स्वामींचें चरण जाणतों. आमची निष्ठा स्वामींचे चरणारविंदीं त्रिकर्णपुरस्सर आहे व स्वामींचीही कृपा आमच्या ठायीं निरवधि आहे. तेणेंकरूनच आमचें कल्याण असे. पाचा आठ, त्याच्या मोहरा १३ व मुगुटास मोहरा ७ एकूण वीस मोहरा पाठवून देणें ह्मणजे आपाचें वचन उतराई जाहलेंच. नानाचे फत्तेनिमित्य तीन महारुद्र करावयाचा संकल्प केला आहे. त्यांपैकीं दोन महारुद्रांचें साहित्य आह्मी करितों. एका महारुद्राचें साहित्य तुह्मीं करून पाठविणें ह्मणून कित्येक आज्ञा केली. ऐसीयास स्वामींचें आज्ञेप्रमाणें मोहरा व एक महारुद्राचें साहित्य आह्मीं करून द्यावें. येणेंकरून आह्मांसच श्रेयस्कर आहे. परंतु आह्मी लेंकरूं, अद्याप तीर्थरूप नानांची मर्जी आमच्या हातीं नाहीं. याकरितां तीर्थरूप रा० नाना येत तों स्वामींनीं कृपा करावी. तीर्थरूप आलीयावर स्वामी आज्ञा करितील तदनुरूप ते आज्ञेप्रमाणें वर्तणूक करितील. तीर्थरूप राव व आपा होते [त्या वेळीं] आपा थोर होऊन जें रायांनीं कर्तव्य संपादावें तैसें आपा संपादूं लागले. तें रायासही मान्य होत गेलें. तैसेंच आह्मांपासून घडून येणें तें स्वामींचेच कृपाकटाक्षेंकरून घडेल. आणि मजपासूनही स्वामींचे चरणाजवळ अंतर पडेल ऐसें नाहीं. स्वामींनीं सर्व प्रकारें मजवर कृपा करावी. मखमलअल्ली तुह्मांस पादाक्रांत व्हावा, तुमची फत्ते व्हावी, [या] निमित्यें दुपेटा सफेद पाठविला आहे घेणें ह्मणोन, तर दुपेटा शिरसा वंदिला. स्वामींनीं मखमलअल्लीविर्सीं आशीर्वाद दिल्हा तो प्रमाणच. स्वामींचें वाक्य अन्यथा कैसें होईल ? सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

# मराठे सरदार, मुत्सद्दी, वगैरे.*

## १ नागपूरकर भोंसले.

[ लेखांक १६६ ] श्री.

श्रीमत् परमहंस भार्गवबावा स्वामींचे सेवेसी:—

सेवक रघोजी[1] भोंसले सेनासाहेबसुभा साष्टांग दंडवत विनंति येथील कुशल जाणून स्वकीय कुशलार्थलेखनआज्ञा करीत असलें पाहिजे. विशेष. स्वामींनीं कृपा करून आशीर्वादपत्र पाठविलें, तेणेंकरून चित्तास परम संतोष जाहला. पत्रीं आज्ञा जे राजश्री भास्कर[2] राम यांज-

* महाराष्ट्रांतील सर्व मराठे सरदार, मुत्सद्दी, सुभेदार, वगैरे सर्व लोकांशीं ब्रम्हेंद्रस्वामींचा पत्रव्यवहार असून त्यांच्यावर त्यांची पराकाष्ठेची भक्ति होती. हा सर्व पत्रव्यवहार उपलब्ध झाला तर स्वामींनीं सर्व महाराष्ट्रमंडळाचें एकीकरण कसें केलें होतें तें उत्तमप्रकारें व्यक्त होईल. आह्मांस सर्व सरदारांचीं त्रोटक त्रोटक पत्रें पुष्कळ मिळालीं आहेत त्यांपैकीं विशेष महत्त्वाचीं तेवढींच पत्रें मासल्याकरितां येथें दिलीं आहेत. तीं संगतवार नाहींत, तथापि त्यांवरून सर्व महाराष्ट्रमंडळ स्वामींच्या चरणीं कसें लीन झालें होतें हें समजण्यास हरकत नाहीं.

१ रघोजी भोंसले:—नागपूरचे सेनासाहेब सुभे—पहिले रघोजी ऊर्फ बाबासाहेब. कारकीर्द इ० स० १७३४—इ० स० १७६१.

२ भास्करराम:—रघोजी भोंसल्यांचे पराक्रमपटु सेनापति. ह्यांचे उपनांव कोल्हटकर. ह्यांनींच गोंडवण, बंगाल व ओरिसा या प्रांतांवर स्वाऱ्या केल्या, व भोंसल्याचा अंमल दूरवर बसविला. ह्यांनीं बंगाल प्रांतावर स्वारी करून बंगालचा नबाब अलीवर्दीखान ह्यास जेरीस आणिले, ह्मणून त्यानें मकसुदाबाद ऊर्फ मुर्शिदाबाद येथें भास्कररामांशीं तहाचें बोलणें लावून दगेबाजीनें त्यांचा वध केला. ही गोष्ट इ० स० १७३७ ह्या वर्षीं घडली. ह्या अपराधाबद्दल भोंसल्यांनीं बंगालच्या नबाबाची खोड मोडून भास्कररामाच्या वधाबद्दल 'मुंडकटाई' ह्मणून त्याच्याकडून १४ लक्ष रुपये खंडणी घेतली. भास्कररामाचें चरित्र फार वीररसप्रचुर आहे.

याबत रुपये तीन हजार, आह्मी तिकडे गेलों असतां तरी सदरहू रुपये घेऊन जाजतीही घेतले असते ह्मणोन आज्ञा लिहिली, येविसीं पंतमशारनिल्हेस दोनचार वेळ लिहिलें आहे. ते रुपये पाठवून देतील. न देतील तर त्यासच द्विगुण द्यावी लागेल. वरकड मजकूर पाचांविसीं लिहिलें तरी तलाश करून पाठवून देऊं. शिंदे यांचे रुपयांविसीं लिहिलें तरी त्यांस ताकीद करून देवितों. स्वामींच्या कार्यास आपणाजवळून अंतर होणार नाहीं. विशेष लिहावें तर आपण स्वामींचा सेवक असें. आपणाविरहित गोष्ट दुसरी आहे ऐसें नाहीं. श्रुत जाहलें पाहिजे हे विनंति.

[लेखांक १६७] श्री.

श्रीमंत परमहंस भार्गवरामबावा स्वामींचे सेवेसीः—

सेवक रघोजी भोंसले सेनासाहेबसुभा साष्टांग दंडवत विनंति येथील कुशल जाणोन स्वानंद लेखन आज्ञा केली पाहिजे विशेष. आपण राजश्री रामाजी गणेश यांसमागमें पत्र पाठविलें तेथें लिहिलें, पाचा आठ, दर तेराप्रमाणें, पाठवणें. त्याजवरून पाचांचा तलास करविला आहे. आल्यानंतर सेवेसी पोहोंचतील. यानंतर पवारांचे बोलीविसीं लिहिलें, त्यास मशारनिल्हेचे मारफतीनें बोली केली आहे. हे सेवेसी निवेदन करितील, त्याजवरून विदित होईल. तीन हजार रुपयांविषयीं राजश्री भास्कर राम यांस लिहिलें आहे. नारायणतेल आपण पाठविलें तें पावलें. सेवेसी विदित जाहलें पाहिजे. विशेष काय लिहिणें, कृपावृद्धि केली पाहिजे, हे विनंति.

[लेखांक १६८] श्री.

श्रीमत् परमहंस स्वामीः—

सेवेसी रघोजी भोंसले सेनासाहेबसुभा कृतानेक दंडवत विनंति येथील कुशल स्वामींचे कृपेंकडून आजिपर्यंत यथास्थित असे. स्वा-

मींनीं आशीर्वादपत्र पाठविलें पावलें. आज्ञा केली कीं, अद्याप दर्शनास येत नाहीं. ऐसीयास आपले पायांसीं आह्मांपासून अंतर न पडावें हें उचित, परंतु किंचित् दिवसांचे अवकाशें विजयादशमी जाहलियास खामखा सेवेसी येतों. अंतर किमपि होणार नाहीं. अवघाच विचार स्वामींचे पायांपासीं निवेदन होईल. आह्मी स्वामींचे आशीर्वादाचे स्थापित आहों. अंतराय स्वामींशीं कदापि करणार नाहीं. प्रस्तुत अंतर जाहलें हा अर्थ स्वामी जाणतच आहेत. आह्मीं सेवेसी लिहावेंसें काय आहे? सेवेसी कळावें याजकरितां लेखन केलें आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक १६९] श्री.

श्रीमत् परमहंस भार्गवराम स्वामींचे सेवेसीः—

सेवक रघोजी भोंसले सेनासाहेबसुभा कृतानेक विज्ञापना येथील कुशल जाणून स्वकीय लेखनाज्ञा केली पाहिजे विशेष. कृपा करून खंडोजीबरोबरी पत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन लेखनार्थ अवगत होऊन संतोष जाहला. वरातेच्या ताकिदीविषयीं लिहिलें त्याजवरून बाळापूरचे कमाविसदारांस ताकीदपत्रें व जासूद जोडी पाठविली आहे. तुह्मीं आपलीं मनुष्यें देऊन ऐवज आणविला पाहिजे. जबानीं खंडोजी सांगतां कळों येईल. रवाना छ० ११ माहे सफर, बहुत काय लिहिणें, लोभ असूं देणें हे विनंति.

## २ होळकर.

[लेखांक १७०] श्री.

श्रीमत् परमहंस स्वामींचे सेवेसीः—

चरणरज मल्हारजी[1] होळकर कृतानेक साष्टांग दंडवत विज्ञप्ति येथील कुशल ता० भाद्रपद वद्य ५[2] इंदुवारपर्यंत स्वामींचे कृपेंकरून

---

१ मल्हारजी होळकरः–सुभेदार थोरले मल्हारराव होळकर–कारकीर्द इ० स० १७३१–१७६५.

२ भाद्रपद वद्य ५ इंदुवारः–ता० १७ सप्तंबर इ० स० १७३३.

सुखरूप असों विशेष. रा० केसोपंताहस्तें आशीर्वादपत्र व प्रसाद पाठविला तो पावून बहुत संतोष जाला. पत्रीं आज्ञा लिहिली कीं, तीन सहस्र रुपये पाठवणें ह्मणून आज्ञा केली, त्यास यंदाचा प्रसंग वोढीचा जाला. याजकरितां प्रस्तुत रा० केसो गोविंद यांजबराबर रुपये २००० दोन हजार पाठविले आहेत. ते घ्यावे. वस्त्रांविशीं आज्ञा लिहिली त्यास आपणायोग्य वस्त्रें जामदारखान्यांत नव्हतीं. याजकरितां त्यांतच शोधून वस्त्रें दोन ताडपत्री शेवती पैकीं १ व महमुदी १ पाठविली आहे, ते मान्य करावी. याउपरी यंदा कर्जाविशीं फारसी वोढ जाली. परिहार करणार स्वामी समर्थ आहेत; याजकरितां आपणास चिंता वाटत नाहीं. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक १७१] श्री.

श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य श्री स्वामींचे सेवेसीः—

चरणरज मल्हारजी होळकर कृतानेक विज्ञापना येथील क्षेम ता० भाद्रपद[1] वद्य तृतीया भृगुवासर जाणून स्वामींचे आशीर्वादेंकरून वर्तमान यथास्थित असे विशेष. स्वामींनीं पत्र पाठविलें तें उत्तम समयीं पावोन परम समाधान जाहलें. ऐसेंच सदैव आशीर्वादपत्र पाठवून सांभाळ करीत असलें पाहिजे. यानंतर आह्मांकडील सविस्तर वर्तमान तर आज दोन वर्षें मुलुखगिरी जाहली; कोठून पैसा मिळकत नाहीं; कर्जवाम खात प्रसंग तो चालवावा लागला; दो वर्षांहीं ठिकाणीं आलों. रा० वासुदेव काशीविशीं आपण पत्रीं कितीयेक विचारें लेख केला, त्यास मशारनिल्हे तों गुदस्ता समजाविशी जाहलेनंतर येऊन पोंहचले. तदनंतर सर्व मजकूर कर्जवाम करीतच चालावें लागलें; या करितां अनुकूळ न जाहलें. तर, हल्लीं समजाविशीच्या प्रसंगीं ज्याप्रमाणें दरसाल मागें देत आलों त्याप्रमाणें प्रविष्ट करूं. वरकड कित्येक गोष्टी मशारनिल्हेनीं विदित केल्याच असतील. आमचा प्रसंग

१ भाद्रपद वद्य तृतीया भृगुवासरः–ता० २९ आगस्ट इ० स० १७४०.

वोढीचा जाला, त्याजमुळें स्वामींचे सेवेसी वर्ष दोन वर्षें अंतर पडलें, याकरितां विषादास न यावें. स्वामींनीं आशीर्वाद देऊन, आमचें कल्याण होऊन कर्जाचा परिहार होय तो अर्थ करावा. पूर्वींपासून स्वामींची कृपा आह्मांवर आहे त्यापेक्षां विशेष जालियानेंच आमचें कल्याण आहे; आणि सेवेसी अंतर होणार नाहीं. स्वामींचे सेवेसी कुडती एक व टोपी एक पाठविली आहे. प्रविष्ट होय. सेवेसी श्रत होय हे विज्ञापना.

[लेखांक १७२] श्री.

श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य स्वामींचे सेवेसी:—

आज्ञाधारक मल्हारजी होळकर कृतानेक दंडवत विज्ञापना येथील कुशल [1]आषाढ कृष्ण ७ सप्तमी भानुवासर स्वामींच्या प्रतापें यथास्थित असे विशेष. कृपा करून आशीर्वादपत्र पाठविलें, मस्तकीं वंदोन चित्तास परम संतोष जाला. यानंतर सेवेसी रामचंद्र महादेव यांसमागमें रुपये ७०० सातशें व सकलाद हिरवी एक ऐसें पाठविलें आहे. विदित असावें. कृपेची अभिवृद्धि अहिर्निशीं करून सेवकाचें विशेष ऊर्जित होय ऐसें केलें पाहिजे. सदैव पत्र पाठवून जे आज्ञा कर्तव्य ते करीत गेलें पाहिजे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक १७३] श्री.

तीर्थस्वरूप राजश्री बावा स्वामींचें सेवेसी:—

आज्ञाधारक मल्हारजी होळकर कृतानेक साष्टांग दंडवत विज्ञापना. येथील कुशल भाद्रपद कृष्ण १ प्रतिपदा स्वामींच्या प्रतापें यथास्थित असे. कृपावंत होऊन आशीर्वादपत्र पाठविलें (तें) प्रविष्ट होऊन मस्तकीं अभिवंदोन चित्त उल्हासयुक्त जालें. ऐसीयासी प्रसाद वेदमूर्ति रा० वासुदेवभट व निंबाजी हवालदार यांजसमागमें येणेंप्रमाणें विस्तारें;

---

१ आषाढ कृष्ण ७ भानुवासरः–ता० ३ जुलई इ० स० १७४३.

नारळें १० लावावयासी, ५ सुकीं नारळें, सुपारीचीं झाडें ४०, भोईचांफियाचीं ५, सुरंगाच्या बिया २०, येणेंप्रमाणें प्रविष्ट जालें. सेवेसी श्रुत असावें. विशेष. बैलांची आज्ञा केली, त्यास यत्न केला, परंतु अनुकूल न जालें. त्यास हैसी निंबाजीनें किल्ल्यामध्यें जाऊन आपले पारखीनें सुमारें २ दोन घेतल्या त्या सेवेसी पाठविल्या असेत. सदैव लोभ करून पत्रद्वारें आज्ञा करीत असलें पाहिजे. दया अभिवृद्धीतें पावीजे. कित्येक अर्थ स्वमुखें मशारनिल्हे सांगतां उपश्रुत होईल. व सकलादेची आज्ञा जाली, त्यास औरंगाबादेस मनुष्यें पाठविलीं आहेत; आल्यावरी पाठवून देऊं. कदाचित् उपयोगा न आलीं तरी पुढें सेवेसी पाठवून देऊं. बहुत काय लिहिणें. दया अभिवृद्धीतें पावीजे हे विज्ञापना.

[लेखांक १७४] श्री.

श्रीमत् परमहंस भार्गवबावा स्वामींचे सेवेसी:—

आज्ञाधारक मल्हारजी होळकर कृतानेक दंडवत विनंति. येथील कुशल आश्विन वद्य १४ प्रताप स्वामींचा जाणून स्वकीय लिहीत आज्ञा केली पाहिजे. विशेष. स्वामींनीं रा० गोविंद केशव नेने यांजबराबर प्रसाद फणसपोळी व आज्ञापत्र पाठविलें तें पावोन बहुत संतोष जाहला. तो पत्रीं कोठवर लिहावा? पत्रांत आज्ञा कीं श्रीचे रुपये ३०० तीनशें राहिले आहेत ते पाठवून देणें. त्याजवरून तीनशें रुपये मशारनिल्हेसमागमें पाठविले आहेत. सेवेसी पावलीयावर सेवकास आशीर्वादपत्र पाठविलें पाहिजे. आह्मीं याजउपरी श्रीच्या आशीर्वादाचें स्मरण करून माळवेप्रांतीं मजल दर मजल जाऊं. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक १७५] श्री.

श्रीमत् परमहंस स्वामींचे सेवेसी:—

चरणरज मल्हारजी होळकर कृतानेक दंडवत विज्ञापना येथील

कुशल जाणून स्वकीय लेखन आज्ञा करीत असिलें पाहिजे. विशेष. कृपा करून प्रसादवस्त्रें आहेर पाठविला, तो लिहिल्याप्रमाणें पावला. ऐवजाविशीं बहुत निकडीनें लिहिलें, त्यास पहिला ऐवज पावणें तो सेवेसी पावला, हल्लींही राहिला तो पाठवावा; त्यास मध्यें स्वामींचे आशीर्वादें लग्नकार्य उपस्थित जाहलें. हेंही आपले दयें-करून सिद्धीस गेलें. हें कार्य होतच आहे तों श्रीमंतांचें पत्र आलें कीं, मुलुकगिरीस सत्वर जाणें. त्यावरून सुमुहूर्तें बाहेर निघालों. पुढें मजल दरमजल जावें असा हेत आहे. त्यास सांप्रत ऐवजाचें निमित्य अनकूल न पडे. ऐवज आपणास सत्वर प्रविष्ट होईल. आपण दुसरा अर्थ चित्तांत आणावा ऐसें नाहीं. ऐवज सत्वरच पावता करूं. कळलें पाहिजे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक १७६] श्री.

श्री ईश्वरस्वरूपमूर्ति राजश्री भार्गवबावा स्वामींचे सेवेसीः—

सेवेसी सौभाग्यवती गौतमाबाई[१] होळकर चरणावर मस्तक ठेवून दंडवत. विनंति उपरी येथील आमचें वर्तमान, तर स्वामींचे कृपादृष्टीकरून पौष शुद्ध तृतीया पावेतों सुखरूप असों. यानंतर आपण स्वारीस पौष शुद्ध द्वितीयेस गेलों. यानंतर सेवेस पाटाव सुमार १, मोत्यें २१ एकवीस सेवेसी पाठविले आहेत, ते घेतले पाहिजे. बहुत काय लिहिणें? सदैव बालकावर कृपा करीत जाणें हे विज्ञप्ति.

## ३ शिंदे.

[लेखांक १७७] श्री.

हरिभक्तिपरायणश्री भार्गवराम बावा स्वामींचे सेवेसीः—

सेवक राणोजी शिंदे दंडवत विनंति येथील कुशल ता० छ १७

---

१ गौतमाबाईः—मल्हारराव होळकरांची पत्नी. ही फार स्वाभिमानी बायको होती.

जिल्हेज मुक्काम वरखेडें वडगांव गंगातीर स्वामींचे आशीर्वादें सुखरूप असों. यानंतर स्वामींनीं आज्ञापत्र पाठविलें तें मस्तकीं वंदोन सनाथ जाहलों. श्रीचा प्रसाद पाठविला तोही पावला. ह्मैसी व पशमीविसीं लिहिलें, त्यास, सध्यां तों अनुकूल नाहीं. मुलुखगिरीहून आली-यावरी अवश्यमेव पाठवून देऊं. सदैव आशीर्वादपत्र पाठवून सांभाळ करावयास स्वामी समर्थ आहेत. हे विनंति.

[ लेखांक १७८ ] श्री.

महाराज श्री स्वामींचे सेवेसी:—

चरणरज राणोजी शिंदे दंडवत विनंति विज्ञापना. सेवकाचें वर्तमान ता० कार्तिक शुद्ध ९ स्वामींचे आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. स्वामींकडून रा० केसोपंत आले, त्यांची रवानगी येणें-प्रमाणें केली. बितपशील:—खासगत ३००० नक्त रुपये तीन हजार, १ पासोडी, कारकूनबाबत २०० नक्त रुपये, १ पागोटें देणें केसोपंत, सदरहुप्रमाणें सेवेसी प्रविष्ट होईल. पुण्यांत असतां घोड्याची विनंति केली ते समयीं स्वामींनीं हेलणा केली. आह्मी तर आज्ञेप्रमाणें वर्ततों, आणि महाराजांनीं घोड्यासाटीं विनंति मान्य न करावी येणेंकरून सेवकास उदासीनता वाटते. तर, ऐसें न करितां कृपाळु होऊन घोडा दिल्हा पाहिजे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ति.

## ४ भोंसले अक्कलकोटकर.

[ लेखांक १७९ ] श्री.

सकल तीर्थस्वरूप श्रीमत् परमहंस स्वामी स्वामींचे सेवेसी:—

अपत्यें फत्तेसिंग[1] भोंसले दंडवत विज्ञापना येथील वर्तमान तागाईत आषाढ शुद्ध अष्टमी स्वामींच्या आशीर्वादेंकरून कुशल असे विशेष. कृपा करून आशीर्वादपत्र पाठविलें तें उत्तम समयीं प्रविष्ट होऊन

---

१ फत्तेसिंग भोंसले—कारकीर्द इ० स० १७१२–१७६०.

संतोषावाप्ति जाहली. जागा जागा कारखाने चालिले याजमुळें खर्चाची वोढ फार जाली, याजकरितां ऐवज पाठवावा ह्मणून आज्ञा झाली; ऐसीयासी आजिपर्यंत मुलुखगिरीस गेलों होतों, प्रस्तुत आपले दयें-करून स्वस्तिक्षेम सातारियासी पावलों. आपल्या चरणांचा सदैव निजध्यास आहे. स्वामींनीं ल्याहावें ऐसें नाहीं. याजउपरी थोडक्याच दिवसांत ऐवजही पाठविला जाईल. शालजोडीविसीं लिहिलें तरी चार गजी शालजोडी कांहीं संग्रहीं नाहीं. या गोष्टीचा तलाश करावा लागतो. असलियावरी सेवेसी पाठविली जाईल. स्वामींच्या आज्ञेव्य-तिरिक्त दुसरा विचार नाहीं. सदैव आशीर्वादपत्रीं संभाळ केला पाहिजे. शाकभाजी मिरच्या वगैरे पाठविल्याप्रमाणें जिन्नस पावला. वरकड सोमाजी विनंति करितां सेवेसी निवेदन होईल. बहुत काय लिहिणें हे विनंति.

[ लेखांक १८० ] श्री.

श्रीमंत राजश्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

अपत्यें फत्तेसिंग भोंसले कृतानेक दंडवत विज्ञापना स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट जालें. बापुभट मोघे तळेगांवकर यांकडील मजकूर लिहिला, ऐशास पूर्वी राजश्री निळप्रभु कारभार करीत होते. त्या वेळेस त्यांनीं बापुभटाकडून काय घेतलें दिल्हें असेल तें त्यांचे त्यांनीं वारिलेंच असेल. ते वेळेचा गुंता अद्यापि राहिला आहे ऐसें नाहीं. जळित कागदपत्र हिसेब त्यापासीं राहिला असला तरी तो आह्मांस कांहीं दखल नाहीं. आह्मीं जाबसाल कशाचा करावा? आपलें देणें घेणें त्याकडे असेल तरी त्यापासून निर्वाह करून घ्यावयाचें कोणतें अगाध आहे? आह्मांकडे त्याचा गुंता कांहीं नाहीं. येविसींचा अर्थ सविस्तर सोमाजीपाशीं सांगितला आहे. सेवेसी विनंति करितां श्रुत होईल. वाड्यांत प्रसादवस्त्रें सोमाजीबराबर पाठविलीं तीं पावलीं. बहुत काय लिहिणें. स्वामी वडील आहां. हे विनंति.

## जाधवराव.

[लेखांक १८१] श्री.

श्रीमत् महाराज साक्षात् भार्गवरामअवतार भक्तजन-
प्रतिपालक स्वामींचे सेवेसीः—

चरणरज आज्ञाधारक पिलाजी[1] जाधवराव कृतानेक विज्ञापना विनंति येथील कुशल स्वामींचे कृपावलोकनेंकरून ता॰ आषाढ शुद्ध ९[2] भोमवासर पावेतों स्वामींच्या चरणांच्या निजध्यासें आनंदरूप असो विशेष. कृपा करून आज्ञापत्र पाठविलें, तेथें लिहिलें कीं "मजला थोडेंसें ज्ञान आहे. तूं दोन जन्माचा गडी आहेस." तरी देवास ज्ञान थोडें आहे कीं फार आहे हें त्याचा तोच जाणे. आणि भक्त केवळ एका दोन जन्माचा सांगाती आहे असें नाहीं. जेथून देव तेथून भक्त असें चरित्र आहे. गतवर्षीं भुलोबाजवळ पाऊसाकरितां बैसलों, देवानें पाऊस दिल्हा; तरी स्वामींच्या चित्तांत पाऊस पडावा असें जालें तेव्हां भुलोबासही संकट पडलें. ते गोष्टीचें अपूर्व नाहीं. तुह्मीं आपला समाचार घेतला नाहीं; मग आपण राजश्री दमाजी गायकवाड यांजकडे गेलों. तेथील भक्तीचा सविस्तर अर्थ लिहिला. तरी देवास भक्त बहुत आहेत. त्यामध्यें आह्मींच कांहीं भक्त ऐसा अभिमान करावा तरी अर्जुनासारिख्यांचा भक्तीचा अभिमान शेवटास गेला नाहीं. देवानें त्यास भक्त त्याहून विशेष कित्येक दाखविले. परंतु अर्जुनासारखी देवाची कृपा आणिखे स्थळीं नव्हती. कर्ण दानशूरच होता परंतु भक्तीचें अभिधान नव्हतें. परंतु सर्व देणें देवाचें आहे. देवाची कृपा जेथें

---

१ पिलाजी जाधवरावः—हे वाघोलीचे जाधव. थोरल्या बाजीराव पेशव्यांच्या कारकीर्दींमध्यें ह्या वीरपुरुषानें मराठ्यांच्या बहुतेक प्रमुख मोहिमांमध्यें आपला पराक्रम चांगला व्यक्त केला. कारकीर्द इ॰ स॰ १७२५–१७४६.

२ आषाढ शुद्ध ९ भोमवासरः—ता॰ ३ जुलई इ॰ स॰ १७३९.

होईल तेथें अवघें भक्तिज्ञान आहे. महाराज, दृष्टांत तुह्मांस काय लिहावा? औरंगजेब, कान्होजी आंग्रे, ह्यापशी काय घेऊन गेले? संपदा कोणासमागमें गेली नाहीं ह्मणून लिहिलें, तरी संपदा कोणासमागमें गेली नाहीं. यास्तव स्वामींच्या चरणांचा निजध्यास करावा तोच कामास येईल. जोतीबाच्या लग्नास बोलाविलें नाहीं ह्मणून लिहिलें, तरी हें अंतर चिरंजीव संभाजी जाधव याजपासून पडिलें हें खरेंच; परंतु लेंकरापासून अंतर पडलें तरी माय आहे, तीस लेंकरांपासून अन्याय झाला येणें करोन असें कळोन क्षमा करून माया न्यून करिते ऐसें नाहीं. सर्व क्षमा करावयास स्वामी समर्थ आहेत. "आपण पैक्याकरितां तुमच्या गळां पडत नाहीं. भुलोबाचें देऊळ राहिलें तरी राहो परंतु तुह्मांस कष्टी करणार नाहीं," ह्मणून लिहिलें, तरी स्वामींनीं जें चित्तीं धरिलें तें शेवटास गेलेंच आहे. देऊळ राहतें असें नाहीं. आणि आह्मांपासीं जें आहे तें अवघें स्वामींचेंच आहे. कायावाचामनसा स्वामींचे आज्ञेविरहित नाहीं. स्वामींनीं कृपाळू होऊन मध व रोपें कुंदाचीं व बटमोगऱ्याचीं व फणसपोळी पाठविली ती पावली. "फणसाच्या रोपास माणूस पाठविला तो सोनजी पाटील ह्मसवेकर याजविषयीं राजश्री पंतप्रधान यास सांगितलें. त्यांनीं आपल्या पायावरी हात ठेविला आहे कीं, त्याची स्थापना गांवावरी करितों. तरी तुह्मीं त्यास व राजश्री बापुजीपंत नानास सांगणें. तुमची भीड आहे" ह्मणून लिहिलें. ऐसीयास राजश्री पंतप्रधान यांनीं आपणासी नियत केलीयावरी ते गोष्टी सिद्धीस पावतील. आणि आह्मीही स्वामींचे आज्ञेवरून सर्वस्वें भीड वेंचून सांगों. परंतु त्याचा वाद महाराज राजश्री स्वामींकडे जातो. तेथीलही बंदोबस्त करणें तो स्वामींनीं केला पाहिजे. स्वामींनीं चित्तीं धरिलें आहे तरी याउपरीं त्यांचें ऊर्जितच आहे. विशेष काय लिहिणें, कृपा निरंतर असों दीजे हे विज्ञापना.

[लेखांक १८२] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंस स्वामींचे सेवेसीः—

चरणरज पिलाजी जाधवराऊ चरणावरी मस्तक ठेवून साष्टांग दंडवत विज्ञापना ता॰ [१]आश्विन वद्य चतुर्थी इंदुवार मुकाम राजपुरी सेवकाचें वर्तमान श्रीकृपेनें यथास्थित असे विशेष. आह्मी कुलाबा होतों ह्मणोन स्वामींनीं आज्ञापत्र सादर केलें, तों इतक्यांत सेवक कुलाब्याहून निघून राजपुरीस आला. राजपुरीस स्वामींचें आज्ञापत्र आलें. तेथें आज्ञा कीं, कृष्णंभट देशमुख प्रांत राजापूर याचे इसाफतीचे गांव होते ते राजश्री संभुसिंग आंगरे यांणीं दूर करून अंत प्रभु यांसी दिल्हे. पुरातन चालत आलें आहे त्यास विक्षेप करावा ह्मणिजे काय? येविसीं तुह्मी राजश्री संभुसिंगास सांगोन कृष्णभटाचे गांव कृष्णभटास देवणें ह्मणोन आज्ञा. ऐसियासी आज्ञा शिरसा वंदिली. राजश्री संभुसिंगही चौरोजां कुलाब्याहून राजपुरीस येणार. आपले आज्ञेप्रमाणें त्यांस सांगोन कृष्णभटाचे गांव कृष्णभटास करार करवावे. तों आजीच खंडोजी साळवी यांणीं वर्तमान जबानीं सांगितलें कीं, कृष्णभटाचे गांव राजश्री संभुसिंगानें करार करून सनद करून दिल्ही आहे. स्वामींसी त्यांणीं वचन दिलें आणि आपणही आज्ञा केली ते आज्ञा उल्लंघन कोण करणार आहे? सेवेसी विदित झालें पाहिजे. पूर्वी स्वामींची आज्ञा होती कीं, चिरंजीव आपाच्या पुत्रास रामनगरकराकडील सोयरीक करार केली आहे तें करणें ह्मणोन. ऐसीयासी रामनगरकराच्या सोयरिका ती जागा जाल्या. एक अंबोजी देशमुख, दुसरे वासदेकर राजे, तिसरे महाराज राजश्री संभाजी राजे, ऐशा

---

१ आश्विन वद्य ४ इंदुवारः—ही तिथि दोन सालांत ह्मणजे इ॰ स॰ १७३३ मधील सप्तंबरच्या १५ तारखेस व इ॰ स॰ १७४३ मधील सप्तंबरच्या २६ तारखेस येते. ह्यांतील खरी तारीख निश्चित करण्यास पत्रांत उल्लेख केलेल्या सनदा किंवा लग्नाची मिति समजली पाहिजे.

सोयरिका जाल्या. परंतु त्या सोयरिका तिही जागा चिरंजीव जाल्या नाहींत. हें वर्तमान राजश्री चिमाजीपंत आपा व आह्मी गतवर्षी स्वामींचे दर्शनास आलों ते समयीं श्रुत केलें होतें. त्यावरून स्वामींनीं आज्ञा केली कीं दुसरे ठिकाणीं सोयरीक पहाणें. त्यावरून आज्ञेप्रमाणें विवंचना करीत होतों. त्यास राशीनचे काळे अवंदा येऊन नवरा पाहोन गेले. परंतु पानें वांटावीं हें राहिलें आहे. आपले आज्ञेखेरीज पानें कशीं वांटावीं ? रामनगरकराकडे नवरी आहे तिचा बापही अवंदा मेला. नरहरपंत तेथून आले होते. त्यांणीं सांगितलें कीं सोयरीक करा, पानें वांटावयासी पाठवा. त्यास आह्मीं जाब सांगितला कीं, ये विसींचा जाब आह्मी वाघोलीस गेल्यावरी सांगूं. त्यांणीं स्वामींसही पत्र लिहिलें असेल. ऐसीयासी त्या सोयरिका चिरंजीव होत नाहींत. स्वामींस विदित आहे. आणि रासीनचे काळे ह्मणोन सिदोजी निंबाळकराचे सासरे व शिऊबाईचे भाऊ भले आहेत आणि स्वामिभक्त...आहेत. वतनदारही आहेत. नवरा तों पाहोन गेले. पानें वांटावीं इतकें राहिलें आहे. येविसीं स्वामींची आज्ञा होईल त्याप्रमाणें वर्तणूक करूं. सविस्तर वर्तमान खंडोजी साळवी यासी सांगितलें आहे. सेवेसी निवेदन करील त्यावरून कळेल. या पत्राचा जाब राजश्री अंबाजीपंत यांजकडे पाठवावा. ते सेवकास पावता करतील. सेवेसी श्रुत जालें पाहिजे हे विज्ञप्ति.

[लेखांक १८३] श्री.

श्रीमत् परमहंस स्वामींचे सेवेसीः—

विनंति सेवेसी हंसाई[1] आऊ जाधव श्री चरणावरी मस्तक ठेवून साष्टांग दंडवत विनंति येथील कुशल जाणून स्वामींचे आशीर्वादेंकरून ता० छ० ९ रजब पावेतों समस्त कुशलरूप असो. यानंतर

१ हंसाईआऊः—पिलाजी जाधवरावांची आई.

स्वामींनीं कृपा करून आज्ञापत्र पाठविलें तेथें आज्ञा केली, कीं पैक। व पाटाव ठेविले आहेत ते पाठवून देणें. त्यावरून निंब्राजी तोरसकर व सटवाजी यादव याजबरोबर ऐवजः—२ पाटाव, ६० नक्त रुपये, ३ नाणें मोहरा येणेंप्रमाणें पाठविलें असे. घेतलें पाहिजे. प्रसाद खजूर पाठविला तो पावला. लष्करचें वर्तमान लिहिणें ह्मणून आज्ञा केली, ऐसीयास राजश्री पंतप्रधान व चिरंजीव पिलाजी व मोंगल भाऊ ऐसे हिंगणगांवावरी येऊन मुर्चे लाविले आहेत. स्वामींस कळावें ह्मणून लिहिलें असे. विशेष काय लिहिणें, कृपा निरंतर असों दीजे हे विनंति.

## ६ गायकवाड.

[ लेखांक १८४ ] श्री.

श्रीमंत परमहंस परिविराजित श्री स्वामींचे सेवेसी:—

सेवक दमाजी[1] गायकवाड समशेरबहादूर विज्ञापना येथील कुशल जाणोन स्वामींहीं आपले कृपेचें वर्तमान कळवून पेशजी सनाथ करीत गेलें पाहिजे. विशेष. कृपा करून पत्र पाठविलें तें पावून परम आनंद झाला. श्री स्वामी स्वर्गी विराजमान[2] जालियावर स्वामींची स्थापना त्या स्थळीं जाली, हें श्रवण होऊन परम आल्हाद जाला. आह्मीं पदरचे असून निरंतर कृपावंत असून पत्रद्वारें सनाथ करावयासी कृपा करीत जावें. बहुत काय लिहिणें हे विज्ञापना.

---

१ दमाजी गायकवाडः—हे पिलाजी गायकवाडाचे पुत्र. हे पिलाजीचा वध झाल्यानंतर गुजराथचे अधिपति झाले. ह्यांची कारकीर्द इ० स० १७३२ पासून इ० स० १७६८ पर्यंत ह्मणजे सरासरी ३२ वर्षें झाली. हे आपल्या वडिलां प्रमाणेंच कर्तृत्वपटु होते.

२ स्वर्गीं विराजमान झाल्यावर ह्मणजे स्वामींनीं समाधि घेतल्यानंतर हें पत्र लिहिलें आहे असें दिसतें. ह्यावरून ह्या पत्राचें साल इ० स० १७४५ हें असूं शकेल. स्वामींचा काल झाल्यानंतर देखील त्यांच्याच नांवानें लिहिलेलीं कित्येक पत्रें आमच्या पाहण्यांत आलीं आहेत. परंतु स्वामींच्या पश्चात् बहुधा 'समाधिस्थ परमहंस स्वामी' असें लिहिण्याचा परिपाठ होता.

## ७ दाभाडे.

[लेखांक १८५] श्री.

श्रीमत् परमहंस स्वामींचे सेवेसीः—

अपत्यें उमाबाई[१] दाभाडे चरणावर मस्तक ठेवून साष्टांग दंडवत. विनंति विज्ञापना. येथील महाराजांच्या आशीर्वादेंकरून फाल्गुन बहुल १० पर्यंत यथास्थित असे विशेष. महाराजांनीं कृपा करून पत्र पाठविलें तें शिरसा वंदून अभिप्राय अवगत जाला. स्वामीसीं बोलिलों होतों कीं, यंदा पांच हजार घ्यावे; पुढें नीट नेटकें जालीयावर पांच हजार घ्यावे. त्यास, तळेगांवास आलीयावर फौजेची समजाविशी करितां वोढीचा प्रसंग जाला. याजकरितां प्रस्तुत अंतर पडलें. स्वामींच्या पायांशीं निश्चय केला आहे त्यासी प्राणांतीं अंतर पडणार नाहीं. सर्व गोष्टीचा मानाभिमान महाराजांस आहे. संवत्सर प्रतिपदा जालीयानंतर उत्तर प्रांतास जातों. गेलियानंतर देवालयाचा ऐवज अविछिन्न पावता करूं. अंतर होणार नाहीं. आपण स्वमुखें लेंक ह्मटलें आहे त्याचा सर्व अभिमान वडिलांस आहे. जगासाठीं रागें भरून

---

१ उमाबाई दाभाडेः—खंडेराव दाभाडे सेनापति यांची पत्नी व त्रिंबकराव दाभाडे यांची आई. ही फार चतुर व पराक्रमी बायको होती. बाजीरावांचें व त्रिंबकरावाचें डभोई मुक्कामीं युद्ध होऊन त्रिंबकराव मृत्यु पावल्यानंतर हिला फार दुःख झालें. त्या वेळीं खुद्द शाहूमहाराज हिच्या सांत्वनाकरितां तळेगांवास गेले होते. त्यांनीं बाजीराव पेशव्यांस हिच्या ओट्यांत घालून तिचा राग दूर केला. ह्या शूर अबलेनें पुढें अहमदाबादेवर स्वारी करून तेथील यवन सुभेदार जोरावरखां बाबी ह्याचा पराभव केला. त्या वेळीं हिनें हत्तीवर अंबारींत आपल्या अल्पवयी दोन पुत्रांसह बसून युद्ध केलें. उमाबाई बायको माणूस असतां शिपाईगिरीची शर्थ केली ह्मणून छत्रपति महाराजांनीं सोन्याचे तोडे तिच्या पायांत घालून तिचा बहुमान केला. ह्या स्त्रीस 'शूर अबला' हें नांव यथार्थ शोभतें. ही इ. स. १७४७ मध्यें मृत्यु पावली.

लिहिलें, त्यास दहा हजारांचा विषय काय आहे? जें आहे तें महाराजांचें आहे. पुढेंही देणार महाराज समर्थ आहेत. पांच हजार रुपये दो महिन्यां पाठवून देतों. बाकी राहिले तेही पाठवून देऊं. बाणाविषयीं मुजरद माणसें पाठविलीं आहेत. सत्वरीच सेवेसी प्रविष्ट होईल. बहुत काय लिहिणें, लोभ असों दीजे, हे विज्ञापना.

[लेखांक १८६] श्री.

श्रीमत् परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

अपत्यें उमाबाई दाभाडे कृतानेक दंडवत विनंति. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करीत असिलें पाहिजे. विशेष. आपण कृपाळू होऊन आशीर्वादपत्र पाठविलें तें शिरसा वंदून परमानंद जाहला. ऐवजाविशीं लिहिलें ऐसीयास आज्ञांपासून अंतर पडलें, परंतु आठां चौ रोजां येथील कामकाजाचा गुंता चालीस लागला ह्मणजे आपल्याकडील ऐवज पोहोंचता होईल. सदैव आशीर्वादपत्र पाठवून सांभाळ केला पाहिजे. बहुत काय लिहिणें, कृपा निरंतर कीजे हे विनंति.

[लेखांक १८७] श्री.

श्रीमत् परमहंस स्वामींचे सेवेसीः—

अपत्यें उमाबाई दाभाडे साष्टांग दंडवत विनंति विज्ञापना येथील कुशल आश्विन बहुल त्रयोदशी इंदुवासरे परियंत यथास्थित असे विशेष. धावडशीस पावलीयावर आशीर्वादपत्र व वस्त्रें सोनजी पांडिया याजबरोबर पाठविलीं तें उत्तम समयीं प्रविष्ट होऊन आज्ञेप्रमाणें चिरंजीव राजश्री सेनापती व उभयतां चिरंजीवांस दिल्हीं. बऱ्हाणपुरी शालू चार आह्मीं घेतले. द्रव्याचा विचार लिहिला तर नियताप्रमाणें मुदतीस प्रविष्ट होतील. चिंता नाहीं. आपणासीं करार केला आहे त्यास अंतर सहसा होणार नाहीं. गायकवाडाकडील मजकूर लिहिला तर सर्व प्रसंग पदरचाच आहे. अवंदाचा प्रसंग वोढीचा, यास्तव विनंति केली असे.

नवापूरच्या मजमूचें लिहिलें, त्यास तेथें गरीब ब्राह्मण, त्यास तीन पिढ्या जाल्या. सांप्रत बारा वरसांचें मूल आहे. त्याची बालपरवेसी चालत आहे. सेवेसी कळावें ह्मणोन लिहिलें असे. वस्त्रें येणेंप्रमाणें पाठविलीं तीं पावलीं. शाल्र चार बऱ्हाणपुरी, झगे दोन, छिटें एक एकूण सात सणगें पावलीं. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक १८८] श्री.

श्रीमत् सकळतीर्थस्वरूप महाराज श्री भार्गवराम स्वामींचे सेवेसीः—

अपत्यानुरूप कृष्णाजी[1] दाभाडे चरणावरी मस्तक ठेवून साष्टांग दंडवत. विनंति उपरी येथील क्षेम ता० वैशाख[2] वद्य पंचमी मुक्काम सातारा सुखरूप असो. स्वामींकडील वर्तमान बहुत दिवस कळलें नाहीं, येणेंकरून चित्तास समाधान नाहीं. तरी येणाराबरोबरी पत्र पाठवून सांभाळ केला पाहिजे. आमचें वर्तमान तरी, गुजराथ प्रांतें रा० बाजीराऊ पंडित प्रधान यांचें व रा० त्रिंबकराऊ दाभाडे सेनापति यांचें युद्ध जालें. ते समयीं रा० सेनापति व रा० मलोजी पवार यांस जखमा लागोन देवाज्ञा झाली. त्यावरी महाराज राजश्री स्वामी व समस्त सरदार कुल तळेगांवास जाऊन, मातुश्री उमाबाई यांचें बहुत प्रकारें समाधान करून, आपणास व मातुश्रीस फौजेसहवर्तमान सातारीयास घेऊन आले. याउपरी मनोदयानुरूप कारभार होऊन, अविलंबें निरोप घेऊन, माघारें तळेगांवास जाऊं. सकळ व-

---

१ कृष्णाजी दाभाडेः—हा कोणी जवळचा नातेवाईक दिसतो. उमाबाईस त्रिंबकराव, यशवंतराव व बाबूराव असे तीन पुत्र होते. हा ज्याअर्थी उमाबाईस मातुश्री असें लिहितो त्याअर्थी पुत्रवर्गापैकींच असावा.

२ वैशाख वद्य पंचमीः—ता० १५ मे इ. स. १७३१, शनिवार. डभोईची लढाई झाल्यानंतरचें हें पत्र आहे. डभोईच्या लढाईचें वृत्त बाजीरावांनीं स्वामींस लिहिलेंच आहे. लेखांक २६ पहा.

र्तमान स्वामींस कळावें ह्मणून लिहिलें आहे. रात्रंदिवस स्वामींच्या चरणाचा निजध्यास आहे. त्यास तिळतुल्य अंतर नाहीं. स्वामींनीं पूर्वीइतके लोभास अंतर न करावें. हें भाग्यवैभव अवघें देणें स्वामींचें आहे. बहुत लिहिणें उपरोध आहे. कृपालोभ निरंतर असों दीजे हे विनंति.

[ लेखांक १८९ ] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंस स्वामींचे सेवेसी:—

विनंति सेवक कृष्णाजी दाभाडे सा॰ दंडवत प्रणिपात विनंति येथील कुशल लेखन करावयास आज्ञा केली पाहिजे. स्वामींनीं कृपा करून आशीर्वादपत्र पाठविलें तें पावोन वर्तमान कळलें. मातुश्री उमाबाई यांनीं राजश्री अंतोबानाईक गुडे यांजकडून रुपये ४००० देविले. त्यासी ऐवजाची येथेंही देण्याची वोढी होती, परंतु महाराजांस देणें अगत्य, याजकरितां कर्ज घेऊन राजश्री अंतोबानाईक यांजपासून उत्तम सुरती स्वामींच्या सोनाराचे परीक्षेनें सदरहू चार हजार रुपये खंडोजी साळवी याचे पदरीं घातले असेत. तरी मातुश्रीबाईस पत्र पावतीचें लेहून जासूद जाणार त्यावरोबर पाठवून ( द्यावें ). बहुत काय लिहिणें ? फणस पाठविले ते पावले. विनंति.

[ लेखांक १९० ] श्री.

श्रीमत् राजश्री बावा स्वामींचे सेवेसी:—

विनंति सेवक कृष्णाजी दाभाडे साष्टांग दंडवत. विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष. स्वामींनीं पत्र लिहिलें, "मातुश्री बाईकडील वर्तमान कळत नाहीं." तरी बाई अमदाबादेवरी आहेत. चांफानेरचें वर्तमान लिहिलें, बांड्यापासून

१ हें पत्र उमाबाईनीं अहमदाबादेवर मोहीम करून तें शहर सर केलें त्या वेळचें दिसतें. ही मोहीम इ. स. १७३४ मध्यें झाली.

होळकरानें घेतलें. कोट पाडून टाकिला. ऐसें वर्तमान जाहलें. स्वामींनीं प्रसाद श्रीफळ पाठविलें तें पावलें. विशेष काय लिहिणें हे विनंति.

[ लेखांक १९१ ] श्री.

श्रीमत् महाराज परमहंस श्री भार्गवरामबावा स्वामींचे सेवेसीः—

विनंति आज्ञांकित चरणरज सोमाजी[१] दाभाडे चरणावरी मस्तक ठेवून दंडवत विनंति. उपरी येथील कुशल वर्तमान तागाईत आश्विन वद्य १४ पर्यंत स्वामींचे आशीर्वादेंकरून सुखरूप असों. यानंतर स्वामींनीं कृपावलोकन करून तीर्थरूपामागें कागद पाठविला तो पावला. त्यावरून बहुत समाधान जहालें. तो अर्थ पत्रीं लिहितां पुरवत नाहीं. तीर्थरूप तों कैलासवासी जाले! मृत्यूस इलाज नाहीं!! बरें, सर्व प्रकारें आह्मांस आपण वडील आहांत. सर्व भरंवसा आपले आशीर्वादाचा आहे. विस्तारें लिहावेंसें नाहीं. आपण आपले सेवक असों. नारोजी घाणेकर यानेंही कित्येक प्रकारें आज्ञावचनें आपलीं सांगितलीं व पत्रीं लेख केलीं. त्यासी प्रस्तुत पैका नाहीं. खर्चाची तंगचाई आहे. बहुत इलाज करून रुपये शंभर नारोजीहस्तें पाठविले आहेत व शेला १ पाठविला असे. तो अंगीकारिला पाहिजे. बहुत काय लिहिणें, लोभ असों दीजे हे विनंति.

## ८ पवार.

[ लेखांक १९२ ] श्री.

श्री सच्चिदानंदकंद श्री परमहंसबावा वडिलांचे सेवेसीः—

आज्ञाधारक चरणरज आनंदराव[२] पवार चरणावर मस्तक ठेऊन कृ-

---

१ सोमाजी दाभाडे—हा कोणाचा मुलगा ?

२ आनंदराव पवारः—धार संस्थानचा मूळ स्थापक. कारकीर्द इ. स. १७३४–इ. स. १७४९.

तानेक विज्ञप्ति. स्वामींचे आशीर्वादेंकरून कार्तिक शुद्ध द्वादशीपर्यंत समस्त क्षेम असो. विशेष. महाराजें राजश्री भिऊबासमागमें आज्ञापत्र व प्रसादवस्त्र कुडती पाठविली ती शिरीं वंदून अंगीं घातली, येणेंकरून परम आल्हाद पावून स्वामींनीं ऊर्जित केलें हें संतोष (दायक) झालें. या उपरी आह्मांस ब्रह्मस्वापासून स्वामी मुक्त करतील. आह्मी कायावाचामनें स्वामींचे चरणरज असों. वरकड कित्येक अर्थ सेवेसी राजश्री भिऊबा श्रुत करितील. आह्मीं आजि कसबे बेले येथें मुकाम केला. पुढें मजल दरमजल उत्तर प्रांतें जाऊं. सेवेसी निवेदन होय हे विज्ञापना.

[लेखांक १९३] श्री.

श्रीमंत महाराज राजश्री परमहंस स्वामींचे सेवेसी:—

विनंति सेवक आज्ञाधारक यशवंतराव[1] पवार कृतानेक दंडवत विनंति. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करावयासी आज्ञा केली पाहिजे. विशेष. स्वामींकडील आशीर्वादपत्र येऊन कुशलार्थ अवगत होत नाहीं, याजकरितां चित्तास समाधान नाहीं. तरी लेखकास आज्ञा करून आशीर्वादपत्र प्रेषून सानंद आनंदविलें पाहिजे. यानंतर आंबे व चांफे व नारळी वगैरे अपूर्व जिनसांचीं रोपें व कलमें ऐसीं बागामध्यें लावणी करावयासी व तोफ १ एक गढीमध्यें ठेवावयासी स्वामी कृपा करून सेवकास देतील तरी परम आल्हाद होईल. ऐसीयासी येविसीं आज्ञा केली पाहिजे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक १९४] श्री.

श्री सकलतीर्थस्वरूप राजश्री भार्गवरामबावा स्वामींचे सेवेसी:—

चरणरज तुकोजी पवार चरणावरी मस्तक ठेवून सा० दंडवत

---

१ यशवंतराव पवार:—आनंदराव पवाराचा पुत्र. कारकीर्द इ. स. १७४९–इ. स. १७६१. हा पुरुष पानिपतच्या लढाईत मारला गेला.

विनंति उपरी येथील कुशल ता० भाद्रपद शुद्ध एकादशी मुक्काम मौजे गणेगांव प्रांत कर्डे ये स्थळीं सर्व मंडळी आपले आशीर्वादें स्वस्तिक्षेम जाणून स्वकीय कुशल लेखन आज्ञा केली पाहिजे. विशेष. बहुत दिवस झाले, स्वामींकडील आशीर्वाद पत्र येऊन साकल्य कळं येत नाहीं. येणेंकडोन चित्तास उत्कंठा प्राप्त झाली आहे ते श्री जाणे ! याउपरी स्मरणपूर्वक आशीर्वादपत्रीं आपला संतोष लिहून सदैव आनंदवीत गेलें पाहिजे. तेणेंकडोन आल्हाद होईल. यावरी आमचें वर्तमान तरी स्वामी गणेगांवीं आले ते समयीं भेटी घेऊन स्वारीस गेलों ते वेळेस माळवा प्रांतीं छावणी झाली. त्याज येलीकडे यंदा मकसुदा (बाद) प्रांतींची मोहिम होऊन समग्र लष्करासहवर्तमान त्रिस्थळीं यात्रा जाली. हें वर्तमान तों परस्पर स्वामींस श्रुत जालेंच असेल. यावरी प्रस्तुत आपले आशीर्वादें श्रावण वद्य प्रतिपदेस गांवास आलों. स्वामींस कळावें. यानंतर आपण येथें भेटीस आले होते (ते) वेळेस आह्मांस बसावयास घोडी कुमेत एक चोखट होते, ते गतवर्षी माळव्यांत छावणी झाली ते समयीं मेली. याउपरी घोडें आह्मांस बसावयायोग्य नाहीं. तरी कृपा करून आह्मांस बसावयासी घोडा निळा पाठविला पाहिजे. येविशीं आपण द्यावासा पूर्वींच मान्य केलें आहे. त्यामध्यें सांप्रत बसावयायोग्य घोडें नाहीं. तरी याउपरी कृपा करून घोडा बसावयासी अगत्यरूप पाठविला पाहिजे. येविशीं विस्तारें ल्याहावें तरी देणें सर्वस्व स्वामींचे आशीर्वादाचेंच आहे. ऐसें जाणून अनमान न करितां अगत्यरूप घोडा पाठविला पाहिजे. वरकड वर्तमान आपले आशीर्वादें कुशल असे. सदैव पत्रीं परामृश करीत गेलें पाहिजे. बहुत काय लिहिणें, लोभाची वृद्धि करावी ही विनंति.

[लेखांक १९५] श्री.

श्रीमत् तीर्थरूप महाराज परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

आज्ञाधारक कृष्णाजी[1] पवार विश्वासराव कृतानेक विज्ञापना ता० वैशाख शुद्ध चतुर्दशीपर्यंत[2] स्वामींच्या कृपावलोकनेंकरून सेवकाचें वृत्त यथास्थित असे. चिरंजीव जिवाजीची मुली राजश्री दावलजी सोमवंशी यांच्या पुत्रास दिली आहे. हा विवाह व आपली कन्या राजश्री राजाराम देशमुख प्रांत संगमनेर यांच्या पुत्रास दिली आहे, ऐसीं दोन्हीं लग्नें वैशाख[3] वद्य पंचमी बुधवारीं नेमस्त केलीं आहेत. महाराजांनीं कृपाळू होऊन दीनावर दया करून मंडप शोभा करणार स्वामी समर्थ आहेत. विशेष लिहिणें तर सर्व प्रसंग स्वामींच्या आशीर्वादाचा आहे. कृपा केली पाहिजे हे विनंति.

[लेखांक १९६] श्री.

श्रीमत् परमहंस राजमान्यराजश्री भार्गवरामबावा स्वामी
वडिलांचे सेवेसीः—

आज्ञांकित बालकें अपत्यानुरूप जिवाजी[4] पवार सा० विज्ञापना ऐसीजे. तीर्थरूप रा० यशवंतराव पवार बावा यांजकडे स्वामींचें कर्ज रुपये दहा हजार आहे. त्याचें व्याज मे।। रुपये दीड हजार आहे. त्यासी येथें रा० शेटियाजी खराडे फौज धरावयासी आले होते, त्यांसी पत्र तीर्थरूपांनीं लिहिलें कीं, स्वामींस व्याजांत रुपये दीड हजार देणें. त्यासी रा० शेटियाजी खराडे यांनीं रुपये दीड हजार आह्मांपासीं ठेविले. आह्मीं राजश्री मल्हारपंत माळशिरसास रा० गोविंदपंत तुमचे होते

१ कृष्णाजी पवारः—हे पवार विश्वासराव सुपेकर होत.

२ वैशाख शुद्ध चतुर्दशीः—ता० २१ मे इ. स. १७३९ शुक्रवार.

३ वैशाख वद्य पंचमी बुधवारः—ता. १६ मे इ. स. १७३९.

४ जिवाजी पवारः—कृष्णाजी पवार विश्वासराव यांचा पुत्र.

त्यांसी सांगितलें कीं रुपये घेऊन जाणें. त्यांणीं मान्य केलें कीं रुपयांस माणसें पाठवून घेऊन जातों. त्यासी हा काल माणसें न आलीं. पैकियासी दिसगत जाली. मग मुजरद एकंदाज व महार देऊन रुपये १५०० सेवेसी पाठविले ते घेऊन जाब पाठविला पाहिजे. ध्यानांत रुपये पावले ऐसें बाळकास लिहिलें पाहिजे. बहुत काय लिहिणें, कृपा बाळकावरी करावी. श्रुत होय हे विज्ञापना. पौष्य वद्य[1] नवमी शके १६६४ दुंदुभि नाम संवत्सरे.



## ९ फलटणचे निंबाळकर.

[लेखांक १९७] श्री.

श्रीमत् परमहंस स्वामींचे सेवेसीः—

सेवक जा[2]नोजी नाईक निंबाळकर चरणावर मस्तक ठेवून दंडवत प्रणाम विनंति उपरी येथील कुशल जाणून महाराजांनीं स्वकीय कुशललेखनेंकरून संतोषाभिवृद्धि करीत असलें पाहिजे. यानंतर महाराजांनीं कृपा करून आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन लेखनार्थ विदित झाला. पत्रीं आज्ञा कीं, त[3]क्रप्राशनाकारणें गाई पाठवून देणें. ऐसीयास आपण जीवप्राणें स्वामींच्या पायाशीं एकनिष्ठ आहों. येथें गाई सिद्ध आहेत, परंतु प्रस्तुत दूध द्यावयाच्या गाई अगर ह्मशी व्याल्या नाहींत. गाभण्या आहेत. आश्विन कार्तिकमासीं विऊन दूध देतील ऐशा आहेत. विदित झालें पाहिजे. याउपरी आंग्रे यांजकडील

---

१ पौष वद्य ९ शके १६६४:—ता० ८ जानेवारी इ. स. १७४३ शनिवार.

२ जानोजी नाईक निंबाळकर:–फलटणचे देशमुख. हें महाराष्ट्रांतील फार प्राचीन घराणें होय. ह्याचा मूळपुरुष वणगोजी हा होय. ह्याचा साहावा वंशज जानोजी हा होय. कारकीर्द इ. स. १६९३–इ. स. १७४८.

३ तक्रप्राशनः–स्वामी फक्त ताक पिऊन राहत असत व त्याकरितां ते गाई बाळगीत असत.

शरीरसंबंधाचें सांगोन पाठविलें त्यावरून राजश्री महादेवभट व राजश्री बाळाजीपंत स्वामींकडे पाठविले आहेत. हे स्वमुखें वृत्त निवेदन करितां विदित होईल. तें चित्तास आणून सोयरिकीचा निश्चय केला पाहिजे. विशेष काय लिहिणें हे विनंति.

[लेखांक १९८] श्री.

नम ॐकारबीजाय विशुद्धाय चिदात्मने ।
गलिताखिलभेदाय गुरवे ब्रह्मरूपिणे ॥ १ ॥

श्रीमत् परमहंस स्वामींचे सेवेसीः—

आज्ञाधारक जानोजी नाईक निंबाळकर साष्टांग दंडवत विनंति उपरी येथील क्षेम स्वामींचे आशीर्वादेंकरून असे. स्वामींनीं कृपा करून मधाची घागर एक पाठविली ते पावली. कृतार्थ झालों. "तुमचें चित्त श्री बोधल्याचे ठायीं आहे. आह्मीही साधुसंताची पायधूळ असों. आमचे ठायीं निष्ठा धरून दोन गाई आमच्या व्याल्या असतील त्या, व दोन गाभण्या ऐशा ४ गाई पाठवणें" ह्मणोन लिहिलें, तर आह्मांस स्वामी साक्षात् राममूर्ति आहेत. येथील सर्वही स्वामींचें आहे. खिल्लारी स्वामींचे. त्याजमध्यें गाई स्वामींचे आज्ञेप्रमाणें पहिले पाठविल्या त्या दोन व आणीक हल्लीं दोन ऐशा चार गाई स्वामींचे सेवेसी पाठविल्या असेत. सर्वही स्वामींचें आहे. अंतरसाक्ष आहे. पत्रीं विस्तार ल्याहावा ऐसें नाहीं. केवळ स्वामींचे आह्मी सेवक असों. सदैव कृपावलोकनें सांभाळीत असिलें पाहिजे. विशेष काय लिहिणें हे विज्ञापना.

[लेखांक १९९] श्री.

श्रीमत् परमहंस साक्षात् श्रीराममूर्ति स्वामींचे सेवेसीः—

आज्ञाधारक जानोजी नाईक निंबाळकर साष्टांग दंडवत विनंति उपरी स्वामींच्या कृपावलोकनेंकरून सेवकाचें सर्वस्वें क्षेम असे. स्वामींचा सेवक व आमचें एक माणूस गाई आणावयास गेले आहेत. सर्व

स्वामींचें आहे. आज्ञेप्रमाणें गाई घेऊन येतील. व स्वामींनीं जें वस्त्र माघारें पाठविलें तें आह्मीं वंदून प्रसादरूप ठेविलें. श्री सुदामदेव यांच्या मुठीभर पोह्या स्वामींनीं अंगीकारिल्या. ते थोर भक्त. आह्मी स्वामींचे अज्ञान सेवक. याजकरितां सेवेसी वस्त्र १ एक पाठविलें आहे. कृपा करून अंगीकारिलें पाहिजे. विशेष काय लिहिणें हे विनंति.

[लेखांक २००] श्री.

श्रीमत् नियम-प्राणायाम-प्रत्याहार-आसन-ध्यान-धारणा-समा-ध्यष्टांग-योगयुक्त श्रीमत् स्वामींचे सेवेसीः—

सेवक आज्ञाधारक मुधोजी[1] नाईक निंबाळकर साष्टांग दंडवत प्रणाम. विनंति उपरी येथील कुशल स्वामींच्या आशीर्वादें क्षेमरूप जाणून स्वकीय कुशल निरंतर आशीर्वादपत्रीं लेखन करून सांभाळीत असलें पाहिजे. यानंतर स्वामींनीं कृपा करून आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन लेखनार्थ विदित झाला. मौजे रावडीचे विषयीं कितेक मजकूर तपसीलें लिहिला, ऐसीयास आपण पूर्वींच स्वामींच्या चरणासी विनंति केली कीं, येथील वतनदारीची रीति ऐसी आहेः—जो कजिया प्रथम होईल तो देशमुखाचे पाशीं येऊन विल्हेस लागावा. बाकीच्यांनीं आपला तनखा जो असेल तो घ्यावा व वतनी कजियामध्यें मन घालावयास प्रयोजन नाहीं. तेणेंप्रमाणें स्वामींनीं मान्य केलें, आजीवर चालत आलें, व पुढें चालवणार स्वामी समर्थ आहेत. पाटिलाचें ज्या प्रकारें समाधान करावयाचें त्या प्रकारें केलें. स्वामींनीं समाधान असों द्यावें. आह्मांपासून किमपि स्वामींच्या सेवेमध्यें अंतर

---

१ मुधोजी नाईक निंबाळकरः—हा जानोजीचा मुलगा. कारकीर्द इ. स. १७४८—इ. स. १७६५. ह्याची पत्नी सगुणाबाई फार सद्गुणी व राजकारणी बायको होती. हिनें मुधोजीच्या पश्चात् फलटण संस्थानचा कारभार बरींच वर्षें चालविला होता.

होणार नाहीं. कितेक वर्तमान निंबाजी फाळके यांजपाशीं सांगितलें आहे. सेवेसी विनंति करितील. तेणेंकरून स्वामींचें समाधान होईल. पाटिलांचें समाधान करून निंबाजी फाळके यांचे स्वाधीन केले आहेत. स्वामींनीं पाटिलांचें समाधान करून सुखरूप राहोन गांवची लावणी करीत तें केलें पाहिजे. आह्मांपासून स्वामींचे सेवेस किमपि अंतर पडणार नाहीं. येविषयीं समाधान असों द्यावें. विशेष काय लिहिणें हे विनंति.

## १० आंगरे.

[लेखांक २०१] श्री.

श्रीमंत परमहंस बावा स्वामींचे सेवेसीः—

सेवक कान्होजी[1] आंगरे सरखेल साष्टांग दंडवत. विनंति. येथील कुशल चैत्र बहुल सप्तमी सोमवार पावेतों जाणोन आशीर्वादलेखन केलें पाहिजे. यानंतरी स्वामींनीं पत्रें पाठविलीं तीं पावलीं. लिहिलें कीं गोटणेंयाहून निघोन घांटावरी धावडशीस आलों. परंतु वाटेस उष्ण बहुत त्याचे श्रमानें ज्वराची वेथा शरीरीं फार जाली. हें वर्तमान राजश्री यांस कळलीयावरी साताऱ्याहून फाल्गुन वद्य नवमी आदितवारीं धावडशीस आले, तों आह्मी तळ्याचे कामावरी होतों. तो एक बाणाच्या टप्प्यावरून पायउतारा होऊन होतों तेथें आले. बहुतसी मर्या·

---

१ कान्होजी आंगरेः—तुकोजीचा पुत्र. हा इ. स. १६९८ मध्यें राजारामाच्या कारकीर्दींत मराठ्यांच्या आरमाराचा मुख्य अधिपति झाला. ह्यानें कुलाबा येथें आपली गादी स्थापिली. हा फार शूर व पराक्रमी होता. ह्यानें सुमारें ३० वर्षें पर्यंत मुसलमान व युरोपियन लोकांस वर मान काढूं दिली नाहीं. त्याची मुख्य कारकीर्द इ. स. १६९८ पासून इ. स. १७२९ पर्यंत झाली. कान्होजीच्या मृत्यूच्या सनाबद्दल बराच घोंटाळा आहे. ग्रांटडफ इ. स. १७२८ अखेर ह्मणतो, व कुलाबा ग्याझेटीयरमध्यें १७३१ साल सांपडतें. परंतु इ. स. १७२९ च्या प्रारंभास कान्होजी मृत्यु पावला असावा. कारण त्याच्या मृत्यूनंतर त्याच्या पुत्रास ह्मणजे सखोजीस सरखेलपदाची सनद छ ५ मोहरम सलासीन ह्मणजे ता० २१ जुलई इ. स. १७२९ रोजीं मिळाली आहे. तेव्हां त्यापूर्वीं महिना दोन महिने तो वारला असावा.

देनें परम निष्ठेनें भेट घेतली. भेटीनंतर स्वामींनींही कुशल सांगितलें. असें परस्परें संतोषाचें भाषण जालें. मग आंगावरी दुशालाची जोडी होती ते राजश्रीचे आंगावरी प्रसाद घातला. मग तेथून राजश्री व आह्मी आपले वाडीयांत आलों. अन्नप्रसाद सिद्ध जाला तों राजश्रीस XXX भोजन घातलें, व राजश्रीच्या बायकांस अन्नप्रसाद वस्त्रें राजश्री बरोबर देऊन सातारीयास रवाना केलें. बहुतसे अहेर करून श्रीस संतोषविलें. हें वर्तमान कळावें ह्मणोन लिहिलें, त्याजवरून सविस्तर कळों आलें. संकटसमयीं तुर्की घोडा दिल्हा ह्मणून स्वामींनीं लिहिलें, तरी स्वामींचें तेज सामान्य नाहीं. श्री भार्गवस्वरूप आहेत. जो कोण्ही स्वामींस न मानी तो अविवेकी आहे. जे स्वामींचें स्वरूप समजले आहेत त्यास ते स्वामींचे मर्यादेस अंतर करीत नाहींत. बहुत काय लिहिणें, स्वामी समर्थ आहेत. कृपा असों दीजे हे विज्ञापना.

[लेखांक २०२] श्री.

श्रीमत् सकल तीर्थास्पदीभूत भृगुनंदनस्वरूप बावा स्वामींचे सेवेसीः—

अपत्यें सखोजी[1] आंगरे सरखेल कृतानेक साष्टांग दंडवत विनंति. उपरी येथील कुशल स्वामींचे कृपेंकडून असे. विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन बहुत समाधान जाहलें. बंदूख कामाची नाहीं याकरितां पाठविली आहे ह्मणोन स्वामींनीं लिहिलें, त्यावरून मुबदला बंदूख पाठवावी; परंतु पर्जन्य बहुत लागला, निभावणार नाहीं, यास्तव पाठविली नसे. मागाहून पाठवून देऊं. व आंगवस्त्रें धोवट दोन नारायण फाटक यांजबराबरी पाठविलीं आहेत. घेतलीं पाहिजेत. बहुत काय लिहिणें. कृपा वर्धमान करावी हे विनंति.

---

१ सखोजी आंगरे:—हा कान्होजीचा वडील पुत्र. हा बापाच्या पश्चात् कुलाब्याचा अधिपति झाला. परंतु तो दोन वर्षांनीं ह्मणजे इ. स. १७३६ मध्यें वारला.

[ लेखांक २०३ ] श्री.

श्रीमत् भृगुनंदनस्वरूप परमहंसबावा स्वामींचे सेवेसी:—

अपत्यें मथुबाईनें चरणावरी मस्तक ठेऊन साष्टांग दंडवत प्रणाम. विनंति. उपरी येथील कुशल ता० जेष्ठ वद्य अष्टमी भृगुवार पावेतों स्वामींचे आशीर्वादेंकरून सुखरूप असों. विशेष. आशीर्वादपत्रिका आली होती त्याचें प्रतिउत्तर पेशजी आंबे रवाना केलें त्याजबराबर पाठविलें, तें पावोन सविस्तर कळों आलेंच असेल. यानंतर रा० बकाजी नाईक यांस बाणकोटीं रवाना करून किल्ला फत्ते केला. तेथोन सारींच माणसें मंडणगडीं रवाना करून परीव घातला होता. दहा बारा दिवस खालीं बसोन मेटे घाटें चौगीर्द करून मौर्चे देऊन तोफांचा मार दिला. त्यामुळें लोक हकाफुका किल्ल्यावरी जाहले. स्वामींचे पुण्य-प्रतापें करून छ १९ जिल्हेजीं प्रातःकाळीं किल्ला फत्ते केला. हें संतोषाचें वर्तमान स्वामींस विदित व्हावें यास्तव लिहिलें असे. मंड-णगड बाणकोट स्वामींचे आशीर्वादेंकरून फत्ते जाहले. अंजनवेल व गोवळकोट राहिला असेत. त्याचाही यत्न करून शामलाचें निर्मूल आपले आशीर्वादेंकरून होईल. दोन्ही जागा हस्तगत जाहली-यावर श्रीचे पायांजवळ यावें हा हेत बहुतसा असे. हे मनोरथ सिद्धीस पावणें हेंही सांकडें श्रीसच असे. जाहलें वृत्त सेवेसी नि-वेदन व्हावें याजकरितां लिहिलें असे. गोवाई आंबे पाठविणें ह्मणून आज्ञा, त्यास ये प्रांतीं प्रयत्न बहुत केला; परंतु गोवाई लावणी नाहीं. स्वामींनीं लिहिलें होतें तें ईश्वरास खरें करणें, याजकरितां गोव्याहून आंबे घेऊन महागिरी वसईस गेली ते बंदरीं आली होती. त्याजबर आंबे थोडकेसे होते. परंतु स्वामींनीं लिहिलें याजकरितां आंबे सुमार एकशें विकत घेऊन रवाना केले असेत. घेऊन पावलीयाचें आशी-

---

१ मथुबाई:—ही कोणाची स्त्री ?

वांदपत्र पाठविलें पाहिजे. बहुत काय लिहिणें, लोभ असों दिला पाहिजे हे विनंति.

[लेखांक २०४] श्री.

तीर्थरूप श्रीमंत परमहंसस्वामी स्वामींचे सेवेसीः—

अपत्यें आपाजी आंगरे चरणावरी मस्तक ठेवून शिरसाष्टांग दंडवत विज्ञापनाः—उपरी स्वामींनीं लखमोजीबराबर आशीर्वादपत्र व प्रसाद पाठविला तो पावला. पत्रिका मस्तकीं वंदून परम संतोष झाला. पत्रीं आज्ञा जे, मौजे धालवली प्रांत राजापूर येथील सनद करून पाठवणें. ते आज्ञाप्रमाणें सनद पाठविली आहे. परंतु अद्याप येथील गुंता उरकत नाहीं व शिक्काही जाला नाहीं. याजकरितां सनद न पाठविली तरी स्वामी कोपातें पावतील; याजकरितां सनद पाठविली आहे. पुढें शिक्काही देवणार स्वामी समर्थ आहेत. मी आज्ञांकित आहें. मीं स्वामींप्रति विशेष काय लिहिणें ? उदईक सेवेसी विज्ञा-(पना) पत्र पाठवून देतों. तेथें सविस्तर लिहितों. गुरावेचें वर्तमान लिहिणें ह्मणून आज्ञा, त्यास अद्याप येथें आलें नाहीं. आलियावर सेवेसी लिहितों. काल खालून कागद आले आहेत. त्याचें वर्तमान कांहीं कळलें नाहीं. कळलियावर सेवेसी लिहून पाठवितों. सेवेसी निवेदन होईल. हे विज्ञापना.

[लेखांक २०५] श्री.

श्रीमंत तीर्थरूप परमहंस स्वामींचे सेवेसीः—

अपत्यें आपाजी आंगरे यानें करद्वय जोडून त्रिसंध्याकाळीं शिर सा० दंडवत विज्ञापना. उपरी विशेषः—मौजे धालवली प्रांत राजापूर हा गांव हुजूर सनदें महाराज राजश्री छत्रपति स्वामींनीं इनाम करून धारादत्त दिला. त्याप्रमाणें आह्मीं आपले तर्फेनें स्वामींच्या पुजेच्या साहित्याबद्दल

---

१ आपाजी आंगरेः—संभाजीचें टोपण नांव असावें ?

मौजे मजकूर कुलबाब कुलकानू हल्लींपट्टी व पेस्तरपट्टी व इनामपट्टी खेरीज इनामदार करून गांव दिला असे. तरी स्वामींनीं मौजे मजकुरचा ऐवज घेऊन माझें कल्याण इच्छिलें पाहिजे. स्वामी ऊर्जित करणार समर्थ असेत. इनामपत्र धारादत्त स्वामींस गांव दिला हे विज्ञापना. सु ॥ खमस आर्बैन मया व आलफ.

तेरीख[१] ८ माहे जिल्काद शके १६६६ रक्ताक्षीनाम संवत्सर मार्गशीर्ष शुद्ध नवमी रविवार. मु० शाहुनगर.

## ११ ढमढेरे.

[लेखांक २०६] श्री.

भगवान् स्वरूप महाराज परमहंसबावा स्वामींचे सेवेसी:—

विनंति आज्ञाधारक जानोजी ढमढेरे साष्टांग दंडवत. विनंति उपरी:–स्वामींनीं कृपा करून सांभाळपत्र पाठविलें तें मस्तकीं वंदून तोषातें पावोन लेखनार्थ अवगत होऊन परम तोषातें पावलों. ऐसेंच निरंतर आशीर्वादपत्र पाठवून सांभाळ करीत असिलें पाहिजे. यानंतर स्वामींनीं आज्ञा केली त्यावरून आपण दर्शनास यावयास सिद्ध जालों, तों श्रीमंत राजश्री पंतप्रधान यांचें पत्र आलें. याजकरितां जरूर जाणोन आपण पुण्यास स्वार होऊन गेलों. तेथें भेट जालीयावर आपण स्वामींच्या दर्शनास येऊं. स्वामींनीं सवाशां रुपयांचें लिहिलें, तर आपण स्वामींच्या वचनाव्यतिरिक्त काय आहें? स्वामींची आज्ञा आपणास मान्य आहे. चिरंजीव सदवाचें (?) लग्न अवंदा माघमासीं जालें आणि आपलाही खर्च अवंदा घरीं बसला. याजकरितां खर्चाची तंगचाई जाली. याजकरितां येसाजी खेडकर याजबराबर ऐवज पाठविला नाहीं. आपण सर्व प्रकारें स्वामींचे आहों. स्वामींच्या वचनावेगळें आपण नाहीं. बहुत काय लिहिणें, कृपा वृद्धीतें पावीत गेलें पाहिजे हे विनंति.

---

१ तेरीख ८ जिल्काद शके १६६६:–ता० २ दिसेंबर इ. स. १७४४.

## १२ थोरात.

[ लेखांक २०७ ] श्री.

तीर्थस्वरूप महाराज राजश्री बावा स्वामी वडिलांचे सेवेसीः—

अपत्यानुरूप बालकें सुभानजीराऊ व राऊजीराऊ थोरात चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग दंडवत विज्ञप्ति ऐसीजेः—कृपा करून आज्ञापत्र पाठविलें, उत्तम समयाचे ठायीं प्रविष्ट होऊन अर्थ पूर्णावगत होऊन सनाथ जालों. "यंदा समाधीस कृष्णातीरीं बैसलों. प्रस्तुत श्रीकृपें-करून धावडशीस आलों. शरीर बहुत कृश जालें. अवस्था कठीण गेली." ह्मणून कितेक प्रकारें लोभललिगतेंकरून आशीर्वादपत्रीं सेवकजनास लिहिलें, कळों आलें. कितेक अर्थ निंबाजी फाळका यानें निवेदन केले. त्याजवरून संतोष पावलों. तो महिमा पत्रीं लिहितां विस्तार होतो. ऐसेंच सदोदित आशीर्वादपत्रीं सांभाळ करावयासी समर्थ (आहां). कुणबिणीची पत्रीं आज्ञा सादर केली. अवश्यक. चिरंजीव मुलें स्वामींचे दर्शनास येणार असत. त्वरीतच येतील. त्यांजसमवेत निसंदेहेंकरून सेवेसी पाठविली जाईल. निंबाजीबराबर श्रीचा प्रसाद नारळें वगैरे बागांत लावयाचीं पाठविलीं तीं प्रविष्ट जालीं. सेवेसी विशेष लिहिणें काय ? कृपा निरंतर असों दीजे हे विनंति. स्वामींस उदाजी पोवार यांनीं बंदूख दिल्ही ह्मणोन ऐकिलें तरी स्वामींनीं आह्मांस खेळावयास पाठविली पाहिजे. चिरंजीव मानसिंग यास गारभाडें (?) कुलाबीयांतून आणविलें पाहिजे. बहुत काय लिहिणें हे विनंति.

[ लेखांक २०८ ] श्री.

तीर्थस्वरूप महाराज राजश्री बावा स्वामी वडिलांचे सेवेसीः—

अपत्यासमान बालकें सौभाग्यवती वज्रचूडेमंडित राधूबाई थोरात कृतानेक दंडवत. विज्ञप्ति ऐसीजेः—स्वामींनीं कृपावंत होऊन राजश्रीस आशीर्वादपत्र पाठविलें, उत्तम समयीं प्रविष्ट होऊन अर्थ कळों आला.

ऐसेंच निरंतर आशीर्वादपत्रीं सांभाळ करावा. ते पत्रीं कुणबिणीचा मजकूर लिहिला, ऐशास आपण स्वामींच्या दर्शनास येतों. समागमें घेऊन येऊं. त्वरित येतों. कितेक अर्थ राजश्रींनीं लिहिला. प्रविष्ट होईल. विशेष काय लिहिणें, कृपा निरंतर असों दीजे हे विनंति.

स्वामी कुलाबीयासी जाणार असत असें विदित जालें, ऐशास ते प्रांतीं मोत्यें व पोवळीं उत्तम असत. आपणास कृपा करून घेऊन आलें पाहिजे. हे विनंति.

स्वामीकारणें खडावांचा जोड १ एक पाठविला आहे. त्याचा अंगीकार केला पाहिजे. आपण दीपवाळीकारणें दर्शनास येऊं. कळलें पाहिजे. बहुत काय लिहिणें हे विनंति.

## १३ सूर्यवंशी.

[लेखांक २०९] श्री.

श्रीमत् सकल तीर्थस्वरूप राजश्री श्रीगुरु स्वामी स्वामींचे सेवेसीः—

विनंति सेवेसी आज्ञाधारक सुभानजी नाईक सूर्यवंशी कृतानेक विज्ञापना. येथील क्षेम तागाईत छ २७ सफरपावेतों वर्तमान यथास्थित असे. यानंतर कृपा करून पत्र पाठविलें तें पावलें. तेथें आज्ञा जे, प्रांत शिराळे येथें देशचौगुलकीचा उपद्रव होतो, तेथें रोंखा पोखा न करणें ह्मणून आज्ञा. त्यासी वतनदारी पेशा आहे, याकरितां वतनदारीच्या नात्यानें रोंखा करावा लागतो. त्यास त्याचा ऐवज एखादे जागां स्वामींनीं एखादीयास देविला तरी देऊं. परंतु वतनी पेशा मना न करावी. ताकीद करून वतनी हकदक जो होईल तो व इनाम देविला पाहिजे. आह्मी कांहीं स्वामींचे पायाशीं XXतार्थ नाहीं. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

## १४ सोमवंशी.

[लेखांक २१०] श्री.

तीर्थस्वरूप चैतन्यरूप परमहंस स्वामींचे सेवेसीः—

विनंति सेवक दावलजीराव सोमवंशी सरलष्कर दंडवत. विनंति उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लेखन आज्ञा केली पाहिजे. विशेष. स्वामींनीं पत्र पाठविलें तें मस्तकीं वंदिलें. तेथें आज्ञा कीं, श्रीचे आह्मांकडील पांचशें रुपये व राजश्री निंबाजीबावाकडील रुपये दोनशें, ऐसीयास आह्मांकडील रुपये पांचशें पैकीं राजश्री जिवाजीपंत कारकून याजबराबरी रुपये २७५ पावणें तीनशें पाठविले असती. बाकी रुपये सवादोनशें राजश्री सखो महादेव सरसुभेदार यांजकडे ऐवज देविला आहे. तो ऐवज स्वामींस सत्वरींच प्रविष्ट करितील. स्वामींस वस्त्र शेला शुभ्र पाठविला आहे. घेतला पाहिजे सदैव सेवकावरी दया करून सेवकाचें अभीष्ट होय तें केलेंपाहिजे. आह्मी सर्वस्वें स्वामींचे आहों. आह्मांस महदाश्रय स्वामींचा आहे. तेथें फार ल्याहावें ऐसें नाहीं. सेवेसी श्रत होय हे विज्ञापना.

[लेखांक २११] श्री.

श्रीमत् परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

सेवक हैबतराव सोमवंशी चरणावर मस्तक ठेवून साष्टांग दंडवत विनंति. येथील क्षेम पौष वद्य दशमी स्वामींच्या आशीर्वादें यथास्थित जाणून स्वकुशललेखन आज्ञा केली पाहिजे. विशेषः—श्रीचे रुपये शंभर पाठवावे ह्मणून आशीर्वादपत्रीं आज्ञा केली. तरी सत्वरच सप्तऋषींस येणें आहे. तदोत्तर दर्शनास येऊन प्रविष्ट करूं. निरंतर आशीर्वादपत्रीं सेवकावर कृपावृद्धि करावी. संक्रमणाचे तीळ युक्त शर्करा पाठविली ते पावली. हे विज्ञापना.

## १५ शिर्के.

[लेखांक २१२] श्री.

श्रीमत् तपोनिधि परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

सेवक कानोजीराजे शिर्के कृतानेक साष्टांग दंडवत विज्ञापना. स्वामींनीं पत्र पाठविलें तें पावोन परम समाधान जाह्लें. ऐसीया आपण लिहिलें कीं, " शिर्के ह्मणजे राजे. तुह्मांस अभिमान निःसीम असावी. तुह्मांस जो आह्मीं बीजमंत्र सांगितला आहे जे, आपाजी आंगरे व तुह्मी एकहातें होऊन सौभाग्यवती बाईजवळ बोली करून कार्य करणें, ह्मणजे तुमचें कार्य फळास येईल. खर्चावेंचाचें संकट बाईस न घालणें. बाईजवळ पैका मागता, तेणेंकरून तीस संकट पडोन कामाची पायमल्ली होते" ह्मणून लिहिलें, त्यास आह्मी तेथें आलों तेव्हां स्वामींनीं आह्मांस जें सांगणें तें सांगितलें. त्यावरून छत्रपति स्वामींपाशीं चार गोष्टी बोलणें ते बोलिलों. त्यावरून त्यांणीं आज्ञा केली कीं तुह्मी जें बोलणें तें वाडीयामध्यें बोला. त्यास आह्मी वाडीयामध्यें जाऊन सौभाग्यवती बाईजवळ बोलों लागलों तों आमच्या गोष्टी त्यांच्या चित्तास न ये. त्यावरून त्यांचा आमचा बनाव बसेना. ऐसीयास आमचें मन उदास जाह्लें. त्यावरून आह्मी निघोन ( फाटलें आहे ) असतें...............तरी या पत्राचें उत्तर सत्वर पाठवणें. सविस्तर वर्तमान राजश्री बाळाजी हरी मुखजबानीं सांगतां कळों येईल. बहुत काय लिहिणें, कृपालोभ करीत असिलें पाहिजे. सेवेसी हे विज्ञापना.

[लेखांक २१३] श्री.

हरिभक्तिपरायण राजमान्य राजश्री बावा स्वामींचे सेवेसीः—

विनंति सेवक जैसिंगराजे शिर्के दोनी कर जोडून चरणावरी मस्तक ठेऊन शिरसाष्टांग दंडवत विनंति उपरी येथील क्षेम जाणून स्वकीय

कुशल लेखन करावयासी आज्ञा केली पाहिजे. विशेष. स्वामींनीं सेवकावरी कृपादृष्टि करून आशीर्वादपत्र पाठविलें तें पावोन बहुत संतोष जाहला. आणि आपण भेटीस येणें ह्मणून आज्ञा केली. त्यास दर्शनास यावें हें आमचे चित्तांत आहे. परंतु तीर्थस्वरूप राजश्री कुवरजी बावांस शरीरास सावकाश वाटत नाहीं. याजकरितां प्रस्तुत यावयाची अनुकूलता होत नाहीं. तीर्थरूपास शरीरास समाधान जाहलीयावरी स्वामींचे दर्शनाचा लाभ घेतला जाईल. स्वामींचें देणें रुपये चारशें त्यापैकीं तूर्त आपणाकडील रुपये २०० दोनशें भिकाजी संखपाळ याजबरोबर पाठविले आहेत. बाकी राहिले तेही तरतूद करून लवकरीच प्रविष्ट करितों. कळलें पाहिजे. स्वामींनीं इतका प्रसंग पूर्वीं विषादेंकरून ल्याहावा ऐसा अर्थ नव्हता. परंतु वडिलांनीं आशीर्वादपत्र पाठविलें त्यावरून समाधान जाहलें. बाकी ऐवज लवकरीच पोहोंचेल. बहुत काय लिहिणें, लोभ असों दीजे हे विनंति.

## १६ प्रतिनिधि.

[ लेखांक २१४ ] ॥ श्री आई आदिपुरुष* ॥

श्रीमत् परमहंस राजश्री बावा स्वामींचे सेवेसीः—

सेवक श्रीनिवास[1] परशराम प्रतिनिधि कृतानेक नमस्कार विनंति येथील कुशल जाणून स्वकीय लेखन करीत असलें पाहिजे. विशेष. आपण पत्र पाठविलें तें प्रविष्ट जालें. कित्येक पूर्वील कथा लिहिली

---

* "श्री आई आदिपुरुष" हें प्रतिनिधींच्या प्रत्येक पत्राच्या शिरोभागीं लिहिलेलें असतें. ह्याचें कारण हे मुळचे औंध ता० कोरेगांव येथील राहणारे असून तेथील देवीचे भक्त होते. त्यामुळें त्यांचें कुलदैवत तेथील देवी हें आहे. त्याचेंच दर्शक "श्री आई आदिपुरुष" असें पत्रावर लिहिण्याचा सांप्रदाय आहे.

१ श्रीनिवास परशरामः—परशराम त्रिंबकाचे दुसरे चिरंजीव व दुसरे प्रतिनिधि. ह्यांस श्रीपतराव असेंही ह्मणत. कारकीर्द इ. स. १७१८–इ. स. १७४६.

आणि "परशरामीं तुह्मीं ब्राह्मण दुसऱ्याचे बोलें ठेविला; तो नानाप्रकारचीं कर्मे करितो. आपले चित्तीं भांडारगृह बांधावें, आणखी इमारत श्रीची चालवावी हा हेतु होता. त्यास, तो तेथें राहून अधिपति जाहला असतां आपण काय करणें"? ह्मणून कित्येक विषादें लिहिली, तरी आह्मीं त्या ब्राह्मणास कांहीं तेथें ठेविला नाहीं. अथवा आह्मांस कोणीं सांगितलेंही नाहीं. आह्मांस त्याचें अगत्य आहे ऐसें नाहीं. आपल्यापेक्षां आह्मांस तो अधिक काय आहे? आपण त्यास लावून द्यावें. त्याचा कांहीं आह्मांस दुराग्रह सर्वथा नाहीं. आपण नाहक आमचा संशय धरून चित्तांत विपर्यास आणावासा नाहीं. आमचे चित्तीं तिळतुल्य नाहीं. छ. १२ रबिलावल. आह्मी कांहीं कजियांत नाहीं. तुह्मी आणि तो जाणे. आंगरीयानें त्याची हिमात केली तरी आम्हीं काय करावें? आंगऱ्या आमच्या हुकुमांत आहे ऐसें नाहीं. आपण समर्थ आहां. जें चित्तास येईल तें करावें. हे विज्ञापना.

[लेखांक २१५] ॥ श्री आई आदिपुरुष ॥

सकल तीर्थस्वरूप राजश्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसी:—

अपत्यवत् श्रीनिवास परशराम प्रतिनिधि सा॰ नमस्कार. विनंति उपरी येथील कुशल ता॰ छ॰ १॰ जमादिलावलपर्यंत स्वामींचे आशीर्वादेंकरून सुखरूप असों. विशेष. आपण आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन मस्तकीं वंदून संतोष जाहला. श्रीचा प्रसाद श्रीफल पाठविलें तें प्रविष्ट जाहलें. श्रीकडे गांव इनाम सहा आहेत. त्यांच्या सनदा द्याव्या ह्मणजे श्री कार्यसिद्धि करील ह्मणून लिहिलें, त्यावरून सनदा दिल्ह्या आहेत. याउपरी सत्वर कार्यसिद्धि होय तें स्वामींनीं केलें पाहिजे. श्रीस वस्त्र आठ पाठविलीं आहेत, तीं श्रीस लावावीं ह्मणोन लिहिलें, तरी स्वामींचे आज्ञेप्रमाणें वस्त्रें प्रविष्ट होतांच श्रीस लाविलीं. विदित जालें पाहिजे. कृपा केली पाहिजे. हे विज्ञापना.

[लेखांक २१६]    ॥ श्री आई आदिपुरुष ॥

श्रीमत् परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

विनंति सेवक श्रीनिवास परशराम चरणावरी मस्तक ठेवून वि-ज्ञापना ता० चैत्र शुद्ध द्वितीयापर्यंत स्वामींचे कृपादृष्टीकरून यथा-स्थित असो विशेष. स्वामींनीं आशीर्वाद खंडोजीहस्तें सांगोन पाठ-विला. आज्ञा केली कीं, नीरा नदीस पूल बांधणें इच्छा आहे. सेवेसी राजश्रींची आज्ञा घेऊन उत्तर पाठवावें ह्मणून. त्यास, कित्येक राजक्रां-तीचा मजकूर प्रस्तुत काळीं आला आहे, त्याजमुळें हा विचार न करावा ऐसें राजश्रींच्या चित्तास येतें. येविशीं कित्येक सांगणें तें खंडूजीस सांगितलें आहे. विदित करील. त्याजवरून कळोन येईल. हे विज्ञापना.

[लेखांक २१७]    ॥ श्री आई आदिपुरुष ॥

श्रीमत् परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

विनंति सेवक श्रीनिवास परशराम प्रतिनिधि कृतानेक विज्ञप्ति. ये-थील कुशल जाणून स्वकीय लेखन केलें पाहिजे. विशेष. आपण पत्र पाठविलें तें प्रविष्ट जालें. लिहिलें वर्तमान कळों आलें. पाथरवटाचा मजकूर लिहिला तरी येविसींचा विचार आपणाकडील कारकून सां-गतां विदित होईल. पांचशें रुपयांचा मजकूर लेख केला, त्यास चैत्रमासीं आह्मी आपल्या दर्शनास येऊं ते समयीं घडून येईल. हे विनंति.

[लेखांक २१८]    ॥ श्री आई आदिपुरुष ॥

श्रीमत् सकल तीर्थस्वरूप राजश्री बावा स्वामींचे सेवेसीः—

अपत्यवत् श्रीनिवास परशराम प्रतिनिधि सा० नमस्कार. विनंति उपरी येथील वर्तमान कार्तिक शुद्ध प्रतिपदा रविवारपर्यंत स्वामींचे दयेंकरून यथास्थित जाणून स्वकीय कुशल लेखन करून संतोष-वित असलें पाहिजे. विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट

होऊन लेखनार्थ अवगत जाहला. मौजे वीरमाडें येथें पालखीपट्टी रुपये चाळीसांचा रोखा जाला आहे तो मना केला पाहिजे ह्मणून लिहिलें, तरी आह्मांकडून रोखा जाहला नाहीं व पट्टीही केली नाहीं. राजश्रींनीं पालखीपट्टी केली आहे. त्यांची आज्ञा रा० मोरो जिवाजी यांस जाली आहे. हुजुरून रोखा केला तो आह्मांस रदबदल करितां कामास येत नाहीं. आह्मांकडून स्वामींच्या गांवांस कोणे-विशीं उपसर्ग लागत नाहीं. परभारें स्वामींनीं राजश्रींस लिहून पाठ-विलें पाहिजे. बहुत काय लिहिणें हे विज्ञप्ति.

[लेखांक २१९] ॥ श्री आई आदिपुरुष ॥

श्रीमत् परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

सेवक श्रीनिवास परशराम प्रतिनिधि नमस्कार विनंति येथील कुशल जाणून स्वकीय लिहीत गेलें पाहिजे. विशेष. माहुली संगमीं श्री देवाचे इमारतीस बाटाचे खरेदीबद्दल आपाजी कासार याजकडे पैका दिला. त्याणें बाट बैल भरून पुढें रवाना केले, ते माहुलीस इमार-तीकडे कोठीस घेतले. ऐसें असतां आपाजी कासार यासी तुह्मीं नेऊन बसविला आहे ऐसें कळों आलें. तरी त्यास बसवावयास प्रयोजन काय आहे? बाटांकरितां काम तटलें होतें, यास्तव जे बैल आले ते कोठीस माप घेतलें. त्याचा अपराध नसतां बैसवावें ऐसें नाहीं. याउपरी त्यास सोडून देणें. बहुत काय लिहिणें हे विज्ञापना.

[लेखांक २२०] ॥ श्री आई आदिपुरुष ॥

श्रीमत् परमहंस स्वामींचे सेवेसीः—

चरणरज श्रीनिवास परशराम सा० नमस्कार विज्ञप्ति. येथील क्षेम ता० वैशाख शुद्ध चतुर्थी गुरुवासर स्वामींचे दयेंकरून क्षेम असो. यानंतर स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन अभिप्राय कळों आला. ऐसेंच निरंतर आशीर्वादोक्त पत्र प्रेषून बालकाचा

परामर्ष करीत गेलें पाहिजे. धावडशी, आनेवाडी, व इडमिडें ( वीरमाडे ) हे तीन्ही ग्राम श्रीचे. तेथें उपद्रव करून ऐवज घेतला हे गोष्ट अनुचित आहे. पैका माघारा श्रीस देवणें ह्मणून आज्ञा. तरी, श्रीचे ग्रामींचा पैका माघारा द्यावा हे गोष्ट यथार्थच; परंतु यंदा मुलकांत सर्वत्र वळवा पडला. येथें फौज ठेविली त्याची बेगमी जाली पाहिजे. याजकरितां सर्वत्र मुलकांत पट्टी केली. त्याप्रमाणें याही गांवावरी राजश्रींनीं पट्टी घालून वसूल घेऊन लष्करचे बेगमीस ऐवज देविला. तो आतां माघारा येतो ऐसा अर्थ नाहीं. बरें. जें जालें तें जालें. स्वामींचे आज्ञेवरून ह्याउपरी तीन गांवांस उपद्रव लागणार नाहीं. रोखापत्रही होणार नाहीं. येविशीं राजश्रींनींही सेवेसी विज्ञप्ति लिहिली आहे. त्यावरून कळों येईल. स्वामींनीं समाधान असों दिल्हें पाहिजे. कृपा केली पाहिजे हे विज्ञप्ति.

[लेखांक २२१] ॥ श्री आई आदिपुरुष ॥

श्रीमत् सकल तीर्थस्वरूप राजश्री स्वामी स्वामींचे सेवेसीः—

विनंति सेवक कृष्णाजी[१] परशुराम कृतानेक साष्टांग नमस्कार. विनंति. सेवकाचें वर्तमान स्वामींच्या आशीर्वादें यथास्थित असें. यानंतर स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें पावलें. मौजे डोरलें व महालुंगे या दोनही गांवच्या रयता धरून नेल्या आहेत त्याविशीं स्वामींनीं आज्ञा केली. तरी स्वामींचे आज्ञेनुरूप आह्मांस दुसरें अवश्य काय आहे? स्वामींचे आज्ञेप्रमाणें चिरंजीव रा॰ बाबूराऊ यास पत्र लेहून मुजरद् मनुष्य रवाना केलें आहे. दोनी गांवचीं कुळें जे काय धरून नेलीं असतील ते सोडून देतील. अंतर आहे ऐसें नाहीं. चिरंजीवासही स्वामींची आज्ञा प्रमाण. आपले आज्ञेविरहित आह्मीं

१ कृष्णाजी परशुरामः–श्रीनिवासरावाचे वडील बंधू. हे कोल्हापूरचे प्रतिनिधि व विशाळगड संस्थानचे मूळपुरुष होत.

नाहीं. यंदाचे वर्षीं आह्मांवर कसाला पडला तो आपल्यास विदित आहे. यामुळें चिरंजिवापासून अंतर पडिलें आहे. स्वामींनीं क्षमा करून दया केली पाहिजे. बहुत काय लिहिणें ? लोभ असों दीजे हे विनंति.

[ लेखांक २२२ ] ॥ श्री आई आदिपुरुष ॥

श्रीमत् परमहंस सच्चिदानंदकंदभृगुनंदनस्वरूपेभ्यां स्वामींचे सेवेसी–

चरणरज शिवराम[1] कृष्ण साष्टांग नमस्कार विनंति येथील क्षेम ता० पौष शुद्ध प्रतिपदापर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून यथास्थित असे विशेष. स्वामींनीं बहुत दिवशीं स्मरणपुरस्सर आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन दर्शनातुल्य हर्ष जाहला. ऐसेंच सतत आशीर्वादपत्र पाठवून परामर्ष करीजेत असलें पाहिजे. यानंतर गांवचा अर्थ आज्ञापत्रीं लिहिला, ऐशास प्रस्तुत तीर्थस्वरूप रा० आणा सप्तऋषींस[2] तीर्थस्वरूप रा० राऊ स्वामींच्या दर्शनास गेले आहेत. त्यांचें आगमन स्वस्थळास जाहल्यानंतर येविषयींचा अर्थ निवेदन करून सेवेसी विनंतिपत्र पाठविलें जाईल. स्वामींनीं प्रसादयुक्त तिवट पाठविलें तें प्रविष्ट जाहलें. आपले आज्ञेपेक्षां विशेष काय आहे ? बहुत काय लिहिणें, लोभ असों दीजे हे विनंति.

## १७ सचीव.

[ लेखांक २२३ ] श्री.

तीर्थरूप श्रीमत् परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

चरणरज नारो[3] शंकर सचीव साष्टांग नमस्कार विनंति स्वामींच्या

---

१ शिवराम कृष्णः–कृष्णाजी परशुराम यांचे चिरंजीव.

२ सप्तऋषिः–सातारा.

३ नारो शंकर सचीवः-भोरचे पंतसचीव. कारकीर्द प. स. १७०७ ते इ. स. १७३७.

आशीर्वादें करून फाल्गुन शुद्ध त्रयोदशी वर्तमान कुशल असे विशेष. स्वामींनीं पत्र पाठविलें तें प्रविष्ट झालें. राजश्री पंताजी करिंदे (?) यानें अधिकाराविसीं कित्येक विषदें आज्ञा लिहिली, ऐसीयास सांप्रत उभयतां राजश्री स्वामींचीं दर्शनें परस्परें जालीं आहेत. कारभाराचा दंगा जाहला आहे. यामध्यें धंद्याचा निकाल निघतो ऐसें नाहीं. अखेर सालीं ये गोष्टीचा विचार राजश्री स्वामींस श्रुत करून काढूं. अखेर सालीं त्यास आह्मांकडे पाठवावें. विदित जालें पाहिजे. कृपा वर्धमान केली पाहिजे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[ लेखांक २२४ ] श्री.

महाराज श्री परमहंस स्वामींचे सेवेसीः—

चरणरज नारो शंकर सचीव कृतानेक साष्टांग नमस्कार. विनंति. ताा० आषाढ शुद्ध चतुर्थी पावेतों स्वामींच्या आशीर्वादें येथील वर्तमान यथास्थित असे विशेष. स्वामींनीं अंतोजी पाथरा याहस्तें पत्र पाठविलें तेथें पैक्याविशीं लिहिलें. ऐसीयास सांप्रत गैरहंगाम यामुळें बहुतसी ओढी जाली आहे. ते पत्रीं लिहितां पुरवत नाहीं. स्वामी रागास येतील याकरितां रु० २५ पंचवीस अंतोजीहस्तें पाठविले आहेत, ते घेतले पाहिजेत. वरकड राहिला ऐवज हंगामशीर कार्तिक मार्गेश्वरमासीं स्वामींस प्रविष्ट करूं. कृपा वर्धमान असों दिल्ही पाहिजे. हे विनंति.

[ लेखांक २२५ ] श्री.

महाराज श्री परमहंस स्वामींचे सेवेसीः—

विनंति सेवक चिमणाजी[१] नारायण सचीव विज्ञापना विशेष. येथील वर्तमान आश्विन वद्य ८ पर्यंत श्रीचे कृपेंकरून यथास्थित असे. यानंतर

---

१ चिमणाजी नारायणः—नारोशंकराचे दत्तक पुत्र. कारकीर्द इ. स. १७३७ ते इ. स. १७५७.

आपण आशीर्वादपत्र खंडोजीहस्तें पाठविलें तें उत्तम समयीं प्रविष्ट होऊन लिहिलें अवगत जालें. आज्ञा जे, बैलाचें दस्तक साल मजकुरचे पाठविणें ह्मणून. त्यावरून दस्तक खंडोजी हस्तें सेवेसी पाठविलें आहे. त्यावरून विदित होईल. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

## १८ पुरंदरे.

[लेखांक २२६] श्री.

श्रीमत् महाराज राजश्री परमहंस बावा स्वामींचे सेवेसीः—

चरणरज मल्हार तुकदेव[1] कृतानेक साष्टांग नमस्कार. विनंति उपरी स्वामींच्या आशीर्वादेंकरून तागाईत श्रावण[2] शुद्ध चतुर्थी भृगुवासरपर्यंत कुशल असो विशेष. राजश्री स्वामींनीं मजला फलटणास पाठविलें होतें त्यास काल गुरुवारीं सायंकाळीं सातारियास आलों. श्रीमंत राजश्री पंतप्रधान यांनीं महाराजांस पत्र पाठविलें तें सेवेसी पाठविलें आहे. त्यावरून विदित होईल. पोताहून ऐवज स्वामींकडे देविला.

रुपयेः—१५०० बाबत हताले तळें. पूर्वील संकल्प रुपये ३५०० साडेतीन हजार पैकीं पावले रुपये २००० दोन हजार. बाकी ५०० उसणें लिंबाजी सांवत सन सीत एकूण २०००.

एकूण दोन हजार रुपये पोत्यास लाखोटे करून ठेविले. नदीस पाणी याकरितां पाठविले नाहींत. महाराजांनीं आज्ञा केली तर पाठवून देऊं. सेवेसी श्रुत होय. फलटणास जातांना मार्गी विहीर पाहिली. उत्तम

---

१ मल्हार तुकदेवः—ह्यांचें उपनांव पुरंधरे. हे अंबाजीपंत पुरंधरे पेशव्यांचे मुतालीक ह्यांच्या वडील बंधूंचे पुत्र. हे दादोबा ह्या नांवानें प्रसिद्ध आहेत. हे पेशव्यांच्या वतीनें शाहूच्या दरबारांत पुष्कळ वर्षें होते. त्यांचे चिरंजीव धोंडोपंत हे दिल्लीस वकील होते. धोंडो मल्हार यांचेकडून दिल्लीच्या राजकारणांचीं पेशव्यांस पत्रें येत असत.

२ श्रावण शुद्ध ४ भृगुवासरः—ता. ११ जुलई इ. स. १७३५.

काम झालें. पाणी उत्तम आहे. महाराजांनीं बहुत उत्तम गोष्ट केली. मार्गावर विहीर, बहुत लोक मार्गानें येतात, महाराजांची कीर्ति वर्णितात. सेवेसी श्रुत होय विज्ञापना. सौभाग्यादिसंपन्न वज्रचूडेमंडित विरूबाई साहेब यांचें पत्र पुणियास स्वामींनीं पाठविलें होतें तें पत्र माघारें आलें. तें सेवेसी पाठविलें असे. विज्ञापना.

[लेखांक २२७] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

चरणरज मल्हार तुकदेव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति. येथील कुशल तागाईत छ १६ सफर पावेतों स्वामींच्या आशीर्वादेंकरून वर्तमान यथास्थित असे विशेष. तीर्थरूप राजश्री आपा स्वामींनीं वसई फत्ते केली. त्यांचीं पत्रें स्वामींस आलीं तीं स्वामींकडे रवाना केलीं आहेत. त्यांजवरून सेवेसी निवेदन होईल. सेवेसी श्रुत होय विज्ञापना.

[लेखांक २२८] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

चरणरज मल्हार तुकदेव कृतानेक साष्टांग नमस्कार. विनंति उपरी येथील कुशल तागाईत छ[2] १६ सवाल गुरुवारपर्यंत स्वामींच्या आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. स्वामींनीं दोन आशीर्वादपत्रें सोमाजी घाणेकराबरोबर पाठविलीं तीं प्रविष्ट होऊन लेखनार्थश्रवणें आनंदावाप्ति झाली. तीर्थरूप राजश्री नानांकडील वर्तमान फत्तेचें

---

१ छ० १६ सफरः—ता. १४ मे इ. स. १७३९ सोमवार. वसईहून चिमाजी आपांनीं स्वामींच्या नांवचीं जीं पत्रें पाठविलीं तीं प्रथम दादोबाकडे पुण्यास पाठविलीं होतीं त्याप्रमाणें तीं त्यांनीं स्वामींकडे रवाना केलीं असें ह्या पत्रावरून व्यक्त होतें.

२ छ० १६ सवाल गुरुवारः—ता. २३ जानेवारी इ. स. १७४१. मोडकांच्या जंत्रीमध्यें ह्या तारखेस शुक्रवार दिला आहे. तथापि हें पत्र ह्याच सालांतील आहे ह्यांत शंका नाहीं.

आलें असेल तर त्याहावयासी आज्ञा केली, तर तीर्थरूप राजश्री नानांचीं पत्रें छ ३ सवालचीं कासारबारी पलीकडून पिंपरखेडचे मुक्कामीहून आलीं होतीं. तेथें लिहिलें कीं राजश्री बाबुराव मल्हार नबाब निजा-मन्मुलुक यांजकडे पाठविलें आहेत. आपणही जामनेर वरणगांवचे रोखे जाणार. फौज जमा झाली. आणखीही वरचेवर जमा होतच आहे. ह्मणून लिहिलें आहे. स्वामींस कळावें यास्तव लिहिलें आहे. सेवेसी श्रुत होय विज्ञापना.

[ लेखांक २२९ ] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

चरणरज मल्हार तुकदेव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति उपरी येथील कुशल तागाईत छ[1] १४ रबिलाखर सौम्यवासरपर्यंत स्वामींचे आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. सोमाजी घाणेकर भेटला. त्याणें सांगितलें कीं, परवांचे दिवशीं श्रीचें आगमन धावडशीस झालें ह्मणून. ऐकोन परमानंद झाला. विदित व्हावें. राजश्री स्वामींनीं आ-ह्मांस आग्रहेंकरून पालखींत बसावयाची आज्ञा केली. त्याजवरून [2]आषाढ शुद्ध त्रयोदशी इंदुवारीं पालखींत बसावयाचा मुहूर्त केला. सर्व फळादेश स्वामींच्या आशीर्वादाचा आहे. सेवेसी कळावें यास्तव लिहिलें आहे. विदित झालें पाहिजे. सेवेसी श्रुत होय विज्ञापना.

[ लेखांक २३० ] श्री.

श्रीमंत महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

चरणरज मल्हार तुकदेव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति उपरी येथील कुशल फाल्गुन [3]बहुल षष्ठीपर्यंत स्वामींच्या आशीर्वादेंकरून

१ छ० १४ रबिलाखर सौम्यवासरः—ता. १७ जून इ. स. १७४१ बुधवार.

२ आषाढ शुद्ध त्रयोदशीः—ता. १५ जून इ. स. १७४१, सोमवार.

३ फाल्गुन बहुल षष्ठीः—ता० ५ मार्च इ. स. १७४३.

यथास्थित असे विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र कृपाळू होऊन पाठविलें तें आजच पावलें. तीर्थरूप राजश्री नाना व राजश्री सदोबाकडील वर्तमान ल्याहावयाविशीं आज्ञापिलें, तर तीर्थरूप राजश्री नानांचीं पत्रें छ १ जिल्हेजचीं जगमनपूर कालिंदीतीर येथील मुकामीचीं छ १३ मोहरमीं आलीं. तेथें लिहिलें आहे कीं, प्रयागीं श्री गंगास्नान करून माघारें फिरणें होईल. पटण्याकडून स्वारी करून येऊं ऐसें लिहिलें आहे. सांप्रत वर्तमान कळत नाहीं. कोणे स्थळीं आहेत, कोठपावेतों गेले, तें लिहून येईल तेव्हां सेवेसी लिहून पाठवूं. पहिलें वर्तमान आलें तें सेवेसी लिहिलें आहे. तीर्थरूप राजश्री सदाशिवपंत भाऊ श्री गोदास्नान श्री त्र्यंबकीं करून हुताशनीकारणें पुण्यास येणार होते. ते पुण्यास येऊन दाखल झाले कीं कोणे ठिकाणीं आहेत हें सांप्रत कांहीं त्यांचें लिहिलें आलें नाहीं. सेवेसी वर्तमान कळावें यास्तव लिहिलें आहे. विदित झालें पाहिजे. राजश्री सदाशिवपंत हुताशनीकारणें पुण्यास आले. सेवेसी कळावें. सेवेसी श्रुत होय विज्ञापना.

[लेखांक २३१] श्री.

श्रीमत् परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

चरणरज मल्हार तुकदेव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत छ १५ जिल्हेजपर्यंत स्वामीआशीर्वादेंकरून वर्तमान यथास्थित असे विशेष. स्वामींनीं बाळकोजी पांडा याजबरोबर आशीर्वादपत्र पाठविलें तें पावलें. स्वामींची आज्ञा कीं आपला ऐवज पोता आहे, त्यापैकीं कर्ज राजश्री रामाजी नाईक कानडे वस्ती पुणें मार्फत त्रिकम शेट गोविंदजी यांस रुपये पांच हजार देणें ह्मणून आज्ञा. त्याजवरून रुपये ५००० पांच हजार त्रिकम शेट गोविंदजी

---

१ छ. १ जिल्हेजः–ता. १७ जानेवारी इ. स. १७४३ सोमवार.

२ जगमनपूरः–हें यमुनेच्या कांठीं जालवण जिल्ह्यांत एक गांव आहे.

गुजर याचे पदरीं बाळकोजी पांडा याचे गुजारतीनें घातले असेत. सदरहू ऐवज स्वामींनीं अंताजी तळेकर जामदार याजपाशीं सोळा हजार सवाऱ्याऐशीं रुपये पोता ठेविले. त्यापैकीं पांच हजार रुपये सदरहू देविले ते दिले असेत. सेवेसी विज्ञापना.

[लेखांक २३२] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

चरणरज मल्हार तुकदेव कृतानेक साष्टांग नमस्कार. विनंति उपरी येथील कुशल तागाईत छ १८ रमजानपर्यंत स्वामींच्या आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र कृपाळूपणें पाठविलें तें पावलें. लेखनार्थश्रवणें आनंदावाप्ति जाहली. राजश्री सयाजी कनोजे याविशीं आज्ञापिलें तर पूर्वील आज्ञेनें पुण्यास तीर्थरूप राजश्री नानांस लिहून पाठविलें होतें त्याचें उत्तर कालच सायंकाळीं आलें. तें वर्तमान सेवेशी लिहून पाठविणार तों स्वामींचेंही आशीर्वादपत्र आलें. त्याजवरून तीर्थरूप राजश्री नानांचें उत्तर सेवकास आलें त्याची नक्कल करून सेवेसी पाठविली आहे. त्याजवरून विदित होईल. तर स्वामींनीं सयाबास पुण्यास जावयाची आज्ञा करून आपलें पत्र देऊन पुण्यास रवाना करावें. पांचशें रुपये सालिना पावते करितील व दोन वस्त्रें देऊन समाधानपूर्वक चालवितील. स्वामींचे आज्ञेपेक्षां अधिकोत्तर काय आहे? सर्व स्वामींच्या आशीर्वादाचें आहे. विदित झालें पाहिजे. स्वामींनीं प्रसाद दाळिंब पक्क पाठविलें तें पावलें. उत्तम फळ आहे. सेवेसी श्रुत होय विज्ञापना.

[लेखांक २३३] श्री.

श्रीमत् महाराजश्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

चरणरज मल्हार तुकदेव कृतानेक साष्टांग नमस्कार. विज्ञापना तागाईत छ २२ मोहरम मुक्काम भिलवडी स्वामींच्या आशीर्वादेंकरून

कुशल असो विशेष. तीर्थरूप राजश्री पंतप्रधानस्वामींचें विनंतिपत्र स्वामींस आलें तें जासुदासमागमें सेवेसी पाठविलें आहे. त्यावरून सविस्तर विदित होईल. येथील वर्तमान तरी राजश्री उदाजी चव्हाण राजश्री स्वामींस छ० १८ मोहरमीं येऊन भेटले. बोलीचालीचा निश्चय कांहीं हा कालपर्यंत झाला नाहीं. सेवेसी कळावें यास्तव लिहिलें आहे. सदैव आशीर्वादपत्रीं सांभाळ केला पाहिजे. सेवेसी श्रुत होय विज्ञापना.

[ लेखांक २३४ ] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

चरणरज मल्हार तुकदेव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति उपरी येथील कुशल तागाईत छ ७ सफर[1] रविवार प्रातःकाळ मुक्काम रेठरें स्वामींचे आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन परमानंद जाहला. ताम्राचें व राजश्री प्रधानपंताकडील वर्तमान कळत नाहीं, तर लिहून पाठवणें, ह्मणून आज्ञा. ऐशास निजामन्मुलुक यांणीं सुनकें रान पाहून बितिंगागड आंवढ्याजवळ होता, त्यास मोर्चे लावून सत्तावीस दिवस गड झुंजला; शेवटीं घेतला. आणिक दुष्ट बुद्धि धरून कावनई किल्ल्यास मोर्चे लावावया फौज रवाना केली ह्मणून वर्तमान आलें आहे. निजामन्मुलुक नाशकासमीप देवळालीवर आहे. याउपरी कोणीकडे जाईल तें पाहावें. तीर्थरूप राजश्री नाना बुंदेलखंडांत गेलियापासून आह्मांकडे कांहीं कागदपत्र आला नाहीं. सेवेसी विदित झालें पाहिजे. राजश्री स्वामींचें आज येथून कूच होऊन तडसरावर गेले. याउपरी देवदर्शनास जेजुरीस चालिले. स्वामींस कळावें यास्तव लिहिलें आहे. स्वामींनीं श्रीचा प्रसाद पंचवीस केळें पाठविलीं तीं प्रविष्ट जाहलीं. विदित झालें पाहिजे. सेवेसी श्रुत होय विज्ञापना.

---

१ छ ७ सफर रविवारः—ता० ५ एप्रिल इ० स० १७४१.

[लेखांक २३५] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसी:—

चरणरज मल्हार तुकदेव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति उपरी येथील कुशल तागाईत श्रावण[1] बहुल दशमी इंदुवासरपर्यंत स्वामींच्या आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. स्वामींनीं खंडोजी साळवी याजबरोबर आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट जाहलें. तेथें आज्ञा कीं, राजश्री पंतप्रधान यांजकडील श्रीचा वर्षासनाचा ऐवज सालमजकुरचा एकसष्टशें रुपये पाठवून देणें ह्मणून. त्याजवरून श्रीमंत राजश्री पंतप्रधान यांजकडील सालमजकूर सन इसन्ने[2] आर्बैन मया अलफचे वर्षासनाचे रुपये ६१०० एकसष्टशें थैल्या भरून लाखोटे करून खंडोजी साळवी याबराबर ओझ्यास माणसें देऊन सेवेसी पाठविले आहेत. घेऊन पावलियाचें उत्तर श्रीमंत राजश्री पंतप्रधान यांस लिहिलें पाहिजे. सेवेसी श्रुत होय विज्ञापना.

[लेखांक २३६] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंस स्वामींचे सेवेसी:—

चरणरज अंबाजी त्रिंबक कृतानेक सा० नमस्कार विनंति उपरी स्वामींच्या आशीर्वादेंकरून ता० चैत्र[3] बहुल अष्टमी रविवासरपर्यंत कुशल असो विशेष. आजि दीड प्रहर दिवस आला ते समयीं राजश्री कृष्णाजी दाभाडे यांणीं राजश्री स्वामींस वर्तमान विदित केलें कीं, राजश्री पंतप्रधान यांचें व राजश्री त्रिंबकराव दाभाडे सेनापति यांचें युद्ध[4] चैत्र शुद्ध पक्षीं झालें. सेनापतीची फौज मोडिली. खासा राजश्री

---

१ श्रावण बहुल दशमी इंदुवासर:—ता० २४ आगस्ट इ० स० १७४१.

२ इसन्ने आर्बैन:—इ० स० १७४१।४२.

३ चैत्र बहुल अष्टमी रविवासर:—ता० १८ एप्रिल इ० स० १७३१.

४ हें डभोई येथील युद्ध होय. लेखांक २६ पहा.

त्रिंबकराव दाभाडे सेनापति कामास आले. आणिक कितेक दुतर्फा लोक कामास आले ह्मणून मोघम वर्तमान सांगितलें. तपशीलें कागदपत्र आले नाहींत. आलियावर स्वामींस लेहून पाठवूं. विदित झालें पाहिजे. कृपा केली पाहिजे. हे विज्ञापना.

[लेखांक २३७] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंस स्वामींचे सेवेसीः—

चरणरज अंबाजी त्रिंबक कृतानेक सा० नमस्कार विनंति उपरी स्वामींच्या आशीर्वादेंकरून ता० छ० २२ रजबपर्यंत कुशल असो विशेष. स्वामींनीं वेदमूर्ति राजश्री प्रभाकर जोशी या समागमें आशीर्वादपत्र पाठविलें, प्रविष्ट होऊन बहुत समाधान जाहलें. श्रीचा प्रसाद खजूर ८।. दहा शेर व सुपारी रोठे सुमारें ३५ पस्तीस व मीरें ८८॥ अच्छेर पाठविलीं तीं प्रविष्ट झालीं. स्वामींनीं पैक्याविसीं लिहिलें कीं ज्येष्ठ आषाढमासीं द्यावेसें मान्य केलें, परंतु सांप्रतच पैका पाठवून देणें. त्यास स्वामींची आज्ञा मान्य करून वे० राजश्री प्रभाकर जोशी यांसमागमें रुपये १००० एक हजार पाठविले आहेत. स्वामींनीं घेऊन पावल्याचें उत्तर पाठवून द्यावयाची आज्ञा केली पाहिजे. स्वामीपासीं आमचें पत्र ज्येष्ठ आषाढ मासीं हजार रुपये देतों ह्मणून पत्र लेहून पाठविलें होतें, तें पत्र आमचें माघारें जासुदापासीं दिल्हें पाहिजे. आह्मी स्वामींचे चरणरज सेवक असों. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक २३८] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

चरणरज महादाजी अंबाजी कृतानेक विज्ञापना ता० छ० २० जिल्हेजपर्यंत वर्तमान यथास्थित असे विशेष. कृपा करून पत्र पाठविलें तें प्रविष्ट जाहलें. संक्रमणाचे तीळ शर्करायुक्त पाठविले ते उत्तम समयीं

प्रविष्ट होऊन परम आल्हाद जाहला. प्रसाद कुडती व तिवट पाठ-विलें तें पावलें. पांचशें रुपये द्यावयाचा करार केला आहे त्यास पांचशे रुपये यंदाचे पाठवून देणें ह्मणोन आज्ञा. ऐशीयास स्वामींस आह्मीं हजार रुपये तीन वर्षांनीं देतों, त्याप्रमाणें हे पांचशें तीन वर्षांनीं द्याव-याचा करार आहे. त्याब्रमोजीब सेवेसी प्रविष्ट होतील. सर्वदा चरणरजावर कृपा असों द्यावी. पत्रीं सांभाळ करावा. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक २३९] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

चरणरज महादाजी अंबाजी कृतानेक विज्ञापना. येथील कुशल ता० अधिक बहुल पंचमीपर्यंत स्वामींच्या आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट जाहलें. कितेक अर्थ स्वामींनीं विशदें आज्ञापिला. त्यांत मुख्यार्थ हाच कीं तुह्मी दोन भाव धरितां. असो. कुडतीस पसमी थानें २ व दुलईस पसमी थानें ३ एकूण पांच व संजाब तापता गज ३ पाठवणें ह्मणोन आज्ञा. ऐशास स्वामी ईश्वरस्थानीं आहेत. स्वामींजवळ दोन भाव आह्मी धरूं हें सर्वथा होणें नाहीं. पसमी थानाविशीं व तापतीयाची आज्ञा, त्यास येविशीं श्रीमंतास विनंति केली. पसमी थानें समागमें आणिलीं नाहींत. स्वामींनीं आज्ञा केली त्याजवरून पुण्यास लिहिलें आहे. पसमी थानें व तापता येतांच सेवेसी पाठवून देतील. जिनसाचे अधिक पन्नास रुपये द्यावे होते ह्मणोन स्वामींनीं आज्ञा केली, त्यास श्रीमंताची दौलतच स्वामींच्या आशीर्वादाची. जें आहे तें सर्व स्वामींचें आहे. स्वामी पन्नास रुपये अधिक द्यावयाचें कां ह्मणतात? स्वामींच्या पायाव्यतिरिक्त श्रीमं-तास अन्य दैवत नाहीं. रामाजी पंचकुडवा तेलंग याजकडील सत्तावीस रुपये पाठवावयाची आज्ञा. त्यास रामाजी पंचकुडवा श्रीमं-ताकडे कोणी चाकर नाहीं, अगर कोण कोठील हेंही ठाव ठिकाण नाहीं. जरी तो चाकर असता तरी लक्षप्रकारें त्याजकडील रुपये उग-

विले जाते. सोमाजीच्या बहुमानास मागें पुढें पाहिलें ह्मणोन आज्ञा, तर स्वामींच्या चरणारविंदीं श्रीमंताचा अविनयभाव तिळतुल्य नाहीं. श्रीमंताजवळ सेवकलोक सेवा करितात ते स्वामींचेच सेवक आहेत व सोमाजीही पदरचाच आहे. त्याचा बहुमान न्हवेसें काय आहे? स्वामींनीं कृपा करून मध घागर १ पाठविली ती पावली. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

## जंजिरेकर हवशी.*

[लेखांक २४०] हु.

आजम अकरम ब्रह्मेंद्रबावा दाम षफकतहु.

मुषफक मेहेरबान एन्तेजाद दोस्तान अज दिल एखलास सिद्दी

---

* पंधराव्या शतकामध्यें बहामनी राज्य ज्या वेळीं स्वतंत्र झालें त्या वेळीं दिल्लीचा संबंध कमी होऊन अबिसीनियन व आफ्रिकन लोक हिंदुस्थानच्या पश्चिम भागांत जास्त शिरले. त्यांपैकीं हबशी हे होत. हबशी हें नांव Arab-el-Habish ह्यावरून पडलें. ह्या लोकांचें सिद्दी असेंही दुसरें नांव आहे. सिद्दी हा सय्यद शब्दाचा अपभ्रंश आहे. हे लोक आपल्या कर्तृत्वशक्तीनें नांवलौकिकास चढले व मोंगलबादशाहीमध्यें हे मुसलमानी आरमाराचे अधिपति झाले. ह्यांच्याकडे दंडाराजपुरी व जंजिरा हीं ठाणीं असत. ह्यांची सत्ता कमी करण्याकरितां शिवाजीच्या कारकीर्दीपासून मराठ्यांचा यत्न चालला होता. ह्यांच्या व मराठ्यांच्या अनेक वेळीं झटापटी झाल्या होत्या. ह्यांनीं मराठ्यांस फार त्रास दिला व त्यांच्या राज्यांतील हिंदु देवस्थानें वगैरे उद्ध्वस्त केलीं. ब्रह्मेंद्रस्वामी चिपळुणाजवळ परशरामीं जाऊन राहिले होते. त्यांना तेथें हबशांकडून उपद्रव पोहोंचल्यामुळें ते घांटावर आले. त्यांची योग्यता हबशांस व त्यांच्या सुभेदारांस चांगली समजल्यामुळें त्यांनीं त्यांस स्वस्थळीं आपल्या राज्यांत नेण्याबद्दल पुष्कळ प्रयत्न केला. त्यांचा व हबशांचा पत्रव्यवहार फार महत्त्वाचा आहे. त्यापैकीं जे कागद उपलब्ध झाले ते येथें सादर केले आहेत.

१ सिद्दी संबुलः—हा सिद्दी सुरूर ह्याचा गुलाम होता. हा इ० स० १७३४।३५ मध्यें जंजिऱ्याचा अधिपति होता असा उल्लेख सांपडतो.

संबुल सलाम बादज सलाम. मुख्य तात्पर्य कारण हें कीं, येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत असलें पाहिजे. यानंतर पूर्वी आपण हुजूर व आह्मांस पत्रें पाठविलीं होतीं, त्यांचीं उत्तरें आपणांस लिहून गेल्यापासून आजपर्यंत कांहींच आपण उत्तर लिहिलें नाहीं. हें स्नेहाचे ठिकाणीं योग्य नव्हे. निरंतर पत्राची वहिवाट ठेऊन मित्रतेची वृद्धि करावी हें योग्य आहे. ऐसीयास हल्लीं परशरामास पूर्वीप्रमाणें येऊन रहावयाचा मनोदय आहे ह्मणोन आपला निरोप विनायक जोशी व कृष्णशेट शेट्ये कर्यात चिपळूण यांचे सांगण्यावरून समजला. त्याजवरून हुजुर विनंति करून आपणास ठिकाणचे ठिकाणीं येण्याविशीं व पूर्वी इनामगांव आपण आल्यानंतर आपणाकडे चालवावयाचा हुकूम घेऊन लिहिलें जात असे. व याप्रकरणीं हुजुरूनही आपणास पत्र पाठविलें आहे. त्याजवरून समजण्यांत येईल. तरी आपण खातरजमेनें कोणतेंविशींही संशय न घेतां, परशरामीं ठिकाणचे ठिकाणीं येऊन सुखरूप पूर्वीप्रमाणें राहिलें पाहिजे. आपलें पूर्वीप्रमाणें अनेक तऱ्हेनें चालविलें जाईल. अंतर पडणार नाहीं. या प्रकरणीं सुभे अंजनवेलीसही हुकूम सादर जाला आहे. बहुत काय लिहिणें. रवाना छ० २० माहे साबान हे किताबत.

[ लेखांक २४१ ] हु.

आजम ब्रह्मेंद्रबावा महफूज बाषंद.

मोहबत व मवलीयत मजमु इबादत बादअज षौक आंके, बहुत दिवस जाले परंतु पत्र पाठविलें नाहीं. हें स्नेहाचे ठिकाणीं नीट नव्हे. उभय पक्षींची मित्रता पूर्वीपासोन चालत आली आहे, त्याप्रमाणें सांप्रतही उभय पक्षींचे मित्रतेचा मार्ग चालू ठेवून, पत्र पाठविण्याची वहिवाट असों द्यावी हें योग्य असे. यानंतर आपण धामधुमेचे सबबेनें

परशरामचे ठिकाणाहून वरघांटीं गेला. त्यास पांच वर्षे होत आलीं. सांप्रत ठिकाणचे ठिकाणीं यावयाचा मनोदय आहे ह्मणोन विनायक जोशी व कृष्णशेट शेट्ये कर्यात चिपळूण यांचे सांगण्यावरून निरोप आला. या प्रकरणीं रफअत व शहामतपनाह सिद्दी संबुल यांणींही विनंति केली. त्यावरून स्नेहाच्या रीतीनें लिहिलें जात असे कीं आपण आपले ठिकाणीं परशरामीं यावयाचें करून पूर्ववत् प्रमाणें सुखरूप रहावयाचें केलें पाहिजे. आल्यानंतर पूर्ववत् प्रमाणें इनामगांव आपणाकडे चालवावयाचाही हुकूम जाहला असे. सरकारांतून वडिलां-पासून आपलें चालविलें तसें हल्लींही हरएक बाबेंत चालविलें जाईल. येविशीं खातरजमा राखोन कोणतेहीविशीं सरोष अंदेशा मनांत आणूं नये. आपलें चालविण्याविशीं सुभेयासही हुकूम सादर केला आहे. बहुत काय लिहिणें. रवाना छ २० माहे साबान सन २१ जिलूस. हे किताबत.

[ लेखांक २४२ ] हु.

ब्रह्मेंद्रबावा हमेषा खुषवक्त बाषंदः—

मोहबत व मजमू इबादत मकान दोस्तान इस्तिजहार मखलिसान बादज दुवा सलाम खैरियत अंजाम माहवल मुराम आंके येथील कु-शल जाणून आपली कुशलता निरंतर लिहीत असलें पाहिजे. यानंतर बहुत दिवस जाहले, परंतु आपणाकडून सुखरूपतेचें पत्र येत नाहीं. पूर्वीपासून आपले व आमचे थोरपणाची ममता परिपूर्ण चालत आली आहे. याप्रमाणें सांप्रतही चालावी असा आमचा मनोदय असे.

---

१ परशरामाहून स्वामी वरघांटीं आल्यास पांच वर्षे झालीं ह्मणून ह्या पत्रांत उल्लेख आहे त्यावरून हें पत्र इ० स० १७३३ सुमाराचें असावें. ह्यांत सिद्दी संबुल ह्यांनीं विनंति केल्यावरून हें पत्र लिहिलें आहे असाही उल्लेख आहे. त्यावरून वरील पत्र व हें एका वेळचेंच आहे असें उघड होतें. ह्या पत्रावरून सिद्दी संबुल हा जंजिऱ्याचा अधिपति ह्या वेळीं नव्हता असें दिसतें. ह्या वेळीं याकूदखान सिद्दी सुरूर हा जंजिऱ्याच्या गादीवर असावा.

आणि पुढेंही आपण या घराण्यावर अधिक लोभ व स्नेह राखावा हें आपणास योग्य असोन, पत्रद्वाराही समाचार घेण्यास स्मरण होत नाहीं; हें थोर लोकांस चांगलें नव्हे. निरंतर स्नेहाचे उत्तमपणाची चाल राखून मित्रतेचे मार्ग दिवसानुदिवस अधिक होय तें केलें पाहिजे. यानंतर आपण दहांबारा वर्षें[1] आपला पूर्वीचा ठिकाणा सोडून घांटावर जाऊन राहिलां. वरची फौज खालीं उतरोन सर्व मुलूख खराब जाहला. आज पावेतों गोर गरीब अद्यापि भकलेले आहेत. या गोष्टीचें भय (!) आपले सेवकांस कांहींच येत नाहीं हें आश्चर्य आहे. आपण आपले जाग्यास परशरामीं येऊन पूर्वीप्रमाणें वस्ती केल्यास ते प्रांतीचे लोकही आपले ठिकाणचे ठिकाणीं येऊन निर्भयपणें वस्ती करून सुख पावतील. येणेंकरून आपणासही थोर श्रेय आहे. याजकरितां पूर्वी शेख महमदअली याचेबराबर आपणास लिहून पाठविलें होतें, परंतु उत्तर येऊन पोंचलें नाहीं. सांप्रत शहामत व अवलीयत बेत सिद्दी याकूत सुभेदार सुभा मामले दाभोळ व प्रांत राजापूर यांणीं पूर्वीप्रमाणें आपले इनामगांवच्या सनदा व पन्नास बैलांचें दस्तक देण्याकरितां लिहून पाठविलें. त्याजवरून आपले वृत्तीवर व खात्रीवर दृष्टि देऊन पूर्वीप्रमाणें पेढे तर्फ चिपळूण व मोजे आंबडस तर्फ खेड दोनी गांवचे इनामाच्या सनदा व पन्नास बैलांचे दस्तक असे तयार करून पाठविले, ते कागद सुभेदार मशारनिल्हे हे आपणाकडे पाठवितील. तर आपले खातरजमेनें आपले पूर्व ठिकाणास यावयाचें करून पूर्व-

---

१ ह्यांत स्वामी परशरामाहून निघाल्यास १०।१२ वर्षें झालीं असा उल्लेख आहे आणि शेवटीं २६ जुलूस सन आहे, तो लेखांक २४१ च्या शेवटच्या २१ जुलूस सनापेक्षां पांच वर्षांनीं अधिक आहे व त्या पत्रांत स्वामी वरघांटीं गेल्यास ५ वर्षें झालीं असा उल्लेख आहे. त्यावरून हें पत्र इ० स० १७३८ सालचें असावें. ह्या वेळीं सिद्दी अबदुल रहिमान हा जंजिऱ्याचा अधिपति असावा.

वत्प्रमाणें प्रांताची वस्ती होय ऐसें केलें पाहिजे. यांत आपली बहुत तारीफ आहे. बहुत काय लिहिणें. रवाना छ० ५ माहे साबान सन २६ जिलूस हे किताबत.

[लेखांक २४३] हु.

आजम अकरम गोसावीबावा संस्थान परशराम मुक्काम धावडशी दाम मोहबत हु:—

अज दिले एकलास सिद्दी याकूत[1] सुभेदार सुभा मामले दाभोळ व प्रांत राजापूर सलाम बादज सलाम खैर अंज्याम आंके येथील कुशल जाणून आशीर्वादसहित स्वकीय कुशल लिहून संतोषवीत असलें पाहिजे. यानंतर सय्यद याकूब जमादार याचे समागमें आशीर्वादपत्र पाठविलें तें उत्तम समयीं प्रविष्ट होऊन लिहिला मजकूर कळला. तुह्मीं पूर्ववत्प्रमाणें चालून गांवशीव पूर्वी ठरले आहेत ते करार करून संस्थानचे चालविलेत, तरी संस्थानचा बंदोबस्त होणें काय कठीण आहे ह्मणून लिहिलें, त्यावरून सविस्तर कळलें. ऐसीयास तुह्मीं आशीर्वाद देणार भगवद्भक्त मनुष्य संस्थानचे ठिकाणीं असल्यास पूर्वीप्रमाणें चालणार नाहीं अशी काय गोष्ट आहे? पहिलेपेक्षां अधिक चालेल. तुह्मांसारखे साधु लोकांचे चरण लागल्यानें आणखीही कित्येक लोकांस सुख होईल. येविशीं नि:संशय. आपले संस्थानास यावयाची तरतूद करून आलें पाहिजे. तुह्मी आल्यावर तुमचे गांवशीव जे आहेत ते तुह्मांकडेस खास चालवूं. पहिलेपेक्षां अधिक चालवण्यास अंतर होणार नाहीं. या प्रकरणीं रा० कृष्णाजी नरहरि आले आहेत. हेही आह्मांकडील स्नेहाचीं बोलणीं बोलतील (त्यावरून) कळों येईल. तुमचा साधु

---

१ वरील पत्रांत सिद्दी याकूत सुभेदार ह्मणून ज्याचा उल्लेख आहे तोच हा माणूस होय. हा दाभोळ व राजापूर येथील सुभेदार असावा असें दिसतें. ह्याचा व स्वामींचा स्नेह होता.

लोकांचा आशीर्वादच असो. बहुत काय लिहिणें, स्नेह बहुत असला पाहिजे. रवाना छ० १५ माहे जमादिलाखर हे किताबत. आपणाकरितां स्नेहाचे ठिकाणीं कृष्णाजी नरहरि यांजबराबर शेला अष्टगोली पैठणी कुसुंबी एक पाठविला आहे. आपणाजोगा नव्हे, परंतु कृपा करून स्वीकार केला पाहिजे. बहुत काय लिहिणें. र० छ० मजकूर. हे किताबत.

[ लेखांक २४४ ] हु.

आजम अकरम गोसावीबावा परशराम मुक्काम धावडशी

दाम मोहबतहु.

अज दिले एखलास सिद्दी याकूत किल्लेदार किल्ले गोंवळकोट ठाणें चिपळूण सलाम बादज सलाम येथील खैर अंजाम सुरसन इहिदे[1] सलासीन मया व अलफ आंके येथील खैरसल्ला जाणून मोहिब्बीं आपला खैरसल्ला हरवक्त कलमीं मरकूम करीत असलें पाहिजे. दिगर चंदरोज गुदस्त जाहले. अंमा याद करून खत किताबत पाठवून दिलास खुषवक्ती पोंहचविली नाहीं. तरी ऐसें वाजवी नसे. याबादज आलेल्या आदमीयासोबत खत किताबत पाठवून शादमानी पोंहचावीत असलें पाहिजे. बादज ईजानेबाचे जागा भाई आजम सिद्दी हिलाल यास हुजुरून सरफराज करून रवाना केलें ते येऊन पोंहचले. आह्मी छ० १५ जिल्कादीं[2] स्वार होऊन हुजूर रवाना जालों. मोहिब्बास मालूम जालें पाहिजे. ते जागा दूरचे पल्लीयावरी असलों तरी निविस्ते याचे राहोन खबरअखबार घेत असलें पाहिजे. खत किताबत पाठवावें. यास फरामोसी केली न पाहिजे. दराज काय लिहिणें, प्यार मोहब्बत असों दिली पाहिजे. रवाना छ० १५ जिल्काद हे किताबत.

---

१ इहिदे सल्लासीनः—इ० स० १७३०।३१.

२ छ० १५ जिल्कादः—ता० ११ मे इ० स० १७३१.

[लेखांक २४५] हु.

आजम अकरम गोसावी मुक्काम परशराम मोहबतहु:—

अज दिल एखलास सिद्दी साद[1] सुभेदार सलाम बादज सलाम खैर अंजाम सु॥ सल्लासीन[2] मया व अलफ आंके, येथील खैर सल्ला जाणून आपला खैर सल्ला कलमीं केला पाहिजे. दिगर किताबत पाठविली ते पोंहोचोन लिहिला मजमून मालूम जाहला. गांवींची रयत डावाडोल जाहली आहे ह्मणून लिहिलें, त्यावरून मौजे पेढें आंबडस हरदु गांवचे रयतीस कौल सादर केला आहे. रयतेचा दिलासा केला पाहिजे. आंबडसचा तेली परागंदा जाहला ह्मणून कळविलें, त्यावरून त्यासही गांवीं यावया बाबें कौल सादर केला असे. मौजे पेढ्याचे तेलीयानें बुतपरस्ती केली सबब त्यास सुभ्याहून गुन्हेगारी करार जाहली आहे. त्यापैकीं पंधरा रुपये बाकी राहिले आहेत. त्याचा तगादा करितात आणि तेलीयापासीं ऐवज नाहीं ह्मणून कलमीं केलें. तर मुसलमान होऊन जो बुतपरस्ती करील त्यास सजा तो खिताबमोजिब आणखीच आहे. लेकिन त्यास गुन्हेगारी मुकरर केली आणि रजा दिली होती. ऐसें असतां हल्लीं मोहिब्बीं त्याचे बाबें कलमी केलें. त्यावरून सदरहु पंधरा रुपये मना करून मनाची चिटी पाठविली असे. हरएक बाबें चालवावें ह्मणून कलमीं केलें; तर दोस्तीचे जागां तजावज आहे ऐसें नसे. दराज काय लिहिणें? प्यार मोहबत असों दिली पाहिजे. र० छ० १९ जिल्हेज हे किताबत.

---

१ सिद्दी साद ह्याचें सिद्दी सात असेंही नांव मराठी कागदपत्रांत सांपडतें. हा हबशांचा पराक्रमी सरदार होता. ह्याची व चिमाजी आपा पेशवे ह्यांची ता० १९ एप्रिल इ० स० १७३६ मध्यें कुलाबा जिल्ह्यांत चऱ्हई गांवीं लढाई होऊन हा मारला गेला.

२ सीत सल्लासीन:—इ० स० १७३५.

[लेखांक २४६]                    हु.

आजम अकरम गोसावी मुक्काम धावडशी दाम मोहबतहु.

अज दिले एखलास सिद्दी साद सुभेदार मुक्काम गोंवळकोट सलाम बादज सलाम खैर अंजाम आंके येथील खैर सल्ला जाणून मोहिब्बीं आपला खैर सल्ला कलमीं केला पाहिजे. दिगर मोहिब्बीं किताबत पाठविली ते पोंहोचोन खुषवक्ती जाहली. आपलीं गुरें तिसंगीस होतीं तीं सुमार सर १११ स्वारीचे लोकीं नेलीं आहेत, तीं देविलीं पाहिजेत ह्मणून तपशीलें कलमीं केलें. तरी मोहिब्बाचे गुरांवर स्वारी पाठवून आणविलीं जातील असें तों होणार नाहीं. आंगऱ्याकडील चाकरमानें यांचीं गुरें बिवलीचे खिडींत होतीं. त्यांवर स्वारी गेली होती. तीं गुरें घेऊन आले. त्यामध्यें कित्येक गुरें तर सरकारचे चाकरमाने यांचीं साल गुदस्ता बयाजी महाडिक यांणीं नेलीं त्यांमधील असेत. तीं ज्यांचीं त्यांनीं वोळखिलीं. मोहिब्बाचीं गुरें अव्वल तिसंगीस होतीं तेथें हल्लीं नसेत. तशाहीमध्यें येथें गुरें आणलीयावर आंगऱ्याच्या मारफतीनें तफहुस करितां मोहिब्बाचीं गुरें यांमध्यें नसेत ह्मणून आंगऱ्यानें मालूम केलें. जर मोहिब्बाचीं गुरें यांमध्यें आलीं असतीं तर मोहिब्बाचे जागा याची बिशाद काय होती ? अलबत मोहिब्बाचे लिहिण्यावरून पाठविलीं जातीं. दराज काय लिहिणें ? प्यार मोहबत असों दिली पाहिजे. रवाना छ० ६ जमादिलाखर हे किताबत.

[लेखांक २४७]                    हु.

आजम अकरम गोसावी मुक्काम परशराम दाम मोहबतहु.

अज दिले एखलास सिद्दी साद सुभेदार सलाम बादज सलाम खैर अंजाम आंके येथील खैर सल्ला जाणून मोहिब्बीं आपला खैर सल्ला कलमीं करीत असलें पाहिजे. दिगर मोहिब्बीं किताबत पाठविली तेथें कलमीं केलें कीं, मौजे महाळुंगे व डोरलें ईजानेबाचीं गांवें, तेथील

सालमजकूर सन इहिदेची खंडणी मुकरर जाहली त्यापैकीं तेतीस रुपये रसद सुभां पाठविली असे; आणि हल्लीं गांवींहून परभारें वरातदारांहीं पैसे घेऊन सुभ्यास नेले असेत ते फिरोन देववावे ह्मणून कलमीं केलें. त्यावरून हरदु गांव पैकीं रसद रुपये ऐन रुपये १२० एकशेंवीस व खुर्दा टक्के ७॥ साडेसात आले होते. त्यांपैकीं खंडणीची बाकी साल मजकुराबाबत रुपये ऐन २७ सत्तावीस व खुर्दा पोतदारी टक्के १॥९ दीड टक्का नऊ रुके येणें होती. ते वजा करून बाकी पैसे बराबर महादजी साठल्या रुपये ऐन ९३ त्र्याण्णव व खुर्दा टक्के ५॥। ३ पावणें सहाटक्के तीन रुके देऊन मोहिब्बाकडे रवाना केले असेत. व सदरहु सत्तावीस रुपयांची हुजतही पाठविली असे. तरी पैसेयांची पोंहच पाठविली पाहिजे. दराज काय लिहिणें. प्यार मोहबत असों दिली पाहिजे. रवाना छ० ४ रबिलावल हे किताबत.

[ लेखांक २४८ ] हु.

आजम अकरम गोसावी मुक्काम धावडशी दाम मोहबतहु.

अज दिले एखलास सिद्दी साद सुभेदार सलाम बादज सलाम खैर अंजाम आंके येथील खैरसल्ला जाणून मोहिब्बीं आपला खैरसल्ला कलमीं मरकूम करीत असलें पाहिजे. दिगर मोहिब्बीं किताबत मरसूल केली ते नेकवक्त पोंहचोन खुशवक्ती हासील जाहली. ऐसीच हरवक्त खत किताबत कलमीं मरसूल करून शादमानी पोंहचावीत असलें पाहिजे. कलमीं केलें कीं, मौजे डोरलें व महाळुंगें ता० पावस आमचे गांव, तेथें विशाळगडाहून दगदगा जाहला. त्यामुळें रयत तजावजा जाली असे. त्यास कौल मरहमत जालीयानें रयत कीर्दमशागतीस लागतील ह्मणून कलमीं केलें. त्यावरून हरदु गांवचे रयतीस कौल पाठविला असे. आह्मी खाले लवकरच येणार असों. मुलाकतीस येऊं ह्मणून कलमीं केलें तरी बहुत खूब असे. ईजानेबही मोहिब्बाची मेह-

रवानीच चाहत  असों. दराज काय लिहिणें. प्यार मोहबत असों दिली पाहिजे. रवाना छ० २८ जिल्हेज हे किताबत.

[ लेखांक २४९ ]  हु.

आजम अकरम गोसावी मुकाम धावडशी दाम मोहबतहु.

अज दिले एखलास सिद्दी साद सुभेदार सलाम बादज सलाम खैर अंजाम सु ॥ इसन्ने सलासीन मया व आलफ आंके, येथील खैर सल्ला जाणून मोहिब्बीं आपला खैरसल्ला कलमीं करीत असलें पाहिजे. दिगर मोहिब्बीं किताबत पाठविली ते नेकवक्तीं पोंहचोन...मुलना हुसेन पेढेकर हरएक बाबें गावांत दगदगा देतो ह्मणून तपसीलें कलमीं केलें तें आयां जाहलें. ऐसीयासी ये बाबें अवल मोहिब्बीं कलमीं केलें होतें त्यावरून त्यास ताकीद फर्माविली होती. अंमा तो खपती, दिवाणा, बेशौर जाहला असे. त्यामध्यें कांहीं शौर राहिला नसे. नाहींतर मोहिब्बाचे गांवीं हरकोणी दगदगा करील त्याचें पारपत्य व्हावयास राहील ऐसें होणार नाहीं. दराज काय लिहिणें. प्यार मोहबत असों दिली पाहिजे. र॥ छ० ३० सवाल हे किताबत.

[ लेखांक २५० ]  हु.

आजम अकरम गोसावी परशराम मोहबतहु.

अज दिले एखलास सिद्दी हिलाल किल्लेदार कोट गोंवळ ठाणें चिपळूण सलाम बादज सलाम खैर अंजाम सु० सन सलास सल्लासीन मया व अलफ आंके, येथील खैर खुशी जाणोन मोहिब्बीं आपली खैर आफीयत कलमीं करीत असलें पाहिजे. दिगर मोहिब्बीं किताबत पाठविली ते पोंहचली. तेथें कलमीं केलें जें, धावडशीहून निघोन छ० ९ मोहरमीं दरग्यास आलों, व अंजनवेलीस सुभेदार यास कागद लखोटा पाठविला, येवढा पोहोंचावून जाब आणणें ह्मणोन कलमीं केलें तें आयां जाहलें. मोहिब्बाचे लिहिलीयाचें मोजिब लखोटा अंजनवेलीस पाठवून

जाब आणवून मोहिब्बाकडे रवाना केला जाईल. मालूम जालें पाहिजे. दराज काय लिहिणें. प्यार मोहबत असों दिली पाहिजे. रवाना छ० १० माहे मोहरम हे किताबत.

[ लेखांक २५१ ]                 हु.

ब्रह्मेंद्रबावा फकीर मुक्काम चिपळूण.

मोहब्बत व मजमूअ इबादत वादज शौक आंके दरींविला कितावत पाठविली ते पोंहचोन मजमून मुफसल जाहिर होऊन आला. तुह्मीं चिह्ल्यांतून उठलेयाची खबर लिहिली. मालूम जाली, व दुपट्टा कुसंबी १ एक बराबर गोपाळ त्रिमल व मल्हारी पाठविला तो येऊन पोंहचला. दराज काय लिहिणें. रवाना छ० ९ माहे रबिलावल सन १३ जिलूस. हे किताबत.

[ लेखांक २५२ ]                 हु.

इलाही मेहेरबान आजम अकरम परमहंस गोसावी उमर जादाहु.

अजंदिले एखलास सिद्दी मसूद मुक्काम बंदर सुरत. सलाम बादज सलाम महवल मकसूद अं येथील खैर खुशी बनजर जाणून मोहिब्बीं आपला खैरसल्ला हमेशा कलमीं करावयास फर्मावीत असलें पाहिजे. दिगर मोहिब्बीं कमाल मेहेरबानी करून किताबत पाठविली ती नेकसात येऊन पोंहचोन दिलताजगी हासिल जाली. ते जाणोन बिलकुल मोहिब्बाची मुलाजमतच जाली. ऐसी खुशवक्ती गुजरली तर येच वजा दोस्ताची याद करून खत किताबत पाठवून खबर अंतर घेत असलें पाहिजे. दिगर मोहिब्बीं लिहिलें कीं राजपुरीस किताबत व तीन कपडे पाठविले होते व लिहिलें होतें कीं, नबाबाकडे खान होते ते वक्तीं त्यांहीं आ-

---

सिद्दी मसूदः—हा हबशांच्या आरमाराचा अधिपति असून त्यांच्या वतीनें सुरतेस होता. हा मोठा कर्तृत्ववान् पुरुष असून त्यानें सुरतेस हबशांचा अंमल बसविला होता.

ह्मांस तीन गांव इनाम दिल्हे होते. त्याप्रमाणें हल्लीं तुह्मींही ताज्या सनदा करून देणें, आणि त्यांहीं चालविलें होतें त्याप्रमाणें तुह्मींही चालविणें. ऐसें तपसीलवार लेहून पाठविलें. अंमा त्याचा जबाब आला कीं, "खान फौत जाले तेच वक्तीं अव्वल तुह्मी आले असतेत ह्मणजे तुह्मांस गांव होते. हल्लीं तुह्मांस गांव इनाम होत नाहीं." ऐसा जाब आला ह्मणून मोहिब्बीं कलमीं केलें ते कुल हकीकत मालूम जाली. ऐसीयास ईजानेबासही हुजुरून हुकूम आला असे कीं, तुह्मीं जंजिरा अव्वल सराईस येणें. त्यावरून आह्मीही हुजूर जाणार असों. तर मोहिब्बीं अव्वल सराईस हुजूर जंजिरा किताबत लेहून पाठवणें. आणि ईजानेबही तेथें गेलीयाबाजद अर्ज करून मोहिब्बाचें काम खामखा करून घेऊं. मोहिब्बाखेरीज जादा आह्मांस कोणाचें जरूर नसे. तर "इनशाअल्ला हुताल्ला" अव्वल फसल हंगामीं आह्मी गेलियावर ताज्या सनदा इनाम गांवच्या करून मोहिब्बास देऊं. आह्मी मोहिब्बाचे दोस्त कदीम असों. हर दर हाल मोहिब्बाचे कामामध्यें तफावत तजावत करणार नाहीं. मोहिब्बास मालूम जालें पाहिजे. आह्मी मोहिब्बाचे हक्कामध्यें हमेशा—चे दरगामध्यें शुक्रगुजारी करीत असतों. दराज काय लिहिणें, प्यार मोहब्बत असों दीजे. रवाना छ० १५ माहे सफर सन २० महमदशाही हे किताबत.

[ लेखांक २५३ ] हु.

ब्रह्मेंद्र फकीर मुक्काम चिपळूण.

मोहब्बत व मजमुअ इबादत बादज शौक आंके दरींविला किताबत पाठविली ते पोंहोचोन मजमून मुफस्सिल मालूम जाला. मौजे नाईसी तर्फ सावर्डें हा गांव सन सबा पासून आह्मांस इनाम दिला. त्याचा वसूल सन मजकूरचा आह्मांस पोंहचला नाहीं. तो वसूल मेहरबान होऊन आह्मांकडे द्यावयास व सालमजकुरीं हल्लीं गांव आमचे दुमाला क-

रावयास हुकूम केला पाहिजे ह्मणून लिहिलें, तर सन सबाचा वसूल सरकारांत पोंहचला तो पोंहचलाच. अम्मा हल्लीं गांव तुमचे तुह्मांला आहे कीं नाहीं तें लेहून हुजूर पाठवणें; व कळंबुसी गांव मेहरबान होऊन आह्मांस इनाम देत होतेंत, त्यास कोणीं इस्कील केली. त्याचा मुबदला दुसरा गांव देत होतेंत. ऐशास मौजे डोरलें व महाळुंगे ता० पावस सुभा राजापूर हे हरदु गांव मराठे यांकडून आह्मांस इनाम आहेत. त्यांस खराब होते. वसाहत करावयाकरितां सन खमसामध्यें सुभ्यांतून गांवास कौल मक्ता खंडी दरसाल रुपये ४२ बेचाळीस प्रमाणें करार करून पांच हजार कौल सुभेदारासही दिला. तेणेंप्रमाणें आज तीन सालां वसूल दिला. हल्लीं सालमजकूर सन समानचे खंडणीचे कौलाप्रमाणें बेचाळीस रुपये सरसुभा अंजनवेलीस रवाना केले होते; ते पोतांजमा झाले, आणि हुजत गांवास दिली नाहीं. लेहून पाठविलें कीं, तुमचे गांवीं बिगर खंडणीची रयत जाऊन राहिली आहे, व बाधेयानें कीर्द केली आहे. त्याची खंडणी साल मजकुरीं मुकरर होणें ते देशकांचे निसबतीनें मुकरर जाली असे. त्याचा वसूल होणें तो अलाहिदा होईल ह्मणून लिहिलें असे. याकरितां दोन्ही गांवची खंडणी कळंबुसीचे मुबदला इनाम चालविल्यास आह्मांस गांव पोंहचला आणि हरदु गांवास तसदी कोणे बाबें न द्यावी ऐसा परवाना सादर करावयास फर्माविलें पाहिजे ह्मणून लिहिलें. मालूम जालें, व हरदु गांवचा कौल तुह्मांस कागद सुभ्याचा आला होता तो ऐसें हुजूर पाठविलें. त्यावरूनही जाहीर जालें. तरी हरदु गांवची खंडणी तुह्मीं रुपये ४२ लिहिले असा. अम्मा सुभ्याचे दसरीं काय असे. ते लिहून हुजूर आणविली असे. 'इनशाअल्ला हुताल्ला,' हरदु गांवचे बाबें सरंजाम पोंहचविला जाईल. बिल फैल कौलमूजिब दोनही गांवची खंडणी घेत जावी. जाजती कोणे बाबें तसदी न द्यावी ह्मणून सुभ्यास परवाना सादर केला असे. व गांवचा कौल तुमचा कागद ऐसे दोन्ही कागद फिरोन तुमचे आदमीयानजीक दिले असेत. दिगर पाथरवटाचे तलासाबद्दल तीन चार जोड्या रवाना

केल्या असा. त्यास सातारा पालीचे पाथरवट दोघे तिघे तुमचे भेटीस येऊन त्यांहीं मुद्दा घातला. याची हकीकत व तुह्मीं त्याशीं करार केला असा याची हकीकत लेहून मल्हारजी पाथरवट सालकर सरनाईक याचा भाई यास हुजूर पाठवून त्याचा मुद्दा खातरेस आणून त्याचा दिलासा करून मुद्याप्रमाणें कौल यास देऊन रवानगी केली पाहिजे; ह्मणजे दसरा होतांच पाथरवट घेऊन मल्हारजी हुजूर येईल ह्मणून लिहिलें. मुफस्सिल माळूम जालें व मल्हारजी पाथरवटही हुजूर येऊन पोंहचला. त्याणें आपले मुद्दे जाहीर केले. त्यावरून त्याचा दिलासा करून पाथरवटास कौल दिला असे कीं, तुह्मीं काय करावयास येणार ते सुखरूप येणें. सहा सात महिने काम करून जेव्हां जाऊं लागाल तेव्हां सुखरूप जाणें. तुह्मांस अटक होणार नाहीं. तुह्मीं कोणे बाबें शक अंदेशा न धरितां सुखरूप येणें. ऐसा कौल देऊन मल्हारजी पाथरवट याची रवानगी केली असे. पाथरवटाचे नाइकानें तुह्मांस तैनातीविषयीं लिहिलें होतें त्याचे बाबें लिहिलेंत, तर ते प्रमाणें तैनात मुकरर केली जात नसे. नाइकास महिना रुपये १० वगैरा पाथरवट यांस कारिगर देखून महिना मुकरर केला जाईल. व दोनशें रुपये आगाऊ मागत आहेत ह्मणून लिहिलें. त्यावरून हुजुरून रुपये दोनशें पाथरवटास रवाना करावयाबद्दल तुह्मांनजीक तुमचे आदमीयासोबत पाठवीत होतों. अम्मा तुमचे आदमीयानें रहदारीचे सबबेनें कबूल केलें नाहीं. याकरितां अंजनवेलीचे पोतांतून रुपये २०० दोनशें हुजुरून मुजरद आदमी पाठवून तुह्मांनजीक रवाना करविले आहेत. ते पैसे तुह्मांनजीक तिकडून येऊन पोंहचतील. ते याचे पदरीं घालून रवानगी करणें. बादज जे पाथरवट येतील ते हुजूर रवाना करावयाबद्दल इजत आसार सिद्दी साद सुभेदार या नजीक पाठविणें. ते गलबतावर हुजूर रवाना करतील. हे बाबें सिद्दी मशारनिल्हेसही परवाना सादर केला असे. दराज काय लिहिणें. रवाना छ० २९ माहे मोहरम सन ९ जिलूस हे किताबत.

# स्वामींनीं पाठविलेलीं पत्रें.*



## शाहूमहाराज व त्यांच्या राण्या.

[ लेखांक २५४ ]  श्रीभार्गवराम.

श्रीमत् परमहंसस्वामी यांहीं

सहस्त्रायु चिरंजीव विजयीभव शाहुजोराजे छत्रपति यांसी आज्ञा केली ऐसीजे:-येथें स्वारी तुमची होत्ये व सरकारकून सरदार आमचे भेटीस येतात. त्यास, धावडशीकर पाटील याजपासून कवडी आपण घेत नाहीं. पलीकडील वर्षीं आपण गवत कुरणांत काढीत होतों तेव्हां पाटिलांनीं, मीरशिकाराची[1] चाहडी सांगितली याजकरितां, मीरशिकार

---

* स्वामींनीं लिहिलेलीं बरींच पत्रें आह्मांस उपलब्ध झालीं आहेत. परंतु तीं संगतवार नसल्यामुळें मागील पत्रांप्रमाणेंच त्यांचा व्यक्तिवार क्रम लाविला आहे. ह्या पत्रांवर कोणत्याही प्रकारें कालबोध होण्यासारखें वार किंवा मिति ह्यांचें साधन नसल्यामुळें त्यांची नक्की तारीख, महिना, अथवा सन ठरविणें बरेंच कठीण आहे. तथापि कांहीं पत्रांतील मागच्या पुढच्या संदर्भावरून त्यांची मिति ठरविण्याचा यत्न केला आहे. हीं पत्रें अस्सल पत्रांच्या नकला असाव्यात असें वाटतें. कारण, तीं बहुतेक धावडशी येथील दप्तरांत सांपडलीं आहेत. ह्या पत्रांचें हस्ताक्षर बहुतेक स्वामींचे शिष्य चिमणाजी कृष्ण व जगन्नाथ चिमणाजी ह्यांचें आहे. खुद्द स्वामींच्या स्वदस्तुरचें असें पत्र शाहू महाराजांस लिहिलेलें एकच सांपडलें आहे. हीं पत्रें फार प्रेमळपणानें लिहिलेलीं असून तीं स्वामींच्या स्वभावाचें खरें स्वरूप दाखवितात. ह्या पत्रांच्या योगानें स्वामींच्या कारकीर्दींतील राजकीय गोष्टींचाच इतिहास नुसता व्यक्त होत नसून, त्या वेळची सामाजिक स्थितिही चांगली व्यक्त होते.

१ मीर शिकार:-शाहूमहाराजांस शिकारीचा फार नाद असे. त्यामुळें त्यांचेजवळ उत्तम उत्तम शिकारी असत. त्यांत मीर शिकार हा प्रमुख असे.

यास मारिलें. वाडियांत कारकुनावरी भुतें घालून वाडियांत दुखणें हो-
ऊन कारकुनाचे घरीं माणसें मरतात. गुरें वासरें कुल मेलीं. त्यास
देव भगत सुवर्णदुर्गाहून आणून निवडिलें. भगतानें सांगितलें, धावड-
शीकर अंबाजी पाटील याचे नि॥ भुतें चेटक १, जखीन १ येणेंप्रमाणें दोन
भुतें वाडियांत नास करितात. भगतानें पाटिलास सांगितलें जें, आपण
सांगतों त्या वारणें. ते न वारीत. कतबा लिहून मागितला जे, याजपुढें
जर कांहीं लाग झाला तर दिवाणचे गुन्हेगार. तो कतबा लिहोन न
देत. ऐसे पाटील लबाड आहेत. मजला आटोपले नाहीं. गांव लागोन
वर्षास पांचशें साशें रुपये खंडणी देतात. ऐसें चालवून मज हे कामास
आले! हें दुःख कोणास सांगावें? याजकरितां तुह्मांस लिहिलें आहे.
अंबाजी पाटील यास नेऊन याचें पारिपत्य बरेंसें केलें पाहिजे. याचें
पारिपत्य न करा तरी, मज आज्ञा कराल तर मी [illegible] एखादेकडेस
जातों. जबानीं सोमाजी सांगतां विदित होईल. हे आशी[illegible].

[ लेखांक २५५ ] श्रीभार्गवराम.

योगभ्रष्ट योगमाता सौ० सकवारबाई रामाजीराऊ याची लेकी
यांसी आज्ञा केली ऐसीजे:—कोंकणांत श्रीसन्निध धामणीगांव व सो-
नगांव दोनी मिळोन हजार रुपयांचे गांव आहेत. त्यास देवें अंजनवेली
तुह्मांस दिली तर दोनी गांव आपले तरफेनें श्रीस अर्पण करावे.
या लोकीं दिल्यास कीर्ति होईल; परलोकीं कामास येईल. मागें छत्र-
पतीस मिरजेच्या मुक्कामीं ह्मटलें जें, आंब्याचा बाग लावावयास धाव-
डशीजवळ एक चावर द्या. त्यास छत्रपति बोलिले जे, मिरजप्रांतें गांव
तुह्मांस देतों. त्यास आह्मीं ह्मटलें, मिरजप्रांतें नलगे. तुह्मांस पुत्र जाहली-
यावर मग पांच गांव मागों ते द्या. जो गांव आंबडसासन्निध आहे तो
श्रीचीं गुरें ठेवावयास देणें. देवानें बहुत वनवास भोगिला आहे. तुह्मीं
तरी देवाचें चालवावें. देव कामास येईल.

[लेखांक २५६] **श्रीभार्गवराम.**

आकाश पडों पाहे तरी तुझीच वाट पाहे. तोंडें मानिली रेणुका ते मातेहून अधिक, सौ॰ मातुश्री सकवारबाई यांसी आज्ञा ऐसीजे:— धामणी, सोनगांव व धालवली कोंकणप्रांतें आहेत. ह्या तीन गांवच्या सनदा आपल्या शिक्यानिशीं पाठवून देणें. चिंतलें कार्य श्री भार्गव सिद्धीस नेईल. तरी तीन गांवच्या सनदा पाठवून देणें. वाचादत्त चार हजार रुपये देऊं केले (ते पाठवून देणें?). श्रेय तुमचे पदरीं पडेल. तुला मीं रेणुका शब्दें मानिली, ते मातेहून अधिक ऐसें आहे. तरी, चित्तास नये तरी मैत्री तोडणें. जामदारखान्यांत पासोडी कुजेल ...र्सीं माझे अंगांत पासोडीची रजई करून घातली ते बरी? तरी ...धरून विचार करावा.

**श्रीभार्गवराम.**

श्रीमत् परमहंस स्वामी यांहीं

...न्न वज्रचूडेमंडित, वदली आकाशाची वाणी, ज- ...निर्वाणी, मातुश्री सखवारबाई मज जोडिलीस पुण्याची ...रेणुका; ऐशास बाई, तुह्मी राज्य करितां, मी तुमचा जागली, चार कामें तुमचीं करितों. तुह्मीं ह्मणजे केवळ कलयुगीचे कर्ण, ऐसें असोन चार हजार रुपयांस हवाले देतां, हें बाई काय? अमृतवाणी ईश्वराची कदापि लटकी करूं नये. तरीच कर्णाची कीर्त दिगंतीं राहिली. गत वर्षी एक पलंगडी व एक रेशमी नवार व परवां एक जरी डगला व रजई मागितली होती. त्यास छिटी बुटेदार तरी डगलें द्यावें होतें. रजई मागितली होती त्यास हींव तेंही निघोन गेलें! बाई, आमचे जीवास बरें वाटत नव्हतें. जीव दोन चार वेळां व्याकुळ जाहला होता. परंतु तुमच्या पुण्यानें कांहीं उतार जाहला. तुह्मींच महाराजास पाठवून आपणाजवळ नेऊन आह्मांस बरें केलेंत. नाहीं तर तुमचे भ्रतारास

तों अगत्यच नाहीं! आह्मी निलाजरे, ह्मणोनच तुमच्या राज्यांत राहतों. परंतु कोणास बूज नाहीं. वरकड तुह्मीं गतवर्षीं व यंदा दोन वेळां पूजा केलींत. दोनी वेळां पूजेसमयीं मौजे सोनगांव व मौजे धामणी हे दोनी गांव भार्गवाचे पायाखालीं आहेत, त्यांचें उदक तुह्मीं घातलें जे, श्रीस अर्पण दोनी खेडीं केलीं. दोनी गांव मिळोन आकार ह्मणाल तरी साडेचारशें पांचशें पावेतों कदाचित् होईल. त्यास तीं खेडीं दोनीं भार्गवाजवळून कितीशीं लांब आहेत तीं आपल्या लक्ष्मणरावाजवळ पुसावें. तो सत्यच सांगेल. तुह्मीं तों तेच समयीं उदक घालून देवास अर्पण केलेंतच; परंतु दोनी गांवचीं दोन अक्षरें आह्मांस लेहून पाठवणें जे, सोनगांव व धामणी हे दोनी गांव देवास दिल्हे. ऐसें लेहून पाठवणें ह्मणजे गांव आह्मांस पावले. विशेष हे आज्ञा.

[ लेखांक २५८ ] श्रीभार्गवराम.

सहस्रायु चिरंजीव महाराज छत्रपति महाराज ज स्वरूप, यांस कोणी मनुष्य ह्मणेल तो नरकास जाईल. जो मंत्र तारक सांगितला आहे तो निष्ठेनें जपणें ह्मणजे पुत्र झालेंच ऐसेंच समजणें. तुह्मीं आपले गुरूचे पायाची क्रिया केली आहे. छत्रपतीशीं भांडो ना. तर आह्मीं निरवानिरव केली आहे. भांडल्यास हा देश टाकीन आणि गोमुत्र तुह्मांवर टाकीन. राजाशीं तुह्मीं भांडिलांत नाहींत ह्मणजे विश्वजन सुखी होईल. ऋषीश्वराचे पायाची क्रिया केली आहे. तुह्मीं जें जेवण कराल तें राजास अमृतासमान लागेल. आणि तुमचें राजाचें एकचित्त नाहीं ह्मणजे तुह्मीं सोन्याचा ग्रास केला तरी राजास विषसमान वाटेल. मागें तुह्मांस आशीर्वाद दिला तो खराच होता. त्यास कोणीं आक्षेप केला असेल त्याचें काय झालें असेल तें ईश्वर जाणे. काय तुमच्या वडिलांचें पुण्य, काय जाणों छत्रपतीचें पुण्य

कीं तुमचें अन्य जन्मींचें सुकृत होतें, तर मज देवानें भुली घातली, आणि तुमच्या आश्रमास अकस्मात् आणिलें, आणि उपदेश जाहला. याचें सार्थक करा. इतकी तुह्मांस भिक्षा पदर पसरोन मागतों. तुह्मीं भांडों नका. निरापराधी कोणी शिवी देईल ते गुरास लागेल. क्षमारूप धरत्रीनाम तपस्वीरूप योगीनाम संत संत संत धर्मानाम. तर पहा, पहा, त्या पांडवाचे कीर्ति अद्याप आहे. पुढें चालेल ऐसी कीर्ति तुह्मीं उभयतां करा. आणि संसाराचा कांहीं भरोंसा नाहीं. जसा दीपक मालवल्यास कांहीं नाहीं.

[लेखांक २५९] **श्रीभार्गवराम.**

सौ० संपन्न मातुश्री सगुणाबाई यांसी आज्ञा केली ऐसीजे:—आह्मीं गेलों होतों जे, नबाव मोंगल यास भेटोन त्यापासून गांव मागोन पालखींत बसोन तुह्मांस मुख दाखवावें. त्यास त्याची भेट न जाहली. याजकरितां राहतां राहिलें. खालें कोकणांत होतों त्यास त्याजवळचे चार गांव इनाम देऊन कसें चालवीत असत तेंही तुह्मांस विदितच आहे. बाजी होते ते ह्मणत जे, किलीजखानास तुह्मांस नेवून भेटवितों; आणि पांच गांव इनाम देऊं. त्यास तो मरोन गेला. एरवीं देविता. तुमची खातर निशा होती. तुमचें सत्पात्रीं देव तुमचें घेईना. कुपात्रीं द्यावें ऐसें तुमचे मनांत होतें, याजकरितां कुपात्रीं देतां!*

[लेखांक २६०] **श्रीभार्गवराम.**

योगीराज योग्याची माता रेणुका माता सौ० संपन्न मातुश्री सगुणाबाई यांस आज्ञा केली ऐसीजे:—ईश्वरी कृपेनें पुत्रसंतान व्हावें ऐसें वोशध हातास आलें तें पुडिया २१ पाठविल्या आहेत. प्रत्यहीं प्रातःकाळीं तोंड धुवोन एक पुडींतील वोशध तितकीच वजन रायपुरी

---

* हें पत्र बाजीराव मृत्यु पावल्यानंतरचें ह्मणजे इ० स० १७४० च्या पुढचें असावें.

साखर एकत्र करून एकवीस रोज घ्यावें. पुत्रसंतान श्री देईल. यास वोशधास पथ्य कांहीं नाहीं. लौकिकीं कोणास कळों न द्यावें. निष्ठेकडून घेतल्यास श्री पुत्रसंतान देईल. भाव पाहिजे. ऋषीशृंगें जैसें पिंडभागांतील विभाग कौसल्या, सुमित्रा, व कैकयी यांस दिले होते, त्यांणीं भावार्थें घेतले, त्यांस पुत्रसंतान जालें; तैसें भावार्थें घेतल्यास पुत्रसंतान होईल.

[ लेखांक २६१ ] **श्रीभार्गवराम.**

विश्वरूप मातुश्री पार्वतीसमान सौ० संपन्न मातुश्री सगुणाबाई यांस आज्ञा. तुह्मांस भार्गवप्रसाद पादुकाजोड पाठविला आहे. घेतला पाहिजे. रघुजी भोंसले यांजकडील कारभारी भास्करपंत यांजकडे तीन हजार रुपये वाग्दत्त रघुजी भोंसल्यांचे येणें आहेत. त्यांजकडे माणसें कोणी जातील त्यांस लिहोन तीन हजार रुपये आणविले पाहिजेत. खर्चास पाहिजेत याजकरितां त्वरेनें आणविले पाहिजेत हे आज्ञा.

[ लेखांक २६२ ] **श्रीभार्गवराम.**

मननिर्मल गंगाजल पुण्यपवित्र सौ० संपन्न ऋषीश्वराची माता मातुश्री विरूबाई यांसी आज्ञा ऐसीजे:—बहुत दिवस जाहले, तुह्मां-कडून पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं. आमचें वृद्धपण जाहलें. तुमचे पुण्यें दहापांच कामें वाईट बरीं जाहलीं. तीं तुह्मांस श्रुत जा-हलीं. हल्लीं आमचा हेत आहे जे निरेस[2] दादर बांधावा. काय निमित्य

---

१ पृष्ठ १७९ लेखांक १६६ मधील २ री टीप पहा.

२ निरा नदी पुणें जिल्ह्यांत वाहत असून जेजुरीपासून पिंपरी व माळशिरस ह्या गांवांस जातांना मध्यंतरीं लागते. तेथें पूल बांधण्याचा स्वामींचा हेतु होता. ह्याप्रमाणें पूल बांधण्याचें काम सिद्धीस गेलें नाहीं. ह्यावरून हें पत्र स्वामींच्या कारकीर्दीतील अखेरचें असावें.

ह्मणाल, तर ज्यापाशीं द्रव्य आहे तो द्रव्य देऊन उतरतो. ज्यापाशीं द्रव्य नाहीं तो कष्टी होऊन माघारा जातो. ऐसे चार महिने लोक पावसाळचे श्रमी होतात. याकरितां चार कमाना बांधाव्या. पांच सात कामें जाहलीं हीं तुह्मांस पुसोन केलीं. हल्लींही पत्र पाठविलें आहे. तर आपले पतीस सांगोन निरेस दादर बांधावयासी सांगणें. दादरास द्रव्य फार पाहिजे. त्यासी चार घरें आणखी चौ दिशांस मागोन तुमचें नांव सांगोन काम चालवूं. दादर तुमच्या कीर्तीचा आहे. नांव तुमचें आहे. आह्मी फुकाचे तुमचे जागली. तर आपले पतीस पुसोन दादर बांधावयाविशीं पत्राचें उत्तर पाठविलें पाहिजे. बाई, बसापा आदले जन्मीं पुण्यपुरुष होता ह्मणून ये जन्मीं त्यासी श्रीनें वासना दिली आणि द्रव्य आपलें शिखरास लाविलें. येणेंकडून तो जीवन्मुक्त जाहला. त्याचे पुण्यास पारावार आहे ऐसें नाहीं. इतके लोक पृथ्वींत आहेत, परंतु ज्याचें देव घेणार त्याचेंच घेऊन त्याचा जन्मोद्धार करितो. तुह्मी तों सुज्ञ आहां. विशेष लिहिणें नलगे. हे आज्ञा. तुह्मी उत्तम अन्न दुध भात जेवितां. आह्मी कंदमुळें खातों. आह्मीं जेवावयास तुमची मर्जी असेल, तरी भुईमूग आह्मांस एक मण पाठवून दिले पाहिजेत.

[लेखांक २६३] **श्रीभार्गवराम.**

सौ० मातुश्री विरूबाई यांस आज्ञा केली ऐसीजे:–श्रीचे देवालयाचा कारखाना सात आठशें माणसें खपतात. इमारतीस चुना कोळसे पाहिजेत. त्यास वावगें रान देवखोल व मोरघर या गांवीं लांकडें तोडीत असत. त्यास यमाजी[1] शिवदेव यांणीं लांकडें तोडावयाची लोणारांस मना केलें आहे. ऐशास देवळाचें काम धरिलें तें टाकतां नये. लांकडें

१ यमाजी शिवदेवः—मुतालिक. ह्यांच्या विरुद्ध स्वामींची तक्रार ह्या पत्रांत आहे.

तुमच्या राज्यांत न तोडावीं तर कोठून आणावीं ? स्वर्गींहून आणावीं कीं काय ? आह्मी कांहीं आंबे, साग, बिब्वी कामाचें लांकूड तोडीत नाहीं. कामाचें नव्हे तें तोडितों. ऐशास देवळ बांधावें ऐसें आपले विचारें असेल तर मोरघर, देवखोल, बजेगांव जेथें लांकूड डोंगर असतील तेथें तोडावीं ऐसें आपले मुद्रेनिशीं चिठी पाठवावी. यमाजी शिवदेव लोणारीयांस ह्मणतो, खंडीस सा रुपये घेतां यांतील तीन आपणास देणें; तर लांकडें तोडूं देईन. यास आह्मी पैके देतों त्यांतील यास मागायास दरकार काय आहे ? चित्तांत आणून [करणें तें करा.]

[ लेखांक २६४ ] **श्रीभार्गवराम.**

श्रीमत् परमहंस स्वामी यांहीं

सौ० संपन्न मातुश्री विरूबाई यांसी आज्ञा केली ऐसीजे:—मी कोळी झालों आणि तुह्मीं उष्टीं बोरें खादिलीं. तो अभिमान तुह्मांस असों देणें. तुह्मीं राजाकडून आह्मांस सिंहासन दिलें. तुह्मांस ईश्वरें सिंहासन तक्त दिलें. तुह्मीं खुशाल सिंहासनीं बसणें. मला जर पालखी हवी असती तर कानोजी आंगऱ्यानें जे पालखी राजास दिली, त्या पालखींत बसवून एकीकडे आपण खांदा घेतील व एकीकडे खासा राजा खांदा घेतील ते पालखी मजला अर्पिली. ते मज जर हावी असती तर मी घेतों कीं न घेतों ? मजला पालखी नलगे. कांहीं नलगे. तुह्मीं सुखी असावें हेच माझी पालखी असे. जबानी केरोजी सांगतां विदित होईल. जाणिजे. पालखीचा सरंजाम राजास ह्मटलें कोथळेगांव देणें. त्यास बोलिला जे, चिंचवडच्या देवास नसले तर तुह्मांस देऊं. त्यास कोथळेगांव निमें सचीव, निमें बाजीराव दमाजीस आहे. राजाचें वचन खरें करणें असेल (व) मजला पालखींत बैसविणें असेल, तर कोथळेच्या सनदा केरोजीजवळ करून पाठवणें. नाहीं तरी मला पालखी नलगे. पालखी पाठवूं नये.

# पेशवे.

## राधाबाई.

[लेखांक २६५] श्री.

गंगाजान्हवीसमान मातुश्री राधाबाई यांस आज्ञाः– जागली मीं, देखों सकतां कीं नाहीं? श्रीचे कोटीस मीठ पेण बंदरीं उभयतां चिरंजीवांहीं वीस खंडी देविलें. वीस खंडी मानाजी आंगरे यांणीं दिलें. त्यास तुमचे वीस खंडींपैकीं तुमचे कमाविसदार दहा खंडी देतात. याकरितां त्यास नशेद–(निषेध?) पत्र देऊन आपले तर्फेनें वीस खंडी मीठ पत्रदर्शनीं श्रीचे कोठीवाले यांचे पदरीं घालणें. वीस खंडी मानाजी आंगरे यांणीं दिलें. एकूण चाळीस खंडी कोठी भरून येईल. आपले तर्फेनें वीस खंडी मीठ द्यावयास अनमान न करणें. जाणीजे. हे आज्ञा. आणखी तुमचें मी फारसें मागत नाहीं; परंतु मीठ तरी पोटभर वीस खंडी खाऊं द्या. देवाचें काम चालों द्या. कण खालल्यास त्याचे उतराई होत नाहीं. याजकरितां मीठ मागीतलें असे. उभयतां चिरंजीवांचें फत्तेचें वर्तमान लिहोन पाठविणें, तरी सविस्तर लिहिणें.

[लेखांक २६६] श्री.

मननिर्मल गंगाजल गंगाजान्हवीसमान मातुश्री राधाबाई पेशवी यांस आज्ञा केली ऐसीजे:–चिरंजीव आपांहीं दुलई पाठविली ती उंच आहे. तैसीच विरूबाई यांणीं पाठविली तेही आहे. परंतु तुह्मीं हलखी दुलई वाराणसीचा ताप्ता, चौतार, कोणेक वजा, लाल, पिंवळा, बदामी, जसा असेल तशाची, अगर बंगाली ताप्ता, उत्तम, दुतार, चौतार, ज्या वजेचा असेल संजपी असो– त्याची दुलई आंत अस्तर पसमी घालून, सा हात साडे सा हात लांब, तीन साडे तीन रुंद याप्रमाणें चित्तास येईल तर करून पाठविणें. जाणीजे.

# बाजीराव व चिमणाजी आपा.

[लेखांक २६७] **श्रीभार्गवराम.**

श्रीमत् परमहंस स्वामी यांहीं

सहस्रायु चिरंजीव बाजीराव बल्लाळ प्रधान यांसी आज्ञा केली ऐसीजे:-जकात शाहाबाडा परगणे असेर येथील जकातीचा अंमल नाना[१] कैलासवासी यांचें दत्त आहे. त्याप्रमाणें तुह्मींही चालवीत आहां. ये वर्षीं धामधुमीच्या प्रसंगामुळें तेथील अंमल उठला होता. सांप्रत तांब्राचें[२] व तुमचें सख्य जालें. या उपरी अंमल बैसलेच असतील. तरी हल्लीं श्रीस्थळींहून राघो बल्लाळ पाठविला आहे. यांसी जकात मजकूरच्या सनदा आपले शिक्यानिशीं करून देणें. खानदेशप्रांतींचा सुभा बाबती व सरदेशमुखीचा करून गेले असतील. त्यास ताकीदपत्र व जमेदारांस पत्र देऊन रवानगी करणें. तुह्मांस श्रीचा प्रसाद मोहाचीं शाहाळीं सुमारें ४ पाठविलीं आहेत. घेणें. बहुत काय लिहिणें हे आज्ञा. याचे समागमें धोंडो महादेव यास जकातीच्या धंद्याचा साहित्यउपराळा करावयास पत्र देणें. बहुत काय लिहिणें हे आज्ञा.

[लेखांक २६८]* **श्री.**

सहस्रायु चिरंजीव विजयीभव बाजीराऊ यांस आज्ञा. राजमाची, कोथळा किल्ला तुह्मांस आला. हे किल्ले घरचेच होते! यांत अपूर्व

---

१ नाना:-बाळाजी विश्वनाथ पेशवे. २ तांब्र:-मोंगल. भोपाळची लढाई होऊन निजामाचें व मराठ्यांचें सख्य झालें तो प्रसंग कीं काय?

* हें पत्र लेखांक ११५ ह्या पत्राच्या पाठीमागें लिहिलें असून त्यावर पैवस्तीची तारीख छ २२ जिल्काद शनिवार ही आहे. त्यावरून हें पत्र ता० ८ माहे मार्च इ० स० १७३५ ह्या मितीचें असावें व हें लेखांक ११५ ह्यास उत्तर असावें असें दिसतें.

नाहीं ! कुलाबाही तुमचाच आहे. आज नाहीं उद्यां येईल. कर्नाळा माहुली घेतली असतीत तर चौकडे कीर्ति होती. सातारा दुष्टबुद्धि जे आहेत, त्यांचें राजास कळों येतें. वरकड आह्मीं, गुलाबशिसे उत्तमसे तीनचार पाठविलेंत तर बरें होतें, जिवास बरें वाटत नाहीं, यास्तव लिहिलें होतें. आमचे जिवास मधीं कांहीं बरें वाटतें. कधीं वाटत नाहीं. वरकड वर्तमान यथास्थित असे. लिहावें ऐसें नाहीं. हे आज्ञा.

[लेखांक २६९] श्री.

चिरंजीव बाजीराऊ प्रधान यांसी आज्ञा. आह्मीं तुह्मांस सांगितलें होतें जे, कोथळ्याच्या सनदा बेगी पाठवून देणें व कांहीं वस्त्रें पाठवून देणें. वस्त्रें औरंगजेबा २, सकलाद उत्तम १, पशमी थान दुलई व कुडती करावयास २ येणेंप्रमाणें पाठवून द्या ह्मटलें होतें. बाजी, आज्ञा मोडूं नको. काय, राहों येथें कीं जाऊं एखादेकडेस ? काशीबाई आश्विनमासापासून कुणग्याची म्हैस पाठविल्ये; त्यास कृष्णराऊ याजकरवीं कागद बाईस लिहविला जे, बाई, तुह्मांस पुत्र जालियावर दोन म्हैसी पाठवून देणें. हें भविष्योत्तर पहिलेंच वाग्देवता वदली होती. हल्लीं पुत्र जाला ह्मणून लिहिलें, बहुत उत्तम जालें. कृष्णराऊ याचे आमची गोडी वीरमाडेयांत जाली. त्यास बोलिलों जे, बाईस पुत्र जालियावर तुह्मांस उत्तम वस्त्र देऊं. त्याजकारणें वस्त्र ठेविलें होतें, तें दुर्जनसिंगास दिल्हें. वरकड भेटीचे समयीं तुह्मांजवळ आह्मीं काय मागितलें ? तुह्मींही अपूर्व वस्तवानी काय आणून दिलींत ! आह्मी तुमचे स्नेहाचे भुकेले. नवाबाचे भेटीस गेलेंत, तेव्हां बोलिलों जे तुमचे फत्ते जाली तर आपले देवाचें नांव घेणें. तैसेंच तुह्मीं राजपुरीं प्रांतास स्वार.........[ फाटलें आहे ].

[लेखांक २७०]　　　　　श्री.

सहस्रायु चिरंजीव रघुपतीस[१] आज्ञा. विश्वजन असें ह्मणतें, वांचोन काय देवळें बांधावीं आहेत. शास्त्रें तुह्मी सांगतां आणि आज्ञा तुह्मी मोडितां, याचें काय होईल? हें तुमचें तुह्मांस कळतच आहे. शब्द-पांडित्य आह्मांसी बोलतां, जें आहे तें स्वामींचे आहे; आणि घातो-पोषण वर्ततां! रडतियाचीं आसवें पुशितां! तुह्मींच आमचा वाक्षेप केला! परंतु बरें वाईटसें काम देवळाचें गोठणेंचें मुस्तैद जालें. पूर्ण-गडीं देवळास आरंभ केला आहे. होईल कीं नव्हे हे श्री आधीन आहे. तुह्मीं पुराणें ऐकतां. तुह्मीं ब्रह्माचे लेंक आहां. परंतु आह्मी कवडीचे माणूस आहों!! वाईटसें भार्गवाचें स्थळ सिद्ध झालें आहे. माझे आई, माझा बा, माझें इमान, आतां मी कोणाचे गळां मिठी घालूं? तुह्मीं बोलिलेंत जे, सातारा गेल्यावर हजार रुपये तळ्याचे कामास देऊं; तर तेही नाहींत! धावडशी ही माझी कांहीं मिरास नाहीं. जिकडे जाऊं तिकडे मिरास आमची. बरावाईट जे कोणी माझे तिळीं आळे नाहींत ते थैल्याच्या थैल्या पाठवितात. येरवी तीन हजार रुपये महिना खर्च कोठून पुरता? जो कोणी आज्ञाभंग करील...[फाटलें आहे.] दोष कल्पांतीं नाहीं! तुह्मीं लिहिलें कीं, उभयतां भेटीस आले तेव्हां आह्मीं राजकीय धंद्यांत होतों. अलीकडे जाते समयीं यावें तर अ-नुकूल पडलें नाहीं ह्मणून लिहिलें; तरी तुह्मी कशास याल? XXX [फाटलें आहे.]

---

१ बाजीरावास स्वामी श्रीरामाची उपमा देत असत व चिमाजीआपास लक्ष्मणाची उपमा देत असत. त्यावरून हें पत्र बाजीरावाच्या नांवाचें असावें असें दिसतें. ह्या पत्रामध्यें स्वामींच्या मनाची स्थिति व पेशव्यांवरील रोष हुबे-हुब चित्रित झाला आहे. स्वामींच्या मर्जीप्रमाणें कोणीं वर्तन केलें नाहीं ह्मणजे बहुधा त्यांची रोषयुक्त मुद्रा होत असे.

[ लेखांक २७१ ]  श्रीभार्गवराम.

श्रीमत् परमहंस स्वामी यांहीं

सहस्रायु चिरंजीव बाजीराऊ प्रधान यांसी आज्ञा केली ऐसीजे:- कृष्ण[1] जोशी बिन विश्वनाथ जोशी चिपळूणकर तुमचे शालक यांसीं देवघेव कारकूनांहीं आह्मां न कळत केला. पैसे श्रीचे दिले. त्याचा परिणाम होतां त्याचें दिवाळें निघालें. त्यास चिमाजीआपा व तुह्मीं त्याचें कर्ज वारावयास सा हजार रुपये प्रस्तुत द्यावयास पुण्यास केले आहेत. जोशी यांचा निरोप कारकुनास आला जे, कतबे घेऊन आपाकडेस पुण्यास येणें; तुमचा कजिया वारून देतील. त्यास कारकून माझे जाणार कोण? यांणीं जाऊन काय करणें आहे? रुपये येणें श्रीचे, याजकरितां हें पत्र तुह्मांस लिहिलें आहे. कतबे व हिशेब तुह्मांकडे पाठविले आहेत. मुद्दल देणार, तर पावलें तें लिहिलें आहे. वजा करून उरले रुपये द्या, अगर तेथून आणऊन पाठवून द्या. परंतु आपाकडे कोणी जाणार नाहीं. माझे रुपये तुह्मीं उगऊन येथेंच द्या. तुमचे उपकार आह्मांवर होतील. विशेष लिहिणें तरी सुज्ञ असा हे आज्ञा. मुद्दलपैकीं रुपये ७१७॥≶ सातशें साडे सतरा तीन आणे येणें ते आह्मांकरितां तुह्मींच येथें द्या. कतबे व हिशेब पाठविला आहे हे आज्ञा. सदरहू खेरीज गु॥ चिमणाजी व्याज येणें रुपये ४७. एकूण रुपये ७६४॥≶ येणेंप्रमाणें येणें असेती. हे आज्ञा.

[ लेखांक २७२ ]  श्री.

सहस्रायु चिरंजीव विजयी भव रघुनाथजीस आज्ञा केली ऐसीजे:—

---

१ कृष्णजोशी बिन विश्वनाथ जोशी चिपळूणकर:—ह्मास बाजीरावांचे शालक असें ह्मटलें आहे त्यावरून हे कृष्णराव जोशी चासकर कीं काय? बाजीराव ह्मांचे मेहुणे चासकर जोशी ह्मांचें नांव कृष्णराव महादेव असें प्रसिद्ध आहे तेव्हां हे जोशी कोण?

आह्मांस एका भक्तानें नारायण तेल पाठविलें ते परभारें तुह्मांकडे रा-
माजीबरोबर पाठविलें आहे. घेऊन पावलियाचें उत्तर पाठवणें.
नारायण तेल चांगलें कोठें मिळत नाहीं. किंकनेल तेल ह्मणून आमचे
संग्रहीं आहे, तें वातास लावल्यास गुण येतो. तें पाहिजेसारिखें असेल
तर सांगोन पाठवावें. पाठवून देऊं. वरकड तुह्मांपासून आलियावर
आह्मांस सोळा हजार रुपये खर्च जाहले. आजवर आमचा खर्च चो-
होंकडे कारखाने लागले आहेत. माझा रुका कोणीं उसना मागों नये.
आह्मांजवळही द्यावयास नाहीं. दसरापावेतों येथें राहोन कोठून कांहीं
ऐवज रुपये आले तर खर्च चालेल. नाहीं तर दसरा जाहलियावरी
भिक्षेस निघोन जाऊं. विदित जाहलें पाहिजे. जगजीवनराव पवार
जर तुह्मांकडे येईल तर त्याचे मनानुरूप सरंजाम करून त्यास आ-
णावा. पवार मर्दाने, पुरातन आहेत. जगजीवन कर्ता, तरवारेचा
शूर आहे. त्यास हत्ती देऊन बहुमान करून आपणाजवळ आणिल्यास
तुमची कीर्ति होईल, आणि आमचें वचन ऐकिलें असें होईल. होळ-
कराचा मूल तुह्मांकडे आला आहे. त्यास आणि जगजीवनास कोटीचें
अंतर आहे. इतक्या पवारांमध्यें तुमची कीर्ति होईल. तीन हजार
रुपये तुह्मांकडील लौकर येत सारखें करा. तुह्मांस तीन वर्षांचा कौल
आहे. तीन वर्षे कांहीं तुह्मांजवळ मागत नाहीं. पांच मोहरा ठेविल्या
तरी आह्मांस नलगे. नाहीं तर आमची पैदास्त नये. दसरा पावेतों
आह्मी येथें आहों. कोठून कांहीं ऐवज आला तरी खर्च चालेल.
नाहीं तर दसरा जाहलियावरी कोठें भिक्षेस जाऊं. तुह्मांस कळावें ह्मणून
लिहिलें आहे. एका भक्तानें पद्म देवास दिलें आहे. त्यास पाचा पा-
हिजेत. इतकें जवाहीर तुह्मीं हत्ती भरून राजास आणून दिलेंत. पाचा
जर दहा दहा रुपयांच्या आठ पाठवून द्याल तर पद्मास लावून देवास
अर्पण करूं. श्रेय तुमचे पदरीं पडेल. रुपये रोख देऊं. या गोष्टीचें

आणि पवाराचें अगत्य आह्मांस आहे. जगजीवनाची बहिण खांसा सुंदराबाई दमाजीच्या भावास [ दिली ] आहे. तिकडे यास वग मोठी आहे. परंतु तुझे पदरीं आह्मीं घालितों. अवघ्या पवारांमध्यें तुझी कीर्ति होईल. हा कागद त्याजकडील कारकून आला आहे त्यास वाचून दाखवणें.

[ लेखांक २७३ ] श्रीभार्गवराम.

श्रीमत् परमहंस स्वामी यांहीं

मननिर्मल गंगाजल आचार्यें पुण्यशील भक्तराज बाजीराऊ प्रधान तथा चिमाजीआपा यांसी आज्ञा केली ऐसीजे:—तुह्मीं पत्र पाठविलें; माझें वचन आयकोन सकलाद देतों ह्मणून लिहिलें; कोटीचें यश तुमचे पदरीं पडिलें. मजला वाराणशींत रत्नाभिषेक केलांत ऐसा सुखी जालों. सांबशिवें अवतार धरिला, जसी ज्याची निष्ठा तसा त्यास प्रसन्न होतो. श्री भार्गव तुज सुप्रसन्न आहे. मी तुझा जागली आहें. तुझ्या पुण्यानें ढीग सकलादी आहेत. परंतु कारकुनाचें त्याचें पारडें फार भारी जालें. कानोजी होता तो एकशब्दी होता. त्याचे आहारीं कारकून होते. हे[1] आहेत ते कारकुनाचे आहारीं पडिले आहेत. यास तुह्मांस कांहीं सुचेल ते यांस बुद्धि सांगणें. आमचा इलाज नाहीं. आमचे भेटीस आले तेव्हां आह्मांजवळ मुरुडचे महाजनकीचें वतन बापू गणेश बागूल यांस देतों ह्मणून नेम केला आणि सातारा गेलीयावर कारकुनाचें ऐकोन आतां देत नाहीं ह्मणतात. याजकरितां पुण्यास गेलीयावरी यत्न करून बापू गणेश याचें वतन महाजनकीचें सनद करून घेणें. बापू गणेश चाकर तुझा आहे. याचें महत्त्व वाढविल्यास श्री तुमचें वाढवील. माझें वचन मोडिलें,

---

१ हेः—कान्होजी आंग्र्याचे चिरंजीवांचा संबंध दिसतो. हे चिरंजीव कोण ? सखोजी कीं संभाजी ?

परंतु तुमचें वचन मोडणार नाहींत. हे अवघे रघुनाथजीचे खेळ आहेत. जाणिजे. शिवराम हरी आमचे जवळचा यास जुन्नरचे खाल-शाचे मजमू दत्त करून दिल्हें आहे. त्यास यंदाचा मुजमू मना के-लांत. त्याचेविशीं एक पत्र अंबाजीपंततात्या यांजवळ देऊन रवाना केलें होतें. त्याचें उत्तर न पाठविलेंत. ऐसें नसावें. हल्लीं त्याचें चा-लवणें आह्मांस अगत्य आहे. तें तुह्मीं अगत्य धरून वेतन पावणें ऐसे सनद गोविंद कृष्ण यांस पाठविली पाहिजे. तुह्मीं वेतन न द्या, तेव्हां आह्मांस पदरचें द्यावें लागतें. हें चित्तांत आणून लौकर उत्तर पाठविलें पाहिजे. विशेष काय लिहिणें हे आज्ञा.

[ लेखांक २७४ ] श्री.

सहस्रायु चिरंजीव विजयीभव रामसेवक हणमंत श्रीसेवक उभयतां आपांस आज्ञा केली ऐसीजे:—मी जागली तुमचा. ......आपला कुलस्वामी भजा ह्मणजे तुझा अंगरोग आणि जंजिरा, वसई हें कार्य झालें ऐसें समजा. चुनी लाल, उत्तम, दर ३ प्रमाणें किंमतीचे २० वीस चांगल्या पाठवून देणें. माझें शरीर अशक्त जालें. अमळशी करमणूक करावयास दादाचा लेंक जगन्नाथ पुराण उत्तम सांगतो. पोथी ऐकतो. त्याची सभासदांत असामी गतवर्षीं पुरंधरीं घातली आहे. गतवर्षीं दोनशें रुपये पावले. यंदा तुमच्या चित्तांत करार असामी आहे ते आहे. तुह्मांजवळ पाठविलें तरी गुदस्ताप्रमाणें दो-नशें रुपये बिगी पाठवून देणें.

[ लेखांक २७५ ] श्री भार्गवराम.

श्रीमत् भार्गवचरणेषु धीर रघुनाथाचा सेवक हणमंत–रामलक्ष्मण दोनी बंधु. लक्ष कोटी रत्नमाणकें मजला दिलींयानें कांहीं माझी कीर्ति वाढत नाहीं. उभयतां दोनी बंधु रामलक्ष्मण तुमची फत्ते झाली ह्मणजे त्रैलोक्यांत माझी कीर्ति जाहली. हेचि मी इच्छा रात्रं-

दिवस श्रीपासीं इच्छितों. पैका नामर्दाचा. इजत व यश मर्दाचें. चिरंजीव रायाचें वर्तमान वरचेवर मजला पाठवीत जाणें. तिळगुळाची खलिती श्री भार्गवाचे पादुकांवर ठेवून अर्पण केली.

[लेखांक २७६] श्रीभार्गवराम.

सहस्रायु चिरंजीव विजयीभव श्री रामसेवक हणमंत भार्गवसेवक उभयतां बाजीराव व चिमाजीआपा यांसी आज्ञा केली ऐसीजे:—आह्मीं पूर्वीं तुह्मांस लिहीत असों जे, दोघे देव तुह्मीं उभयतांनीं भक्तिवादें नेले. आज तीन वर्षें लिहितों जे, तीन देव तुह्मांकडेस गेले. यंदा जीवावरील दुखणें गेलें. मजकडेस देव असते तर मजला कां दुखणें येतें? एकला गणपति व भुलोबानें काय करावें? श्री भार्गवाचे संगें-करून कडवईचीं पानें–ह्मणजे गुरु अगर कोणी खाते तर तात्काल मृत्यु प्राप्त होता–तीं पानें श्रीसंनिध सेविलीं! माझे निढळचा घाम पैका कान्होजी आंगरे यांणीं कांहीं बुडविला, कष्टी केलें; व शामलानेंही कष्टी केलें. तें तुह्मांस श्रुतच आहे. याची साक्ष घेणें. कोंकणही तुह्मांकडेस जाहलें. तुह्मीं गतवर्षीं[1] सातान्याहून समाराधनेस सामान देविलें होतें तें, राजश्री छत्रपति व सौ० मातुश्री विरूबाई प्रतापगडास गेलीं, तिकडून येतांसमयीं श्रीच्या दर्शनास आलीं. ते समयीं तुमचे सामानाचे सार्थकता जाहली. एक दिवस मेजवानी सांग केली. मग उंब्रजेस गेलीं. आतां तुमचें कांहीं नको. वसिष्ठाचा हेत जे हरिश्चंद्राचें सत्व रक्षोन चंद्रसूर्यपर्यंत दिग्विजय व्हावा, त्याचप्रकारें आमचाही हेत जे चंद्रसूर्यपर्यंत (तुमचा दिग्विजय) व्हावा. हा हेत धरून तुमचें कल्याण श्रीजवळ नित्य करीत असों. याची साक्ष अंतरीं मनोमन पहिलीच जाहली. तर श्री भार्गव तुमचे भाकेस गुंतला ऐसें समजणें. श्री भार्गवाचें विस्मरण न करणें. त्याप्रांतीं लिहून

१ गतवर्षीं:–इ० स० १७३४ ह्या वर्षीं.

तुह्मीं आह्मांकारणें उत्तम प्रकार कांहीं आणलेच असाल, ते विलंबें पाठवाल; तों आह्मी समाधीस जाणार. दहा[1]रोज समाधीस राहिले. तुह्मीं जें अपूर्व त्याप्रांतींचें पाठवाल तें दृष्टभर पाहोन मग समाधीस बसों, ऐसें चित्तीं आहे. केसोबा पाठविला आहे. सांगतां कळों येईल. विशेष काय लिहिणें ?

[लेखांक २७७] श्री भार्गवराम.

मननिर्मल गंगाजल सत्यवक्ता एकवचनी सहस्रायु चिरंजीव विजयीभव चिमाजीआपा यांसी आज्ञा केली ऐसीजे:— तुह्मी स्वारीहून पुण्यास सुखरूप आलेंत, हें वर्तमान ऐकोन मज आनंदाच्या कोटी झाल्या. वरकड तुह्मांस जें ईश्वरें दिल्हें तें मी कांहीं मागत नाहीं. पूर्वीं तुह्मांस आह्मीं वस्त्रांविषयीं निरवणूक केली होती व पत्रीं लिहिलें होतें. त्यास तुह्मीं यत्न करून आणिलींच असतील. ते वस्त्रें बापुजी गणेश याजबराबर येणेंप्रमाणें देणें:— २ पसमी दुलई उत्तम, १ सकलाद लाखी उंच, चार गज. १ थीरमे सा हाती लांब, तीन हात रुंद जाडी, उंच, हातांस आली असली तर. येणेंप्रमाणें पाठविलें पाहिजे. वरकड कित्येक वृत्त जबानीं बापुजी गणेश सांगतां कळों येईल. जाणीजे. छत्रपति यांणीं श्रीस गांव उत्तम तुमच्या जिल्ह्यांत कोथळे अगर माळशिरस यांतून एक गांव उदक घातलें आहे. राऊ निजामनमुलुकाकडून आलियावर सनदा करून देतील, ऐसें वचन राजाचें होतें. त्यास राऊ येऊन तांतडीनें [2]राजपुरीस गेले. हल्लीं दो गांवांतून एक गांवचे सनदा करून आपले मुद्रेनिशीं पाठवून देणें. गई न करणें. जाणीजे. विशेष लिहिणें तर सुज्ञ असा. यंदा समाधीस

१ समाधीस दहा रोज राहिले ह्या उल्लेखावरून ह्या पत्राची मिति ता० १ माहे जुलई इ० स०१७३५ ही असावी.

२ बाजीराव ता० २२ जिल्काद ह्मणजे ता० २६ मे इ० स० १७३३ रोजीं राजपुरीस गेले ह्यावरून हें पत्र इ० स० १७३३ च्या मे महिन्यांतील असावें.

भार्गवक्षेत्रीं जात नाहीं. वरघाटेंच समाधिस्त होऊं. जाणीजे. आंबे बनसोड नारायणगांवीं उत्तम इरसाल चांगले रुजवणीबद्दल पाठवून देणें. हे आज्ञा.

[लेखांक २७८] श्रीभार्गवराम.

श्रीमत् परमहंस स्वामी यांहीं

सहस्रायु चिरंजीव विजयीभव श्रीसेवक आपा यांसी आज्ञा ऐसी-जेः— तुह्मांस पत्रें पाठविलीं, त्या पत्रीं दमाजीवर स्वारी करावी व कोंकणचें वर्तमान लिहावें. त्यास गाइकवाडाचें व कोंकणचें कांहींच उत्तर पाठविलें नाहीं. तर आजच कांहीं आह्मी नादान जाहलों नाहीं. बरें, उत्तर पाठविलें नाहीं तरी यांत कांहीं आमचें जात नाहीं. वरकड पूर्वींपासून तुह्मांस लिहोन पाठवितों व हल्लीं पत्र पाठविलें आहे. तर राधाबाई[1] व मानसिंग थोरात यांचें चालविल्यासी पृथ्वींतील सरदार जेवढे आहेत तेवढे सुखी होतील. राधाबाई अन्नास महाग जाहली. यासमयीं त्यांचा अभिमान धरून चालविल्यासी श्री संतोषी होईल व आह्मी संतोषी होऊं. तर चित्तांत कोणे गोष्ट न आणतां चालविलें पाहिजे. चिरंजीव रायांनीं येतांसमयीं पूर्ण रीत्यां त्यांसी आश्वासन दिल्हेंच आहे व आह्मीं लिहिलें आहे. तर चित्तावर धरिलें पाहिजे. वरकड उदाजी पवार कर्ता सरदार आहे. पैलीकडील[2] वर्षीं राजश्रींनीं उदाजीस रायगड प्रांतें शामलावर पाठविला. तो वाडी पाचाड येथें सिद्दी अंबर अफवानी याणें पांचसातशें माणूस जमावानिशीं युद्धास उभा राहिला. तेसमयीं उदाजीनें

---

१ राधाबाई थोरात इचें चालविण्याचें चिमाजी आपांनीं लेखांक १२९ मध्यें मान्य केलें आहे व तें पत्र इ. स. १७३६ मधील आहे. त्यावरून ह्या पत्राचें तेंच साल असावें.

२ पलीकडील वर्षीं:—इ. स. १७३५ मध्यें.

त्याचा मोड करून अफवानीचें शीर कापून आणिलें. महाड, बाणकोट हस्त(गत) केला. सिद्दी साद यासी घास्त लाविली. रायगडचे मुर्चे उठविले. मग गोवलकोटावर गेला. तेथेंही शर्तच केली. तों राजश्रीकडील बाबुराऊ यासी व उदाजी यासी न पटे ऐसें जाहलें, ह्मणून वरते आले. तर उदाजीसारिखा सरदार तुह्मांकडेस आला, तर त्याचा सरंजाम करून चालविल्या तो लाखाचें यश देईल. आह्मी तुमचे जागली. तुह्मीं आमचे शब्द मानितां ह्मणून आह्मी तुह्मांस सांगतों. न ऐका तर मग आपणास लोकांमध्यें श्रीचें कां ह्मणवितां व आह्मांस महत्त्व कशास देतां? तुह्मी जाणते सुज्ञ आहां. विस्तारें काय लिहिणें? हे आज्ञा.

[ लेखांक २७९ ] श्रीभार्गवराम.

सहस्रायु चिरंजीव विजयीभव रामलक्ष्मण भक्तराज आपा यांसी आज्ञा केली ऐसीजे. श्रीनिवास केदार यांजबरोबर नवस देवाचा सवाशें पुतळी निफांशी व सवाशें रुपये मुगुटाचे पाठविले. त्यास निफांशी पुतळीया घेत नव्हतों. त्यास श्रीनिवास केदार यांणीं अर्ज केलाजे, स्वामींनें पुतळ्या घ्याव्या. फांशाचें सोनें पांच तोळे व सवाशें मोत्यें, रुपयास एकप्रमाणें, आपांस सांगोन सोमाजी बरोबर पाठऊन देतों. त्यावरून पुतळ्या ठेविल्या. तरी पांच तोळे फांशांचें व मोत्यें सवाशें, रुपयाचे एकप्रमाणें, आधीं पाठऊन देऊन मग वरकड देवांचे नवस देणें. जाणिजे.[1]

---

१ लेखांक ५३ चें चिमाजी आपांचें जें पत्र आहे त्यास हें स्वामींचें उत्तर दिसतें. ह्यानंतर लेखांक ५४ चें पत्र पुनः चिमाजी आपांनीं लिहिलें. त्यावरून ता० १३ मे इ० स० १७३९ व ता० १५ जून इ० स० १७३९ ह्या दरम्यानचें हें पत्र असावें. ह्याच समयाचें स्वामींचें आणखी एखादें पत्र असलें पाहिजे असें लेखांक ५४ वरून दिसतें.

[ लेखांक २८० ] **श्रीभार्गवराम.**

सहस्रायु चिरंजीव लक्ष्मण अष्टप्रधान यांसी आज्ञा ऐसीजे:-अंजनवेलीहून सात आठ गांवें राजपुरीजंजिरांतून तेथून सामान दारू गोळे पायवाटें आज अंजनवेलीस येतील. आणि मार्गी वाटस याची मेटें आहेत. महाडासारखे मेट, तळाघोळासारखे मेट, ऐसीं दहा मेटें आहेत. आणि चौकडून सामान न ये तेव्हां अंजनवेली जेर होऊन आपोआप टाकून पळतील. आतां माणूस मर्दाना ह्मणावा तरी बयाजी महाडकर, अंणाजी साटला, दत्ताजी विचारे ऐसे मर्दाने त्याणें मारले. धर्म जरी ह्मणावा तरी तुमचे राज्यांत कवडीचा नाहीं, आणि कारकून तुह्मांस लेखीत नाहींत. तुह्मांहून अधिक जाहले. राजा कृपाळू, चाकर बेईमान, आपलीं आपलीं घरें भरितात. अवरंगजेब होता त्याचा धर्म जबरा चालत होता. त्याचे दुव्हाईस वाघानें उभे राहावें. तरीच चंदीचंदावर सुटले. राजा तरी महादेवाचा महादेव जाहला. पुढें होईल कसें ? लक्ष्मणबावा ! हें कसें कामास येईल ? तरी तुह्मीं धननीचे कानावर घालणें. आह्मांस कळलें तेवढें लिहिलें आहे. आह्मीं घडीं घडीं हे थोर लोकांस लिहों ना !

[ लेखांक २८१ ] **श्रीभार्गवराम.**

सहस्रायु चिरंजीव विजयीभव. वेडा गोसावी तुमचे कुळीं भार्गवें अवतार घेतला. हणमंतासारिखें यश तुह्मांस आलें. पुढेंही श्री अहद रामेश्वर तहद दिल्ली यश देईल. तुह्मीं वर्तमान लिहिलें व चिरंजीव बाजीरायाचीं पत्रें आलीं हें संतोषाचें वर्तमान ऐकोन, जैसी हणमंताचे गळां रघुवीरें रत्नांची माळ घातली तैसीं यशाचीं पत्रें पाठविलीं. तुह्मी रामरूप जाहलें. मी तुमचा जागली. कैलासवासी नानाबाबत नकद रुपये साडेतीन हजार यास व्याजबट्टा नाहीं. पहा, पहा, माझें थोरपण ! तुमचे घरांत द्रव्य व तपही घातलें, व यशही घातलें. तर

श्रीभुलोबाचे इमारतीचा लगट[1] लागला आहे व ताथवडा येथील काम बाजीचे पुण्यें आकारास आलें; तर यासमयीं जर मजला रुपये दिल्हे तर सुदामदेवाची गत जाहली. साडेतीन हजारांपैकीं पत्रदर्शनीं दोन हजार रुपये केसोबा व नारुजीजवळ देणें. दीड हजार राहों देणें. जरी दहा कोटी फौज घेऊन कोंकणांत जातेंत तरी ऐसें यश कोंकणचें न येतें. ऐसें पुर्ते आपले ठायीं समजणें. रावणासारिखा[2] दैत्य मारिला! नाहींतर मजला राग आला तर मी तुमचा नव्हे. नानाबाबत साडेतीन हजार रुपये बाबत तुह्मीं मठांत उदक घातलें व बाजीरायांनीं जेजुरीचे वर घातलें तर [ तें खरें करा? ].

[ लेखांक २८२ ] श्री.

आपास आज्ञा ऐसीजे:-कोंकणांत पांच गांव इनाम दिल्हे होते व जकात पांचशें बैल यांची जकात देत होता. त्यास आमचे हातचा हत्ती घेऊन गेला [ह्मणून] आह्मीं कपाळास कांठीं घेऊन वरघाटें आलों. त्यावर श्री भार्गवराजाच्या मनांत शिरोन पांच गांव वरघाटें दिल्हे, आणि विश्वजन पैके देतें. तुह्मांस आह्मीं तांदुळ मागितले ह्मणून बोलिलें तर तुह्मी तांदुळ भक्षितां, त्याप्रतीचे तांदुळ माळशिरसीं पाठविले ह्मणजे तुमची निष्ठा खरी. श्री भुलोबाची समाराधना करूं ह्मणजे श्रीभुलोबा भोजन करील. तें श्रेय तुह्मांस येईल. न मागतां सौ० विरूबाईनें दोन हजार रुपये दिले. हे आज्ञा.

[लेखांक २८३] श्री.

चिमाजीस आज्ञा. तुमचे फत्ते श्रीचे कृपेनें अमर्याद जाली. परंतु इतकेंही व्यर्थ दिसतें. कसें तर आपले जन्मभूमीचा स्वामी पूजेविर-

---

१ भुलोबाचे इमारतीचा लगट लागला आहे ह्या उल्लेखावरून हें पत्र इ. स. १७३६ सालचें असावें.

२ रावणासारखा दैत्यः-सिद्दी सात जंजिऱ्याच्या हबशांचा सरदार.

हित, स्वकीय इष्टजन कुटुंबसहित क्लेशयुक्त ऐसे असोन, त्याचें इष्ट आणि श्रीस्थानीं उत्साह पूर्ववत् पूजा आपणासही दर्शन घ्यावयास योग्य जेव्हां नव्हे, तेव्हां सर्व पुरुषार्थ तुमचे अयोग्य आहेत. बरें समजणें. उभयतां बंधु दिग्विजयी. पांडव अर्जुन श्रीकृष्णाचा मनोरथ पूर्ण करीत. आज्ञेत तत्पर, एकनिष्ठ, सेवावृत्तींत लीन, ह्मणोनच भगवान त्यांचे हातून अरिमर्दन करून पृथ्वीचे इष्ट जन देव पालन करवीत. असें कर्ता तो ईश्वर, परंतु पांडवांचे ठायीं कृपा, याजकरितां यश त्यांस देववी. आमचा हेत कीं, तसीच तुह्मीं भावपुरस्सर आज्ञा पालन करावी. श्रीभार्गव स्वक्षेत्रीं नांदतसे, हाच पराक्रम सर्वांत अधिक आहे. तुमचे पूजेची इच्छा ह्मणावी तर तुह्मीं मनोदयानुरूप करावी. यांत अपूर्व काय? लौकिकजन संतुष्ट करितात. भक्तराज खंडेराऊ यांस बरें वाटत नव्हतें. त्याचा समाचार जातां घेतला. त्याणें अतिशयें लीन होऊन श्रीस संतोषी केलें. पांच सात वस्त्रें श्रीस दिलीं. तें बहुतच अपूर्व दिलीं. द्रव्यही उत्कृष्टच दिलें. तुह्मांस परस्परें कळलेंच असेल. तुमचा जागली जेथें जाईल तेथें सर्व अनुकूलास उणें नाहीं. तुह्मांपासीं एवढा पराक्रम दिसतो ह्मणूनच तुह्मांयोग्य तुह्मांस सांगितलें. माझा वैकुंठवासी नाना माझे मनोरथ संपूर्ण करावयास पुन्हां जन्मास आला आहे. त्याचें भाषण काल ऐकिलें. याउपर चित्त संतोषी जालें. नाना माझा होता. तो एकनिष्ठ होता तर दमाजीस त्यास दिल्हा. सय्यदाचा सल्ला झाला. त्यामुळें इतकें अभीष्ट झालें. दिल्लीची मसलत सुरू झाली. एक मनोरथ त्याचा राहिला होता तो संपूर्ण करावयास तुह्मी आलां. त्याचा मनोरथ [पूर्ण करा].

[लेखांक २८४] श्री.

सहस्रायु चिरंजीव विजयीभव चिमाजीआपा प्रधान यांसी आज्ञा केली ऐसीजे:—येसाजी गायकवाड याचा भाऊ बाबजीनाईक गायक-

वाड वसईस चाकर तुह्मांकडेस होता. तेथें युद्धीं पडला. त्याजबरोबर त्याचे सोयरे संभाजी शेटगा मेहुणा व बाबाजी मोरे पडले. त्यांचे खबरीस तुह्मांकडे आगोटीस येसाजी गायकवाड पाठविला होता. त्यासी तुह्मीं त्याचे क्रियेस तिघांचे रुपये पन्नास दिल्हेत. ते घेऊन येऊन येसाजीनें क्रिया तिघांची केलिया बालपरवेशी तिघांची चालवूं; पुढें येणें ह्मणजे सवाशें रुपये देऊं; ऐसें तुमचें वचन होतें. त्यावरून हल्लीं येसाजी गायकवाड पाठविला आहे. तरी याचे बालपरवेशी बेगमीस सवाशें रुपये वचनाप्रमाणें याचे पदरीं घालणें, व कांहीं वस्त्रपात्र बायकांस देणें. तुमच्या वचनाचा भरंवसा धरून यास पाठविला आहे. दिवसगत न लागतां याचे रवानगी करून पाठविला पाहिजे. मागें पन्नास रुपये तुह्मीं दिलेंत ते कापून घेतलेले पाडेसार दिल्हेत. ते कोठें न चालत. पाडा दर रुपयास चव्वल मागत. मग आह्मीं ते रुपये ठेवून मुबदला चांगले आपणापासून दिल्हे. ऐसेच हल्लीं रुपये द्याल, ते तैसे न देणें. चांगले रुपये आपले दृष्टीनें पाहोन, पाडा न पडे ऐसे रुपये सवाशें देऊन, याची रवानगी करणें. बोलल्या बोलास अंतर केलियास आह्मांस कोप येईल. ऐसें न करणें. विशेष काय लिहिणें. हे आज्ञा.[1]

[लेखांक २८५] श्रीभार्गवराम.

सहस्रायु चिरंजीव मननिर्मल विजयीभव चिमाजीआपांस:— तुह्मीं पत्र पाठविलें, उत्तमकाळीं प्रविष्ट होऊन पत्रश्रवणें परम संतोष जाहला. केवळ वैकुंठींच वास जाहला ऐसा संतोष जाहला. कौरव पांडव द्यूत खेळोन पांडव वनवासास चालिले, ते समयीं कुंती श्रीकृष्णास बोलिली जे, तूं द्वारकेस चालिलास, आमची गत पुढें काय? ते समयीं कृष्णनाथ बोलिला जे, मी कांहीं द्वारकेस जात नाहीं. अहर्निशीं

---

१ लेखांक १४९ पहा. त्या पत्राचें हें उत्तर आहे.

तुमचे पुत्रासन्निधच आहें. द्वारकेस गेलों असें लोकांस वाटतें. परंतु क्षणभर विस्मरण पांडवांचें पडेल तेव्हांच अवतार संपूर्ण जाहला. ऐसें शपथपूर्वक बोलिला. कुंती व कितेक भक्त कृष्णास ह्मणाले जे, तुझे निजभक्त पांडव आणि वनवासास कां जातात? तेव्हां उत्तर दिलें जे, यांसी वनवासास पाठवून तपश्चर्या करितील. मग ते तपोबळें कौ-रवांचें निर्दालन करितील. तर तुह्मीं रुपयांचें लिहिलें तर पांच हजार काय व शंभर काय व लक्ष काय व रुपया काय! मी तुमचा जागली बोलिजे. पूर्वीं भक्तितपःसामर्थ्यें वामन द्वारपाळ केला, त्याप्रमाणें तुह्मी भक्तियोगेंकरून आह्मांस कालक्रम परशराम यांसी आपले द्वारपाळ करून ठेविलें. तर सोडावयाची आज्ञा कधीं द्याल ती कळत नाहीं. काडीमुड्याचीं वाईटशीं कामें होत आहेत हें श्रेय तुमचेच पदरीं पडतें. मातुश्रीचे शरीरीं सावकाश नाहीं ह्मणून लिहिलें, तर आरोग्यता जा-हलियाचें वर्तमान लिहिलें नाहीं तर आह्मांस तेथवर यावें लागेल. गतवर्षीं[1] आमचे शरीरीं वेथा जाहली ते समयीं मातुश्री धावडशीस आली होती. आरोग्य जाहलियाचें वर्तमान लिहोन पाठवणें.

पु॥ साखर खाऊन समाधान जाहलें. साखरेचे रुपये ४० पाठविले ते पावले. व साबाजी नाईक यांचा कौल पाठविला तो पावला. व मोत्यें २५ पाठविलीं तीं पावलीं. विशेष काय लिहिणें? संभाजी यादव व भिवजी यादव या हरदु जणांनीं आह्मांस राजश्री–दरबारीं यत्न मात्र करून पाहिला. परंतु कांहीं चालेना. पुण्यास येऊन साबाजी राऊत न्हावी याणें डोकीच करावी! याचा पाट निघाला!! अवघा गांव बुडवून जाया न पडावा हा विचार करीत होते; परंतु कोठें चालिला नाहीं! ते लबाड आहेत. वरकड बंदसोडीचे आंबे लावणीकारणें

---

१ गतवर्षीः—इ० स० १७३७ ह्या वर्षीं स्वामीं आजारी होते त्यावरून हें पत्र इ० स० १७३८ सालचें असावें.

व जाहले उत्तम इरसाली पाठवून देणें. बरें, वसईचा अभिमान श्रीस आहे. तुह्मी चिंता करितां एक गुण, श्रीस दशगुण आहे. चिरंजीव बाजीराऊ याकडील वर्तमान लिहोन पाठविलें तें पावलें. विशेष काय लिहिणें ? हे आज्ञा.

[ लेखांक २८६ ]      श्रीभार्गवराम.

सहस्रायु चिरंजीव आपांस आज्ञा. तुह्मांस बहुमान झाला, आह्मांस स्वर्गांतून विमान आलें. यास लटकें असेल तरी आह्मांस शिष्याची आण असे. हेंच प्रमाण असेल तरी अंतकाळ बराच येईल. बहुमानाची भिक्षा देणें. शेणवी याणें आमचा अपमान केला आहे. त्यापासून पंचवीस हजार रुपये घेणें. आह्मांस नानाप्रमाणें ह्मणत असत तर चौवीस हजार खर्च करून एक हजार आह्मांस पाठवून देणें. निळो पतकी चिपळुणकर याणें हबशी याकडे आमच्या चाड्या सांगोन परशरामींतून आमचे भांडीं, दरवाजा, नगारे नेविले आहेत. त्याच्या लेंकाचा धंदा नारायणगडीं आहे. त्यास दूर करून कचेश्वर गोविंद (यास नेमणें). माझा अपमान शेणवी याणें केला आहे, तो कैलासवासी नानाचा अपमान केला आहे. त्याचें पारपत्य केलेंच पाहिजे. [न] कराल तर परशरामाची आण असे.

[ लेखांक २८७ ]      श्री.

मननिर्मल गंगाजल चिरंजीव चिमाजी आपा यांसी आज्ञा केली ऐसीजे:— चिरंजीव सदाशिव याचें कांहीं वर्तमान लिहीत नाहीं. तुह्मीं आंबे बनसोडीचे पांच पाठविले; आणखी पाठवावयास नव्हते कीं काय नकळे ! कोठून पाठवाल ? विजवडीबद्दल बनसोडीचे आंबेयांच्या आटोळ्या असतील त्या व आणखी इरसाली आंबे नारायणगांवच्या आटोळ्या असतील त्या पांचशें पावेतों ज्या पाठवाल त्या कार्याच्या आहेत. आह्मी आहों तों पाठविल्या तर लावून मग समाधीस परश-

रामास जाऊं. लौकर पाठविले पाहिजे. घोडी पाठविली ती आपल्यास पावती केली. धुरंधर चिरंजीव बाजीराऊ व तात्या[1] गुरुवारीं दशमीस धावडशीस भेटीस आले होते. तुह्मांस कळावें याजकरितां लिहिलें आहे. तुह्मांस प्रसाद भोगवस्त्र दुलई ठेविली होती, ते भेटीचे समयीं अंबाजीपंत तात्यांहीं भांडोन झगडोन आह्मांपासून घेतली. ऐशास दुलई पांघरावयास पाहिजे तरी, या दोघांस न कळतां दुलई चित्तास येईल तैशी करून सोंवळ्याची पाठविणें. बाजीराऊ व तात्या दोघे भांडतात. त्यांचें तुजकरितां आह्मी चालवितों. तुजही कळलेंच आहे. आह्मीं लिहिलें होतें जें, राजा येईल तेव्हां तूं सातारा येणें. त्यास बापू[2], तूं आमचें कोठें ऐकतो? येथें तो अवघे पांचसा पातकी आहेत. उमाबाईकडे अवघे जाले आहेत......चिरंजीव सदाशिव सुखी असावा.

## बाळाजी बाजीराव.

[ लेखांक २८८ ] **श्रीभार्गवराम.**

श्रीमत् परमहंस स्वामी यांहीं

सहस्रायु चिरंजीव विजयीभव नाना प्रधान यांसी आज्ञा ऐसीजे:- तूं वंश बाळाजीचे पोटास आलास. यासी कोणी लटकें ह्मणेल तोच अध:पातास जाईल. याकरितां तुह्मीं उदासपणें लिहिलें तर मी तपश्चर्या तुह्मांकरितां करितों. याहून तपश्चर्या सुईचे अग्रीं करून संकष्टा चतुर्थी समाधि आपले ऐस घेईन. तुह्मीं निर्भय चित्तें मुलुखगिरीस जाणें. कोटीची फत्ते होत आहे. श्रीचरणीं भाव ठेविला ते पूर्णआयुष्यी झाले.

---

१ तात्याः—अंबाजी त्रिंबक पुरंदरे.

२ बापू:—चिमाजी आपास स्वामींनीं प्रेमळपणानें चिमणाबापू ह्या अर्थीं बापू हें संबोधन दिलें आहे.

तूं पूर्णआयुष्यी होशील. मजला भार्गवाजवळ व भुलोबाजवळ मागणें हेंच. आह्मांस एवढें मानपत्र पावलें. इतके दिवस मार्ग पाहतों. पत्रें पाठविलीं ह्मणून लिहिलें तर आह्मांस पावलीं नाहींत. तुमचीं फत्तेचीं पत्रें वरचेवर पाठवीत जाणें. ह्मणजे संतोषी होऊं. तीळगूळ संक्रमणाचे पाठविले आहेत. स्वीकारणें. हे आज्ञा. तुमच्या पुण्यानें नवीं कामें येणेंप्रमाणें लाविलीं. पाणी लागलें:–१ पिंगोरी, १ शिरवळानजीक आंधारे १ कासुरणीस, १ तळें भुलेश्वर एकूण चार कामें नवीं केलीं. पाणी लागलें. कळावें ह्मणून लिहिलें आहे. आणखी एखादें मोठेंसें संकट घालणें. जेथें पाणी नसेल तेथें पाणी करून श्री देईल. महादोबा श्रीचा आहे. स्वामींच्या कामावर एकनिष्ठ आहे. याजवर दया करीत जाणें.

[लेखांक २८९] श्री.

नानांस आज्ञा. दत्ताजी कनोजे ह्मणून सरदार नामांकित कान्होजी आंगरे सरखेल यांजवळ होते. ज्यांणीं जयगड बांधला, मोठमोठीं कामें केलीं, ते मृत्यु पावले. त्यांचे पुत्र सयाजी[1] कनोजे, आह्मांजवळ सखोजी आंगरे यांचे वेळेस आले. त्यास अन्न महिपतगडचा हवाला श्रीनिवासराऊ यांजकडून महिपतगडीं यमाजी शिवदेव यांजकरवीं सांगविला होता. बरेंच चालत होतें. त्यास यंदा बजाजी कदम याणें रसद पांचशें रुपये यमाजीपंतास देऊन हवाला दूर करविला. आणखी अन्न दुसरे जागा सांगूं ह्मणून गळां पडिला आहे. परंतु सयाजी कनोजे राहत नाहीं ह्मणतो. याचें आह्मांस अगत्य आहे. कर्ता आहे. त्यास उत्तम एका किल्ल्याचा हवाला सांगावा. तेथें चौकस धंदा करील. कामाचा असला तरच याचें चालवावें. तुह्मांसही याचे सहवासें

१ सयाजी कनोजेः–लेखांक ७२।७६।१५५ पहा.

कर्तेंपण कळों येईल. विशेष काय लिहिणें? उत्तर आलियावर यास तुह्मांकडे पाठवून देऊं.*

[ लेखांक २९० ] श्रीभार्गवराम.

मननिर्मल गंगाजल पेशवे प्रधान. बरें, तुह्मीं आठवीत नाहीं. परंतु आह्मी बाळाजी पासून तुमच्या गाई चारितों. बरें, तुमच्या मनांत आलें तरी बरें. तुह्मांस ठाऊक नाहीं तर आह्मी सांगतों. तुह्मी आलेंत तेव्हां साडे पांचशें रुपयांचीं वस्त्रें लागलीं. काल सदाशिवबाबा आले तेव्हां वस्त्रें ऐशी रुपयांचीं लागलीं. तुह्मांस सारें ठाऊक आहेच. परंतु आह्मी उगेंच लिहितों. आह्मी कांहीं तुह्मांजवळ मागत नाहीं. तुह्मीं साहजार एकशें वर्षास देतां, तेवढेच आह्मांस कोटीचे जागीं आहेत. आह्मी समाधीस बसलों; परंतु एक पशमी थान व दोन चार शालजोडी लांबसी साडे सात हात ऐसी सोमाजी बरोबर पाठवून देणें. तिजवर स्नानसंध्या करून तुमचे पदरीं पुण्य पडेल. तुह्मांस मध प्रसाद ८॥ आदमण पाठविला आहे. हे आज्ञा. आह्मीं घोड्यासाठीं तुह्मांस लिहिलें होतें. घोडा देणें, नाहीं तर हजार रुपये देणें. त्यास तुह्मीं लिहिलें कीं

---

* हा मजकूर बाळाजी बाजीराव ह्यांच्या एका पत्रावर लिहिला आहे. तें पत्र येणेंप्रमाणें आहे:— श्री

"श्रीमत् महाराज श्रीपरमहंसबावा स्वामींचे सेवेसी:—

चरणरज बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक साष्टांग नमस्कार. विनंति. येथील कुशल आश्विन शुद्ध चतुर्थी रविवारपर्यंत स्वामींचे आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. उत्तर प्रांतींचा कार्यभाग उरकून त्रितिया मंदवारीं स्वामींचे आशीर्वादप्रतापेंकरून सुखरूप पुण्यास आलों. स्वामींस अवगत व्हावें ह्याकरितां लिहिलें असे. कृपा केली पाहिजे हे विज्ञापना."

हें पत्र आश्विन शुद्ध ४ ह्मणजे ता० ५ जुलई इ० स० १७४१ ह्या मितीचें आहे. त्यावरून वरील स्वामींचें पत्र इ० स० १७४१ सालचें असावें असें दिसतें.

१ लेखांक ७६–८४ पहा. ह्यांच्या पूर्वीचें हें पत्र दिसतें.

आह्मीं आल्यावर घोडाच स्वामीयोग्य देऊं. त्यास आह्मीं तों येथें बाराशें रुपयांचा घोडा तुरकी घेतला आहे. पाहे. राजानें घोडा दिल्हा आहे तो कसा, चौमुलकांत कीर्त जे, असा घोडा खासा बावांस दिल्हा. आणि तुह्मी घोडें देतां ते निबर, आमचे कामाचें नाहीं, ऐसें कृत्रिमें देतां. याजकरितां आह्मीं लिहिलें कीं, रुपये पाठवणें. आह्मीं आपले खातरेयोग्य घोडा घेऊं. त्यास तुह्मांस मजपेक्षां रुपयेच अधिक जाले कीं काय? हल्लीं आह्मीं घोडा तों घेतलाच आहे. तुमचे चित्तास येईल तरी बाराशें रुपये पाठवून देणें. वरकड वर्तोव्याचे रुपये राहिले आहेत. ते आह्मांस निकड रुपयांची आहे. तरी राहिले रुपये सोमाजीबरोबर पाठवणें. व एक तोळाभर कस्तुरी व दोन तोळे केशर व तोळाभर अंबर ऐसें पाठवणें. तुमचे पुण्यानें गणपतीचे देवळाचें व तळ्याचें काम आजि वर्ष दीडवर्ष लागलें आहे. चार साडेचारशें माणूस खपतें. हेंही तुमच्या पुण्यें सिद्धीस जाईल. आह्मी राजुरास निघोन जाणार होतों परंतु राजेयानीं राहविलें. नाहींतर आमचें नांव कशास घेतां? जर तुमच्याच पुण्यानें चालत असिलें तरी तेंही आह्मी पुढें पाहतच आहों. आह्मांपेक्षां तुह्मांस रुपये अधिक जाले असिले, तरी रुपयेही न देणें आणि घोडेंही न देणें. मग आमचे कपाळीं असेल तें होईल. आह्मी तुमचे पुण्यानें समाधींतून सुखरूप उठलों तरी भेट होईल. नाहीं तरी संस्थान चालविणें. हें तुमच्या वडिलांपासून तीन पिढ्या क्रियाभाक झालीच आहे. तें स्मरोन चालवालच यांत अपूर्व काय आहे? आमची खर्चाची वोढ बहुत आहे. वार्षिकप्रमाणें सा हजार एकशें रुपये चतुर्थी अलीकडे चार दिवस सोमाजी बरोबर पाठविलेंत ह्मणजे संतोषी होईन. आणि वार्षिकप्रमाणें पशमी थानें ४ व शालजोडी एवढीं पाठवून देणें. व घोडीचे रुपये बाराशें ऐसे पाठविले पाहिजेत.

## सदाशिव चिमणाजी

[लेखांक २९१]* श्री.

श्रीमत् परमहंस स्वामी यांहीं

चिरंजीव सदाशिव चिमणाजी यांस आज्ञा केली ऐसीजे:—आह्मीं निशाण पाठविलें जे, नानाची फत्ते होवो आणि किलीजखान यास पादाक्रांत होऊन याचे पायाखालीं येवो, ह्मणून आह्मी तीन महारुद्र भुलोबास बोलिलों. त्यासी दोन महारुद्र आह्मी करीतच आहों. एक महारुद्राची सामग्री राधाबाई काय लागेल ती पुण्याहून माळशिरसास पाठवील तरी पाठवणें. न पाठवील तर आमचा पायपोस गेला! तीन महारुद्र करून आह्मीच श्रेय घेऊं. नाहींतरी तुह्मांस देऊं. कैलासवासी नानापासून उभे चतुर्थीचें श्रेय समाधीचें श्रेय तुमच्याच कार्याकरितां देतों, हें राधाबाईस कसें न कळे? आणि ती डोळ्यावर कसें कातडें घेत्ये? तिचे लेकानें पुण्याचे मुक्कामीं काय काय देऊं केलें होतें तें अवघें ××× गेलें! जावो!! मज कोप आणूं नका. कोप आणल्यास कोणाचें बरें झालें नाहीं. नानाची काय गत व महादाजी बल्लाळ याची काय गत व विरूबाईची गत काय झाली हें तुह्मांस कसें न कळे! आठ दिवस पैका पाठवून देतों ह्मणून नेम केला त्यास दिवस किती जाहले? हल्लीं तळ्याचे कामास कर्ज पैकीं रुपये १०,००० दहा हजार पाठवून देणें. न पाठविल्यास जसा पुण्यांत आपावर कोप होऊन गेलों, तैसा कपाळास काठी घेऊन उनातानांत एखादेकडेस जाईन. पुढें काय होईल तें कळों येईल. पुण्यावर कोप होऊन तळेगांवास गेलों. तेथें उमाबाईनें वस्त्रपात्र देऊन पूजा केली. दमाजीकडे जाऊं न देई. आणि काल सातार्‍याहून भेटीस धावडशीस येऊन दोन हजार रुपये आणून दिले. ऐसी त्या लोकांची निष्ठा. आणि तुह्मी तों आमचीं ह्मणवितां, आणि

---

* लेखांक ८३ हें लेखांक २९१ चें उत्तर असावें.

तुमची निष्ठा या प्रकारची! तुह्मांस कामास येईल!! इतक्यावर आह्मीं काय करावें? वसईचें ठावें आहेना? वसई न आली तर या राज्यांत राहील त्याचें संन्यासपण लटकें असे कागद गेले होते! ते तुह्मांस ठावेंच आहेत. पंधरा दिवस गोमूत्र टाकिलें होतें. ऐसें असोन तुह्मांस होणारासारखी बुद्धि आठविली! सासवडचें ठावकें आहेना? पुण्यांत मन कां कष्टी केलें होतें?

[ लेखांक २९२ ] श्री.

श्रीमत् परमहंस स्वामी यांहीं

श्रीभगवान्स्वरूप परमेश्वराचें तेज सदोत्रास आज्ञा केली ऐसीजे:— बहुत दिवस जाहले, परंतु समाचार कळत नाहीं. बरें आमचें काय जातें? तुमचे पूर्वज जें जाहलें वर्तमान सविस्तर लिहीत असत. संक्रमणाचे तीळगुळ पाठवीत असत. बापुजी[1] मेघश्याम याजकडे उदकदत्त रुपये ५० पन्नास येणें व रामचद्रपंत पिंपळनेरकर दिंमत कवडे याजकडे उदकदत्त रुपये ५० व वस्त्रें २ ऐसीं येणें आहेत; तर बापुजीपंताकडील व रामचंद्रपंताकडील रुपये १०० व वस्त्रें २ ऐसीं पाठवून देणें. रुपये पोताचे पाठवून तुह्मीं त्याजकडून जासूद पाठवून रुपये आणवणें. या गोष्टीनें तुमचे पदरीं पुण्यच पडेल. तुमचे वडिलांनीं न्हावीचे तळावर एका घटकेंत हजार रुपये भिक्षा परहस्तें करून दिली. तुह्मी ऐसें करितां, हें बरें कीं काय? तुमचें देवाचें कार्य होतें व आमचें चित्त संतोषी होतें ऐसें करणें. राजा ह्मणजे कोणास नेदी. आमचें उदकदत्त येणें रायाकडे रुपये पांचशें होते. ते त्यांसी कळतांच रुपये पोताचे पाठविले आणि त्याजकडून घेतले. तुह्मी तों पुरातन श्रीचे आणि असें करितां हें काय? पुढिले जन्मीं येईल कीं काय? पालखीकरितां कितेक वेळां लिहावें? अतःपर लि-

१ लेखांक ८१ पहा.

हिणार नाहीं. तुह्मांस संसाराची चिंता आहे. पालखीची चिंता याज-हून विशेष असावी. आतां वारंवार लिहीत नाहीं. चिरंजीव नानाचें वर्तमान काय? कोणते गडकोट हबशांचे जंजिरे घेतले हें न कळे. त्या-जकडीलही पत्र फार दिवस येत नाहीं.

चिरंजीव दादोबास आज्ञा केली ऐसीजे, चिरंजीव सदाशिव-पंत यांसी पत्र पाठविलें आहे. तर त्याजकडे प्रविष्ट करून उत्तर पाठवणें. जाणीजे.

[लेखांक २९३ ] श्री.

सहस्रायु चिरंजीव विजयीभव सदोबा यांसी आज्ञा. तुमचे मस्तकीं हात ठेविला. आपलें स्वरूप तुझे स्वरूपांत घातलें. जसा पांडवास श्रीनें अनुग्रह केला. विश्वासो फळ होय. कां तुह्मीं सा वर्षांचा मक्ता पैक्याचा करून दिल्हा! नियताप्रमाणें समाधीस द्यावें. त्यावेगळी टोपीस मखमल मागितली तर एवढा माझा अन्याय पोटीं घालणें!! प्रसादिक समाधीची शालजोडी सात हात पाठविली आहे. या शा-लेवर स्नानसंध्या करणें. चिरंजीव नानानें आज्ञा करून पत्रें दिलीं होतीं. बरवाजी पाटील व शंकराजी केशव व खंडोजी माणकर यांसी पत्रें दिलीं जे, त्या प्रांतींचे हशम, मुलूख उत्तम, भिक्षा करून देणें. याकरितां तिकडे माणसें पाठविलीं आहेत. तर दुसरीं ताकीदपत्रें त्यांस पाठवून भिक्षा जमा होय तें करणें. कैलास-वासी बाळाजी नानापासून पिलाजी जाधव याणें बहुत द्रव्य मि-ळविलें आहे. दोन तीन कोटी द्रव्य आहे. तर फुरसतीनें श्रीचा अंश असिला तर द्रव्य युक्तिप्रयुक्तीनें घेऊन हशमांस वांटणी करणें.

[लेखांक २९४] भार्गवराम.

श्रीमत् परमहंस स्वामी यांहीं

अनंत जन्मांच्या राशी, भेदोनी गेल्या गगनासी, मर्यादा नाहीं

भाग्याशी, ऐसेंच घडलें. सहस्रायु चिरंजीव सदाशिवपंत भाऊ यांसी आज्ञा ऐसीजे:–पांच हजार रुपयांची पावती पाठविली ते आपण फिरोन पाठविलें; आणि खंडोजीबरोबर सांगोन पाठविलें कीं, मुद्दल पैकीं पांच हजार पावले ऐसी पावती द्यावी. तरी आजिपर्यंत व्याजाचा हिशेब काय होतो तो तुह्मीं फडनिसाजवळ पुसावें. पांच हजार जाजती होतील. पुढें व्याजाचा हिशेब द्याल, त्यामध्यें पांच हजार वजा करावें. पावती काल पाठविली तेच पावली असे. विल्हेस लावून ठेवावी. वरकड, हेमगर्भाविसीं लिहिलें होतें. त्यास आपण लिहिलें कीं, यत्न केला परंतु मिळाला नाहीं. तरी आह्मीं वैद्याकडून हेमगर्भ दोन तोळे आणविला आहे. रुपये वीस पडले. तरी वीस रुपये किंमत पाठवून दिली पाहिजे. वरकड तुह्मी मजशीं दोन भाव धरितां, हे गोष्ट कामाची नाहीं. माझे शरीरीं किमपि ताकद राहिली नाहीं. हाडें निघालीं तीं तुह्मीं आपले डोळयांनीं पाहिलीं. ऐशास मजला तवाना करणें असेल, तरी एक म्हैस दुभती, चांगली, ऐसी खिल्लारांतून आणवून पाठवणें. वरकड, आह्मी तुह्मांसीं काडीभर प्रपंच धरीत नाहीं. आजपावेतों तुह्मांकडे मागेंपासून उसनवटें बहुत होतीं. त्यांचा हिशेब ह्मणावा तरी बहुतच होईल. वर्तांळा अलीकडे जाहला, परंतु माझें धैर्य थोर आहे. काल तुह्मी दर्शनास आलेंत तेव्हां एक शालजोडी तरी लांबसी आणावी होती! वृद्धापकाळीं स्नानसंध्या करितों. मागें लग्नाची पाठविली तेही आह्मांयोग्य पाठविली नाहीं. ऐसे दोन भाव धरूं नका. वरकड तुह्मी येथून गेलेंत तेव्हां वाटेस याद जगन्नाथ चिमणाजी यांहीं नेऊन तुह्मांस दाखवून ××× पाठविली आहे. तेणेंप्रमाणें नारो राम मजमदार तारापूर याची सनद करून पाठविली पाहिजे. पंचवीस रुपये जाजती एकूण सव्वादोनशें रुपये सनद पाठवावी. बहुत लिहिणें तरी सुज्ञ असा हे आज्ञा.

# मराठे सरदार, मुत्सद्दी वगैरे.

## १ नागपूरकर भोंसले.

[लेखांक २९५] श्री.

श्रीमत् परमहंसबावा स्वामी यांहीं

निजभक्तशिरोमणी सहस्रायु चिरंजीव रघोजी भोंसले यांसी आज्ञा केली ऐसीजे:—श्रीनें कांहीं तुमचें कार्य केलें नाहीं व बरें कांहीं केलें नाहीं. पूर्वीं बापूजी भोंसले हबशी यापासून सोडविलें व संताजी भोंसले यांची बेडी नानाकरवीं प्रयत्नें तोडविली. बयाबाई यांणीं पांडवगडीं होती तेव्हां त्यांणीं श्रीची सेवा केली, तेव्हां आह्मी संतोषी जाहलों. ते समयीं त्यांणीं सांगितलें जे, माझा रघुजी यास आशीर्वाद भाग्यास आला ह्मणजे स्वामींचे सेवेसी चुकणार नाहीं; तर रघोजीस आशीर्वाद उत्तमप्रकारें द्यावा. ते समयीं तुह्मांवर पूर्ण दया जाहली. त्यापासून तुमचें कल्याण इच्छितों. त्यासी श्रीनें तुह्मांस संतत, संपत्ति, यश दिल्हें. तुह्मी तों सेवेसी चुकणार नाहीं, परंतु आह्मींच त्या प्रांतास येत नाहीं. आलियावर तुह्मांपासून अंतर पडणार नाहीं. तुमचे गांवीं जेवरी माळशिरसचीं कुळें पळोन आलीं, त्यास मानाजी खलदकर याकडेस श्रीचें कर्ज येणें रुपये वगैरा कुल त्याकडेस येणें आहे. त्यासी तुमचे गांवीं कुळें आलीं, तो गांव श्रीचाच आहे. तर तेथें कुळें आहेत त्यांकडेस रुपये येणें. त्यासी दोन चार कुळें आह्मीं आणून अटकेंत ठेविलीं. त्यांचीं माणसें तुमचे स्थळीं आहेत. तर तीं कुळें आपले हातीं घेऊन त्यांकडील मुद्दलच रुपये तुह्मीं देवणें. तुह्मीं कुळांबद्दल हवाला घेतला आणि रुपये पाठविले ह्मणजे कुळें पाठवून देऊं. येणेंप्रमाणें नांवनिशी:—

| निसबत मानाजी खलदकर. | | किता कुळें. | |
|---|---|---|---|
| १०० | आपाजी मालवदकर. | ७५ | अंबरा वाणी |
| ३७५ | खुद्द मानाजी. | ७५ | शिवाजी महाडीक |
| २६ | चिमा तेली. | १०३ | मल्हारी बाकरा |
| ५०१ | | २५३ | |

पैकीं वसूल रुपये.
 २२ आपाजी मालवदकर.
 ६ चिमा तेली.
बाकी रुपये ४७३
तेरीज २३३

७०६

पैकीं वसूल अंबरा वाणी २०
बाकी २३३.

एकूण सातशें सा रुपये त्याकडे मुद्दल आमचें येणें. त्यासी हे रुपये तुह्मीं पाठवावे ह्मणजे कुळें व कतबे पाठवून देऊं. सातशें सा रुपये मुद्दलच तुह्मांकरितां घेतों. काय निमित्त कीं, तीही पेठ आमचीच. ती पेठ औरंगाबाजेसारिखी जास्त वसवणें. आपलीं कुळें आमचे रुपये पाठवून घेऊन जाणें ह्मणजे नांव तुमचेंच आहे. यानंतर चिरंजीव नारो शंकर याणें वराडांत अकोटच्या अविंधाकडेस सेवा केली. तीन चार वर्षें होते. सांप्रत त्याणें नारो शंकर याजवर तुफान करून सात सहस्र रुपये दंड ठराविले. त्यांपैकीं तीन हजार रुपये घेतले. बाकी चऊ हजार रुपयांबद्दल जामिनाचे घरीं चौकी बसविली. कांहीं खाल्लें-पिल्लें नसतां नाहक याजवर दंड घातला आहे. तर याचें श्रीस बहुत अगत्य आहे ह्मणून तुह्मांस लिहिलें आहे. तर अकोटच्या अविंधास व जमीदारास ताकीदपत्रें लिहून देणें कीं, वाजवी त्याचे अंगीं पैसा नसतां काय समजोन ब्राह्मणास कष्टी करितां ? याउपर त्या ब्राह्मणाचे

वाटें न जाणें. नाहींतर तुमचा आमचा स्नेह राहणार नाहीं. ऐसीं ताकीदपत्रें देऊन जे गोष्टीनें याची मुक्तता होय तो पदार्थ अगत्य करणें. अनमान न करणें.

[लेखांक २९६] श्री.

श्रीमंत परमहंस स्वामी यांहीं

गंगाजान्हवीसमान मातुश्री काशीबाई भोंसली यांसी आज्ञा केली ऐसी जे:—सारी पृथ्वी आह्मांस ध्याते आणि हजारांचे हजार पैके धाडून देतात. सौभाग्यवती विरूबाई वर्षामध्यें चार वेळां आमचे भेटीस येतात. हें तुह्मांसही परस्परें विदितच आहे. आमचा विश्वासघात करून शिंपी माळशिरसचे पेटेंतून पैसे घेऊन तुझे गांवांत जाऊन राहिले आहेत. त्याजकडे गोविंद केशव गेला आहे. तरी हिशेबाप्रमाणें त्याच्या मुसक्या बांधून त्याजपासून पैके घेऊन आह्मांकडे पाठवून देणें ह्मणजे आह्मी पोटभर गोमूत्र घेऊं, आणि तुजला तुझ्या पुत्रास आशीर्वाद देऊं. त्याजकडील रुपये पाठविल्यास तुझीच भिक्षा पावली ऐसे संतोषीं [होऊं]. ते कांहीं स्वर्गास तुज कामास येणार नाहीं? स्वर्गीं वास करणें तुझेच हातीं आहे. हे गोष्ट न करा तरी तुजवर गोमूत्र टाकून खांसा आह्मी तेथें येऊं. तेव्हां संकट पडोन त्याजकडील पैका तुजला [द्यावा लागेल. हे आज्ञा?].

[लेखांक २९७] श्री.

गंगाजान्हवी समान मातुश्री काशीबाई यांसी आज्ञा:—मी साधुसंताची पायधूळ आहें. बाई, गतवर्षीं मज कागद तुह्मीं पाठविलांत जे, बावा, तुमचे आशीर्वादें माझा लेक रघुजी भोंसले सुखरूप येऊं द्या ह्मणजे मी स्वामींचे भेटीस येईन. त्यास तुझेच पुण्यें. चिरंजीव रघुजी भोंसले सुखरूप घरास आले. तुमची याची भेटी जाहली. त्यावर कांहीं तुमचा कागद आला नाहीं. कर्जदार कुळांकडे माणसें पाठवितों, त्यास

मध्येंच तुमचे कारकून आपलीं माणसें पाठवून आमचे माणसांस बाहेर घालितात. तुज आह्मांमध्यें तूट पाडितात. तुमचे माणसाबरावर तुह्मांस कागद लिहिला होता जे, बाई, तुजला देव नको; शिंपी व्हावें असतील तर सूर्यासन्मुख उभी राहोन बोल, जे तुमचे रुपये बद्दल असले तर आपण कुरुक्षेत्रींचे वृद्धीनें देईन ऐसें ह्मण. ह्मणजे कुळां-जवळ तुह्मांजवळ रुपये मागत नाहीं. हल्लीं देवजी जासूद रायाकडील पाठविला. त्याणें सांगितलें जे, बाई बोलिली जे मजवर बावांहीं गोमूत्र कां टाकिलें आहे? माझा अन्याय कांहीं नाहीं. बावांचे माणसास मध्यें चाकर दबवितात. हल्लीं तुह्मीं आपलीं कुळें घेऊन जा. अगर रुपये त्यांपासून आपले घेणें. जासूदही आपला वसुलास दिल्हा. हें रायाचे जासुदानें सांगितल्यावर संतोषी जाहलों. बरें, आठशें रुपये तुह्मांकडे येणें, त्याचा फारसा विषय नाहीं. तुमचे बोलें गोमूत्र घेऊन हल्लीं जासूद पाठविला आहे. याजबरावर तुह्मांकडील झाडून आठशें रुपये पाठवून देणें.

## २ होळकर.

[ लेखांक २९८ ]                श्री.

सहस्रायु चिरंजीव जडभरत बोधला मल्हारबा यास आज्ञा ऐ-सीजेः— ज्या दिवसापासून तुजला श्रीनें प्रथम भेट दिली त्या दिव-सापासून तुझे मनीं साक्ष आलीच असेल. मी सदेह होऊन कोणास प्रसाद देत नाहीं आणि तुला सदेह होऊन प्रसाद दिला. मीं तुजला ह्मटलें, पांढरी सकलाद पाठवून दे. त्यास तूं अनमान केलास. त्यास तुजला प्रसाद पांढरी सकलाद पाठविली आहे. हें वज्रकवच अंगावर घेत जाणें. हें कोणास देशील तर माझी आण असे. तुह्मीं पांच हजारांचें वाग्-दत्त धारादत्त उदक घातलें, त्यास लौकर न दिल्यानें कुरुक्षेत्राचे वृद्धीनें

वृद्धि होत्ये. यांत व्यतिपात, वैधृत, ग्रहणें जाऊन......श्री कार्यास काय [राहणार?].......वीस लक्ष रुपये लागले. आतां कामें मोठमोठालीं धरिलीं आहेत. तरी पांच हजार पैकीं आजि तीन हजार रुपये देणें. दोन हजार पुढें आगोटीस देणें. श्रीचरणीं निष्ठा असलीयानें......तुह्मी फत्ते होत्ये तें कळों येईल. पाटाव पासोडी जशी राणोजी शिंद्यानें दिले, त्याप्रमाणें पासोडी ऊंच, ताडपत्री दोन, शंभर रुपये [किंमतींची] सोंवळ्याची देणें. केसोबाबराबर आपलीं माणसें देऊन पाठवणें.

[ लेखांक २९९ ] श्री.

श्रीमत् परमहंस स्वामीं यांहीं

सहस्रायु चिरंजीव मल्हारजी जडभरत होळकर यांसी आज्ञा केली ऐसीजे:— आह्मी तुमचे घरास आलों आणि तुह्मी खोलींत जाऊन एकांत करीत बैसलेंत. आमचा कर्णा ऐकोन न आलेंत. हें तुह्मांस विदित नाहीं. तुह्मी ह्मणजे आमचे निजभक्त. तुह्मांपासून अंतर न पडावें तें पडिलें! तेथून आह्मी जगतापाचे घरास गेलों. त्यांणीं पूजा केली. तुमचे घरास न आलों ह्मणून लोक निंदा करतील, याजकरितां वाफगांवास तुमचे स्थळास गेलों. तुमचे बायकोस सांगोन पाठविलें जें, द्रव्याखेरीज काय द्याल तें घेऊं; ऐसें असेल तर तुमचे घरास येतों. त्यांणीं मान्य केल्यावर तुमचे घरास गेलों. तुमचे बायकोनें अंगावर पासोडी घातली. तिची निष्ठा देखोन बहुत संतोषी जालों. तुह्मांपासून अंतर पडिलें, परंतु आह्मांपासून तुमचे ठायीं अंतर पडिलें नाहीं. मागील उदकदत्तपैकीं तुह्मांकडे रुपये ८०० राहिले आहेत, ते शंभुजवळ देणें. अनमान न करणें. येंदा कांहीं तुह्मांजवळ मागत नाहीं. मागील उदकदत्त न ठेवणें.

## ३ भोंसले अक्कलकोटकर.

[ लेखांक ३०० ] श्री.

सहस्रायु चिरंजीव विजयीभव धर्ममूर्ति फत्तेसिंगबावा यांसी आज्ञा ऐसीजे:— बाबुजी नाईक यासी तुह्मी मैत्री करूं नका. हा केवळ पंचमहापातकी आहे. याच्यानें कांहीं तुमचें बरें करवत नाहीं. जातीचा सराफ, अपेशी आहे. तरी याची मैत्री तुह्मीं तोडून देणें. आमची त्याची गोडी नाहीं. ऐशास तुह्मांस आह्मीं लिहिलें आहे. तरी या गोष्टी चित्तामधीं ठेवून मैत्री तोडून टाकणें. मैत्री केल्यास पुढें कळेल.

## ४ जाधवराव.

[ लेखांक ३०१ ] ॥ श्री भार्गवराव ॥

सहस्रायु चिरंजीव विजयीभव पिलबा जाधवराव यांसी आज्ञा केली ऐसीजे:–आह्मी जेजुरीहून गतवर्षी तुमचे घरास आलों. भांडून झगडून पांच हजार रुपये दिल्हे ते श्रीस प्रविष्ट जाहले. पांच वर्षे जाहलीं. ती वर्षांचें वर्षासन रुपये बाराशें ऐसे पांच वर्षांचे रुपये भुलेश्वरास सत्वर पाठवून देणें. तुमचे अंगणाहून भुलोबाचें देऊळ काड्यामुड्याचे जाहलें तें दिसत असेल. तुझी माझी गडी आज कालची नाहीं. बहुत दिवसांची कोंकणांतील आहे. रुपये मागतों ह्मणून टाकूं नको. पैके दिल्हे आहेत देवें व मागतोही देव. दिल्यानें काय होईल आणि न दिल्यानें काय होईल, तर तुह्मी जाणतच आहां. तुजला सर्व कळतच आहे. भुलोबाचें तळें अत्रीचे हातचें होतें, तेंही दुरुस्त [केलें.] ... [ह्या पुढील बंद गहाळ झाला आहे].

## ५ गायकवाड.*

[लेखांक ३०२] श्री.

पिलाजी गायकवाड याणें मळोजीस ह्मटलें जे, तुह्मी आह्मी सोयरे होऊं. त्याजवर मळोजी बोलिला जे, पुत्र व कन्या बावांचे प्रसादाचीं आहेत. सोयरीक बावा देणार. आमचे स्वाधीन नाहीं, व खंडेराव दाभाडे यांणीं मळोजीस सांगितलें जे, पिलाजी गायकवाड आमचा बारगीर, त्यास सोयरीक न करणें. ऐसें झालें. त्यावरून पिलाजी गायकवाड यांणीं आह्मांस पत्र लिहोन कारकून आह्मांकडे पाठविला जे, बावा तुह्मी भेट द्याल तर हत्ती भरून रुपये देईन. दोन हजार सध्यां पाठविले आणि लिहिलें जे, मळोजीचे मुली आमचा पुत्र खंडेराव यास देवणें. त्यावरून आह्मीं मळोजीस लिहोन सोयरीक देविली. हे सोयरीक जाली ह्मणून पोरास पोट भरावयास जागा जाहला. ऐसें असोन आह्मांसीं नष्टपणा धरितो, उदकदत्त पाठवीत नाहीं. जो मंत्र दिला तो पाण्यांत लिहोन बुडविल्यास काय होईल तें तुह्मांस कळों येईल. वेड लागेल ह्मणून खोंचून तुह्मांस लिहिलें आहे.

## ६ दाभाडे.

[लेखांक ३०३] श्री.

मननिर्मल गंगाजल मातुश्री उमा मुक्ताबाई दाभाडी यांसी आज्ञा केली ऐसीजे:—तुमचें संतोषाचें वर्तमान पत्र वैशाख वद्य १० प्रविष्ट होऊन जैसें धुरूचे सापत्न मातेनें धुरूस लाथ मारली होती, तो तपश्चर्येस जाऊन अढळ पद परमेश्वरें दिल्हें, त्याचे मातेस संतोष जाला; तैसें तुमचें फत्तेचें पत्र ऐकोन समाधान जालें. तुमचे निष्ठेनुरूप श्री फत्ते

---

* हें पत्र कोणास लिहिलें त्याचा नामनिर्देश नाहीं. तथापि हें पिलाजी गायकवाडास अनुलक्षून असल्यामुळें तें गायकवाडांच्या नांवाखालीं घातलें आहे.

करील. बाई, तुमचे नेमास बहुत दिवस जाले, आणि वचनाप्रमाणें दहा हजार रुपये पाठविले नाहींत. मेरूचे देवालयाचें काम कांहीं सामान्य नव्हे. चार हजार रुपये अंतोबा नाईकाकडून देविले आहेत ह्मणून लिहिलें ते प्रविष्ट होतील. वरकड आजिवर आशीर्वादपत्र पाठविलें नाहीं ह्मणून लिहिलें, तरी सर्वकाळ आशीर्वाद तुमचें कल्याण व्हावें हें इच्छित असों. पत्र लिहावें तर मागें प्रसाद चादर व दुलई अंगावरील पाठविली त्याचा जाब न पाठविलांत. याजकरितां पत्र आजिवर न लिहिलें. याजउपरी साहा हजार रुपये उदकदत्त वागूदत्त पैकीं राहिले ते पाठवून दिले पाहिजेत. ह्मणजे सुदाम्याचे पोह्यासारखें होईल. सहस्र हातांचा देणार आणि दो हातांचे माणस किती घेईल? तुझें बरें व्हावें याजकरितां तुमचे रुपये घेऊन देवकार्यास लावावे. येरवी आह्मांस कांहीं रुपये मिळतील कीं न मिळतील, वरकड देतील कीं न देतील, हें चित्तांत आणणें. तुजला लेकी ह्मटली ते खरीच आहेस. तुझें बरें व्हावें याजकरितां लिहिलें. पुतें चित्तांत आणून रुपये साहा हजार पाठवणें. ह्मणजे पैके यथेष्ट मिळतील. जाणीजे. सोरठप्रांतें जात्येस तेही भूमी तुज पादाक्रांत होतील. भेटीचे समयीं बोलिली होतीस जे, जातांच वस्त्रें पाठवून देतों आणि नेमास कां चुकत्येस? नये तुझ्या चित्तास, तर आणखीकडे बावा भीक मागावयास जा ऐसें स्पष्ट लिहिणें. देवास देऊं करावें आणि ठेवावें हें उत्तम नसे. जाणीजे.

[लेखांक ३०४] **श्री.**

श्रीमत् परमहंस स्वामी यांहीं

मननिर्मल गंगाजल गंगाजान्हवीसमान मुक्ताबाई दाभाडी यांस आज्ञा केली ऐसीजेः—आमचें वचन मानित्येस याचा फलात्कारही होतो. तुझे सुनेस मानबाई (तान?) पुत्रही जाहला. आह्मी सराटेचे आसनावरी जेजुरीस सव्वा महिना बैसिलों. येस पाटील गांवांत बसिला.

परंतु आमची भेट घेतली नाहीं. आह्मी मूठभर सूत (?) देतों आणि नाचणीचे आंबील पाजितो. शाहूपासून रंभाजी गेला त्याला अन्नवस्त्र मिळतें कीं नाहीं ? तैसाच चंद्रसेन गेला. तैसाच सुलतानजी निंबाळकर गेला. त्यास बिडासारिखे शक्त (तक्त ?) दिल्हें. ऐसे कितेक गेले ! दादलेचे वेळेस तूंच कारभार करीस. आतां तुझी बुद्धि कोठें गेली ? गायकवाड त्यांचा वाढविला. तो दुसरे जागां गेला तरी उपासे मरेना ! याचें चित्त धरून जें काय देईल तें त्याचे समाधानानें घेणें. दहाजण तुजला बरी ह्मणतील......छत्रपतीही सुखी होईल.

## ७ पवार.

[लेखांक ३०५] **श्रीभार्गवराम.**

श्रीमत् परमहंस

क्षत्रियकुलावतंस रणधीर उदाराम पवार. तुह्मीं पत्र लिहिलें तें माघ वद्य पूर्णिमेस पावलें. कान फुंकून उपदेश करिताती. म्यां तुह्मां दोघां बंधूंस अंतरींच उपदेश केला. तुमचें मन तुह्मांस साक्ष देत असेल. तुह्मी उभयतां माझे विषयीं व कृष्णाजी व लिंगोजी हवालदार तुह्मी माझे भजनीं असिलेंत तरी महाड आलेंसें समजा. दिगंतीं तुमची कीर्ति होईल. छत्रपति तुह्मांवरी संतोषी होतील. तुमच्या लष्करांत फितवा होऊं न पावे. मी वेडासा जोगी समस्तांचा (आहे). माळशिरसच्या सनदा राजा व तुह्मीं जरी पाठवाल तरी मी गोमूत्र घेईन आणि क्षौर करीन. आपण आजिपर्यंत गोमूत्र घेतलें असेल तरी तुझ्या गळ्याची आण असे. हल्लीं मेरूचें देऊळ होतें व हल्लीं खांबटकीचे तळ्याचें काम होतें. राजाच्या पुण्येंकरून भुलेश्वराचें देऊळ होईल. जरी तुमच्या चित्तास नये तरी एखादे दिगंतरास जाईन. तुमचें तुह्मी जतन करा. मी कांहीं तुमचें नेणार नाहीं. हें राज्य टाकून जिकडे माह्मी माती निरवली असेल तिकडे जाईन. तुह्मीं सविस्तर फत्तेचें वर्तमान

लिहिलें, बहुत संतोष जाहला. लिंगोजीनें आह्मांसीं नेम केला जे, चवथे दिवशीं सनदा पाठवितों. सरलष्कर सोमवंशी ह्यांच्या सनदा आल्या. हे आज्ञा.

[ लेखांक ३०६ ] श्री.

सहस्रायु चिरंजीव विजयीभव रणधीर रणशूर अर्जुनतुल्य उदाजी पवार यांस आज्ञा ऐसीजे:—तुह्मीं पत्र पाठविलें तें पावोन संतोष जाहला. शाक पावल्या. देवाची आणि सुदाम्याची भेटी झाली. श्रीनें सुदाम्याचें दरिद्र विछिन्न केलें. तैसें तुमचें पत्र पाहोन श्रीस संतोष बहुत जाला. निष्ठा देखोन तुह्मांवर श्रीची कृपा विशेषात्कारें जाली. या उपर तुमचे क्लेश सर्व दूर होऊन लक्ष्मी आणि विजय श्री उदंड देईल. तुमचे निष्ठेचें पत्र देखोन श्रीची तुह्मांस भेटच जाली. या उपरी आदले जन्मींचे क्लेश व याही जन्मींचे कष्ट दूर होऊन संतोष आणि जय पावाल. अंतरसाक्षीची भेट तों श्रीची जाली. या उपरी बाह्यात्कारची भेट तुमची आमची श्री करील, तेव्हां सर्व मनोरथ श्री पूर्ण करील. सुदामनगरी सुवर्णाची जाली. तुह्मीं लिहिलें जें, यजमान श्रमाचा जाण होऊन कृपा करीत नाहीं. अशास तुमची समशेर गाजली, तिचा नामोश त्रैलोक्यांत जाला. यापरीस थोर तें काय? श्री सूर्यानें कवच कुंडलें कर्णास दिलीं, तैसेंच श्रीनें अंगचें कवच तुह्मांस पाठविलें आहे. दुर्योधनाचे हातीं राहू होता तो अपार द्रव्य वाटी, परंतु सरेना. त्याची कीर्त नाहीं; आणि पांडवांची कीर्त अद्यापि त्रैलोक्यांत वाखाणितात. पहा, येथें उदंड भक्त आहेत परंतु तुमची (कीर्त विशेष आहे).*

[ लेखांक ३०७ ] श्री.

सहस्रायु चिरंजीव जगजीवन पवार यासी आज्ञा केली ऐसीजे:—

---

* ह्या पत्राचा पुढील भाग गहाळ जाहला आहे हें पाहून वाईट वाटतें. हें पत्र किती मनोरंजक व महत्वाचें आहे हें रसिक वाचकांस सांगणें नकोच.

तुंझा बाप लष्करांत होता, तेव्हां पुत्राचा आशीर्वाद दिल्हा. तो तूं मलोजीचे पोटास तूं प्रसादपुत्र आलास. तुजला नशेद (निषेध) करून लिहिलें जें, मायेचे पायावर डोई ठेवून तिचे आज्ञेत राहणें. त्यास तूं आह्मांस लिहिलें जे, मायेचें श्राप पुत्रास लागत नाहीं. तरी तिजला तूं शिवी दिलीस तरी तिचे श्रापें तुझें भस्म होईल. तिजजवळ तूं बेअदबी कितेक लहान माणसाच्या बोलें तुफान घेऊन तिजला कष्टी केलें आहे. तुला पुढें वांचोन नांवरूप करणें असेल तरी तिचे पायांवर डोई ठेवून जाले अन्याय बक्षीस करून घेणें. न घेस तरी तुझें बरें होत नाहीं. दारू खाऊन बेअदबी, माता ती, तिजजवळ करितोस, हें बरें नव्हे. पाजी तूं आहेस! काय आमचें वचन मोडशील? तेव्हां बाजीचे बटकीकडून धरून आणून तुजला चाकर केला जाईल. हें पुतें मनांत आणून आनंदीचे समजाविसी करून तिचा कागद आला तरच तूं वांचलास. नाहींतरी तुझा मुलाहिजा होत नाहीं हें पुतें समजणें. तूं ह्मणशील तीन वर्षां तुह्मांस हजार रुपये देतों, तर त्याचा आह्मांस लोभ नाहीं. वाटेचे वाटसराचे बटकीपासून रुपये हजार घेईन. तुझा हिसाब काय आहे? धनवटीस तिनें आपली वानीवस्त ठेविली होती ते तूं नेलीस. धिग् तुझ्या जिण्यावर! तुज काय बापाचे धर्म होती? तूं हे गोष्ट बरी न केलीस. सर्व जन तुजच हांसेल. तिचे वाणीवस्त देणें. तिचें समाधान करशील तरच आह्मांस उत्तर लिहिणें. नाहींतर आह्मांस उत्तरही न लिहिणें.*

---

* ह्या पत्राच्या शेवटीं खालील मजकूर आहे. त्यावरून वरील पत्र मसुदा असून पुढील मंडळीच्या संमतीनें तें पाठवावें अशी स्वामींची आज्ञा होती असें दिसतें. "कृष्णाजी व पाटील मौजे माळशिरस यांसी आज्ञा:—अंवदा सालीं माळशिरसास वाकोजीकडेस रुपयाच्या मोह्यास (?) जाणार आहे तो तेथें गेला तर गांवकर मिळोन त्यास दस्त करून पाठवणें. वाकोजी देऊरास जाईल सवरील. त्यास नजरेंत असों देणें. कृष्णाजीस कागद आनंदी पवारीण हिजला लिहिला आहे तो तीस देणें. जगजीवनाचा कागद वाचून तीस दाखवणें. तिचे चित्तास येईल तरी लाखोटा करून त्याकडे घेऊन जाणें."

## ८ निंबाळकर.

[लेखांक ३०८] श्री.

सहस्रायु चिरंजीव जडभरत बोधला जानोजी यांसी आज्ञा केली ऐसीजे:—मागें दोन म्हैसी मागीतल्या होत्या, त्या देतों म्हणतां. त्या देणार कधीं आणि आह्मीं तक्र कधीं भक्षावें ? गतवर्षी गाई दोन पाठविल्या होत्या, त्यांचें तक्र पोटभर आजिवर घेतलें. आतां त्या गाई भाकडी जाहल्या. सांगाल तर पाठवून देऊं. हल्लीं तक्र प्यावयास उत्तम गाई व्याल्या नसल्या तरी गाभण्या, तरण्या, दुधाळ, लौकर वियत ऐशा, दोन गाई पाठवून देणें. आह्मीं तक्र घेऊं. तुमचें बरें होईल. तरी अनमान न करितां गाई दोन पाठविल्या पाहिजेत. देणें. नसेल तरी सटल पटल करणें. पुढें देऊं घेऊं ऐसें कशास ह्मणतां ? परिच्छिन्न नाहींच ह्मणणें. पाण्याचें ह्मणाल तर आह्मी साधु संताची पायधूळ आहों. भार्गव चिंता धरील तर पानाडीयाचाही यत्न करून पाणीही भार्गव लावील. त्याचें काय आहे ! आह्मीं तुह्मांजवळ तरी थैल्या भरून रुपये कोठें मागितले आहेत ? तुह्मीं तरी काय दिलें आहे ? पहिला पांच हजार रुपये खर्च लागतो. दहा भक्त आहेत ह्मणून चालतो. दोन गाई तुह्मांजवळ मागितल्या त्यास मागें पुढें कशास पाहतां ? देणें असेल तर द्या, नाहींतर आमचा कागद परतून देणें. तुह्मांस प्रसाद नारळ १ व द्राक्षें दोनशेर पाठविलीं आहेत. घेणें. हे आज्ञा.

## ९ सुलतानजी निंबाळकर[१].

[लेखांक ३०९] श्रीभार्गव.

मननिर्मळ गंगाजळ आचार्यै पुण्यशील सुलतानजी बोधला निंबाळकर यांस आज्ञा. या कलयुगामधीं असीं कोणीं देवळें केलीं नाहींत.

---

१ निजामाकडे गेलेल्या रावरंभा निंबाळकर ह्यांच्या घराण्यापैकीं हा सरदार आहे.

परंतु त्वां केलीं. तुझ्या पुण्यास पारावार नाहीं. तरी याजकरितां खेड्या-मधील कोठें एक रुपया, कोठें पांच रुपये, माणूस घर पाहोन भिक्षा करून, कोठें पंचवीस रुपये याप्रमाणें शंभर रुपयांची भिक्षा करून दिल्यानें आह्मांस (?) चिंचपुरीं खंडेराव आहे, तेथें लक्ष रुपयांचें (काम) आहे तें दुरुस्त करूं. तुमचे पदरीं पुण्य पडेल. याखेरीज बिडामधीं गांव भिक्षा करून द्याल तरी उत्तम आहे. तुह्मांस वज्रकवच अंगचें आगाऊ पाठविलें आहे. घेणें. याचें काय तें उत्तर पाठविलें पाहिजे.

## १० आंगरे.

[ लेखांक ३१० ] श्री.

सहस्रायु चिरंजीव विजयीभव संभु जयसिंग सरखेल यांसी आज्ञा केली ऐसीजे:—तुह्मीं राजपुरीच्या मुक्कामींहून पत्र पाठविलें तें पावून वर्तमान विदित जालें. प्रधान व फत्तेसिंग यांच्या भेटी जाल्याचें वृत्त लिहिलें तें कळों आलें. मज रडल्याचे आसवें पुसिलीं नाहींत; असल्या गोष्टी करितां मी दिलगीर होतों. ते गोष्ट करून अर्जुनासारिखें पृथ्वीचें यश घ्यावें होतें. पुढ्यांत बैसोन मज बाटविलें. माझा आत्मा आपल्या आत्म्यांत घातला. मीं कांहीं तुमचें बरें केलें नाहीं, आणि तुह्मी माझें बरें कोठून कराल? आमचेंच प्राक्तन उणें! त्यास तुह्मांस बोल काय लावावा? मीं जे आळ घ्यावी ते मीं सिद्धीस पाववावी. तरीच आमचा पांचवा आश्रम! माझीही आळ माझे भक्तांहीं चालवावी हें उचित आहे. वरकड तुह्मी त्या स्थळीं गेलेंत आहां, (तरी) शामल लोकांचा विश्वास न धरावा. आपणास बहुत जतन करणें. तुमचे हातून महत् कामें होऊन यश मोठें पदरीं पडणें आहे. याजकरितां बहुत बहुत जतन आपणास करणें. जाणीजे. छत्रपतीस पुत्राचा आशीर्वाद श्रीनें दिल्हा आहे. तो घडावयाचा ते समयीं घडोन येईल. छत्रपतीची निष्ठा कोणें प्रकारची आमचे ठायीं आहे हें परस्परें विदितच आहे. तैसीच बाजीराऊ

प्रधान यांचे निष्ठा कोणते प्रकारची आहे ? त्यांचे निष्ठेनरूप ते चित्तावर धरितात तें श्री फत्ते करितो. बाजीराऊ उभयतां बंधु, सर्व संपदा आहे ते स्वामींचे आहे. यास अन्य असेल तर आपण नानाचे वीर्यांचे नव्हों ऐसें ह्मणतात. आह्मांकरितां प्राण दे ह्मटलें तरी देईल. ऐसी निष्ठा त्याची. आणि तुह्मी तो आमचें काळीज; आमचे पुरातन वडिलांपासून; आणि आमचें ऐकत नाहीं; हे गोष्ट बरी नाहीं !

[ लेखांक ३११ ] **श्रीभार्गवराम.**

श्रीमत् परमहंस स्वामी यांहीं

सहस्रायु चिरंजीव संभुसिंगबावा सरखेल यांसी आज्ञा केली ऐसीजे:—बावा येथें सर्वस्व वेंचावें आणि राजा सर्व अवघे वश्य करून घ्यावें, आणि आपले सर्व मनसबा करून घ्यावा, आणि चिरंजीव तुळाजी आंगरे सोडून न्यावें. तुह्मांस श्री येथून जातांच महालाची तारवेंच सांपडतील याप्रमाणें होईल. कांहीं चिंता नसे. हे गोष्ट न होय तेव्हां आमचें देवपणच नव्हे. नांवच घेऊं नका. आह्मीं देवास नवस तीस पुतळ्यांचा देवास केला आहे. चित्तास येईल तर पाठवून द्याव्या. नाहींतर नका पाठवूं! तुमचा मनसबा व्हावा, तुळाजी(ची) सुटका व्हावी, याजकरितां नवस केला आहे. आह्मीं ये वेळेस तुह्मांस कांहीं वरते या ह्मटलें नाहीं. तुह्मीं कां आलेत ? आतां सर्वांचे तूंवर झाडणी करा असें ह्मणतील. तितकें मान्य करून देणेंच लागेल. मागतील तें द्याल. न दिल्यास कांहीं येथें होणें नाहीं. विशेष काय लिहिणें ? हे आज्ञा. तुह्मी आपलें लेंकूरपण येथें टाका. कोणास शिवीगाळी देऊं नका. मागें इंग्रज तुमच्या गडाकडे आला होता, तो पराभवातें पावावा, निघोन जावा, तुमचें बरें व्हावें, ह्मणून भुलेश्वरास हजार ब्राह्मणांची समाराधना मानिली होती ते आह्मीं केली. तुह्मांस कळावें ह्मणून लिहिलें आहे.

[ लेखांक ३१२ ]                    श्री.

तुमचे तीर्थरूपाकडे साठ हजार रुपये, तीन हजार होन येणें. त्याचे पोटीं तुह्मी जन्मलेंत. तुह्मीं पितृऋण न खंडा, ज्याणें घेतलें ते देतील ह्मणाल; तर कुरुक्षेत्रीचे वृद्धीनें सदाजन्म त्यास खंडावें लागेल. उपास करून, गोमूत्र खाऊन, पाय जाळून, चार घरें मागितलीं; तें द्रव्य तुमच्या वडिलांकडेस राहिलें. त्यांचे पोटीं तुह्मी अवतारी निर्माण जाहलेंत. या जन्मीं दिल्हें ह्मणजे उत्तम. न दिल्हें तर पुढें परजन्मीं एका रुक्यास सहस्र रुके सहकुटुंबनिसीं तुह्मांस द्यावें लागेल. सुटणार नाहीं. ऐसें चित्तांत आणून आमचें आह्मांस देणें.

मागें तीन औरंगजेब्या लिहिल्या होत्या, ते आह्मी राज्याचे भेटीस येऊं तेव्हां देऊं. त्या तीन औरंगजेब्या व ऊद ८१ एक मण देणें. देवापुढें जळेल. गंध चंदन उत्तम ८१ एक मण याप्रमाणें देणें. पैशांत धरणें. फुकाचें तुमचें कांहीं नलगे!

आमच्या येणियांत जमा:- ०।० सुंठ, ०।० साखर चिनी, ८३ मिरें, ०॥० खजूर खारिका, २ लोखंड कामीचे दहा दहा हात, ४ पाहरा, १ सकलाद भगवी, ८८१ कृष्णागरु, येणेंप्रमाणें आमचे देणियांत देणें. तुह्मीं आपले पदरचे फुकट न देणें. तुह्मी वासना चांगली धराल तर तुह्मांस कुलाबा येईल. भार्गव सन्निध होईल. आह्मांस वस्त्रवाणी शंभरांची द्याल ते दोनशें रुपये धरा आणि कानोजीस ऋणापासून मुक्त करा.

[ लेखांक ३१३ ]                    श्री.

सहस्रायु चिरंजीव विजयीभव संभुसिंग यास आज्ञा ऐसीजे:— आमचे अंगावर पासोडी घालून फिरोन घेतली. हातची लोखंडाची नाहक हिरून घेतली. निशाण तेंही जोरावारीनेंच घेतलें. इतकें करून

कोणती फत्ते जाहली ? आह्मीं तुह्मांपासून घेऊन देवास अर्पून तुमचें कल्याण इच्छावें. आमचा हेत इतकाच होता जे, दा मण साखर व तीन हजार रुपये घेऊन, संतोष पावोन, तुह्मांस मनांतून आशीर्वाद देऊन येतो. बरें. आह्मांस कांहीं ईश्वरें न्यून केलें नाहीं. तुमचें थोरपण तुह्मीं केलें !

[लेखांक ३१४] श्री.

सहस्रायु चिरंजीव विजयीभव पूर्वील नाम कुबेर संभुसिंग बाबा राजे सरखेल यांसी आज्ञा केली ऐसीजे. पूर्वी तुमचा आमचा नेम होता जे, पलीकडील वर्षी तुह्मीं सुवर्णदुर्गास यावें, आह्मांस सांगून पाठवावें, आह्मीं तेथें यावें. तेथून पुढें कुलाब्यास जाऊन मानाजीस बोध करून कुलाबा त्याजकडून तुह्मांस देवावा. तो आमचें वचन मान्य न करी तरी त्यास श्रापून यावें ऐसा नेम होता. त्यास तुह्मी न आलैंत. तो प्रसंग ते वेळेस राहिला. हल्लीं त्याचे कागदपत्र येतात. आह्मांस या ह्मणतो. परंतु आह्मी त्याकडे येत जात नाहीं. गतवर्षी जाऊन कुलाबा द्या तुह्मांस ह्मणावा, ना ऐके तरी श्रापावा, हे गोष्ट राजाच्या (व) बाजीराऊ यांच्या कानावर घातली. ते बोलिले, "आजिचा प्रसंग एव्हां नाहीं. गेलीयास तो कांहीं तुमचें ऐकणार नाहीं. तुह्मीं केलें न होय, तरी आपले प्राणास घात कराल. याजकरितां तुह्मांस जावयास उचित नाहीं." याज करितां राहिलों. आतां तूं होऊन कुलाब्यास जावयास येणें. मी पुढें, तूं मजमागें, जमाव तारवें घेऊन येणें. कुलाबा घेऊं. त्याचा हिसाब काय आहे ? काम श्रीचे आशीर्वादें होईल. मुखजबानी गोविंद राम सांगतील ती एकांतीं ऐकणें. कोणास व्र कळों न देणें. तूं जाणस, हे जाणा. त्याचा मान्याचा देहांत समय आला, तर गोविंद राम ईश्वरें पाठविला आहे, ऐसें समजोन कार्य करणें व निश्चय धरा.

[लेखांक ३१५] श्री.

जयसिंगास आज्ञा केली ऐसीजे:—आह्मीं तुजजवळ तीन गोष्टी मागितल्या होत्या. त्यास तूं आज्ञा भंगिली. शंकरभट उपाध्या मुरुडकर व कानडा व नीळ ठाकूर तिघेजण मन माने तैसी आमची निंदा करितात. पृथ्वीवेगळे बोलतात. शिव्यागाळी देतात. तो तुवां आमचा अभिमान धरावा, तो धरिला नाहीं. तेव्हां आह्मांस ईश्वरें कशास जन्मास घातलें? न घालता तरी बरें होतें! तुझ्या बापानें वाक्षेप केला ह्मणून कोंकणांतून वरघाटें आलों. येथून ही शुकासारखें वैराग्य माझें असेल तरी कळेल. तुजला आह्मीं जें सांगितलें तें सत्यच सांगितलें असेल. आणि तूं ह्मटलेंस माझा शिक्का लटका कसा करूं? द्रोपद राजा याणें द्रोणाचार्यांचा अपमान केला होता, तसा तूं माझा अपमान केला आहेस. हें तुज परिणामीं कळेल. आपले गड किल्ले जतन कर.

[लेखांक ३१६] श्री.

जयसिंगास आज्ञा ऐसीजे:—त्वां माझी आज्ञा मोडिली. याचें फळ इहलोकीं परलोकीं काय होईल तें कळलेंच आहे. आह्मीं तुला दोन तीन गोष्ट आज्ञापिल्या होत्या. त्या लटक्या नव्हत्या. खऱ्याच होत्या. तूं ह्मणालास जे, शिक्का लटका कसा करावा? इतक्यावरी तूं माझा काय आणि मी तुझा काय? कोण्हाचें पोट भरेना ह्मणून लटकें बोलतो? कोण्हास लेंकरें बाळें पोसावीं लागतात ह्मणून लटकें बोलोन द्रव्य मेळवितो? कोण्हाचें राज्य बुडतें ह्मणून लटकें बोलतो?······चौऱ्यायशी योनी भोगाव्या आणि एकदा मनुष्य देहासी यावें. याचा दृष्टांत हल्लीं चक्रवतीनें काय केलें? हरिश्चंद्र राजानें काय केलें? श्रीनें मजला आज्ञापिलें आणि गोमूत्र पान केलें. लटकें बोलोन द्रव्य मेळविलें नाहीं. ऋणहत्या फिटेना. हें द्रव्य दिल्यानें बरें आहे. शिखराचें

काम लाविलें आहे; तरी द्रव्य पाठवून देणें. नाहींतरी स्पष्ट लिहिणें जे, आपण द्रव्य बुडविलें. मग आह्मी देशांतरास जाऊं.

तुह्मी लोकांजवळ बोलता जे, बावा रागें द्रव्य मागतील तर आह्मांस त्यांणीं उदकच घातलें आहे. कांहीं द्यावें (ऐसें) नाहीं. आणि संतोषें मागितलें तर अवघें आहे हें त्यांचेंच आहे. ऐशास महादेवें भस्मासुर यास वर दिला, त्यास भस्मासुर बोलिला जे, तुझ्याच मस्तकीं हात ठेवितों. तैसें तुह्मी करावयास लागलेंत. श्रीचें द्रव्य द्यावें हें तुह्मांस ग्राह्य आहे कीं काय? आह्मीं सात पांच कामें धरिलीं, आमचें ह्यातारपण झालें, आमचें वस्तु प्रवास होत नाहीं. देवाचें द्रव्य तुह्मीं ठेवल्यास उत्तम नाहीं. माझा देह परशरामींच सुटता तर तुमची धन होती. आतां मेरूचें काम धरिलें आहे ह्मणून मागतों. द्रव्य घेऊन पुरून ठेवून कांहीं नरकास मज जाणें नाहीं!

[ लेखांक ३१७ ] श्री.

सहस्रायु चिरंजीव पूर्वी अभिधान कुबेर संभुसिंग बाबा सरखेल यांसी आज्ञा केली ऐसीजे:–तुह्मीं पत्र पाठविलें, प्रविष्ट होऊन वर्तमान कळलें. तुह्मीं लिहिलें जे, श्री रामेश्वराचे व कान्होबाचे पुण्येंकडून नसरगड गर्दीस मेळवितो. तर ही गोष्ट खरीच. तूं तैसाच बापापरीस कर्ता, पुरुषार्थी. किती केलीत अंतीमती क्षेत्राचा धनी, व कोंकणचा धनी श्रीभार्गव आहे. हबशी याची गत कशी झाली? रायगडासारखा गड त्याची गत काय जाहली? आतां कोणी चित्तावरी धरीत नाहीं. जर चित्तावरी धरील तर जंजिरा अंजनवेली एका घटकेंत येईल. तूं ह्मणतोस जे रामेश्वर, तर गतवर्षी इंग्रजांस व त्यांच्या बायकांस सोडिलें तेव्हां रामेश्वर कोठें होता? तुमचे वडिलास साठ हजार रुपये व तीन हजार होन व वस्त्रें वानी दिलीं त्याचें व्याज काय जाहलें? गोठणें गांव श्रीस उदक घालून दिला, त्याचे पोटीं तुह्मीं अवतार घेतला. तीं

गोठणीचीं खाजणें तुह्मीं घेतलीं तर तेणेंकरून श्रीचें न्यून होईल कीं, तुमचें पूर्ण होईल ऐसें चित्तांत समजणें. महापुरुषा, वर्षामध्यें दहारुपयांची वानीवस्त आह्मांस पावेना, तेव्हां धन्य माझें कपाळ! धावडशीस वर्षामध्यें इमारती वेगळ्या करून दहा हजार रुपये खर्च लागतो. शाबास! शाबास!! संभुसिंगा, बापाचे उतराई झालास! माझें काय आहे? मी समस्तांचा जागली आहें. मागें एक भगवी सकलाद व कृष्णागर आदशेर लिहिलें होतें तें तुमचे वस्तु देववलें नाहीं. बरें, तुमचे तुह्मांस आर्जवी असो!

[लेखांक ३१८] श्री.

संभूस आज्ञा केली ऐसीजे:—आह्मी तुज भेटीस आलों. तेव्हां राजश्रीचे अनुमतें आलों. आह्मीं तुह्मांस दोन गोष्टी सांगितल्या, त्या तुह्मींही मान्य केल्या. आधीं गोवळकोट घ्यावा; अंजनवेली घ्यावी; मग कुलाबेयासी जावें. त्यास आह्मीं तुझी भेट घेऊन आलेयावरी तेंच क्षणीं खंडूस राजाकडेस पाठविला. त्या बराबरी सांगोन पाठविलें जे, संभाजी आंगरे यांणीं आह्मांपासीं नेम केला जे, लोक व भांडीं गोवळकोटास पाठवून गोवळकोट घेतों. तसें राजास सांगोन पाठविलें. राजे बोलिले जे, 'येतील तेव्हां बावा खरे होतील.' हल्लीं तुह्मीं सुवर्णदुर्गास आलेंत. आह्मांस तुह्मीं बोलाविलें. तरी तुमचे बोलाविल्यावरून आह्मीं आलों तरी चौराज्यांत आमची अपकीर्ति होईल. हें तुह्मांस कैसें समजत नाहीं? तुह्मी अंजनवेलीस मुर्चे लावा ह्मणजे आह्मी डोईचे वाटेनें चालत येऊं.

[लेखांक ३१९] श्री.

चिरंजीव संभुसिंग सरखेल यांसी आज्ञा केली ऐसीजे:—माणसाचा अभिमान धरावा. तो या लोकीं परलोकीं कामास येतो. भार्गव देव कोंकणचा राजा. देव सर्वांचा पुरातन आहे. तुमचा त्याचा सल्ला

जाला ह्मणून तुह्मीं राजपुरीस कागद लिहून *** तुझा बाप वेडा नव्हता. त्याणें आमचे दरगास पेढें, आंबडस, नायसी तिनी गांव दरोबस्त देऊन चालवीत होते. तेणेंप्रमाणें तिनी गांव करार करून सनदा दरोबस्त तुह्मीं अभिमान धरून आणविणें. जोंवर देवाचें बरें नाहीं तोंवर कोंकणचे कोणाचें बरें होत नाहीं हें पुर्तें समजणें. तुह्मांवांचून परवाने येत नाहींत. देवावर पाणी पडणार नाहीं!

[ लेखांक ३२० ] श्री.

सहस्रायु चिरंजीव संभुसिंग यांस आज्ञा केली ऐसीजे:—तुह्मीं पायाची क्रिया केली. मुद्रेनिशीं कागद दिल्हा. येधवां एक बोलाल, घडीभरानें एक बोलाल. बादते (?) गोठणेयासी पाठविले ह्मणून बोलिलेंत. फार तरी वीस रुपये किंमत होती. परंतु पाठविलेंत नाहीं! तुमचे शब्दाचा विश्वास काय? तारू सांपडलें तें आमचे आशीर्वादें सांपडलें. तुह्मीं आह्मांपाशीं नेम केला जे, आधीं गोवळकोट घ्यावा; मग अंजनवेली घ्यावी; तेथून कुलाबा घ्यावा. गोवळकोट, अंजनवेली न घेतां एकाएकींच कुलाब्यास जावें. येणेंकरून राजा व विरूबाई व सर्वजन आह्मांस बरें काय ह्मणेल? दिल्ही आगरे पावेतों कीर्ति जाहली आहे ते अपकीर्ति होईल. अंजनवेली घेतली ह्मणजे कुलाबा घटकेमध्यें आला. कुलाबेयासी जावें नलगे. ऐसा तुमचा त्रास मानाजीस पडेल.

[ लेखांक ३२१ ] श्री.

चिरंजीव विजयीभव बाबा सवाई जयसिंग सरखेल यांस आज्ञा:—मुरुडचें महाजनकीचें तुम्हीं सविस्तर वर्तमान लिहिलें जे, शंकरभटास देत नाहीं. अमानत दिवाणांत ठेवितों. बहुत उत्तम. याप्रमाणें करणें. परंतु शंकरभटाकडील तिनी कागद आणवून पाठविलेत नाहींत. आधीं पाठवणें. तुझा देव मी. तुझा बाप मी. परंतु इतक्यांच्या (चे?)

पाप मी घेतों. आणि बाबा सरकारांत जें ठेवसील तें मज वेघळ तुज जोड काय? ज्या हरिश्चंद्रानें स्वप्नीं दान दिलें होतें त्यास कृष्णंभटाचें उदक त्वां घातलें. तें तूं खरेंच केलें. तैसें हें महाजनकीचें तुझें वचन सत्यच आहे.

[लेखांक ३२२] श्रीभार्गवराम.

सहस्रायु चिरंजीव विजयीभव तुळाजीस आज्ञा ऐसीजे:—तुजला अहिल्येचें वोटीस घातलें होतें. याजकरितां तिजला पांच हजार रुपये दिल्हे व तूं माझा शिष्य व तिचा लेंक ह्मणून दोन हजार तुजला दिल्हे. त्यास मागें कानोजी बोलिला जे, तुमच्यासाठीं हजार रुपयांतून रुपया ठेवील त्याची आई वंध्या व त्याचा निर्वंश होईल. त्यास संभूनें मजशीं दावा लाविला. हातचे निशाण व बंदूक व पासोडी अंगावरील हिरोन घेतली. तेथूनही कागद लिहिला जे, क्षणक्षणा कागद लिहूं नका. त्यानें मजला उभे दुपारीं लाथ हातली. आह्मीं त्यास श्रापिले. तुजला आशीर्वाद दिल्हा जे तो मरेल. तूं तक्तीं बैसशील. तेव्हां तुझी भेट घेईन. तुझे पाईची बेडी काढावी ह्मणून चिमाजीजवळून क्रिया घेतली जे, तुळारामाची बेडी काढणें. त्याची गत काय जाहली? कानोजीनें हत्ती नेला त्याची गत काय जाहली? हबशी याचें राज्य टाकिलें त्याची गत काय जाहली? आपले आपले जागा मरतात. विरूबाई यांणीं लाविले [?] त्यांची गत काय

---

१. हें पत्र स्वामींच्या सर्व पत्रांहून अगदीं वेगळें आहे. याची लिपी बालबोध असून याचे शेवटीं अर्धा उमटलेला असा एक शिक्का आहे. त्या शिक्यांतील 'लस्य मुद्रा जयति सर्वदा' एवढीं अक्षरें स्पष्ट दिसत आहेत. आह्मीं स्वामींचीं जेवढीं पत्रें पाहिलीं तेवढ्यांवर आह्मांस एकही शिक्का आढळून आला नाहीं. फक्त ह्या पत्रावरच हा अपूर्ण शिक्का उमटलेला दिसतो. हें पत्र स्वामींचें आहे ह्यांत शंका नाहीं. तेव्हां हा जर त्यांचाच शिक्का असेल तर त्यांतील संपूर्ण अक्षरें समजणें अत्यावश्य आहे.

जाहली? ऐसें असोन देवाचा रुका जो अभिलाष करील त्याचा निर्वंश. एकवीस जन्में खणेल. बरें होणार नाहीं. उभे दुपारा अग्नि लागेल. आह्मीं राजश्रीचे कानीं घातलें. त्यासी राजे बोलिले जे वडिलांचें कर्ज कां न खंडावें? ह्मणून उभयतां बायकांकडून कागद लिहिले आहेत. कानोजी व सेखोजी व संभाजी यांना स्वर्गवास करणें असेल व नरकांतून काढणें असेल तर तूं उतराई पितृऋण कर. नाहींतर तुजवरही गोमूत्र टाकीन. मग आह्मांस बोल नाहीं. जर वडिलांचे उतराई जाहलास तर श्री ऊर्जित करील, व पितरांस स्वर्गवास होईल. जर ठेविलेंस तर कुरुक्षेत्रीचे वृद्धीनें जन्मजन्मीं वाढतें. व्यतिपात, ग्रहणें, महापर्वें जातात. येणेंकडून उत्तम नसे, असें समजोन जो माझें द्रव्य ठेवील त्याच्या पितरांस अधोगत व त्याचें ऊर्जित होणार नाहीं. तूं तो शहाणा आहेस. इतकें लिहिलें आहे हें चित्तांत आणून वर्तणूक करणें. श्रीचें द्रव्य द्यावें. आशीर्वाद घ्यावा. येणेंकडून उत्तरोत्तर कल्याण श्रेयस्कर आहे. कांहीं तुजजवळ मागत नाहीं. माझें द्रव्य मज देऊन उतराई होणें, ह्मणजे स्वर्गवास तुझे पिते, बंधु करतील. पैकियांत पंचवीस खंडी लोखंड कांबीचें देणें, दहा खंडी साखर देणें, मणभर नारायण तेल देणें, व चंदन पांचमण देणें; व द्राक्षें एकमण देणें. लवंग एकमण देणें. रेशीम एकमण, केशर ८॥, कस्तुरी ८।, जायफळ जायपत्री ८१ देणें. गोठणें गांव दिल्हें तेव्हां कान्होजीनें उदक घातलें तर तेथील वेंठ बेगार नेऊं नका व खाजणें तुह्मांकडे नेतात तें खाजणें देणें, व भात नेलें तेंही देणें. डोरलें महाळुंगें येथील रुपये नेले ते पाठविणें. विसाजीपंतास ठाऊक आहे. येणेंप्रमाणें देणें. जिन्नस द्याल त्यांची रास्त किंमत करून रुपये माझ्या रुपयांत वजा करून बाकी रुपये रोख पाठवणें. यासी चुकलास तर तुजवर गोमूत्र टाकीन. मग मजला बोल नाहीं. राजाच्या बायकांहीं उपदेश घेतला. लोक आपले पदरचे देतात आणि माझा आशीर्वाद

घेतात. आणि हें देवाचें चतुरा ( न? ) ठेविल्यास इहलोकीं परलोकीं बरें नसे. अंतोबा व खंडोजी पाठविला आहे. सांगतां कळेल. द्रव्य आलियावर मी तेथें येईन. तुह्मांस आशीर्वाद देईन. मी खांसा येव्हांच येत होतों. त्यास शरीरीं आरोग्य नाहीं. याकरितां अंतोबा व खंडू पाठविला आहे. मागाहून द्रव्य आलियावर येतों. गोठणें यावर वेढ्याचा अगर कोणे गोष्टीचा रोखा न करणें. बहुत काय लिहिणे?

[ लेखांक ३२३ ] श्री.

पुरवणी तुळाजीरामास आज्ञा ऐसीजे:—देवाचीं वस्त्रें खरीदी करून पाठविलीं आहेत. तें पाहणें. तुमचा नवा अवतार जाहला ह्मणून आह्मांला तुमची भेट हवी. आह्मांस तुमचा अडकारुका कांहीं देऊं नको. तुह्मांस अडकारुका खर्च फार जाहला आहे. ऐशास तुमची (भेट) बहुतां दिवशीं जाहली होती. ऐशास हल्लीं भेटी घ्यावी ऐसें चित्तांत आहे. सातारा येऊं नको. आपली वक्रताच असों दे. जेव्हां सौ० बाई येईल तेव्हां येणें. तुह्मांजवळ मागणें इतकेंच जे, कारखाना खालें घेऊन येतों; तरी कांहीं भात व नागली व वर्या तुमचे चित्तास येईल तरी द्यावें. हबशानें नगारा, दोन जंबुरे व घांट व दरवाजा ऐसा घेऊन गेला. तो खालीं पाठवून द्यावा. देवाचा देवास लावूं. माग धामणी आह्मांस होती. राजा चंदीस XXX दिल्हीच होती. आणि यांहीं राजानें व बाईनें उदक घालोन दिल्हे आहेत. पालखीची वाट पाहतों तरी पालखी आह्मीं तुमची घेऊन तुमच्याकडे पाठवून देऊं. धामणीचा काजी शंभर माणसांचा जमादार होता. तो हबशीजवळ होता. त्याणें बहुत बायका बाटविल्या. नानाप्रकारच्या खाऱ्या केल्या. तरी त्यास तुह्मी छटणें (छळणें). तो मोठा चालक आहे. बाबा, गोवळकोटचा हबशी जीवेंच मारावा होता तो कैसा केला (मेला ?). वैकुंठवासी कानोजींनीं आह्मांस 'चोरु' ह्मणून सिबाड दिल्ही होती तैसी आह्मांस सिबाड देणें. मुंबईहून देवाचें सामान आणावयासी द्यावें.

मग तुमचें आह्मांस कांहीं एक नलगे! तुमचे चार लाख रुपये मसलतीचे***(यापुढें फाटलें आहे.)

[लेखांक ३२४] श्री भार्गव चिरंजीव अवतार.

चवदालक्षांचा धणी तो आहे देवळीं, त्याचा भक्तराजशिरोमणी तुळाजी सरखेल व योगभ्रष्ट कान्होजी. त्याची निष्ठा होती. त्यांणीं काय काय सेवा केली! कितीक कामें झालीं! एक मालती पुष्प दिल्हें, त्या प्रसादें कलंकी धरून आणिली नवा लाखांची. एका सुवर्णदुर्गांपासून किती किल्ले घेतले? त्याचे निष्ठेप्रमाणें तुझी निष्ठा असली तरी अंजनवेली आली. सत्य करून जाण. मी हरिभक्ताच्या गाई राखितों. आपण भक्तीस्तव सातारियास आलों. येथें राजेश्रीनीं भक्ति करून आणून क्षौर केलें. बरें वाटत नव्हतें याकरितां आणिलें. पुजेसमयीं धामणी आणि सोनगांवचें उदक घातलें. अंजनवेली आलियावरी तुह्मी चालवा. श्रीचा प्रसाद शिरवेष्टन, वज्रकवच व तीळशर्करा पाठविली ती घेणें. तुमच्या बापानें अहिल्या सेवेशी उदक घालून दिल्ही. तुझ्या भावानें राधा, आनंदी, सोनी ऐसे जैसी तुझा भाऊ यांणीं दिल्या. संभाजी आंगरे यांणीं पुरता मजसी दावा बांधला. जैसा भस्मासुरानें बांधला तैसा बांधला. तुजदेखतां बांधला. श्रीच्या ठायीं निष्ठा असों देणें. अजंनवेलीवरी लगट करावा. काढावा. हे आज्ञा. तुह्मांस शाहूजीनें सरखेल दिली. तुह्मांवरी दया फार आहे. हे आज्ञा.

[लेखांक ३२५] श्री.

सहस्रायु चिरंजीव विजयीभव तुळाजीस आज्ञा ऐसीजेः–तुझे सहस्र अन्याय जाहले! तुजला पत्र न लिहितों! परंतु मानसिंग याची [व] तुमची गोडी व्हावी, महत्कार्य सिद्धीस जावें, याजकरितां पत्र लिहिलें आहे. तर कबिले, बायका जे तुह्मांकडे मानाजीचीं आहेत तीं लावून

रवाना करावीं. येविसीं राजपत्रें व आमचें पत्र गेलेंच आहे. बहुत काय लिहिणें हे आज्ञा. मानसिंगास दोन गोष्टी सांगितल्या [ त्यांत अंतर ] त्यापासून काडीइतकें सहस्र वांख्यानें पडणार नाहीं. आह्मीं चित्त शोधून पाहिलें. तुह्मीं आतां लेंकुरबुद्धि न करणें हे आज्ञा. दोघे भाऊ एक होऊन एखादे आभाळास हात घालणें.

[ लेखांक ३२६ ] श्री.

मानाजी आंग्रे यांसी आज्ञा ऐसीजे:—पत्रें पाठविलीं प्रविष्ट होऊन आमचे चित्ताचा निशा जाहला. इकडील वर्तमान तर पिलाजी जाधव विजयदुर्गाहून वरते आले. ते जागां कांहीं सौरस्य नाहीं. रघुनाथ प्रभूच्या बायका सोडावयासी आग्रह करीत होते. त्यासी तो मान्य करीना. बायका कोठीस होत्या. त्या दारू वाटावयासी लाविल्या. यासी उत्तर दिल्हें जे, तुमच्या चित्तांत खालीं स्वारी करावयाची उद्यां असेल ते आजच करणें. ऐसे परनिष्ट सांगितलें. त्यावरून जाधवराव व तो आला. आह्मांस संभुसिंगानें पूर्वीं पत्रें पाठविलीं जे, एक वेळ भेटीस येणें. व हल्लीं भला माणूस व पत्र पाठविलें जे, तुह्मी भेटीस येणें. यासी प्रत्योत्तर पाठविलें जे, या प्रसंगांत भेटीचें प्रयोजन काय आहे ? तुमच्या पुण्यें थोडें बहुत काम चाललेंच आहे. तुह्मांस दो चौ कोटींचा लाभ जाहला ह्मणजे आह्मांस संतोष. आह्मी कांहीं शाखभाजी, वल्कलें मागों. सारांश गोष्ट जे, तुमचें अभीष्ट ह्मणजे आह्मांस संतोष. तुह्मी तों धीरवंत, औदार्यपरिपूर्ण, आहां. संभुसिंगानें धीर धरुन जाधवास परनिष्ट सांगितलें जे, उद्यां याल ते आतांच या; तर तुमचें कर्तृत्व त्याजहून धीराचें आहें. पाणी पाण्याकडेस जातें ह्मणून तुह्मांस लिहिलें. तुमचे पत्रांत एकवचन ऐकोन संतोषी जाहलों. विशेष काय लिहणें ?

पिलाजी जाधव मोठा मायावादी आहे. याचा विश्वास न

धरणें. आमचा विश्वास तुह्मांस काय? परंतु आह्मीं आपला वारा तुमच्या वाऱ्यांत घातला आहे. कांहीं शाक भाजी मागतों ते देतां तुह्मी कष्टी होतां. शाबास तुझा धीर!

[लेखांक ३२७] श्री.

सहस्रायु चिरंजीव भार्गवदूत मानसिंग आंगरे यांसी आज्ञा केली ऐसीजे, बहुतां दिवशीं स्मरण करून पत्र पाठविलें [तें] प्रविष्ट होऊन लेखनार्थ अवगत जाहला. श्रीनें तुझे आत्म्यांत आत्मा घातला ह्मणून तुजला रोज पांचशें शिव्या देतों जे, तूं अंतकाळीं कामास येशील. संभाजी आंगरे यांच्या मनामध्यें जे, आह्मीं तेथें जाऊन तुह्मांस श्रापावें. तर तेथें येऊन त्याणें आमची छळणा केली तो श्राप त्यासच लागला. हल्लीं त्याकडील माणसें आलीं व कागद आले, ते आह्मीं माघारे फिरविले. ते कित्येक शरण आले परंतु भेट दिली नाहीं. तर बाबा, तुजला आह्मीं काय संकट घातलें? केथे मेथें मागत होतों. आह्मांस दिल्यानें सुदामाची गत होईल. आह्मी साधुसंताची पायधूळ आहों. काय मागतों जे, कांहीं तूप, कांहीं गुलाब, कांहीं द्राक्षें, साखर, सुरण मागतों. तें तुमचे चित्तास नये. बरें! समाधिविसर्जनास वस्त्रें पाठविलीं [तीं] पावलीं. तुह्मांस प्रसाद तिवट लाल १ पाठविलें आहे. घेणें.

[लेखांक ३२८] श्री.

चिरंजीव सहस्रायु विजयीभव भार्गवशिष्य मानाजी वसिष्ठशिष्यपरी तुज आज्ञा ऐसीजे:—मानसील तरी गुरुआज्ञा विशेष आहे. तरी मथुराबाईचा बहुत सन्मान करून पालखी पाठवून आपल्याजवळ घेऊन जाणें. तेणेंकरून लौकिकीं कीर्ति होईल. आणि कान्होजीसारखें यश येईल. यानंतर संभुबावाचा कागद आला आहे कीं, तुह्मी मजला सरखेलाचे ठायीं आहां. आह्मां दोघांची गोडी करा. आपण जरी

मानाजीचे वाईट करीन तरी स्वामींच्या पायांची शपत, व सरखेलाची शपत. पहा, पहा, मरतां मरतां सरखेलास पाल किल्ला आला. तो किल्ला राजा मागत होता; परंतु त्यांनीं दिला नाहीं. तूं तरी सरखेलाचा पुत्रच आहेस. सरखेल बोलिले होते जे, 'जयसिंगामागें मानाजी तुह्मांस उपकारास येईल. यासी उपदेश करणें.' जयसिंग धावडशीस भेटीस आला तेव्हां तीनशें रुपये मजपासून घेतले आणि बापु बागलास मुरुडची महाजनकी देतों ह्मणून आमच्या पायाची क्रिया केली. आणि मागत्यान बेमान जाहला. ते क्रिया त्यास लागली. आणि कृष्णंभटाची देशमुखी पूर्वापार आहे. आह्मी रामेश्वरास मागें पळोन गेलों तेव्हां चार मुद्दे कान्होजीस घातले कीं, किरवंत जातींत घालणें.*** **रतना भंडारी सोडविला. आणखी कृष्णंभटाची देशमुखी दे. त्यास कानोजी बोलिला, कृष्णंभटाची देशमुखी खरीच आहे. दुसरे वेळीं तुह्मी या. देशमुखी कृष्णंभटास देतों. त्यावरी जयसिंगानें उदक घातलें. संभूनें उदक घातलें. लक्ष्मीबाईनें उदक घातलें. तिघांनीं उदक घालून देशमुखी करून दिली. ते संभूनें जयसिंगाचा शिक्का लटका केला. आणि कृष्णंभटाची देशमुखी काढिली. हा त्याणें मोठासा अन्याय केला, बरें याचा भोक्ताश्री आहे. माझ्या जिवास बरें वाटत नाहीं. शिवरात्रीकारणें राजे, विरूबाई, दोघी राण्या, फत्तेसिंग व सरकारकून आमचे भेटीस आले. दोन दिवस राहोन सवेंच गेले. आतां फारसें जिवास बरें वाटतें. तरी पांच गुलाबशिसे चोखटसे, आणखी दहा शेर सेंधेलोण कांहीं तुझे संग्रहीं सुरण असिलें, तरी येईल चित्तास तरी बेगी पाठवून देणें.

[ लेखांक ३२९ ] **भार्गवराम.**

मातुश्री लिंबाई व केदारजी व मानसिंग यांसी आज्ञा केली ऐसीजे:— श्रीस इनामगांव छत्रपतीनें दरोबस्त देखील सरदेशमुखी दिली. जो-

त्याजी केसरकर यांसही ठावकें आहे. ऐसें असतां कोंकणप्रांतें तुह्मांकडील जिवाजी प्रभू कमावीसदार महिपतगडीं आहे. त्याणें पांवस तर्फेचें डोरलें, महाळुंगें या गांवचे रुपये ८ वसूल केले. ऐशास जिवाजी प्रभू यास आपलें पत्र देणें जे, श्रीचे गांवचे सनदा आहेत. त्यांचे वाटेस न जाणें. रुपये आठ घेतले आहेत तें पत्रदर्शनीं परतून देणें. याजउपरी गांवावरी रोखा केलांत ह्मणजे तुमचा मुलाहिजा होणार नाहीं. ऐसें पत्र लवकर पाठविणें. अल्प गोष्टीकरितां महाराजास इटकावें ऐसें नाहीं. याजकरितां तुह्मांस लिहिलें आहे. श्रीचे गांवचे रुपये घेतल्यानें तुमचें अधिक होत नाहीं, आणि न घेतल्यानें तुमचें बरेंच होईल. ऐसें जाणोन लौकर कागद पाठवणें. बहुता लोकांची तुमची भिक्षा पावली. (अपूर्ण.)

[ लेखांक ३३० ] श्री.

मननिर्मळ गंगाजल मथुबाईस आज्ञा ऐसीजेः—तुह्मीं लिहिलें जे, शामलाचें निर्मूळ होऊन देवाची भेटी घ्यावी हा हेत आहे. स्वर्गीचे देव जे अमृतपान करितात तेही भार्गवाची भेटी व्हावी हे इच्छा करितात. भार्गव ह्मणजे चिरंजीव. येरवीं येणें कोठें होतें? तुझ्याच पुण्यें भार्गवें निर्मूल करून तुह्मांस भेटीस आणिलें. "बकाजी नाईक यांणीं जिवाभ्यास करून बाणकोट मंडणगड फत्ते केला." ह्मणून लिहिलें. तरी बकाजी महाडीक कामाचा आहे. त्याजवर दया तुह्मीं बहुतशी असों देणें. गोंवाई आंबे यत्न करून पाठविलेत ते पावोन कोटीशा आनंद जाला. बहुत बहुत संतोषी जालों. निष्ठा अंतरापासून आहे हें कळों आलें. तुह्मीं लिहिलें, दोनी स्थळें राहिलीं आहेत. त्यांचा प्रत्न (प्रयत्न) करून श्रीआशीर्वादें लौकरीच हस्तगत होतील. तरी ज्याचें तळ कोंकण त्याचे चित्तांत तुह्मांस कोंकणचें राज्य द्यावें. हें चित्तांत असलें तरी तुमचेच हातें दोनीं स्थळांचें यश श्री तुमचे पदरीं पाडीतच आहेत. लौकर दोनी स्थळें हस्तगत आलियाचें संतोषवृत्त

लिहोन यंदाचें समाधीस भार्गवक्षेत्रीं तुह्मीं खासा यावें ऐसें केलें पाहिजे. दोनी स्थळांचें यश तुमचे पदरांत भार्गवें घातलें तरीच आह्मी यंदां खालें समाधीस येऊं. नाहींतरी खालें यंदां येत नाहीं. तुह्मांस कळावें ह्मणून लिहिलें आहे.[1]

[लेखांक ३३१] श्री.

मननिर्मळ गंगाजळ मथुराबाई यांसी आज्ञा ऐसीजेः—पत्र पाठविलें प्रविष्ट जाहलें. मानाजीवर कृपा करणें ह्मणून लिहिलें, तर तुझी कृपा मानाजीवर असलियासी तरेल. वरकड, आह्मीं तेथें यावें; आमची पूजा उत्तम जाहली तर तुमची कीर्त व आमचा लौकिक. याकरितां दोनी श्रम आह्मीच राखतों. पुढें ईश्वरें दिलियासी येणें ते समयीं येऊं. तुह्मांस सुवर्णाचीं तारवें श्रीनें दिलियासी सहस्र वेळ येऊं. लक्ष मागूं. बहुत काय लिहिणें.

[लेखांक ३३२] श्री.

राजकृपा नाहीं ऐसें जाहलें! हल्लीं जर निष्ठा वडिलांप्रमाणें तुळाजीनें धरिली तर भार्गवदया होऊन बरेंच होईल. मुख्य निष्ठा असली पाहिजे. कृष्णंभट देसाई याजवर आमचे दया होती. तुह्मांसही लोकांहीं सांगितलेंच असेल. याजकरितां याजवर दया तुह्मीं असों देणें. याचें बरें असेल तें तुह्मीं केलियास श्री तुमचें बरें करील.

[लेखांक ३३३] श्री.

* * *तरी आजि तागायत डोरलें महाळुंगेंचे आह्मांस रुपये तीन हजार साडेतीन पावले असतील तर आह्मी तुह्मांस रोकडे आठ दहा हजार पावेतों रुपये देतों. आणि तुह्मीं धोपेश्वरचें देऊळ, माझे आई, तूं कर. माझी तूं आई; माझा तूं शिष्य; माझा तूं सखा. देऊळ जर

---

१ हें पत्रोत्तर लेखांक २०३ च्या पाठीमागें लिहिलें आहे.

सिद्धीतें पावलें तर कळसारोपण तुझेच हातें करवीन. एक उंट आपला पाठवून देणें. नगारेची जोडी देवास पाठवून देतों. देवद्वारीं ठेवें.

## ११ प्रतिनिधि.

[लेखांक ३३४] श्री.

श्रीमत् परमहंस स्वामी यांहीं

सहस्त्रायु चिरंजीव श्रीनिवासराउ प्रतिनिधि यांसी आज्ञा ऐसीजे:– येथें इमारतीचे बेगमीस तांदुळ पाहिजेत. याजकरतां कांगोरीखाले बिरवाडी तर्फेंत तांदूळ घेतले आहेत. बैल पाठवून आणवणार. त्यास जकातीचे दस्तक पारघाटचे तलघाठ वरघाट कांगोरी पावेतों कमावीसदारांस पावणशें बैलांचें दिल्हें पाहिजे. प्रतापगडची एक शीव आहे. त्यास निराळे गडकरीयांस व तळघाट वरघाट जकातदारांस, जेणेंकडून खटखटा कोणी न करीत, ऐसीं पत्रें देऊन पाठविलीं पाहिजेत. विशेष लिहिणें तरी सुज्ञ असा. हे आज्ञा.

## १२ पुरंदरे.

[लेखांक ३३५] श्री.

श्रीमत् परमहंस यांहीं

मननिर्मल गंगाजल आचार्यें पुण्यपवित्र चिरंजीव दादोबा व महादोबा यांसी आज्ञा केली ऐसीजे:—कृष्णाजीस मूठभर पोहे अर्पावे सुदामदेवानें. ती वर्षांचा ऐवज रुपये १००० व वस्त्र वर्षास सुसी घेतों. यंदा उत्तम किमखाप चाळीस रुपयांचे पाठवणें. वर्षास सुसीची दुलई व सुसीची कुडती करितों. यंदा किमखापी करावी ह्मणून किम-

---

१. ह्या पत्रावर कोणास लिहिलें त्याचें नांव नाहीं. तथापि हें पत्र आंगऱ्यांच्या इतर पत्रांत सांपडलें असून त्यांतील संबंधही त्यांचाच दिसतो. त्यावरून तें आंगऱ्यांच्या सदराखालीं दाखल केलें आहे.

खाप लिहिला आहे. तर चाळीस रुपये अगर थान पाठवावें. ह्मणजे कुडती करूं. तुह्मी आमची आज्ञा पाळितां ह्मणून आह्मी लिहितों. तुह्मांस लिहावें ना तर कोणास लिहावें? तर रुपये व किमखाप पाठवून दीजे. नये चित्तास तर रुपयेही नको व किमखापही नको! कळलें पाहिजे. विशेष काय लिहिणें हे आज्ञा.

[लेखांक ३३६] श्री.

श्रीमत् परमहंस स्वामी यांहीं

सहस्रायु चिरंजीव मल्हार तुकदेव यांसी आज्ञा केली ऐसीजे:—तुह्मांकडे श्रीचें येणें ते गु॥ खंडोजी साळवी येणेंप्रमाणें पावले रुपये:—१००० भिक्षा ती वर्षा द्यावी ते पावले. ४० वस्त्रांपैकीं. एकूण एक हजार चाळीस रुपये पावले. विशेष काय लिहिणें. छ० १४ सवाल सुमा आर्बैन मया व आलफ. हे आज्ञा.

## १३ जंजिरेकर हबशी.

[लेखांक ३३७] हु.

दिलपाक दिलदर्या इलाही मेहेरबान—खान

मुक्काम जंजिरा उमर ताजा व दौलत ज्यादा यांस:—

अजीद्वागोये द्वाअंकी येथील खैरसल्ला जाणवून आपला खैरसल्ला कलमीं करीत असलें पाहिजे. दिगर मेहेरबानगीचे नजरेनें किताबत पाठविली ते खुशवक्त पोहोंचून दिल आराम जाहलें. ऐसेच हरघडीं खत किताबत पाठवून फकिराचे खबर घेत असले पाहिजे. आह्मी द्वागीर असो. किताबत आली तेथें कलमीं केलें जे, धामधुमीचे सबबेनें परशरामचे ठिकाणींहून वरघाटीं गेलियास पांच वर्षे होऊं आलीं. अलबता ठिकाणचे ठिकाणीं यावयाचा इरादा आहे ह्मणून विनायक जोशी व कृष्णशेट शेटये कर्यात चिपळून यांचे जबानीवरून पैगाम

१. छ० १४ सुमा आर्बैन इ०:--ता० ३ जानेवारी इ० स० १७४०.

रोशन होऊन आला. दरिबा रफामत व शहामत पन्हा सिद्दी संबूल यांहीं हिम अरूज केला त्यावरून अजराहमरात कलमीं केलें जात असें चालविलें जाईल. दरीं बाब खातर जमा देखोन कोणें बाबें शकअंदेशा दिलांत आणिला न पाहिजे. मोहिबाचे चालवावयाबाबें सुभेयासही हुकूम सादर केला असे ह्मणून कलमीं केलें, तें मालूम जाहलें. ऐशास आह्मी कांहीं वतनदार फकीर परशरामचे नव्हो. इलाहीचे हुकुमें व बडेखान यांचे मेहेर आमचे जागा होती. ते ह्मटलें तें आमचें चालवीत असत. याजकरितां त्यांचे सुखें होतों. हल्लींही बडेखानाप्रमाणें मेहेरचे नजरेनें चालवूं ह्मणून कलमीं केलें; याहून अधिक काय आहे? आतां यावें तर गैरहंगाम जाहला व ज्याचे बंदगी करितों तो दिलांत येऊन त्याचा हुकूम जालियावरी डोईचे वाटेनें आपले ठिकाणीं येऊं. मालूम जाहलें पाहिजे. ज्यादा काय लिहिणें? प्यार मोहबत मेहेरचा पन्हा फकिरावर असों दिला पाहिजे. हे किताबत.

---

# पुरवणी नंबर २.

# स्वामींस आलेलीं पत्रें.

## पेशवे.

[ लेखांक ३३८ ] श्री.

पुरवणी श्रीमत् महाराज परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—विज्ञापना.

कृष्णागर चंदन एक शेर वजन पक्का पाठवणें ह्मणोन आज्ञा. त्यास वसईहून आणविला आहे. आलियावर ( पाठवूं. ) आज्ञेखेरीज काय आहे?

नेहर परगणियाची मजमू नारो गणेश यांस सांगितली. तो लबाड आहे. त्यास दूर करून दुसरा पाठविला. परंतु तुह्मी नारो गणेशच करार केलां. तर त्याजकडील आमचे दुसाला रुपये १५० दीडशें घेऊन पाठवणें ह्मणोन आज्ञा. त्यासी स्वामींचे आज्ञेपेक्षां विशेष दमास पाठवावयाविशीं लिहिलें त्यास स्वामींस दमास दिल्हे त्यापेक्षां उंच नाहीं. नवा कोठून आलिया पाठवूं.

मुंढवे याचे पाटिलकीची स्थापना करणें ह्मणोन आज्ञा. त्यास स्वामींचे आज्ञेप्रमाणें पाटील मजकुराचें वर्तमान मनास आणून वाजवी असेल तेंच करूं.

रानचा मेवा कृपा करून पाठविला तो पावला. आज्ञेप्रमाणें भक्षिला.

---

* मागील पत्रें छापून निघाल्यानंतर आह्मांस स्वामींचा आणखी कांहीं पत्रव्यवहार उपलब्ध झाला. तो पूर्वीच्या क्रमाप्रमाणें पुरवणी नंबर २ अशा सदराखालीं घातला आहे. ह्यामध्यें पेशव्यांचीं व इतर सरदारांचीं व त्यांच्या कारभाऱ्यांचीं वगैरे स्वामींस आलेलीं पत्रें असून स्वामींनीं लिहिलेलींही पत्रें बरींच आहेत. तीं उपयुक्त असल्यामुळें ह्या पुस्तकांत दाखल केलीं आहेत.

काय आहे ? नारो गणेश आलिया-वरून स्वामींचे बोलीप्रमाणें नारो गणेश यांजपासून रुपये घेऊन सेवेसी पाठवूं.

गोपाळनाईक इंदापुरकर यांचें कर्ज अंबरो रोडगे याजकडे आहे. खतपत्र आहे. मागत असतां देत नाहीं. गोपाळनाईक गरीब, जातवान आहे. यांचें कर्ज उगवून देणें ह्मणोन आज्ञा. त्यास स्वामींचे आज्ञेपेक्षां अधिक काय आहे ? अंबरोजी रोडगे यांस ताकीद करणें तैसी करून कर्ज उगवे तें करितों. बहुत काय लिहिणें हे विनंति.

शिवराम महाडीक यांस तुळजाजी पांडरा शिंपी वस्ती कसबे पुणें याचा भाऊ खंडोजी पांडरा याणें सोइरीक देऊं केली असतां तुकोजीस दगलबाजी करून द्वाही दुसरी केली आहे. तरी शिवरामाची सोइरीक शिवरामास देवणें ह्मणोन आज्ञा. त्यास येविसींचें उत्तर आलाहिदा लिहिलें असे.

[ लेखांक ३३९ ] श्री.

पु ॥ श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

विज्ञापना शिवराम महाडीक यांचे सोईरिकीची तहकिकात केली. त्यास सोईरीक शिवरामाची खरी आहे. त्याची त्यास देणें ह्मणोन आज्ञा. आह्मीं ताकीद केली; परंतु तुकोजी सदरा उगाच लबाडीच्या गोष्टी सांगत होता. ते त्या गैरमाकुल. तुकोजी सदरा सौभाग्यादिसंपन्न मातुश्री बाईसाहेब वाडा पहिला यांच्या चौकांत राहतो. त्या हिमायतीनें नवदिगर करील तर त्याचे स्वामींनीं पारिपत्य करावें. आमचा गुत्ता कांहीं तेथें नाहीं. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति.

[ लेखांक ३४० ] श्री.

पुरवणी श्रीमत् महाराज राजश्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

विज्ञापना सोमाजींनीं केशर कृष्णागराविशीं स्वामींची आज्ञा सांगितली. त्याजवरून केशर तोळा ८८– १, कस्तुरी ८८८१, कृष्णागर वजन ८८॥. येणेंप्रमाणें सेवेसी पाठविलें आहे. पावलियाचें उत्तर पाठवावें. "सर्प बिळांत आहे. फडा करून धुसधुसतो. त्याचा विश्वास न धरणें" ह्मणून आज्ञा. त्यास तों सर्पाचा विश्वास न धरावा उचीतच. त्याहीमध्यें स्वामींची आज्ञा. मग विश्वास कोण धरील ? परंतु सर्प कोणता, बीळ कोणतें, तें आमच्या चित्तांत आलें नाहीं. तरी ल्याहावयाची आज्ञा केली पाहिजे. कल्याणच्या पांचा हजारांची मुदत होत आली तरी रुपये पाठवणें ह्मणोन आज्ञा. तर प्रस्तुत येथें ओढ आहे. पुढें ये विसींची विनंति स्वामींजवळ करणें ते करूं. स्वामींची आज्ञा आह्मांस सर्वप्रकारें वंद्य आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[ लेखांक ३४१ ] श्री.

पु॥ श्रीमत् परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

विनंति स्वामींनीं लेंकरावर चार गोष्टी रागें भरून शिकवणुकेच्या लिहिल्या. त्यास जसा भाव आमचा स्वामींचे पायासीं असेल तसें फळ पाऊं, यांत संशय नाहीं. स्वामींचे आज्ञेप्रमाणें तूर्त येणेंप्रमाणें जिन्नस पाठविली असे.

घोडी निळी, गरीब, स्वामींचे बसावयाचे कामाची आहे. यास्तव पाठविली असे. कृपा करून अंगीकार करावा.

सयाजी कनोजे याजविसीं प-

व्याजाचे रुपायांची वरात हिशोबाप्रमाणें दादोबावर पाठविली आहे. रुपये देतील.

जगजीवनंपतांविसीं स्वामींनीं आज्ञा केली. त्यास त्याविसीं स्वा-

हिले स्वामींनीं आज्ञा केली होती. सांप्रतही विस्तारें लिहिलें. स्वामींचे आज्ञेपेक्षां अधिक काय आहे ? यास्तव हशमांत कोणतीही तैनात कबूल केली. लोकांच्याही माणूस पाहून केल्या. गांव राहावयास भलता नेमून देतो. खुद्द फिरंगी याची गडबड आहे. यास्तव लोकांची भरती पाहिजे. ह्मणून भलते जागा, जेथें झुंजावयाचें काम असेल तेथें पाठवितो. गडबड वारली ह्मणजे हवालाही योजिला जाईल, तसें सांगत होतों. परंतु ते गोष्ट त्यांनीं अमान्य करून सेवेसी आले आहेत. याउपर स्वामींचे विचारास येईल तें करावें. मींनीं चरणरजास निरोप धावडशीहून देतेसमयीं एकांतीं स्वमुखें सांगितलें तो अर्थ ध्यानांत आहे. त्याप्रमाणें वर्तणुकेस अंतर होणार नाहीं. वरकड त्यांचें चालवावयास अंतर होणार नाहीं. एतद्विषयीं वारंवार स्वामींनीं लिहावें ऐसें नाहीं.

स्वामी कृपा करून वरचेवर शिकवणुकेस्तव राग दर्शवून लिहितात, तरी स्वामींचे चरणांवेगळे आह्मी वागत नाहीं हे पूर्ण निष्ठा आमची आहे. असें असतां आह्मांस वारंवार ल्याहावें ऐसें काय आहे? आह्मी तर स्वामींचे आज्ञेखेरीज नसावें आणि आमचे मनोरथ स्वामींनीं आपल्या तपोबळें पूर्ण करावे. न कळे तर देव बोल लावील.

(पुढील भाग फाटला आहे.)

[लेखांक ३४२] श्री.

पु॥ श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसी:—

विज्ञापना बारा बैलांचे दस्तक मुंबईचें देणें ह्मणोन आज्ञा. त्यास ये विशींचें उत्तर सोमाजीजवळ सांगितलें आहे. विनंति करील त्यावरून

विदित होईल. स्वामींनीं लग्नाचे साहित्यांतील कस्तुरी, केशर व गुलाब शिसे पाठवावयाची आज्ञा केली. त्यावरून कस्तुरी तोळा १, केशर तोळे २ व गुलाब शिसे २ सेवेसी पाठविले असेत. कस्तुरी केशर उत्तम नाहीं. सामान्य आहे. स्वामींस लग्नाचीं वस्त्रें १ शालजोडी, १ किनखाप, १ टोपी मखमालीची एकूण तीन पाठविलीं असेत. कृपा करून अंगीकार केला पाहिजे. उत्तर पावलियाचें पाठवावें. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[ लेखांक ३४३ ] श्री.

पुरवणी श्रीमत् परमहंसबावा स्वामींचे सेवेसी:–

विनंति उपरी स्वामींनीं आज्ञा केली त्याचें उत्तर:–माळशिरसकराविशीं राजश्री बापुजी श्रीपत यांस सांगोन दीड हजार रुपये खंड ह्मणोन आज्ञा केली. ऐशास तुकोजी पाटील यांची मुलें व बका माळी यांस किल्यावरी ठेविलें आहे. हल्लीं आज्ञेप्रमाणें खंडाचाही तगादा केला असे, व संभाजी यादव यासही आणविला आहे. खंडाचा निकाल करून घेऊं, तेव्हांच त्यास निरोप देऊं. नाहींतरी स्वामींच्या आज्ञेवेगळा त्यास निरोप देणार नाहीं.

बावाजी गायकवाड वगैरे लोक धारावीस मेले. त्याजविशीं स्वामींनीं लिहिलें. ऐशास त्यांचें तथ्य वर्तमान जीवंत आहेत कीं मेले ऐसें कळत नाहीं. परंतु बहुधा मेलेच असतील. त्या लोकांच्या बालपरवेशा करार करून देऊं. चालवावयास अंतर होणार नाहीं.

मोत्यांचे पंचवीस दाणें पाठवून देणें ह्मणोन स्वामींनीं आज्ञा केली. त्यांतून मोत्यें दाणें २५ पंचवीस हस्तें कानोजी यादव जासूद पाठविलीं आहेत. घेतलीं पाहिजेत.

साकर बुरा वजन पक्के शेर तीन मण सातारेयाहून देवणें ह्मणोन आज्ञा केली. त्यावरून तीन मण बुरा सातारेयाहून देविली असे. प्रविष्ठ होईल.

येसजी गायकवाड बावाजीचा भाऊ याजविशीं स्वामींनीं लिहिलें, ऐशास येसजी प्रस्तुत चाकर होत नाहीं. दसरियास दहा वीस माणूस घेऊन येऊन चाकर होईन ह्मणतो. यास्तव आतां चाकर ठेविला नाहीं. पुढें लोकसहवर्तमान आल्यावरी चाकर करून चालविलें जाईल. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक ३४४] श्री.

पुरवणी श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

विज्ञापना. आमचे शरीरीं अनारोग्य प्राप्त होऊन व्यथा अतिशयेसी जाहली. या व्यथेसारिखी व्यथा कधींही जाहली नाहीं. मरणांतिक अवस्था जाहली होती. प्रस्तुत स्वामींचे आशीर्वादेंकरून व्यथेस उतार आहे. स्वामींचे सेवेसी विदित व्हावें यास्तव लिहिलें असे. हे विज्ञापना.

[लेखांक ३४५] श्री.

पुरवणी श्रीमत् महाराज परमहंसबावा
स्वामींचे सेवेसीः—

विज्ञापना. सेवकाचे शरीरीं देवीची पीडा प्राप्त जाहली आहे. त्यास प्रस्तुत फोड्या पाण्यानें भरल्या व किंचित् उतारही पडिला आहे. या उपरी स्वामींचे कृपेंकरून आरोग्यही होईल. स्वामींचे सेवेसी अवगत व्हावें यास्तव लिहिलें असें. सेवेसी श्रुत जालें पाहिजे हे विज्ञापना.

## इतर लोक.

[लेखांक ३४६] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंस स्वामींचे सेवेसीः–

चरणरज बापुजी श्रीपत कृतानेक नमस्कार विनंति. येथील फाल्गुन बहुल द्वादशी गुरुवासरपर्यंत स्वामींचे कृपावलोकनेंकरून यथास्थित असे. विशेष. राजश्री पंतप्रधान यांनीं गंगाजी मल्हार व दादाजी

यांस लिहोन स्वामीकारणें जिन्नस आणविला होता, तो त्यांनीं येथें आणिला. येथून सांप्रत सेवेसी पाठविला आहे:—

| | |
|---|---|
| ४५ दाळिंबें सुमारें. | ८८६ गोराडी वजन पक्के. |
| ३० साखरनिंबें ७५. | ८८॥। सुरण कंद. |
| ७५ | ८८६॥। |

एकूण दाळिंबें व साखरनिंबें पाऊणशें व वजन पक्के पावणेसात शेर बकाजी शिंदा यास समागमें भोयांवर देऊन सेवेशी पाठविलें आहे. प्रविष्ट जाहलियाचें उत्तर पाठवावयास आज्ञा केली पाहिजे. स्वामींचा मुक्काम पिंपरीस किती दिवस आहे, तेथून जाणें कधीं होईल, हें लेहोन पाठवावयास आज्ञा केली पाहिजे. सेवेसी श्रुत झालें पाहिजे हे विज्ञप्ति.

[लेखांक ३४७] श्री.

श्रीमत् परमहंसस्वामी भार्गवरामबावा यांचे सेवेसी:—

चरणरज विसाजी गणेश व काशी नानाजी दिंमत यशवंतराव पवार सा० नमस्कार विनंति. स्वामींनीं आज्ञापत्र पाठविलें कीं, राजश्री यशवंतराव पवार यांजकडे कर्ज आहे. तें यंदांचे ठेविले वर्ताळियाचे रुपये १५०० पंधराशें व व्याजाचे व कारकुनाचे रुपये दीडशें सदरहु साडेसोळाशें पाठवणें. आज्ञेप्रमाणें रुपये साडेसोळाशें आजि प्रात:काळीं आश्विन शुद्ध अष्टमी मंगळवारीं धावडशीस स्वामींस पत्र लिहून रवाना केले. तों आज दो प्रहरां श्रवण जाहलें कीं, स्वामींचें आगमन वाघोलीस जालें आहे. रुपये पाठविले हें स्वामींस श्रवण व्हावें याजकरितां पत्र पाठविलें असे. आह्मांस पुणियाचें बोलावणें आलें आहे. आजि भोजनोत्तर अथवा पहांटेस जाऊं. विदित जालें पाहिजे. हे विज्ञापना.

[लेखांक ३४८] श्री.

श्रीमत् परमहंस भार्गवरामबावा स्वामींचे सेवेसीः—

चरणरज विसाजी गणेश व काशी नानाजी दिंमत राजश्री यशवंतराव पवार मुकाम कविठे कृतानेक सा० नमस्कार विनंति. येथील कुशल स्वामींचे कृपावलोकनेंकरून भाद्रपद वद्य चतुर्थी यथास्थित असों. यानंतर स्वामींचें कर्ज रा० यशवंतराव पवार यांजकडे आहे. त्यांचें पत्र आह्मांस आलें कीं, आह्मी दूरदेशीं छावणीस सवाई[1] जयसिंगापासीं राहिलों. स्वामींचे कर्जाचा निकाल जाला पाहिजे. कर्जाचें स्मरणही नसेल ह्मणोन कोप होईल. याकरितां नासिकांत एका साहुकाराचें कर्ज काढून आह्मांस पत्र लिहिलें कीं, पैका स्वामींस प्रविष्ट करणें आणि त्यांचें आशीर्वादपत्र आह्मांस पाठवणें. त्यास नासिकप्रांतींहून पैका यावयासी वाटेची धामधूम प्रस्तुत आहे. पैका कैसा येईल हें संकट. दुसरें, साहुकाराचें व्याज चालतें. ये गोष्टीचा विचार पडिला ह्मणून स्वामींस विनंतिपत्र लिहून पाठविलें असे. गतवर्षी वर्तांळा मात्र स्वामींनीं केला होता. त्याप्रमाणें यंदां वर्तांळाच घ्यावयाचें असेल तरी तितकाच साहुकारापासून आणून स्वामींस प्रविष्ट करूं. स्वामी ह्मणतील कीं, अवघा पैका आणवणें. तरी धामधुमेचा निर्गम आठांचवदिवसांचा विचार. यांतून ऐवज आलियावर पाठवून देऊं. आह्मी स्वामींचे चाकर ठेवणाईत. जैसी आज्ञा कराल तैसी वर्तणूक करूं. राजश्री यशवंतराव पवार तुमच्या आशीर्वादें पुष्करावर सवाई यांसी छावणी करून सुखरूप आहेत. ज्या कार्यास गेले होते तें कार्य धोकळसिंग व सवाई जयसिंग यांचा सल्ला जाला. यश आलें. सर्व प्रताप स्वामींच्या आशीर्वादाचा आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

१. सवाई:—सवाई जयसिंग जयपूरकर राजे.

[लेखांक ३४९] श्री.

श्रीमंत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसी:—

चरणरज गोविंद काशी कृतानेक साष्टांग विज्ञापना ता० छ० १५ जिल्कादपावेतों स्वामींचे कृपावलोकनेंकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेष. श्रीमंत राजश्री नाना स्वामींनीं व्याजाबाबत सालमजकूरचे रुपये २००० दोन हजार देविले. उत्तम पारखून, निशाणें घोटून, थैल्या भरून, लाखोटे करून, राणोजी कदम वगैरे माणसें चौकीचे माणसांबरोबर पोतांपैकीं सदर्हु दोन हजार रुपये पाठविले आहेत. घेऊन पावलियाचें उत्तर पाठवायास आज्ञा केली पाहिजे. विदित जाहलें पाहिजे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

पै० छ०[1] १५ जिल्काद सन तिस्सा सलासीन. रुपये २०००.

[लेखांक ३५०] श्री दत्तात्रेय.

श्रीमत् सकलतीर्थरूप महाराज राजश्री परमहंसबावा

स्वामींचे सेवेसी:—

आज्ञाधारक सेवक देवराव मेघःशाम कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति उपरी येथील कुशल ता० चैत्र शुद्ध प्रतिपदा जाणोन स्वकीय लेखन करावयास आज्ञा केली पाहिजे. स्वामी घाटाखालें श्रीच्या दर्शनास गेले. कोणें स्थळीं आहेत हें वर्तमान कळत नाहीं. तरी आशीर्वादपत्रीं विस्तारें लेखन करवून सनाथ केलें पाहिजे. विशेष. यादव सजणाजी प्रभु सबनीस शामलाचे तर्फेनें अंजनवेलीस होते. त्यास अंजनवेल राजश्री तुळाजी आंगरे यांणीं फत्ते केली ते समयीं यांचें वस्त्रहरण जालेमुळें मनुष्यें सुद्धां कैदेंत आले आहेत. ऐसीयास रा० केसोपंत यांणीं रुपये पावणेचारशें खंड करार करून विपत्य मोडिली

१. छ० १५ जिल्काद:—ता० १४ फेब्रुवारी इ० स० १७३९.

आहे. त्यास यादो सजणाजी स्वामींसही विदित आहेत. आणि आमचे विदंडकीं पुरातन आहेत. तरी कृपा करून त्यांची सुटका होय तें केलें पाहिजे. पूर्वी महद्यशें शतशा स्वामींच्या आज्ञेनें जालीं आहेत. तेथें हें काम स्वामींस अगाध आहे ऐसें नाहीं. येविसीं विनंतिपत्र राजश्री जगन्नाथपंत यांणीं लिहिलें आहे. त्यावरून विदित होईल. तरी विनंति उदास केली न पाहिजे. बहुत काय लिहिणें? मशारनिल्हेस कबिलेसुद्धां घाटावरी पाविलें पाहिजे. बहुत काय लिहिणें हे विज्ञापना.

[ लेखांक ३५१ ]        श्री दत्तात्रेय.

तीर्थस्वरूप श्री परमहंस अवतंस श्रीस्वामी स्वामींचे सेवेसी:—

शिष्यांतर्गत देवराव मेघःशाम कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति उपरी येथील कुशल ता० छ० जिल्कादपर्यंत स्वामींच्या कृपालोकनें-करून यथास्थित असे. आशीर्वादपत्र पाठविलें तेथें आज्ञा केली कीं, मौजे राजुरी व मौजे दुधडवाडी हे दोन्ही गांवच्या निर्वेध सनदा राजश्री छत्रपतीकडून करून देणें; बहुत श्रेयस्कर आहे; ह्मणून कित्येक प्रकारें आज्ञा केली. ऐसियासी स्वामींची आज्ञा सेवकांस प्रमाण. शिरसा वंदन करून राजश्री छत्रपतींस विनंति केली. त्यास राजश्री छत्रपति बोलिले कीं, राजश्री पंतप्रधान यांची समजाविसी जाली ह्मणजे सर्व कार्यें होतील. येविसीं कालही सेवेसी लिहिलें आहे. वारंवार राजश्री छत्रपतींस स्मरण करून देत आहों. कोणेविसीं सेवेसी अंतर पडणार नाहीं. बहुत काय लिहिणें हे विज्ञापना.

[ लेखांक ३५२ ]        श्रीभार्गवराम.

श्रीमंत परमहंस स्वामींचे सेवेसी:—

विद्यार्थि देवाजी यशवंतराव व रंगनाथ शिवाजी व सौ० गंगाबाई कृतानेक सा० नमस्कार विनंति उपरी ता० वैशाख शुद्ध ३ पावेतों

समस्त गंगातीरीं करजगावीं सुखरूप असों. आपलें अभयपत्र पिंपरी त्या परवादी [?] यांबराबर आलें तें पाहोन परम आल्हाद झाला. माझाळसाबाईची माय येथें आली होती. त्यास गंगास्नान करून उभयता या प्रांतास आहेत. आपले दर्शनास येतील. तीर्थरूप रा० दिवाजी पंताकडील मनुष्य सांप्रत कोणी घरचे आले नाहीं. गुजरात प्रांतीं उभयता सैन्यें आहेत. चैत्र शुद्ध ६ गुरुवारीं रा० प्रधानपंतासी व सेनापति यांसी युद्ध जालें. सेनापतीकडे अवंदा उदाजी पवार गले होते. त्यास युद्ध जालें. त्रिंबकराऊ दाभाडे व मळोजी पवार युद्धांत कामास आले. आणखी कितेक लोक याकडील जखमी जाले. प्रधानपंताकडील नारायणजी ढमढेरें व आणखी कितेक युद्धांत पडिले. कितेक जखमी जाले. उदाजी पवार व चिमणाजी दामोदर पाडाऊ प्रधानपंताकडे आलें. ऐसें वर्तमान रा० सेनापतीकडील जासूद या मार्गे गेले, त्यांनीं सांगितलें. आणखी कितेक लोकांचीं पत्रें आलीं. परंतु आमचे माणूस अद्यापवर आले नाहीं. रा० आनंदराऊ पवार व शिवाजीपंत स्वामींच्या कृपेंकरून सुखरूप आहेत. थोडियाच दिवसांत कागदपत्र येती, व तेही येती. "खंडोजी रेवा उतरोन दक्षिण तीरास नंदुरबारेकडे आला; व प्रधानपंत रेवा उतरोन अंकलेश्वरावर आले." हें वर्तमान आजि आलें आहे. उभयतां सैन्यें थोडियाच दिवसां या प्रांतांत येती. तीर्थरूपांचे कागदपत्र आलियावर स्वामींकडे मुजरत माणूस पाठवूं. कोणे विषयीं चिंता न कीजे. सदैव पत्र पाठवून बाळकाचा सांभाळ करीत गेलें पाहिजे. कृपालोभ असों दीजे हे विनंति.

[लेखांक ३५३] **श्रीएकनाथ समर्थ.**

श्रीमत् महाराज श्री भार्गवराम बावा स्वामींचे सेवेसीः—

विनंति चरणरज अंताजी नाईक गुंडे कृतानेक सा० नमस्कार विनंति उपरी स्वामीनें तुकोजी पाटील माळशिरसकर रुपये पांच हजार

व गुन्हेगारी हजार बद्दल पाठविले. ऐशास आह्मीं तों स्वामींचीं लेंकरें आहों. सर्व अन्यायी आहों. परंतु आपले समर्थांनीं ह्मणविलें, एकवेळ कृपाळू होऊन आशीर्वाद आह्मांस दिधला, तेथें समर्थांपासून इतराजी कदापि होणार नाहीं. दुसरें, आपले रुपये कांहीं मोबदला करून उदीम करावा ऐसें नाहीं. येथें दंगा मोठा जाला होता. तें सविस्तर वृत्त कळलेंच असेल. सांप्रत अवघें सुरळीत जालें. दिवाळीच्या मुहूर्तें गायकवाड स्वारीस जातात. मातुश्रीही स्वार होऊन त्यामागें येतात. यांचे सोबतीनें रुपये बैलावर घालून, माणसें आपलीं देऊन, रुपये देतों. पावते करितों. वारंवार माणसें पाठवून आह्मांवर इतराजी करून आमचा उपहास करावा ऐसें नाहीं. आपली ठेव रुपये आह्मांजवळ आहे. देतों. आह्मांस जरूर काय आहे? परंतु हुंडी ही येथून होत नाहीं. कदाचित् करावी तरी एक हुंडी फिरून आली; आपण शब्द लाविला; यास्तव भयभीत आहों. सारांश, ऐवज उमाबाई पदरीं घेतील तरी त्यांचे (पदरीं) घालूं. अगर न घेत तरी आह्मी पावते करूं. अंतर कदापि होणार नाहीं. आणि उगीच माणसें आपण पाठवितात. तीं कांहीं पदरीं रुपये घेत नाहींत. यास आह्मीं काय करावें? दुसरें गुन्हेगारीची गोष्ट आपण लिहिली तरी सर्व अन्यायी आहों. आज्ञा कराल तें प्रमाण आहे. हे विज्ञापना.

[ लेखांक ३५४ ] श्री.

श्रीमत् सर्व तीर्थस्वरूप परमहंसबावा स्वामींचे सेवेसी:—

अपत्ये चरणरज नारो विठ्ठल प्रभु कृतानेक विज्ञापना. येथील वर्तमान ता० चैत्र शुद्ध नवमी पर्यंत मु॥ उंम्रेड येथें स्वामींच्या कृपादृष्टीकरून सुखरूप असों विशेष. स्वामींनीं पत्र पाठविलें होतें व रुद्राजीपंतांनींही कितेक विचार सांगितला. त्याजवरून माणूस न पाठविलें.

त्यास राजश्री दमाजी गायकवाड हे सोनगडास आलेयावर माहे ज्येष्ठमासीं माणसें पाठवावीं. हुजरोन महाराजास राजश्री यशवंतराव व राजश्री जिऊबा चिटनवीस यांणीं फिरोन रदबदली केली. महाराजांनीं मान्य केलें कीं जैसे श्री बावा ह्मणतील तैसे कागदपत्र हातरोखे देणें. परंतु गायकवाड याचें आपणास बरें करणें जरूर आहे. दाभाडी तापीतीरास होती. त्याणें कदमासीं घसघस लाविली होती. त्यास कंठाजी कदम आपले फौजेनिशीं राजश्री चिमाजी आपा बरोबर गेले. तेही दाभाडियाच्या पदरींहून गेले, आणि दाभाडे कोणीही दरबारीं येत नाहींत. शेवट लागेल तो पहावा. त्यास आपण तो सर्वप्रकारें आज्ञांकित असों. यानंतर हबशी याकडील येथें वकील आला आहे. त्यास आपण राजश्री यशवंतराव व राजश्री जिऊबा यांस वर्तमान सविस्तर श्री भार्गव चिपळूणचें सांगितलें. त्याजवर उभयतांनीं कबूल केलें कीं, जैसी बावा आज्ञा करितील त्याजप्रमाणें हबशी यास कागदपत्र पाठवून कौल करार राजपुरीहून आणवितों. अंजनवेलीकर व गोवळकोटकर यांसही ताकीद जैसी पाहिजे तैसी करितों. तसें हबशी याकडील वकिलांनीं (वकिलास?) सर्व उभयतांनीं क्रियापुरस्सर त्यास सांगितलें. त्याणें मान्य केलें. त्यास हें वर्तमान स्वामींच्या सेवेसी कळावें ह्मणून लिहिलें असे. त्यास जर कांहीं स्वामी आज्ञा करितील तर त्यास येऊन निरोप जाहलियावर समागमें माणूस देऊन स्वामीकडे पाठवून देऊं. नाहींतर आपणास आज्ञा होईल तर आपण त्यास घेऊन सेवेसी येऊं. तमाम चिपळोण तर्फेस कौल दिल्हा. याजकरितां सविस्तर अर्थ सेवेसी लिहिला. जैसी स्वामी आज्ञा करितील त्याजप्रमाणें वर्तणूक केली जाईल. बहुत काय लिहिणें हे विज्ञापना.

[ लेखांक ३५५ ] **श्री.**

तीर्थसमदर्शन श्रीमत् परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

अपत्यें चरणरज कृष्णाजी नरहरी दोनी कर जोडून चरणावरीं

मस्तक ठेवून साष्टांग नमस्कार विज्ञापना ऐसीजे:—स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें पावोन सनाथ जाहलों. तेथें आज्ञा केली कीं, आह्मांस खालें न्यावयाचे चित्तांत असेल तर, पेढें, आंबडस, नाइसी, कळंबुसी, धामणी, सोनगांव एकूण सा गांवच्या सनदा आणवून पाठवून देणें, ह्मणून आज्ञा केली. ऐसियासी चरणरज स्वामींचे चरणाजवळ आलों होतों तेव्हां, "पुरातन खानाचे कारकीर्दीस चार गांव इनाम चालत होते त्या गांवच्या ताज्या सनदा हुजूरच्या आणून पाठवणें; मग हे सुभेदार खुद्द दौलत करूं लागतील तेव्हां दुसरें इनाम गांव देतील तें देऊत" ह्मणून आज्ञा केली. त्याप्रमाणें आह्मीं आजम सिद्दी याकूत सुभेदार यांस पत्र लिहून स्वामींचें त्यांस पत्र होतें तें देखील त्याकडे रवाना केलें असे. त्याप्रमाणें चार गांवच्या ताज्या सनदा येतीलच. हल्लीं धामणी सोनगांव दोन गांव नवे इनाम करून देणार, तरी स्वामींहून हबशी यांस दोन गांवची हिशाब बहुतसी आहे ऐसें नाहीं. तेही गांव सिद्दी याकूतच करून देतील. हल्लीं स्वामींचें पत्र आलें हेंच बजिन्नस त्यांकडे रवाना करून दोनी गांवचें इनाम सनदांविशीं लिहितों. कोंकणचें ऊर्जित होय ऐसा स्वामींनीं आशीर्वाद दिल्हा पाहिजे. स्वामींचा पूर्ण आशीर्वाद जाहलियानें तो भार्गवच आपलें राष्ट्र मामुरी (?) करील. सेवकही खालें गेलियास नवे दोन गांवचे विसीं सिद्दी याकूत सुभेदार यांजवळ बोलावयाचें तैसें बोलोन, स्वामींचे पूर्ण आशीर्वादेंकरून धामणी सोनगांवही इनाम होतील. विदित जाहलें पाहिजे. हे विज्ञापना.

[लेखांक ३५६] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसी:—

चरणरज बापुजी गणेश सा० नमस्कार विनंति येथील वर्तमान ता० १२ सवालपर्यंत यथास्थित असे विशेष. स्वामींहीं महादजी हरकारे

याजबराबर आज्ञापत्र पाठविलें तें पावलें. मातुश्री लक्ष्मीबाईचें पत्र पाठविलें तेंही वाचून पाहिलें. तें फिराऊन मागें पाठविलें असे. त्यांहीं अतिशयें स्वामींचा आहे ऐसें लिहिलें आहे. स्वामी आपल्या यत्नास कांहीं चुकत नाहीं. आमची पुण्यसामग्री थोडकी, तेथें उपाय काय आहे? "जे गोष्टीनें मोती फुटे ती गोष्ट कार्याची आहे ऐसी नाहीं. त्यांहीं अतिशयें त्यासी ल्याहावें ऐसें नाहीं. इतल्ला करावा तो गौरवें करून करावा. राजा आहे तो कष्टी करूं नये. ईश्वर बरें ह्मणत नाहीं. दुराग्रह करून गोष्ट सिद्धीस गेली तर बरें. नाहींतर गोष्ट कठीण आहे. राग मनांत धरून पक्का ध्यानास होऊं शके." पत्र वाचून पाहतां कोठील गोष्ट कोठें लागत्ये ऐसें वर्तमान आहे. स्वामींस मीं पामरानें ल्याहावें ऐसें नाहीं. आपल्या चित्तास येऊन रहस्य राहोन कार्य जाहलें तर करावें. नाहींतर दुराग्रह करूं नये. स्वामी समर्थ आहेत. सेवेसी श्रुत होय. श्रीमंत राजश्री पंतप्रधान यांस राजश्री स्वामींचें पत्र बोलावणें काल प्रहरा दिवसास येथून रवाना जाहलें आहे. आधीं पत्र न वाचणें, घोड्यावर बसावें मग पत्र वाचावें. ऐसींच पत्रें गेलीं आहेत. तेही लवकरच सातान्यास यावें ऐसें आहे. स्वामींस कळावें ह्मणून सेवेसी लिहिलें आहे: सोयरिकीचे विसीं स्वामींस विनंति लिहिली आहे. तेथें स्वामींनीं पर्यायें लिहिलें तर स्वामींनीं सर्वस्वें माझा अंगीकार केला आहे. मायबाप, गणगोत स्वामी ऐसें मनःपूर्वक चित्तांत आणून विनंति लिहिली आहे. आपलें त्याचें संभाषण जाहलें नाहीं. स्वामी ह्मणतील तर याउपर पत्र पाठवूं. अद्यापि आपण लिहिलें नाहीं. बोलीचाली रुबरु जाहली नाहीं. ऐसें वर्तमान आहे. स्वामींच्या चित्तास येईल ती आज्ञा करावी. स्वामी आपणावर दया करूं लागले त्याजपासून हब (सर्व?) लोक बरें ह्मणों लागले. ऐसें मनःपूर्वक दिसोन येतें. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक ३५७] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसी:—

चरणरज बापुजी गणेश चरणावर मस्तक ठेवून शिरसाष्टांग नमस्कार विनंति. येथील वर्तमान स्वामींचे आशीर्वादेंकरून पौष्य[1] वद्य चतुर्दशीपर्यंत स्वामींचे कृपेंकरून यथास्थित असे विशेष. राजश्री बाबुराव मल्हार यांहीं स्वामींच्या द्रव्याच्या हुंड्या अवरंगाबादेहून सातारच्या सावकारांवर करून पाठविल्या आहेत. येणेंप्रमाणें रुपये:—

५०० माणकोबा नाईक पाठक.
२६०० त्रिकमशेट गुजर राजापूरकर.
१९०० नारोबा नाईक अनगळ हुंड्या दोन.

५०००

एकूण पांच हजारांच्या आल्या आहेत. आजपासून रुपये नववे दिवशीं त्याजपासून खरें करून पेठचालीचे घ्यावे. तर स्वामीनें कृपा करून खत काढून खताचा हिशेब व्याजाचा करून, गोविंदपंतास नाहीं तर हरकोणास पाठविलें पाहिजे. व्याजाचे रुपये होतील ते हिशेब करून वारून देऊं. पुढें स्वामींचे रुपये वृद्धीस लावणें. तर त्या गोष्टीची फिकीर थोडकीच आहे. पुढें हंगाम येईल तेव्हां स्वामींस विनंति करूं. परंतु पैका आला तो घ्यावा. ही गोष्ट उत्तम आहे. स्वामींचें पत्र राजश्री बाबूराव यांस पाठविलें होतें. परंतु त्यांच्या हुंड्या अर्धींच अवरंगाबादेच्या आल्या. त्यांहीं स्वामींस विनंति लिहिली आहे. तेही पुढें कांहीं स्वामींच्या पायाशीं चुकतील ऐसें नाहीं. परंतु आला पैका तो घ्यावा ही गोष्ट उत्तम आहे. स्वामीनें हिशेब करून व्याज ठरावून खत पाठविलें पाहिजे. सेवेसी श्रुत होणें. शके १६५३ हे विज्ञापना.

---

१ पौष्य वद्य चतुर्दशी:–ता. १५ जानेवारी इ. स. १७३२ रोज शनिवार.

[लेखांक ३५८] श्री.

श्रीमत् महाराज राजश्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

चरणरज बापुजी गणेश चरणावर मस्तक ठेवून शिर सा० नमस्कार विनंति. येथील वर्तमान ता० छ० ४ जिल्हेजपर्यंत वर्तमान श्रीमंत राजश्री दादा यांजकडील वर्तमान हर्षाचें आलें तें राणोजी चव्हाण याजबरोबर पाठविलें. सा घटका रात्रीस राजश्री दादोबा कांगोरीस गेले आहेत. राजश्री प्रतिनिधींचें त्यांहीं लिहिलें आहे कीं सुलतान ढवा करून जंजिरा राजश्री प्रधानपंतीं शिड्या लावून लगट करून घेतला. ऐसें राजश्री स्वामींस लिहिलें आहे. शंभर हबशी मारिले. एकास बेडी घातली आहे. एक ठाणपेयानें उभयतांहीं मारिला ऐसें वर्तमान आलें आहे. राजश्री राऊ यांचें पत्र आलें नाहीं. येईल तेव्हां खरें ऐसें ह्मणतात. स्वामींचे आशीर्वादेंकरून कार्य जाहलें. तर स्वामींचा प्रताप थोर आहे. जासूद येणार आहे. तर आले ह्मणजे हर्षाचें वर्तमान पाठवितों. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक ३५९] श्री.

श्री सकल तीर्थस्वरूप बावा स्वामींचे सेवेसीः—

चरणरज जिवबानें[१] दोनी कर जोडून चरणावरी मस्तक ठेवून शिरसा० नमस्कार विज्ञापना ऐसीजेः—स्वामींची आज्ञा कीं, तंबाकू पाठवणें. आज्ञेवरून तंबाकू ठकबंदी शेर मण चाळीस शेरी प्रमाणें वजन ‹३॥४ साडेतीन मण चार शेर सेवेसी पाठविली आहे. वरकड लष्करचें वर्तमान तरी रा० बाजीराव प्रधान नर्मदा बावापिराच्या घांटें उतरोन अलीकडे आले. त्यांचे मागें दाभाडे यांच्या फौजा आहेत व पुढें यांच्या सा गांवच्या अंतऱ्यानें किलीजखान व बंगस आहेत. यांचा त्यांचा हर्षामर्ष होणार आहे. उदाजी पवार व चिमणाजी दामोदर

१ जिवबा खासनीसः—पेशव्यांच्या खाजगींतील नौकर.

या उभयतांस वस्त्रें व हत्ती दोघांस दोन देऊन सोडिलें. हें वर्तमान रा० बाजीराव प्रधान यांचे कागद महाराजास जेजुरीचे मुक्कामीं आले व रा० बापुजीपंत नाना यांणीं सांगितलें, त्यावरून सेवेसी लिहिलें आहे. यानंतर वाडियाचीं लांकडें आलीं. येणेंप्रमाणें:—१८ खांडे, १७ खांब, १८ पाटस यास ओंडे. एकूण त्रेपन्न लांकडें आलीं. शेवेसी श्रुत होय. रा० नानाकडील कागदलाखोटा व करंजगांवाहून लाखोटा ऐसे दोन लाखोटे सेवेसी रवाना केले आहेत. घराचें काम चालीस लाविलें आहे. घर कवलार बांधतो... राणोजी चौगुला मृत्यु पावला. सेवेसी कळलें पाहिजे हे विज्ञापना.

[ लेखांक ३६० ] **श्रीभार्गवराम.**

श्रीमत् भृगुनंदनस्वरूप तपोनिधि महाराज

श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसी:—

सेवेसी चरणरज राघो बल्लाळ चरणावरी मस्तक ठेऊन शिर सा० नमस्कार विनंति. येथील कुशल फाल्गुन वद्य ५ पर्यंत स्वामींचे आशीर्वादें बऱ्हाणपूर शहादाडा येथें सुखरूप असों विशेष. स्वामींनीं कृपा करून तुकोजी जासुदासमागमें आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन आनंद पावलों. राजकी प्रसंगामुळें बहुतशी काळजी प्राप्त जाहली होती. परंतु स्वामींच्या आशीर्वादें श्रीमंत राजश्री नाना पंत प्रधान यांचा सवाई नक्ष जाहला. तेणेंकडून सर्व संकट निवारण जाहलें. सर्व प्रताप स्वामींच्या आशीर्वादाचा असे. कोणेंविशीं चरणरजास चिंता वाटत नाहीं. श्रुत होय. यानंतर स्वामींनीं जिनसाविशीं आज्ञा केली, त्यास यंदा कापडाची जात सवाईनें महर्ग आहे. तशांहीमध्यें चौकशीनें जिन्नस घेऊन पाठविला असे. त्याची यादी अलाहिदा तपशीलवार असे. त्यावरून विदित होईल. शालांचे विषयीं स्वामींनीं मजला दोन तीन वेळां निरवण केलीच होती जे, सात हाती शाला हातास यतें-

करून येतील तरी तलास करून घेऊन पाठवणें. त्यास मी आलिया-
पासून बहुत यत्न केला. परंतु सात हाती शाला मिळत नाहीं. दिल्ली-
कडून यंदा एवढें लष्कर आलें, परंतु शालांचा जिन्नस अणुमात्र आला
नाहीं. दिल्ली मात्र नांव राहिलें आहे. सावकार अगदीं बुडाला.
यानेंकडून एक अगर जोडी शाल मिळतील तरी पाठवावयास अनमान
मी करीत असेन, तरी स्वामींच्या पायाची शपत असे. धुवट शाला
मिळतात. त्याही पांच साडेपांच हाती. कोरा माल अगदीं नाहीं. सेवेसी
श्रुत व्हावें ह्मणून लिहिलें असें. वरकड कितेक वृत्त विनंतिपत्रीं लिहिलें
आहे. त्याप्रमाणें चरणरजावरी कृपाळू होऊन लोभाची वृद्धि करणार
स्वामी समर्थ असेत. हे विज्ञापना.

[ लेखांक ३६१ ] **भार्गवराम.**

श्रीमत् भृगुनंदनस्वरूप तपोनिधि महाराज

श्री परमहंसबावा स्वामी स्वामींचे सेवेसीः—

सेवेसी चरणरज राघो बल्लाळ चरणावरी मस्तक ठेवून शिर सा०
नमस्कार विनंति. येथील कुशल आषाढ शुद्ध ६ पर्यंत स्वामींचे आ-
शीर्वादें शहादाडा यास सुखरूप असे विशेष. स्वामींनीं सावजी जासूद
याजबराबर आशीर्वादपत्रें पाठविलीं तीं मजला आषाढ शुद्ध प्रतिपदेस
पावोन बहुत समाधान जाहलें. जासुदास बरें वाटत नव्हतें ह्मणोन
आपले घरीं पडोन दोन महिने राहिला होता. यास्तव पत्रें पावलीं
नव्हतीं. हल्लीं पत्रामध्यें आज्ञा जे, एक शूद्री मागें बक्षीस केली आहे
पाठविली. सईचे माथां रुपये ठेविले आहेत हे पाठवून देणें. न
पाठविलेस तर कोप होईल ह्मणोन रागेरोन लिहिलें. तरी शूद्री
सरकारांत राहत होती. तिजला ठेविली असती आणि एक वर्ष अधीच
मुशाहिरा देणें. निमें मुशाहिरा नजर कां हे तरी स्वामींची आज्ञा

कबूल आहे. चवदा पंधरा वर्षें अन्नवस्त्र स्वामी देतात. स्वामींचें देणें संतत संपत जीवनमाफक परिपूर्ण आहे. ज्येष्ठ मास निघतांच मी दर्शनास येणार होतों. त्यास सावजी आला नव्हता सबब राहिलों. आतां अखेर जाहलें. दिवाणचा हिशेब विल्हेस लाविला पाहिजे. श्रीमंत राजश्री पंतप्रधान फौजसहवर्तमान सिरोंजेसमान आले. लष्कर येथें येईल तेव्हां येथें मोकासियाची कांहीं कटकट आहे. त्याकरितां त्यांचें दर्शन घ्यावें लागतें. यानिमित्य राहिलों. पुढें श्रावणमासीं पाऊस हळू असिला तर चतुर्दशीस मी येईन. आणि पाऊस फार असिला तरी येणें न होय.

[लेखांक ३६२] श्री भवानीप्रसन्न.

श्रीसकलतीर्थस्वरूप राजश्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

अपत्यें यमाजीनें चरणावरी मस्तक ठेवून साष्टांग नमस्कार विनंति. ता० वैशाख शुद्ध पंचमीपर्यंत स्वामींच्या आशीर्वादेंकरून येथील वर्तमान यथास्थित असे विशेष. वेदमूर्ति सदाशिवभट अग्निहोत्री यांणीं स्वामींचें आशीर्वादपत्र दिल्हें तें प्रविष्ट होऊन परम समाधान जालें. मौजे अनेवाडी ता० कुडाळ व मौजे धावडशी ता० परळी या दो गांवींचा वसूल दिवाणांत घेतला ह्मणून स्वामींनीं लिहिलें. ऐसियास तेथील वसूल राजश्री स्वामींनीं घेतला ते समयीं आह्मी प्रसंगीं नव्हतों. जरी असतों तरी ऐसी गोष्टी होऊन सहसा न येती. याउपरी कांहीं त्या गांवास (उपसर्ग) लागों देत नाहीं. वसूल घेतला आहे तोही पुढें प्रसंगानुसार उगवावयाच्या यत्नास सहसा चुकणार नाहीं. हे विज्ञापना.

[लेखांक ३६३] श्री.

सकल तीर्थस्वरूप राजश्री बावा स्वामींचे सेवेसीः—

अपत्यसमान यमाजी शिवदेव कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना

विशेष. छ ९ जिल्काद पावेतों आपले आशीर्वादेंकरून वर्तमान यथा-स्थित असे विशेष. कसबे चिपळोन येथें ठाणें कारकून पाठविले आहेत व पेशजी शामलास मुलुखाविसीं लिहिणें तें लेहून करार होणें तो जाहला. ऐसियास कसबे मजकूरची वस्ती जाहली पाहिजे. याकरितां कृष्ण शेटीस व निळोपंत पतकी यांसी येथें आणिलें होतें. परंतु स्वामींचे कोणी परशरामीं जाऊन राहिले विना कोणी वतनदार खालते जातात असा अर्थ नाहीं. तरी स्वामींनीं आपणाकडील कोणी कारकून येथें आह्मांकडे पाठवावया आज्ञा करून पाठवून द्यावें. येथें शामलास कागदपत्र लेहून देऊन रवानगी करूं. अक्षय त्रितीयाही समीप आली आहे. श्रीची ऊर्जा होऊन आली ह्मणजे सर्वांचें तेंच कल्याण आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[ लेखांक ३६४ ] श्री.

सेवेसी विज्ञापना स्वामीनें आज्ञापत्र पाठविलें तें पावलें. भांडी जाहली खुशालीची. रेवासचें ठाणें सिद्दी सात याणें घेतलीं होतीं तेथें राजश्री चिमाजी आपा व मानाजी आंगरे गेले. त्यांणीं यास मारून पहिलेयानें घातलें, आणि आराबा देऊन रेवासच्या ठाण्यापासून तीन कोस अलीकडे मुलुकांत येऊन मुलूक मारिला. त्याजवर गलबताची वाट यांहीं रामचंद्र हरी जाऊन धरली. त्यावर हबशी यांचे माणूस जाऊन पांच सात घोडीं मारिलीं. दहा पांच माणूस मारिले. हें वर्तमान राजश्री आपांस कळलें कीं (हबशी) जोरावर आहे. त्याजवरून आपणच गेले व मानाजी आंगरे ऐसे गेले. मग सिद्दी सात याणें आराबांतील हजार माणसानिसीं मोंगल झुंज देतात ऐसें (झुंज) दिलें. त्याचा तपशील येणेंप्रमाणें:—राजश्री आपांचीं पत्रें राजश्री स्वामींस आलीं.

| सिद्दी सात याजकडील | आह्माकडील |
|---|---|
| २ खासा सिद्दी सात व उंदेरीचा किल्लेदार | ६० घोडीं ठार |
| | ७५ जखमी घोडीं |
| ५ घाट गांव को(?)आणखी सरदार | ४०० माणूस पाईचे |
| १३०० माणूस रणास आलें. | मानाजी आंगरे यांचे माणूस रणास आले ४००. |
| | मानाजी आंगरे यास गोळी उरांत आहे. |

येणेंप्रमाणें रण जाहलें ह्मणून राऊत आला. त्याची खुशाली आली. मागाहून तवताम आज उद्यां येणार आहे. आले ह्मणजे पाठवितों. सदर्हु बेरीज लिहिली आहे. येणेंप्रमाणें रणास आले. स्वार आले त्यांसी सोनेंयाचे कडे बारा मोहरांचें दिल्हें. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक ३६५] श्री.

सेवेसी विनंति. कुलाबेयाकडील वर्तमान तरी राजश्री संभाजी आंगरे नव गुराबा व साठ गलबतें ऐसें आरमार घेऊन कुलाबेयाचे बोऱ्यावरी आला. तेव्हां एक गलबत पुढें कुलाबेयास पाठविलें कीं, तीर्थरूपाचें थडं अलिबागेस आहे तेथें दर्शनास येतों. ह्मणून गलबतावरून सांगोन पाठविलें. त्यास मानाजी आंगरे यांहीं उत्तर दिल्हें "या समयीं न येणें. पुढें उदंड दिवस भेट घ्यावयाचे आहेत." ऐसे गलबतास जाब दिल्हे. यावरी गलबत कुलाबेयास येऊं लागलें, तेव्हां मानाजी आंगरे यांहीं कुलाबेयावरून तोफांची मारगिरी गलबतावर केली. तेव्हां पांच माणूस ठार झाले. हें वर्तमान संभाजी आंगरे यांस कळतांच

ते उडीनें (होडीनें ?) अलिबागेस येऊन बैसले. मानाजी आंगरे कुलाबियाहून चालोन जमावानिसीं आले. तेव्हां यांची व त्यांची झटापटी जाहली. मानाजी आंगरे यांजकडील मोड जाहला. दहावीस माणूस मानाजी आंगरे यांजकडील ठार जाहले. तेव्हां मानाजी आंगरे कुलाबेयास गेले. कुलाबेयाचे दर्वाजा देऊन आंतच बैसले आहेत. पाण्याची कुमक इंग्रेजानें केली आहे. गलबतावरून रात्रीचें पाणी पोहोंचवितो ह्मणून कुलाबकरासी ठिकाणा आहे. हिराबुरूज व पाली व सागरगड ऐसे संभाजी आंगरे यांहीं आपलीं निशाणें चढविलीं. जुने लोक सरखेलचे होते त्यांहीं निशाणें घेतलीं. यावरी मानाजी आंगरे यांहीं जुने लोक होते ते कुलाबेयांतून काढून दुसरे जागीं ठेविले आहेत. नवे लोक मात्र कुलाबेयांत आहेत. ऐसें वर्तमान कुलाबेयाकडील आहे, तें सेवेसी लिहिलें आहे. हे विज्ञापना.

[लेखांक ३६६] श्री.

सेवेसी विज्ञापना ऐसीजे. स्वामींचें आशीर्वादपत्र आलें त्यावरून बहुत संतोष जाहला. लिहिलें जें, आपण श्रीचे देवळीं बसल्यानें तुह्मांस काय लाभ ? तुह्मी सरखेलास आमचेविसीं काय निमित्त लिहून भीड खर्चावी ह्मणून आज्ञा. तरी स्वामींचें त्या स्थळीं राहणें जाहल्यानें सर्व राज्यास कल्याण आहे. या कार्यानिमित्त भीडें ऐसें काय ? प्राणही खर्चावयाचा. व विचारें खर्चावा. ऐसें असोन ऐसी गोष्ट त्याणें मान्य केल्यानें त्याचेंहि स्वहितच आहे. हे गोष्ट त्याणें न केल्यानें कोप करून घेतल्यानें शेवट थोडक्याच दिसानें लागेल. या मागें ज्यांणीं आपले चरणासीं अंतर केलें त्यांचे परिणाम च्यार महिन्यांत ईश्वरें ठिकाणीं लाविला. त्याचप्रमाणें याचेंही होणार असलें तरी तैसीच बुद्धि यास घडोन येईल. वरकड त्यास व राजश्री केसोपंतास आह्मीं बहुत प्रकारें लिहिलें आहे. आजीच एक पत्र मुजरद पाठविलें आहे. पेशजी

माणूस पाठविले होते, त्याचा जाब आला तो सेवेसी विदित जाहलाच असेल. पुढेंही जाब येईल तो सेवेसी निवेदन करू. लक्षप्रकारें तो ध्यानावरी येऊन स्वामींच्या पायासी रुजू राहून स्वामींच्या आज्ञेप्रमाणें वर्तणूक करील आणि आशीर्वाद घेईल ऐसें आहे. ऐसें असोन दुर्बुद्धि न सोडी तरी त्याची फलश्रुत पावेल. राजश्री शिवाजी हरी स्वामींच्या दर्शनास घेऊन यावें ह्मणून दोन तीन रोज येतों. परंतु प्रजन्यामुळें कोसावरून भिजोन माघारें आलों. उदईक अगर परवा त्यास घेऊन सेवेसी येतों. वरकड सर्वस्वें आह्मी स्वामींचे पदरीचे स्थापित आहोंत. सर्व वित्त विषय प्राणसुद्धां स्वामींचा आहे. स्वामींच्या चरणाविरहित दुसरें दैवत जाणत नाहीं. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

## स्वामींनीं लिहिलेलीं पत्रें.

[ लेखांक ३६७ ] श्री.

सहस्रायु चिरंजीव महादाजी गोविंद यांस आज्ञा केली ऐसीजे:— तुझ्या बापापासून तूं श्रीचे आशीर्वादाचा. श्रीदया तुजवर. तुझें देवें बरें केलें असतां, आह्मी तुजजवळ देवालया द्रव्य मागतों. याजकरितां तुझे चित्तांत आमचे ठायीं अनिष्ट दिसोन येतें. ऐशास महादोबा, द्रव्यसंचितार्थ मागापासून कोणाजवळ राहिला? पैका ऐसें ठेवणें ठेवावें होतें. या लोकीं कीर्ति, परलोकींचा ठेवा. हे कीर्तीच प्रसूर्य अक्षय तों राहील. तूं सुज्ञ, जाणताच आहेस. आह्मांसही तुझें बरें व्हावें हेंच श्रीपासीं इच्छितों. पिलाजी गायकवाड सांगातें काय घेऊन गेला? तूं दमाजीचे कीर्तिकर. तूं एक कीर्ति तुवां ऐसी केली, भुलोबाचे देवालयास रुपये पंचवीस हजार देविले. त्याणेंकडून दमाजीवर दया होऊन पवार हतवीर्य मोडून टाकिले. तुमच्या राज्यांत सावकारांजवळ किती पैके आहेत? आणि तुह्मी अष्टप्रधान, तुह्मांजवळ

पैका काय आहे? हे बराबर येतील? जसें पवाराचें व आणखी कितेक यशें दमाजीचे पदरीं घातलीं, तैसें हें यश दमाजीचे पदरीं खासखेली सेनापद श्री घालितो. याचें पत्र एकांतीं दमाजीस वाचून दाखवून त्यास होय भरून उत्तर पाठवणें. ह्मणजे हेंही यश तुझ्या पदरीं सामान्य पडतें ऐसें नाहीं. तुझी कीर्ति दिगंतरीं प्रसवेल. दमाजी-वेगळें पत्र दुसऱ्याचे कानीं पाडसील तर तुजला तुझा पिता गोविंदपंत याचें शपत असे. नारोजी पाठविला आहे. याची त्वरेनें रवानगी करणें. अगर दमाजी नसला तर दोन महिने माणसें दमाजीचे भेटीकरितां राहतील. यांचा समाचार घेत जाणें.

[लेखांक ३६८] श्री.

मननिर्मल गंगाजल भक्तराज यमाजी शिवदेव यांस आज्ञा:— तुह्मांस सुभा न्हवता तेव्हां तुझे घरीं राहोन ताकपाणी घेतलें. आह्मांस सुखी केलें. गोविंद रामजी याणें आह्मांस श्रमी केलें होतें. त्यामागें तुजला श्रीनें सुभा दिल्हा आणि तूं आमचा ऐसें असोन, तुझ्या सुभ्यांत आमचे गांवचे रुपये घ्यावे ऐसें नव्हतें. रुपये तुह्मींच घेतले. ते तुह्मी चित्त घालतेंत तरी रुपया कोण घेणार होता? याजउपरी आमचे रुपये सवा तीनशें गेले आहेत. ते उगवून घेऊन फिरोन पाठवून देवास आह्मांस संतोषी करणें. ह्मणजे श्रीदयेनें तुह्मी व तुमचा पुत्र चिरंजीव करील. सर्वकाल कल्याण होईल. याज उपरी आह्मांस कष्टी करणें असेल तर सुखरूप करणें. तुझे माता ते आह्मांस रेणुकेप्रमाणें. आणि देवास आह्मांस कष्टी केलेंस हें उत्तम नाहीं. समयांतरीं कळों येईल. जाणीजे.

[लेखांक ३६९] श्री.

यमाजीस आज्ञा. कोणी कान फुंकून उपदेश करितो. तुझें पुढें बरें होणार. यास्तव अंतरसाक्ष तुझे मस्तकीं श्रीनें हात ठेविला. लोकां-

तरीं कीर्ति जाली जे, तूं ह्मणजे भार्गवशिष्य. मरा मरा ह्मटलें तों राम राम झाला. उपदेशक मंत्र जो तो कांहीं कळत नाहीं. मुख्य भाव आहे तोच कळतो. कांहीं तूं चित्तांत विकल्प आमचे माथां धरितोस याजकरितां विपर्यास होऊन येतो. हें तुझें मन तुज साक्ष देतच असेल. मी बहुतांचा जागली आहें. म्यां जे कांहीं आजिता-गायत··परोपकार केला असेल तो जर खराच असेल, तर आमचा परिणाम बराच होईल. तैसेच कृष्णंभटाची देशमुखी तीन पिढ्या चाललीच आहे. हें अवघ्या पृथ्वीस ठावकें आहे. आणि कृष्णंभट (व) अंतप्रभू सातारा भांडों लागले; तेव्हां कृष्णंभटाची मनसुभी वतन खरेंच जालें. याचे साक्ष श्रीनिवास यास पुसणें. येथून अंतप्रभू कुलाब्यास गेला, आणि सरखेलास बोलिला जे, गोविंद दामाजी व श्रीपतराव यांस लांच देऊन आपलेंसें केलें. त्यावरून कानोजीनें यांस पत्रें करून दिलीं. जर कानडा खरा असता तर नवीं पत्रें करून कशास कानोजी देता? कृष्णंभटास दोन हजार रुपये नागविला. आह्मीं केलें हें सत्यच असिलें तर गोमूत्र घेईन. या राज्यांत राहीन. मग वैकुं-ठवास होईल. नाहीं तर या राज्यांत राहणारच नाहीं. आमचा हातचा हत्ती जेव्हां कानोजीनें नेला तेव्हां कानोजीनें आह्मांस पत्र लिहिलें जें, तुह्मी भेटीस या. कृष्णंभटाची देशमुखी खरीच आहे. त्याचीं पत्रें करून देतों. तेव्हां आह्मी गेलों नाहीं. पुढें तो मृत्यु पावला. पुढें याचे लेंकाचे भेटीस गेलियावर कृष्णंभटास वतनाचीं पत्रें करून देविलीं. असें असोन आमचें वचन कोणी अमान्य करील? भोंसल्याचे राज्यांत त्याचा भोक्ता श्री आहे.

[ लेखांक ३७० ] श्री.

श्रीमत् परमहंस स्वामी यांहीं

सहस्रायु चिरंजीव आण्णास आज्ञा केली ऐसीजेः—तुझ्या पुण्यानें

व राजाच्या पुण्यानें मेरूस तुह्मींच हात लाविला. माझें काय? मी सर्वांचा जागली. मी तुमच्या राज्यांतून जात होतों, कपाळास काठी टेकून, वैतागोन जात होतों; परंतु राजापुढें विलाज नाहीं. हल्लीं धावडशी आलों. खालून कातडी व वानीवस्त येते त्यास तुमचे जकातदार तगादा करितात. त्यास तारळेकर व मला व तहद राजापूर पर्यंत दस्तक देणें जें, बावाचे सुपारी व ताग जे येईल त्यास तगादा न करणें. मना न करणें. त्यास ताकीद करणें जों मेरूचे देऊळ होईल तों एकंदर दस्तक देणें. घास तोंडचा टाकून आधीं दस्तक देणें. न देस तरी तुजला जळाचे आण.

[लेखांक ३७१] श्री.

सहस्रायु चिरंजीव भक्तराजशिरोमणी अण्णा यांसी आज्ञा केली ऐसीजे:—मी वासोटियापासून तुझीं गुरें गाई राखतों आणि तूं टाकशील तर सुखी टाकणें. श्रीचीं वाईटशीं कामें होणें तें जाहलीं. एक मेरुलिंगाचें देऊळ राहिलें आहे. जर तुह्मी शरीर पुष्ट कराल तर तेंही काम होईल. तर मध उत्तम पातळ अगर दाट ऐसा सोमाजीजवळ देणें. मध संग्रहीं एक घागर दोन घागरी असो, जो असेल तो झाडून पातळ व दाट पाटवून देणें. समाधीस सत्वरीच जाऊं. कळलें पाहिजे हे आज्ञा.

[लेखांक ३७२] श्री.

चिरंजीव राघो बल्लाळ मु० शहादाडे शहर बऱ्हाणपूर यांसी आज्ञा केली ऐसीजे:—कासीद याजबरोबर पत्रें पाठविलीं तें छ० २० रविलाखर आषाढ वद्य सप्तमीस पावोन लिहिलें कळों आलें. दोनशा रुपयांची हुंडी पाठविली त्यांत लिहिले जे, केशराबाबत साठ घ्यावे वरकड चौकीपैकीं पावले, ह्मणून लिहिलें; तरी साठ रुपये केसोबा यांणीं पाठविले ते घेतले. अशीं लोकांचीं मुलें आणून आह्मांकडे पाठवावीं हें

तुमचें कोण शहाणपण? अशी वर्तणूक करीत न जाणें. वरकड आपण चतुर्थीस येतों ह्मणून लिहिलें. बरें. तुह्मांस फावेल तर येणें. नाहींतर पत्रें लिहिलीं आहेत तीं पाठवून देणें. जाणीजे.

[ लेखांक ३७३ ] श्रीभार्गवराम.

चिरंजीव सदाशिव व भवानीदास मु० गोंवे यांसी आज्ञा केली ऐसीजे:—तुह्मीं बहुता दिवशीं पत्र पाठविलें ते पावोन लिहिलें वर्तमान कळों आलें. मराठ्यांच्या उपद्रवाकरितां आपला उदीम चालत नाहीं; येणेंजाणें कोणी देत नाहीं; स्वामीनें दोन चार वर्षें परामर्ष केला नाहीं; ह्मणून लिहिलें. तरी तुह्मी माळ पोवळियाची पाठवितों ह्मणून आमचे पायाची क्रिया केलीत, याजकरितां माणसें मागें पाठविलीं होतीं. त्यास माळ न पाठविली. आमचा तुह्मांस कंटाळा आला! याजकरितां आह्मीं तुह्मांकडे माणसें पाठविलीं नाहींत. बाळकृष्ण भुतशेटीचा लेंक याणें पांच सांशें असर्फी आमचे बुडविले, त्याचें आह्मीं काय केलें? तुह्मी तिकडे दुरस्थ. येथून तुमचा समाचार घ्यावयास अनुकूल पडत नाहीं. सातारा पेठ थोर आहे. येथें माल आणि उदीम कराल तर पांचशें पावेतों रुपये भांडवल तुह्मांस देऊन हरएकविसीं चालवूं. चित्तास येईल तर येणें. यामागें तुह्मीं शाल आह्मांस चित्तायोग्य पाठविली व वस्त्रें चित्तायोग्य पाठविलींत. पैका तों तुमचा आह्मीं देखलाच नाहीं. तुमचे तुह्मांस कामास येईल!

[ लेखांक ३७४ ] श्री.

चिरंजीव भक्तराज बकाजीस आज्ञा ऐसीजे:—थोरले सरखेल, धाकटे सरखेल कैलासवासी जाले. या मागें कर्ता तूं आहेस. तुह्मी गोवळकोटचे मसलतेस आलेंत ह्मणून ऐकिलें. तुह्मीं तों लिहिलें नाहीं. ऐशास मागें पुढें पाहून आपणास रक्षून शत्रूवर जाणें. आतां आह्मी तों तुह्मांजवळ कांहीं मागत नाहीं. मागें सुवर्णदुर्गीं कोण कारभारी

असेल त्यासी फळ पाठवणें. तुमचे जपणीस मागें पुढें दादोबा देसाई लागला आहे. बहुत सावधपणें त्याचें दमन करणें.

[ लेखांक ३७५ ] श्री.

दिलपाक दिलदर्या इलाही मेहरबान सिद्दी सैद सुभेदार प्रांत दाभोळ व राजापूर उमर ताजा व दौलतज्यादा हूं.

अजीद्वागोय द्वाअंकीं येथील खैरसल्ला जाणून आपला खैरसल्ला हमेशा कलमीं करावया फर्मावीत असिलें पाहिजे. दिगर मोहिबी मेहेरचे नजर फकिरावर धरून किताबती पाठविली, ते खुशवक्तीं पोंहचोन दिल आराम झालें. कलमीं केलें जे, चंदरोज मोहिबाकडील कागदपत्र येऊन खैरसल्ला मालूम होत नाहीं. मोहिबास दोस्तीचे जागां वाजिब जसे पेशजी भिस्त, जसी सिद्दी साद सुभेदार हे असतां त्यांची व मोहिबाची दोस्ती चालत होती, त्याहून ईजानेबाची व मोहिबाची दोस्ती ज्यादा चालावी हें ईजानेब चाहत असों. "अलीकडे धामधुमीचे सबबेनें मोहिबीं आपला कदीम तकिया सोडून उपर घाटावर जाऊन नवाच तकिया बनाविला आहे. अम्मा मोहिबासारखे बना खुदाई लोक आहेत त्यांहीं आपला कदीम तकिया सोडून जावें ऐसें काय होतें? दुतर्फाकडूनही मोहिबास चाहतच होते. येथें धामधूम जाहली ह्मणून मोहिबीं आपला तकिया उजाड पाडून जावें ऐसें नव्हतें. लेकिन दुनिया इचंइनसानाचा तरीका मोहिबी दिलांत आणून अमलांत आणिलें तरी इलाहीचे कुदरत माफीक होत असे, त्यास इलाज काय असे? हल्लीं सुदामतमोजीब मोहिबीं नीचे येऊन आपले तकियास बैसावया बाबेदोस्तीचे तरकियानें अजम पंडित प्रतिनिधि व अजम यमाजी पंडित यांहीं ईजानेबास कलमी केलें व अजम विनायक जोशी व कृष्णशेट शेट्ये यांहीं मालूम केलें त्यावरून ईजानेबास खुशवक्ती हासील होऊ ईजानेबा हुजूर गेलों होतों. तेवक्तीं हरबंदगी मोहिबाचे खिजमयेत मालूमांत

करून हुजूरचे निविस्तें मोहिबास पाठविले आहेत. त्यावरून व ईजानेबाचे तर्फेनें दोहीज्यादा दोस्तीचे सक्त हरदु मशारनिल्हे मुजबानीं बोलतील. त्यावरून मालूम होऊन येईल. मोहिबा नीचे आलियानें सबबतेनें खैर आहे व मोहिबाचे तकियांत दिवाबत्ती लागेल. असें समजोन मोहिबास दोस्तीचे हकानें कलमीं केलें असे. हमतालाचे करमेनें ईजानेबाचें खांवदाकडून मोहिबाचें अव्वलच्या बमोजीब जियादा चालेल. कोणएक बातेनें जे ईजानेबाची व मोहिबाची जुदाही आहे ऐसें नसे. हेच वजा मोहिबीं दिलांत समजोन मोहिबाची व ईजानेबाची मुलाजमत अनकरीबच होऊन येई तें केलें पाहिजेच" ह्मणून कलमीं केलें तें मालूम जाहलें. किताबत पोहोंचोन खुष जालों. आपले लिहिल्यावरून आपण दिलांतून चालवितील हा भरंवसा दिसोन आला. ऐशास खालीं यावें तर गैर हंगाम आहे व आह्मीं ज्याची बंदगी करितों त्याचा हुकूम जालियावरी डोईचे वाटेनें येऊन आपले ठिकाणीं राहूं. मालूम जालें पाहिजे. ज्यादा काय लिहिणें? प्यार मोहबत मेहेरचे बहुततऱ्हा बहुत फकिरावर धरून चालविलें पाहिजे. हे किताबती.

---

# परिशिष्ट १.

# श्री ब्रह्मेंद्रचरित्र.

## अध्याय पहिला.

### आर्या.

गणपति धीपति मंगलमूर्ति विनायक गुणेश यद्वदनीं ॥
स्थिरते नामामृत हें पाहूं न शकेहि काल तत्सदनीं ॥ १ ॥

---

१ हें आर्याबद्ध चरित्र धावडशी येथील रा. रा. दिनकर महादेव तांबे ह्यांच्या दप्तरांत सांपडलें. 'श्री ब्रह्मेंद्रस्वामींचें कवितात्मक चरित्र' यापेक्षां प्रस्तुत काव्यास कोणतेंही महत्त्व नाहीं. काव्येतिहाससंग्रहकारांनीं छापलेल्या श्रीस्वामींच्या बखरीवरून हें तयार केल्याचें दिसतें. यांत दिलेली हकीकत फारच संक्षिप्त व त्रोटक असल्यामुळें, यांतील बरींच स्थळें दुर्बोध झालीं आहेत. श्री ब्रह्मेंद्र-स्वामींच्या बखरीशीं चांगला परिचय असल्यास हा ग्रंथ अवघड वाटणार नाहीं. टीपा देतांना ज्या स्थळांचा बोध बखरीवरून सहज होऊं शकतो त्या स्थळांचा विचार केला नाहीं. त्या फक्त कठिण शब्दार्थांची फोड करण्याकरितां दिल्या आहेत. पहिल्या प्रकारचा प्रयत्न केला असता तर, बहुतेक बखरच उतरून घ्यावी लागली असती! हें काव्य भालचंद्र बाळदीक्षित अयाचित या नांवाच्या गृहस्थानें रचिलें आहे असें प्रत्येक अध्यायाच्या शेवटीं असलेल्या उल्लेखावरून दिसतें. हा कोणी तरी धावडशी संस्थानाच्या आश्रितवर्गापैकीं असावा, असें त्याच्या भाषाशैलीवरून आढळून येतें. आह्मांस उपलब्ध झालेली प्रत इ० स० १८२७ च्या पोर्तुगाली कागदावर लिहिलेली आहे. हिचा लेखक कोणी व्यंकटेश नांवाचा होता असा शेवटीं उल्लेख आहे. भालचंद्र हा फार विद्वान् असेल असें वाटत नाहीं. जागोजाग यानें अशुद्ध मराठी व संस्कृत रूपांचे प्रयोग केले असल्याचें दिसून येतें. हें चरित्र नक्की केव्हां लिहिलें गेलें हें

आहे वऱ्हाड देशीं लघुशी नामें प्रसिद्ध दुधवाडी ॥
[1]मनसा हरिला तेथें नानान्नें विप्र सिद्ध दुध वाडी ॥ २ ॥
तदुदरिं बहु सुकृतानें आला गणपांश लोक ताराया ॥
मीही तद्यश भावें गातों संसारदुःख हाराया ॥ ३ ॥
भिक्षाद्रव्यें केलें तातें त्या सूनुचेंहि उपनयन ॥
दावी सुपथ जनीं तो; अक्षर वृद्धास जेविं उपनयन ॥ ४ ॥
[2]पृथ्वीदेव अनंतर अचिर [3]अंकग्रस्त पावला मरण ॥
सुतही उत्तरविधि करि तत्स्वांतहि बहु विनायकस्मरण ॥ ५ ॥
[4]लग्नार्थ ये पुढें तो दुर्घट पटहीन तप करायाला ॥
गणनाथ-राजुरी या श्वशुरगृहीं भक्तितें वरायाला ॥ ६ ॥
मुक्त करी सर्व जनां गणपपुरी राजुरी जिला नांव ॥
तरती जन भव-सिंधुहि करुनी तेथें सुभक्तिची [5]नाव ॥ ७ ॥
ऐसी विमलपुरी ती देखुनि तन्मन रमे [6]विकटचरणीं ॥
दासारिष्ट हराया वाटे जैसा मला [7]तमा तरणी ॥ ८ ॥

---

सांगतां येणें कठीण आहे. तथापि, हें १८२७ च्या पूर्वींचें नाहीं; त्याप्रमाणेंच हें १८५० च्या नंतरचें नसावें. त्याअर्थी तें इ० स०१८२७ व इ० स० १८५० ह्यांच्या दरम्यान लिहिलें असावें असें मानण्यास हरकत नाहीं. हें काव्य भाविकजनांनीं वाचण्यालायक अशा मराठी कवितेच्या वर्गांत मोडत असल्यामुळें योग्य सुधारणा करून पुरवणीरूपानें येथें जोडिलें आहे.

१ तेथें श्रीब्रह्मेंद्रस्वामींचा पिता जो विप्र तो, मानसिकच, नानाप्रकारचीं अन्नें व दुग्ध हरीला वाढी, ह्मणजे दारिद्र्यामुळें मानसिकोपचारांनीं पूजा करीत असे. २ ब्राह्मण=स्वामींचा पिता. ३ रोगग्रस्त. ४ या साहाव्या आर्येचा अर्थ असा कीं, मुंज झाल्यानंतर लग्न व्हावयाचें, त्याप्रमाणें स्वामींनीं तपश्चर्येशीं विवाह करावयाचा—तप करणें हाच आपला निश्चय—असा विचार कायम करून स्वामी गणपतीचें स्थान राजुरी या गांवीं, त्यास श्वशुरगृह समजूनच कीं काय, येते झाले. ५ नौका. ६ गणेशचरणीं. ७ अंधकार हरायाला जसा सूर्य तसा.

वर्षीं वर्षीं वाहुनि दुर्वांची धीपतीस लाखोली ॥
भक्तिबळें देवकृपें जेणें अविधर्म[1] लोटिला खोली ॥ ९ ॥
श्रावणिंची आद्यतिथी येतां प्रारंभ करिति एकांता ॥
निगम-त्रिदिवस[2] विरचुनि नमुनी रम्या समाधि धीकांता ॥ १० ॥
वदती जीस गणेशा पुण्यचतुर्थी दिनींच बाहेर ॥
येउनि पूजुनि गणपा ह्मणती दीनाकडेस बा हेर[3] ॥ ११ ॥
पार्थिव गणेश शंभु स्वकरें करुनी तयांसि पूजावें ॥
अर्पुनि दूर्वा शमिपति सुमनें शमि धेनु[4]दुग्ध पाजावें ॥ १२ ॥
एक पदीं तिष्ठावें ब्राह्मीं[5] संकष्टहा[6] चतुर्थीला ॥
इंदू-उदया येतां पूजुनि, तो हेम[7] घे त्यजी कथिला ॥ १३ ॥
अन्नासि न सेवावें कांहिं मिळाल्या फळासि भक्षावें ॥
प्राशुनि गोमुत्रातें तिर्क्त[8] गिळावें स्वधर्म रक्षावें ॥ १४ ॥
यापरिस भक्ति केलें घोर तपाचरण वत्सरें चवदा ॥
सांगे गणेश तेव्हां दूतांसी मजसमान हाच वदा ॥ १५ ॥
होउनि सकृप अनंतर देवें दर्शन दिलें स्वदासास ॥
ठेवुनि ह्मणे शिरीं कर होशिल मत मम सुलोकवासास ॥ १६ ॥
पावसि वांछिसि जें जें झालासी पूर्ण योगिराज महा ॥
आतां निग्रहतप हें न करीं, सोडीच सर्व संभ्रम हा ॥ १७ ॥
एवं प्रवरा देउनि झाला गणराज गुप्त ते समयीं ॥
तोषें गणेशदासें केली वृत्ती जनीं निरासमयी[9] ॥ १८ ॥
आलें एके दिवशीं चित्तीं वाराणशीस जायाचें ॥
होतां याम[10] निघाले पादद्वय नमुनि धुंढिरायाचे ॥ १९ ॥

---

१ अधर्म, पातक. २ निगम=४, त्रि=३, =३४. ३ बापा, पहा. ४ गायीचें. ५ पहांटेस. ६ नाशक. ७ सुवर्ण. ८ कडू, तुरट. ९ आशाया: परमं दु:खं, नैराश्यं परमं सुखं, आणि असक्त: कुरु कर्माणि, संगं त्यक्त्वा सुखी भव. १० प्रहर.

आदौ अष्टविनायक[1] करुनि मयूरेश्वरादि यात्रा ती ॥
वाराणशीस गेले जाणुनि सर्वां जनांस या त्राती ॥ २० ॥
यापरि करोनि तीर्थें मार्गीं आले पुढें प्रयागास ॥
त्रिनदी-संगम जेथें करिती सनकादि विप्र यागास ॥ २१ ॥
सारुनि तेथिल विधि मग आले विश्वेश्वरा नमायास ॥
नम्रपणें ह्मणति तुझ्या सदयत्वा महि पुरे न मायास ॥ २२ ॥
यापरि केशवचरणीं[2] सार्थक करुनि निज मायबापाचें ॥
आले शिवाख्यपुरिसी फिरुनी मदहारि[3] शत्रु पापाचे ॥ २३ ॥
आश्रम चवथा करणें ऐसें चिंतुनि मनींच तो यतिला ॥
बोले, ज्ञानेंद्रा मीं तृष्णेवरि सोडिलेंच तोयतिला[4] ॥ २४ ॥
सदयें ज्ञानेंद्रें मग दिधला चवथा तयासि आश्रम हा ॥
हंसी[5] दीक्षा वरिली जैशी सन्मति बुधें जनीं श्रमहा[6] ॥ २५ ॥
सांगितलें ज्ञानेंद्रें ह्मणतिल 'ब्रह्मेंद्र' लोक तुज नाम ॥
कर्म न सोडीं परि तूं, लाविति वैष्णव जसा उभा नाम ॥ २६ ॥
तेथुनि गुर्वाज्ञेनें जाउनि उत्तर दिशेस केदारा ॥
नाना तीर्थें सेवुनि आले याम्येसि[7] मुक्तिच्या दारा ॥ २७ ॥
कृष्णातटीं वसावें चित्तीं, परि घोर राज्य यवनाचें ॥
जाणुनि अरण्यवासी फिरती, ज्यां[8] त्यज्य सर्व यवनांचें ॥ २८ ॥
भ्रमतां एक नगावरि रम्य गुहाही सुवर्णगांवाच्या[9] ॥
संनिध स-जला देखुनि स्थिरले, ज्याची सुवर्णगां[10] वांचा[11] ॥ २९ ॥
धेनू चारित होता बाळा गोपाळ त्या सदा रानीं ॥
भक्षितसे आनंदें दिधलें जें अन्न त्यास दारांनीं[12] ॥ ३० ॥

---

१ अष्टविनायक हीं स्थानें पुण्याचे आसपास आहेत. २ गयेस विष्णुपदीं पिंड देऊन. ३ पापरूपी शत्रूचा गर्व हरण करणारे. ४ तिलांजली, उदा० संसारावर तिलांजली सोडिली. ५ संन्याश्याच्या हंस, परमहंस, इ० दीक्षा आहेत. ६ श्रमनाशक. ७ याम्या = दक्षिण दिशा. ८ ज्याला यवनाचें सर्व त्यज्य होतें. ९ सोनगांव. १० उत्तम आहेत वर्ण जीचे अशी. ११ वाणी. १२ स्त्रियांनीं.

दैववशें त्या गोपा दर्शन घडतां, शिरासि तच्चरणीं ॥
ठेवी, धन्य ह्मणे मी या चरणां देखिलें सदाचरणी ॥ ३१ ॥
द्यावीं फलमूलादि स्वामींसी नित्य त्याच गोपानें ॥
न त्यजिती कानन तें, गोमुत्रें वा रहाति जलपानें ॥ ३२ ॥
नवल पुढें; गोपालें हरित फलें आणिलीं रसालांचीं[1] ॥
पक्कफलीं यति ह्मणती आहे रसिं रति, न फार सालांचीं ॥ ३३ ॥
गर्ता खणुनी तेथें पुरिलीं तृणसह फलें हिं पिकवाया ॥
जो करि जतन जनातें दाउनि सत्पथ भवाब्धि चुकवाया ॥ ३४ ॥
गेल्यावरि दिन कांहीं गोप ह्मणे झालिं पक्क, उकरावीं ॥
भक्षावीं सर्व फलें, मजवरि सदया कृपा बहु करावी ॥ ३५ ॥
खणितां स्वपंचशाखें[2] स्वामींच्या तंव करासि साप डसे ॥
लागे रक्त गळाया, शोभे मग अंग लाल कापडसें ॥ ३६ ॥
ऐसें देखुनि धेनुप गेला भयभीत[3] शीघ्र गांवास ॥
आला अन्यदिनीं तो जित कीं मृत साधु हें पहायास ॥ ३७ ॥
पाहे तंव तों बसले, करिति जपा, गरल बाधलें नाहीं ॥
नवल कथी सर्वजनां येउनि, हा योगि योग्य नमनाही ॥ ३८ ॥
सद्यश कर्णीं पडतां बाळाजी विश्वनाथ आणि तसा[4], ॥
तेथिल नृपदास कुंणी[5], उभयें नमिला सुरीं बृहस्पतिसा ॥ ३९ ॥
जोडुनि कर मग ह्मणती यावें भिक्षेस आमुच्या गेहा ॥
सदयत्वें पूत अहो देह करा एकवार संगें हा ॥ ४० ॥
मानुनि तद्वाक्यातें आले प्रेक्षावयासि तत्सदन ॥
उभयें भिक्षा करितां पावति यति तोष यन्मनीं मद न ॥ ४१ ॥
प्रार्थी तें साधूतें येथें वस्ती कराजि अठ-वीन[6] ॥
प्रगटपणें राहुनि मग ह्मणती संकटिं गणेश अठवीन ॥ ४२ ॥
अद्भुत लीला करिती बसुनी रंभादलावरी[7] जाती ॥
तरुनी सागर भार्गवरामाची करिति नित्य पूजा ती ॥ ४३ ॥

---

१ अंब्यांचीं. २ आपल्या हातांनीं. ३ भिऊन. ४ त्याप्रमाणें. ५ आबाजी बल्लाळ का० स०. ६ अटविना=निःशंक. ७ केळीचें पान.

रात्रौ यापरि करितां कृत्यें हीं घोर एक मनुजाच्या ॥
पडले दृष्टिस भुलला देखुनि लीलाहि योगिराजाच्या ॥ ४४ ॥
तेणें गांवांमाजी कौतुक सर्वां जनांस साधूचें ॥
कथिलें, मग ते ह्मणती अंशचि कीं हे षडास्यबंधूचे ॥ ४५ ॥
अनुभव घ्याया निघती अवजी बल्लाळ, विश्वनाथज ही ॥
गुप्तत्वें तत्सुकृता वानिति कीर्ती विलोकुनी अजही ॥ ४६ ॥
वर्णी चरित स्वमतें एवं हें भालचंद्र कविदास ॥
अध्याय पुरा करि मग वंदुनि गुरुच्या पदारविंदास ॥ ४७ ॥

इति श्री ब्रह्मेंद्रचरिते भालचंद्रकृते प्रथमोध्यायः
समाप्तः ॥ १ ॥

---

## अध्याय दुसरा.

### आर्या.

सिद्धिविनायक वदनीं ज्याच्या हें नाम तो जनीं तरला ॥
मृत्यूजन्म महापट त्याचा गणपें स्वयेंच कांतरला ॥ १ ॥
वसती तत्र पुढें हे होता तो यत्र रेणुकातनय ॥
देति न पीडा कोणा स्थिरती करुनी जनीं सदा विनय ॥ २ ॥
वंदाया जन येती तेथेंही स्वामिशीं, तरायास ॥
आपण दुस्तर भवनिधि, दुष्टकुधीवास कातरायास ॥ ३ ॥
केला विनायकाचा यतिनें सुध्वज तसाच कर्णांही ॥
गातां सद्यश ज्याचें लागे पीयूषतुल्य कर्णांही ॥ ४ ॥
चालविली गणपतिची पूजनसेवा करीत पूर्वजसी ॥
तद्योगें बहु फांके कांति ब्राह्मीं प्रभाहि पूर्व जसी ॥ ५ ॥
जीर्णालय रामाचें जाणुनि बांधावया महालय तें ॥
भिक्षाटणासि करिती ज्यांचें श्रीपतिपदीं सदा लय ते ॥ ६ ॥

---

१ गणपति. २ बाळाजी विश्वनाथ. ३ दुष्ट अशी जी कुबुद्धि तेंच कोणी त्र. ४ वाद्यविशेष. ५ अमृतसम. ६ उषःकालीं. ७ सदा लक्ष.

श्रीगणराजें दिधलें स्वालयरचना करावयास धन ॥
यति हे कार्यारंभा करितां आणीक देति वसु सधन ॥ ७ ॥
मेळविलें वसु जें तें, गुर्जर उधयास[1] ठेउनी निकट ॥
गेले विशाळदुर्गी आलयसिद्ध्यर्थ ते नमुनि विकट ॥ ८ ॥
शिरतां परि खातरि ते पुसती तेथील यास हो यवन ॥
'कथिं वृत्त,' सांगती ते, देति न जावूं त्यजूनियां भवन ॥ ९ ॥
निशिमाजीं दुर्गेंद्रा स्वप्नीं सांगे गणेश या सोडी ॥
जोडी यश, रिपु तोडी, भवहिम[2] दवडील भक्ति-पासोडी ॥ १० ॥
ब्राह्मीं उठोनि तोपुनि सत्कारुनि तो ह्मणे दया करिं गा ॥
पत्रक देउनि सांगे भिक्षा मम राष्ट्रिंची सदा वरिं[3] गा ॥ ११ ॥
तो ये निजगणसह मग मिळवुनि यति कीर्ति भार्गवाजवळी ॥
रक्षुनि धर्म स्वीयचि, चित्तीं हेरंबराजपद कवळी ॥ १२ ॥
ह्मणती 'भार्गवराम' स्थिरल्यापासूनि भार्गवा निकटी ॥
इंद्रियजित, कधिं ज्यांची षड्रिपुंनीं श्रंशिली नसेचि कुटी[4] ॥ १३ ॥
इकडे याकुदखानें पाठविले दूत सांगुनी जागा ॥
आणा त्यासि नमूं, जे कथिती जनिं धीपपादकं[5] जा गा ॥ १४ ॥
दूतोक्तें यतिहि निघे गणसह जंजीर दुर्ग देखाया ॥
जलधितटीं नियत रमे निज लीलें शक्ति थोर देखाया ॥ १५ ॥
पाहे दुर्गशिराहुनि आणुनि उतरोनि सर्व नौकेंत ॥
रंभाच्छादन[6] यतिसी धाडित राया करोनि संकेत ॥ १६ ॥
बैसुनि त्याच दळावरि तरले रत्नाकरांत ते साधू ॥
निरखुनि चित्रा लीला, वंदुं ह्मणे या, स्वकार्य मग साधूं ॥ १७ ॥
पूजियलें सत्कारें अंतीं मज तारिती ह्मणोनीच ॥
ग्रामद्वयासि देउनि रक्ष ह्मणे मी कृतागसा[7] नीच ॥ १८ ॥

---

१ उधाजी गुजर. २ संसाररूपी थंडी भक्तिरूपी पासोडी दवडील. ३ घेत जा. ४ देह. ५ गणेशस्मरण करा असें. ६ रंभाच्छादन=केळीचें पान. ७ अपराधी.

त्यासि ह्मणे यति विभुजी, निज संस्थानास एक कारकुन ॥
युष्मद्गृहिंचा द्यावा; न्यो वदती ते तदुक्ति आयकुन ॥ १९ ॥
होते बहु तत्सदनीं त्यांतुनि बहु कुशल योग्य हरिभजनीं ॥
निवडिति बापूजीतें, सुज्ञ परीक्षा वसेच साधुजनीं ॥ २० ॥
व्यसनीं सांपडलासा जाणुनि केलाच मुक्त न्यायास ॥
बद्धा मोचन व्हावें करिती मुनि सर्व याच न्यायास ॥ २१ ॥
निजपर शिवार्थ घेउनि त्यास परिव्राजियें निजस्थानीं ॥
बापूची रति यतिसी वत्स-रती जेविं धेनुच्या थानीं ॥ २२ ॥
करिती स्वामिकृपें मग बापूजीपंत सर्वही काजें ॥
द्वेषा गुर्जर करि, तंव फाडी कागद, न उक्त लोकां जें ॥ २३ ॥
पुसती द्रव्यव्यय यति केला वद सर्व केविं बापूस ॥
कागद हानिमुळें तो चुकला, मग फार बोलले त्यास ॥ २४ ॥
अन्य जनें कथिलें मग नाहीं अपराध याकडे कांहीं ॥
गुर्जर सर्व करी हें चित्तीं याची नसो विशंका ही ॥ २५ ॥
काढुनि गुर्जर केलें बापूच्या सर्व काज आधीन ॥
स्वामींच्या आज्ञेविण बापू करि कार्य कांहिं आधी न ॥ २६ ॥
सेवा करिती प्रेमें चिमणाजीपंत परशुरामाची ॥
करिती रुग्हरणार्थ प्रीति जडो, ह्मणुनि तत्र रामाची ॥ २७ ॥
सत्वगुणी चतुर तसे बापूचे आप्त जाणुनी स्वामी ॥
ठेविति संनिध, तंव तो बोले मानीन या पदां स्वा मी ॥ २८ ॥
संगें चिमणाजी ते जाति द्विज दोन आणि घेऊन ॥
महिपतिगडा अणाया चूर्ण, मनीं जळति ज्या अघें ऊन ॥ २९ ॥
दिधलीं होतीं यतिंनीं चिमणाजी-निकट सत्फलें दोन ॥
अर्पाया दुर्गेंद्रा, रक्षी तो तत्पदासि वंदोन ॥ ३० ॥
क्षुधित द्विज ते ह्मणती आह्मां दे नारिकेल भक्षाया ॥
गुर्वाज्ञाभंग रुचे मच्चित्ता नचि, दिलींत रक्षाया ॥ ३१ ॥

---

१ न्या असें ह्मणाला. २ नेण्याकरितां. ३ पूर्वी. ४ रोगहरणार्थ. ५ शांत. ६ आपले. ७ आणखी. ८ तीक्ष्ण (ऊन) पापें (अघें).

सह[1]घृण होउनि विप्रा दिधलीं जाणूनि लागली भूक ॥
क्षुधिता तृप्त करावें सांगति हा उचित धर्म शंभू[2] कें[3] ॥ ३२ ॥
येतां दुर्गायतनीं फलयुग्मा दे ह्मणे समर्पाया ॥
विभुसी, वदे तदा तो विप्रें तीं भक्षिलीं नमुनि पायां ॥ ३३ ॥
सा[4]मर्षें यति ह्मणती दुष्टा तूं भंगिली ममाज्ञा ही ॥
जा जा राहुं नको रे गुरुची केलीस तूं अवज्ञा ही ॥ ३४ ॥
मानीं सुख तद्वचनीं त्याचा मनिं रोष हा कदा न वसे ॥
अधिकचि सेवा करि तो वदुनि असा पति मिळे न कीं न[5]वसें॥३५॥
चुरितां पाय यतीचे लत्ताप्रहरेंचि ताडिलें त्यास ॥
वारंवारहि परि तो नाठवि, नच सोडिही यतिपि[6]त्यास ॥ ३६ ॥
उरतां अल्प निशा मग निजलेसे पाहुनी चुरी चरण ॥
जागृत होतां ह्मणती येथें कां तूं, अनन्य मी शरण ॥ ३७ ॥
करुणावचन श्रवणीं पडतां ठेवी स्वपंचशाख शिरीं ॥
राहें जनीं सुखी बा, तोडिन तव बंध, सत्य सुकृत-शरीं ॥ ३८ ॥
तेथुनि स[7]चूर्ण सगणचि आले स्वकृतोक्त कार्य हे[8]राया ॥
बोलति नमुनि गणेशा देवा त्वद्दास मी असे राया ॥ ३९ ॥
फडणीशी दिधली तैं बापूसी स्वामिंनीं दया करुनी ॥
केलें चिमणाजीच्या स्वाधिन भांडारकोश हो भरुनी ॥ ४० ॥
सांगे बापूसी यति लिहिणें न स[9]रे तवैकहस्तास ॥
कल्याणाहुनि आणुनि केलें चिटणीस धुंडिपं[10]तांस ॥ ४१ ॥
ब्रह्मेंद्राचें ऐसें बालात्मज भालचंद्र यश गाय ॥
द्वितियाध्यायीं रक्षिल ह्मणुनी वत्सा जसी सुखें गाय ॥ ४२ ॥

इति श्री ब्रह्मेंद्रचरित्रे भालचंद्र अयाचितकृते द्वितीयोध्यायः समाप्तः.

---

१ सदय. २ शंकर. ३ ब्रह्मदेव. ४ रागानें. ५ नवसानें. ६ यति हाच पिता, त्याला. ७ चुना घेऊन. ८ पहावयास. ९ संपत नाहीं. १० धोंडोपंतास.

# अध्याय तिसरा.

## आर्या.

देवा गणपति राया माझ्या पासूनि घ्यावि बा सेवा ॥
आहें शरण तुला मी दीनाचा तूं नको करूं हेवा ॥ १ ॥
चुकलें पारावारी बहु काळ जहाज एक यवनीचें ॥
केला नवस तिणें जी दवडा, घ्या त्र्यंश, दुःख हानीचें ॥ २ ॥
सांपडलें स्वामिकृपें, आली मग घेउनी स्वनवसवसूं[1] ॥
अर्पी ब्रह्मेंद्रातें, दवडुनि मल राहिलीहि दिवस वसू ॥ ३ ॥
ब्रह्मेंद्रें त्या वसुचा करुनी व्यय रम्य बाणगंगा ती ॥
शोभविली पाषाणें, पातकहा, जीस सर्व सुर गाती ॥ ४ ॥
भार्गवपृष्टिस आहे वोढा जो ख्यात नंदिनामानें ॥
गुंफा बांधुनि तेथें गाती गणराज बसुनि नेमानें ॥ ५ ॥
चिणुनि[2] द्वारें दोनी पंचममासीं[3] वरी समाधीस ॥
शुद्ध प्रथमदिनीं ते, उपमा दे कवण त्याचिया धीस ॥ ६ ॥
भाद्र चतुर्थी दिवशीं येती बाहेर ते प्रती वर्षीं ॥
ध्यानिं विनायक त्यांच्या, भासति सर्वा वशिष्ठ ब्रह्मर्षी ॥ ७ ॥
शामल[4] सरखेलांचें केलें निर्वैर त्या स्थलीं यांनीं ॥
दोघां हितोपदेशुनि, येती देवास ते स्वपायांनीं ॥ ८ ॥
नंतर महोत्सवातें करिती बसविति गणेश यानातें ॥
कीर्तन रसान्न भोजन देती विप्रा त्यजूनि मानातें ॥ ९ ॥
सुरवर विनायकाचा पवनसुताचा सुभार्गवाचांही ॥
मातापुरवासिनिचा रचुनि प्रासाद, घे सुवाचांही ॥ १० ॥

---

१ स्व-नवस-वसू=आपल्या नवसाचें द्रव्य. २ बंद करून. ३ पांचव्या महिन्यांत ह्मणजे श्रावण मासांत. ४ हबशी. ५ आंग्रे. ६ मारुतीचा. ७ परशुरामाचा. ८ देवीचा. ९ आशीर्वाद.

भार्गवरामासंन्निध नूतन हे, चार अन्य गांवांत ॥
रचिलें असंख्य, तत्पद नमितों व्हायास, मान्य देवांत ॥ ११ ॥
यावरि दिल्लीपतिच्या आज्ञें श्रीशाहुराज किल सदल ॥
आले चंदनदुर्गाजवळी वाहुनि शिवास बिल्वदल ॥ १२ ॥
कटिसूत्र स्वीय, तसी कौपिन, यति धाडितीहि राजास ॥
लाभो यश निधि वांछिति त्यातें, ह्मणती जनीं हिरा ज्यास ॥ १३ ॥
ब्रह्मेंद्राशिष येतां आलें यश शाहुलाच[1] तत्काळीं ॥
स्वामीचरणीं निष्ठा ठेउनि करि शत्रुचीं मुखें काळीं ॥ १४ ॥
वीर, प्राज्ञ, घृणावान्, बाळाजी विश्वनाथ पाहूनी ॥
दिधलीं प्रधानवस्त्रें दिव्य मुहूर्तावरीच शाहूंनीं ॥ १५ ॥
आणी त्या ब्रह्मेंद्रा निज राष्ट्राच्या शिवार्थ भूपाल ॥
सत्कारुनि गुरुसि ह्मणे स्वामी काळासही न कोपाल ॥ १६ ॥
विगताश[2] स्वामि परी, नृप दे सनदा बळें त्रिगांवांच्या ॥
वैराज[3]-प्रांतींच्या राष्ट्रीं भद्रार्थ सत्य सर्वांच्या ॥ १७ ॥
पूर्वाशिष मनिं धरुनी बाळाजी एक गांव देच तसा ॥
नृपपत्रासह यतिसी, गेला समजुनि कुताप[4] ममहि तसा ॥ १८ ॥
स्वामी निजाश्रमातें आल्यावरि शामल प्रभूहि करी ॥
विनती, आणावा परराष्ट्रांतुनि आमुचा तुह्मींच करी[5] ॥ १९ ॥
जातों परदेशीं तरि रक्षुनि तुमच्या गजास आणीन ॥
न धरीं भीति मनीं जो पीडिल तद्राष्ट्र सर्व खाणीन[6] ॥ २० ॥
सुखकर वचनें तोषुनि दश संगें लोक दे पदातीचे ॥
परदेशांतिल यति तो साधुनि निजकार्य साधि दंतीचें ॥ २१ ॥
मार्गी एक नदीवरि स्नानादिक कर्म धर्म साधाया ॥
उतरुनि गजा पुढें ते धाडिति अरिताप त्या न बाधाया ॥ २२ ॥

---

१ ताराबाईला यश न येतां. २ निरीच्छ. ३ वांईप्रांतांतील. ४ आपली निकृष्ट दशा संपली असें जाणून. ५ हत्ती. ६ खाणीन= नाश करीन.

जातां मागंजुनाच्या पासीं धांवोनि शामलारीचा ॥
लोकें निज बाहुबळें केला अपहार शत्रुच्या करिचा ॥ २३ ॥
नेला जयदुर्गावरि येउनि तेथील फार लोकांनीं ॥
असुगत दोन पदाती केले भक्षावयासि काकांनीं ॥ २४ ॥
कळतां सिद्दी सातें भार्गवरामस्थ सर्व जन लुटिलें ॥
नेलें देवनगांही तरि या दुष्टासि पाहिजे कुटिलें ॥ २५ ॥
चिमणाजीसह यतिचे सेवक बहु ताडुनी ह्मणे सांगा ॥
कोठें असेल वसु मग पाहे खाणून दुष्ट फरसां गा ॥ २६ ॥
इकडे स्नानादि विधि स्वामी येतांच सारुनी श्रवणीं ॥
पडतां कुवृत्त ह्मणती केली कोणीं हि पापसांठवणी ॥ २७ ॥
दे गज दुर्गपतिप्रति कथिलें, परि तो न दे, पुढें ह्मणुनी ॥
सरखेलाचें पत्रक स्वामींनीं त्या दिलें असे अणुनी ॥ २८ ॥
घेउनि गज निजसंगें आले सक्रोध शामलापासीं ॥
बघतां गज, कर जोडी दीनावरि करिं ह्मणे न कोपासी ॥ २९ ॥
सिद्दी सातापासुनि नेली जी वस्तु सर्व पाठविली ॥
भार्गवरामानिकटीं सोडुनि यतिदासभक्ति सांठविली ॥ ३० ॥
निजपतिकडेहि धाडी सर्वांची पावती तसें पदक ॥
अर्पुनि यतीस तो विभु रडुनि ह्मणे मी न सोडिं तव पदक॥३१॥
त्रासुनि निजगणसह ते आले तेथूनि राम वंदाया ॥
आश्रम रक्षाया कीं भक्ताचें कालचक्र भेदाया ॥ ३२ ॥
पाठविली सर्व पुढें वस्तू धावडशितें वसायासी ॥
स्कंधीं वाहुनि अर्ध क्रोश जगन्नाथ धाडि सायासीं ॥ ३३ ॥

---

१ मागजुनाच्या=माखजन हा गांव कोंकणात आहे. हा या वेळीं आंग्रे यांच्या तांब्यात होता. परंतु तत्पूर्वी हा हबश्यांच्या ताब्यांत असावा असें वाटतें. जंजिरेकरांनीं दिलेल्या या गांवाच्या कुळकर्णाच्या सनदा श्रीमंत खांडेकर साहेब (इतिहासप्रसिद्ध गणेश संभाजी व गोपाळ संभाजी यांचे वंशज) जहागिरदार पंथ पिंपळोदा ( माळवा ) यांचे जवळ आहेत. २ हबशांचे शत्रू—आंग्रे. ३ देवाचे डागिने. ४ सिद्दी सातः—हबशी अंजनवेलीचा सुभेदार. ५ फरसबंदी जमीन.

मागें येउनि आपण केलें वस्तीस गांव धावडशी ॥
ह्मणति नृपा अयश तुला जरि जन येथील सत्य धावडशी[1] ॥ ३४ ॥
भार्गवरामीं जावें श्रावणमासीं समाधि घ्यायास ॥
स्वाधिन करिति तिघांच्या ग्रामादिक काज तें पहायास ॥ ३५ ॥
धुंडीराज तसे हे बापु जगन्नाथ मानिती आज्ञा ॥
एक विचारें असती ज्यांची शोभे जनीं महा प्रज्ञा[2] ॥ ३६ ॥
निंबकर ग्रामस्थें अन्य बळें रेटिली पुढें सीमा ॥
अनयावाडिकरें हें कथिलें स्वामिंस मुलास पोसी मा[3] ॥ ३७ ॥
निग्रहयुत यति जाउनि सक्रोधें बैसले सिवेंवरते ॥
कळतां शाहुनृपा हें आला धांवुनि पुढें, पदींच रते[4] ॥ ३८ ॥
ब्रह्मेंद्रप्रिय करुनी सत्कारुनि बैसवोनि खलु यानीं ॥
अणिलें गांवामाजी स्वस्थानीं नमुनि शाहुरायांनीं ॥ ३९ ॥
शिबिका देउनि यतिसीं नम्रपणें एक गांव आणीक ॥
दिधला निजराष्ट्राच्या उदयास्तव, मानि यासि माणीक ॥ ४० ॥
चिमणाजी मृत शोडश शतिं झाले या त्रिषष्टिं दुर्मतितें[5] ॥
तत्सुत बराच बुधसा नाम जगन्नाथ ही न दुर्मति ते ॥ ४१ ॥
केली तडागरचना फोडुनि, पाषाण आश्रमाजवळ ॥
तैसी त्रिपुटनगावरि[6], सांगावें साधुचें किती नवल ॥ ४२ ॥
एवं सुभालचंद्रें साधूची वर्णिली कथा सुरसा ॥
तृतियाध्यायीं, तरि हो परलोकीं मुक्ति या स्थळीं सुरसा[7] ॥ ४३ ॥

इति श्रीब्रह्मेंद्रचरिते भालचंद्रायाचितकृते तृतीयोध्यायः ॥

श्रीभार्गवार्पणमस्तु ॥

---

१ जर येथील लोकांस तूं धांवण्यास लाविलेंस तर खरोखर तुला अपयश येईल असें स्वामींनीं हबशास सांगितलें. २ प्रज्ञा=बुद्धि. ३ मा=आई. ४ नमस्कार केला. ५ "शके १६६३ दुर्मती संवत्सरीं चिमणाजी यांस देवाज्ञा झाली." ६ त्रिपुटीच्या डोंगरावर. ७ देवासारिखी.

# अध्याय चवथा.

## आर्या.

धीपतिचरण[1]सरोजीं सेवि कथेचे पराग धीभ्रमरा[2] ॥
नकळे गुरुसी तरि तूं वंदुनि मग पूस; मान्य हो अमरा[3] ॥ १ ॥
कळलें स्वामिस पूर्वी होइल पुढती निजावताराची ॥
शीघ्र समाप्ती ह्मणुनी बोलति वाणी हितोपकाराची ॥ २ ॥
एक दिनीं छत्रपती आले ब्रह्मेंद्रदर्शनासाठीं ॥
सामोरा त्यांसि पुढें जाय जगन्नाथ, तोष धरि पोटीं ॥ ३ ॥
भूप पुसे यति कोठें ? सांगे हा स्वाश्रमींच आहेत ॥
आलों त्यांसि नमाया, दाखविं तरि बा धरूनि बहु हेत ॥ ४ ॥
येतां गुप्त स्वामी झाले मग नृप पुसे जगन्नाथा ॥
नसती येथें मम गुरु, ठेऊं कोणाचिया पदीं माथा ॥ ५ ॥
ऐका ह्मणे नृपाला होते स्थानीं मघां पहा याच ॥
आलों तिकडे तेव्हां सांगितलें ह्मणुनि मीं तुह्मां या च[4] ॥ ६ ॥
भूपालें पाठवुनी नगरा चतुरंगिणी पुढें सेना ॥
एकटका शूद्रगृहीं राहे यतिचा वियोग सोसेना ॥ ७ ॥
ऐक जगोबा बसतों गुप्त, यती आलियावरी पूस ॥
करुणावचनें द्रवडीं रोष जसा वन्हि जाळि कापूस ॥ ८ ॥
गेलासा नृप जाणुनि अपरान्हीं स्वासनींच ये योगी ॥
दावितसे कोपातें जैशी बाळास दावि माय उगी ॥ ९ ॥
यतिसी पुसे जगोबा भूपावरि रोष कां न अपराधी ॥
उत्तर तो दे अमुचा ग्राम न सोडवि जयांत न परा[5] धी ॥ १० ॥
आंग्र्याचें भूपाचें प्रस्तुत बहु वैर सांचलें ऐका ॥
आज्ञापालन न घडे तरि बाल त्याग करिल आई कां ? ॥ ११ ॥

---

१ गणपतीच्या चरणरूपी कमळांतील. २ बुद्धिरूपी भ्रमरा. ३ देवांस.
४ चलाच ह्मणून. ५ ज्यांत दुसरा हेतु नाहीं.

येउनि तोषें ह्मणती आहे कीं भूप सांग गेला बा ॥
आहे वदतां सत्वर आण ह्मणे त्यासि जेंवि मूला बा ॥ १२ ॥
भूपासह यति निकटी येच जगन्नाथ त्यास नृप नमुनी ॥
बालक कृतापराधी तरि त्यावरि रोष हो करी न मुनी ॥ १३ ॥
सोडुनि निजासना यति तिष्ठुनि ह्मणती ममासनीं बैसा ॥
स्वकरें तत्कर धरितां नृपती बोले न धर्म मम ऐसा ॥ १४ ॥
वदति स्वामि तयासीं, बसणें तुज उक्त, होसि जामात ॥
माझी सुता तुझी स्त्री; वद यावरि काय भूभुजा मात ॥ १५ ॥
एवं विनोदपर बहु अर्ध घटी करिति भाषणें उभय ॥
प्रश्नद्वय यति भूपा सांगति बोलति धरुं नकोसि भय ॥ १६ ॥
कांहिं न मागें तुज परि जेव्हां मी गमन करिन नाकास ॥
संस्थानासि रक्षिल जो त्यास धरूं दे नृपा तुझी कास ॥ १७ ॥
स्वकरें यति मग देती पंताचा नृपकरीं अहो पाणी ॥
'सुतसम रक्षीं' ह्मणतां आलें नेत्रीं तिघांचिया पाणी ॥ १८ ॥
करितों प्रश्न दुजा तुज कोठें माझी समाधि करशील ॥
आज्ञा कराल तेथें करिन ह्मणे भूप हेंचि मम शील ॥ १९ ॥
आहे सिद्ध समाधी केली पूर्वींच माळशिरसांत ॥
सुख मज येथें घेतां; तोडिन मग शत्रुकाळ शिरसांत ॥ २० ॥
मृगयेच्छा सांगितली शाहूनें मग यती ह्मणे जेवा ॥
होइल काज तुझें तरि वांछित पुढती असेचि तत्र ठेवा ॥ २१ ॥
अशना जातां येउनि सांब्र पशू पातला तडागांत ॥
नृप तो घेउनि गेला आनंदें स्वामिच्या पदा गात ॥ २२ ॥
भार्येचा जाणुनियां दर्शनहेतू नृपेंहि पाठविलें ॥
सगुणा नाम तियेला, चित्तीं गुरुला सदैव सांठविलें ॥ २३ ॥
दिन मग कांहीं जातां वदले जाणें अह्मांस हो आतां ॥
परिसुनि वाणी करिती स्फुंदन, जी फार लागली चित्ता ॥ २४ ॥

---

१ बाप. २ राजा. ३ गोष्ट. ४ स्वर्गास. ५ माळशिरस गांवीं. ६ मस्तकाचे ठिकाणीं. ७ सांबर.

साश्रुपणें[1] सांगितलें, फडणीशत्वा न सोडि बापूजी ॥
गेलों नाकीं जरि मी सद्भावें पादुकेसि बा पूजीं ॥ २५ ॥
यापरि सर्वांचें बहु करुनि समाधान, तेचि संन्यासी ॥
घेउनि संगें निघती एक जगन्नाथजी न अन्यासी ॥ २६ ॥
चिमणाजीच्या स्त्रीतें प्राशाया ह्मणति दे मला तक्र ॥
देतां प्राशुनि गेले भेदाया मृत्युचें सुखें चक्र ॥ २७ ॥
वाजीवाहन मार्गीं च्यूतद्रुम देखतां विसाव्यास ॥
घेउनि पलार्ध आले, कृष्णेच्या तटिं दुजा जसा व्यास ॥ २८ ॥
नंतर बसले घालुनि दिव्यासन यति चिनोन दारास ॥
ठेउनि दोन, जगोबा रक्षाया दूत येत नगरास ॥ २९ ॥
तेव्हां दुश्चिन्हें बहु होती नक्षत्रपात रडति शुनी[2] ॥
स्वप्नीं माहिषदर्शन धरिलें मिळुनी किं उष्ट्र बहु शिशुनीं ॥ ३० ॥
होतां वसुदिन[3] आंतुनि ह्मणती दूता कवाड मुक्त करा ॥
नसतां पूर्ण समाधी अमुच्या हें काय कृत्य उक्त करा[4] ॥ ३१ ॥
पुसती दूता हें कथ कोणाचें गज पदाति रथ वाजी ॥
आला नृप कीं उपनृप? ह्मणती एकहि दिसे न बा वाजी ॥ ३२ ॥
हेरंब श्रीगणपति मयुरेश्वर धुंडिराज हेच मुखीं ॥
उच्चारी न दुजें तो होईल खलु पुरुषमान्य ब्रह्ममुखीं ॥ ३३ ॥
धाडी सांगुनि दूतां मधु मात्रा आणि हेमगर्भ तसा ॥
घेउनियां जा सत्वर आण जगोबास शोककिलगतसा ॥ ३४ ॥
दूत स्वामीवृत्ता बोलुनि बसतां निघे जगोबा कीं ॥
चित्तीं ह्मणे अहाहा वेळा आली अह्मां कसी बाकी ॥ ३५ ॥
इकडे इंद्र षडानन रुद्र हरीकादि हे विमानातें ॥
विचरुनि नाकीं पाहति साधूच्या करिति कोण मानातें ॥ ३६ ॥

---

१ डोळ्यांत आंसवें आणून. २ कोल्हीं. ३ आठ दिवस. ४ स्वामींच्या समाधीचे पूर्ण दिवस होण्यापूर्वीं कवाड उघडणें आपल्या हातांस योग्य नव्हे असा भावार्थ दिसतो.

आले स्वानंदाहुनि मोदामोदादि दूत गणपतिचे ॥
षोडशदलयुत सौभीं नेले बसवुनि गणेश सुरतीचे ॥ ३७ ॥
कथिलें यतिनिर्याणा करुनी चवथा समाप्त अध्याय ॥
गुरुसी, दीक्षितवंशज बालात्मज भालचंद्र हा ध्याय ॥ ३८ ॥
इति श्रीब्रह्मेंद्रचरिते भालचंद्र अयाचितकृते चतुर्थोध्यायः समाप्तः ॥

---

## अध्याय पांचवा.

### आर्या.

हरिहर शक्ति रवीही पूजुनि तुमच्या पदासि गणपाला ॥
वांछित पावति तरि मज गाया धी दे तव प्रतापाला ॥ १ ॥
शब्द न होतां ह्मणती कोणी बहु लागली असे निद्रा ॥
पाहतां त्यासि जगोबा देखियलें जीवहीन मुखचंद्रा ॥ २ ॥
क्रोधन[1] वर्षीं गेले षोडश शत सप्तषष्ठि भृगुवारीं ॥
अरुणोदयिं सित नवमी पंचममासींच भक्तकैवारी ॥ ३ ॥
पाठविला शाहुकडे खंडोजी सांगुनी सकलवृत्ता ॥
आमात्यासह नृप मग आला योजावयासि सार्थकता ॥ ४ ॥
त्या तनुला कृष्णेचें घालविलें स्नान नमुनि भूपानें ॥
पूजन विधियुत करवुनि बोले त्यजिलीं मुलेंच बापानें ॥ ५ ॥
भूपालें सर्वांचें करुनि समाधान योगनिष्ठासें[2] ॥
घालुनि शिबिकेमाजी अणिलें स्वस्थानिं करुनि कष्टास ॥ ६ ॥
आणुनि धावडशीला जेथें संध्येस गा बसत होते ॥
गर्ता खाणुनि तेथें, येथें स्थापा ह्मणें कुशल हो ते ॥ ७ ॥
सारुनि यतिविधि बोले अवसानीं[3] आसना न कां वळलें ॥
आतां घडेल कैसें तंव हें स्वामींस अंतरीं कळलें ॥ ८ ॥
धरुनी पदासि करितां होय जगन्नाथ आसनां कमल[4] ॥
वानिति साधूचे गुण ह्मणती याची तनू असे विमल[5] ॥ ९ ॥

---

१ क्रोधन संवत्सर. २ योगीराजास. ३ निर्याणसमयीं. ४ आसन मांडी.
५ पवित्र, शुद्ध.

गर्तेमाजीं बसवुनि शंखें भेदी शिरा जगन्नाथ ॥
करुनी समान भूमी बोलति रक्षी अह्मांसि गुरुनाथ ॥ १० ॥
गेला स्वस्थाना नृप सांगुनि सर्वांस नीट परिसा रे ॥
द्वादश वासर करणें कर्मविधी जपुनि धर्म बहु सारे ॥ ११ ॥
गेल्यावरि शाहु, पुढें करिति जगन्नाथ तत्क्रिया सारी[1] ॥
द्युमणी दिन, परि झाले त्या दुःखें बहु विरक्त संसारीं ॥ १२ ॥
येतां दिन तेरावा नृपजायेनें समग्र पाठविलें ॥
साहित्यासि; बहु परी चित्तीं शतवार दुःख आठविलें ॥ १३ ॥
बहु विप्र, अन्य तैसे, जेवविले कोण करिल संख्या ती ॥
अन्नाचे गिरि उठले इहपरलोकींहि वाढली ख्याती ॥ १४ ॥
भूपें पाचारुनि मग भक्त जगन्नाथ बापु धुंडीस ॥
वस्त्रें देउनि वदला धाडुं नका नाकिं पापहुंडीस ॥ १५ ॥
सांगे भूपस्त्री मग गुरुचा प्रासाद हो करा अचल ॥
न्या वसु वांछित परि कधिं भंग न व्हावा तया जसा अचल ॥१६॥
आणुनि निधि तद्वाक्यें करिति जगन्नाथ आलयारंभा ॥
तंव ती सगुणा गेली कैलासा त्यजुनि राष्ट्र कीं शोभा ॥ १७ ॥
भूपानें मग कथिलें न्यावें तैसेंचि शेवटा काम ॥
मेल्यावरि मी राहिल ऐसें मज वाटतेंचि गुरुधाम ॥ १८ ॥
होतां अर्धालय तें गेले शाहू त्यजूनि राज्यास ॥
भोगाया स्वर्गसुखा, करिती मग सर्व लोक कज्ज्यास ॥ १९ ॥
प्रासादासी नेलें सर्वांनीं शेवटासि त्या मिळुनी ॥
घेती सुखासि मानुनि स्वामीगतदुःखशोक तो गिळुनी ॥ २० ॥
प्रत्यब्दीं दशदिन ते करिति महोत्सव गुरूसि सुखवाया[2] ॥
देऊनि अन्नदाना सुकृत गुरूचें जनांत कळवाया ॥ २१ ॥

---

१ यथासांग, संपूर्ण. २ सुख देण्याकरितां.

वर्षे द्वादश यापरि गेल्यावरि कीं मरीचिनगरास[1] ॥
चिमणाजीसुत[2] नेले रघुनाथें[3] स्वक्षयार्थं[4] नगरास ॥ २२ ॥
वर्ते नवल पुढें बहु आले ब्रह्मेंद्र दोन यामिं[5] दिवा ॥
सर्वां स्तवितां वदले रक्षा जो लाविला मिं कीर्तिदिवा ॥ २३ ॥
चिंता न करा येइल चिमणाजीतनय अष्ट दिवसांत ॥
कांहीं बंध नसे त्या, आहे समजा मनीं स्ववासांत ॥ २४ ॥
पत्रें पुष्पें पूजुनि गेले मग घालवावया क्रोश ॥
तंव ते अदृश्य होतां रडती करिती बहूत आक्रोश ॥ २५ ॥
तिकडे दर्शन देउनि स्वामि जगन्नाथ यास कथि जा च ॥
मोहें रघुनाथेंही केला सत्कार फार, नच जाच[6] ॥ २६ ॥
आले वसु दिवसांच्या आंत जगन्नाथ आपुल्या भवनीं ॥
ऐशा ब्रह्मेंद्रा जो गाय तया होय गेहिं लाभ वनीं[7] ॥ २७ ॥
दिधली मती जसी मज गणराजानें तसेंच या वदनें ॥
वदलों तद्दासाचे गुण मी, सांगुनि तयासि मम मद ने[8] ॥ २८ ॥
ठेवी चरित्र जो हें अथवा सदनीं पुजील सद्भावें ॥
वाची नित्य; तयानें स्वानंदें सुरगणांत शोभावें ॥ २९ ॥
रचिली पंचाध्यायीं जाळाया सर्वही दरिद्रास ॥
नाकीं वास मिळाया बालात्मज दिव्य भालचंद्रास ॥ ३० ॥

इति श्रीब्रह्मेंद्रचरिते महायाज्ञिकवैराजक्षेत्रस्थबाळदीक्षितात्मज
भालचंद्रकृते पंचमोध्यायः समाप्तः ॥

---

१ सूर्यलोकास. २ जगन्नाथपंत. ३ रघुनाथ बाजीराव ऊर्फ राघोबादादा ह्यांनीं जगन्नाथपंत ह्यांस कैद केलें होतें. ४ आपल्या नाशार्थ. ५ दोन प्रहर. ६ छल. ७ घरीं अथवा रानांत कोठेंही लाभ होईल असा भावार्थ. ८ माझा अहंकार नाहींसा कर असें सांगून.

# परिशिष्ट २.

## कठिण शब्दांचा कोश.

### ब्रह्मेंद्रस्वामी ह्यांचें चरित्र.

पृष्ठ. शब्द. अर्थ.

२ निकर्ष—हठयोग, शरीरास क्लेश देऊन जी सेवा करणें ती, दुराग्रह.
१० करामती—कर्तृत्ववान्, अजबशक्तीचा.
„ अवलिया—साधु.
„ खुरनिशात—कोर्निषात्—जमिनीस हात लावून नम्रपणें सलाम करितात तो, मुजरा.
„ वरघाटें—घांटावर, देशांत.
१८ खलेल—अडथळा, हरकत.
१९ दस्तक—हुकूम, आज्ञापत्र.
२० कर्णेकरी—कर्णा वाजविणारा.
२१ वस्तवानी—चीजवस्त, जिनगी.
„ बंद धरून नेणें—कैद करणें, अटकेंत ठेवणें.
„ तक्सीर—अन्याय, गुन्हा.
२२ मुल्ला-गो-फकीर—धर्माधिकारी—गाई—साधु.
„ तसनस—नासाडी, उपद्रव.

पृष्ठ. शब्द. अर्थ.

२२ जराबाजरा—किरकोळ सामान-सुमान.
„ दिक्कत—तक्रार, हरकत, त्रास.
„ बळजा—मुलाजा, क्षमा.
„ तंगकरी—तगेरी—फांटा देणें, पदच्युत करणें, नौकरीवरून काढून टाकणें.
२३ खैरसल्ला—कुशल समाचार.
„ किताबत—पत्र.
„ महसूल केली—सादर केली.
„ नेकसात वारीद होऊन—सुमुहूर्तीं पोहोंचून.
„ खुषवख्तीं—संतोषसमयीं.
„ तहयेफे—नजरनजराणे.
„ आरामशीर—सुरक्षित.
„ फिलबाल, फिलहाल(?)—आतां.
„ मलाजमतेस—भेटीस.
„ येकिन—खात्री, भरंवसा.
„ तरीका—चाल, रीत, पूर्वापार चालत आलेली पद्धति.

पृष्ठ. शब्द. अर्थ.

२४ सर्बेराय–व्यवस्था, आदरपूर्वक सत्कार.

,, मुजबानीं–तोंडानें.

,, सकून–गोष्ट, भाषण.

,, आयां करतील–निवेदन करतील.

,, दराज–विस्तार.

,, प्यारमोहबत–मेहेरबानी, कृपा.

२५ पोटतिडीक–अगत्य, कळकळ.

,, सुदामत–सुरळीत रीतीनें.

,, दुवा–आशीर्वाद.

२६ वानीवस्त–वस्तवानी, चीजवस्त.

२७ कौलनामा–अभयपत्र.

,, साकीन–रहिवासी, राहणार.

,, शकदील–भयभीत, साशंकित.

,, तजावजा–फाटाफाट, पळापळ.

,, मऱ्हामत करणें–दया करून देणें, कृपाबुद्धीनें देणें.

,, कीर्दीमामुरी–जमिनीची लावणी, संचणी.

,, शक–संशय, भीति.

,, बेशकपणें–निर्भयपणें, निःशंकपणें.

२८ बंदगीस–सेवेस, चरणास.

,, कमीनाखालीं–नौकरीच्या शर्तींखालीं.

,, जोरावारीनें–बळजबरीनें.

,, सुभा आणून–सुभ्यास आणून.

पृष्ठ. शब्द. अर्थ.

२९ मुजाहिम–अडथळा.

,, दास्तन–मूळ अर्थ, गोष्ट, हकीकत. यादीदास्तन ह्मणजे यादीचा मजकूर किंवा यादींतील वृत्तांत.

,, गर्गशा–दंगा, भांडण, तंटा.

,, मसाला–दंड.

३० चुकल्या–चुगल्या, चाहड्या.

,, नशेदपत्रें–ताकीदपत्रें.

,, सर्फराजी–स्तुति, आदरसत्कार.

,, बाधवत–भागवत (ह्मणजे लांबलचक पुराण किंवा कथा केली अशा अर्थीं).

३१ उपराळा–मदत, कुमक, साहाय्य.

३२ नकदी–रोकड.

४४ नतीजा–शिक्षा–मूळ अर्थ परिणाम, शेवट.

,, विशदर्थें–रागानें.

,, दुसाला–दोन सालांनीं.

४७ हर्टी–मेंढ्यांच्या कळपाप्रमाणें.

,, भांडें–तोफ.

,, सुलाखेंकरून–स्नेहभावानें, गोडीगुलाबीनें.

,, सचंतर–स्वतंत्र, निराळी.

४८ अंतराय–अंतर, कसूर.

,, गुह्माणा–राग, किल्मीष.

,, हरोळी–टेहाळणी, बिनी.

पृष्ठ. शब्द. अर्थ.

४८ मुखतां–रुबरू, तोंडानें.

४९ नेस्तनाबूत–पराभूत करणें, नष्ट करणें, किंवा गर्भगळित करणें.

५१ कबज करणें–काबीज करणें, ताब्यांत घेणें.

५५ पायबंद–अटकाव.

„ चौगीर्द–चोहों बाजूंनीं.

„ आयास येणें–जेरीस येणें.

„ बेहबुदी–व्यवस्था.

„ बरकंदाज–चापाच्या बंदुकी बाळगणारे लोक, सं० नालीक.

„ बेलदार–सुरुंग फोडणारे व खाणी खणणारे लोक.

५६ बोलबाला–जयजयकार.

५७ बरजोर–मोठासा, जोरदार.

„ जगनामोश–जगभर लौकिक किंवा कीर्ति.

५९ पैरवी–पाठलाग, शोध.

६५ लागमाग–गलबतें लागण्याच्या समुद्रांतील जागा व मार्ग.

७१ बेलभाकर–बेलभंडाराप्रमाणें बेलभाकर हें शपथपूर्वक स्नेह केल्याचें चिन्ह मानीत असत.

„ दसरामानीं–दसऱ्याचे सुमारास.

७६ गनीमाची सलाबत वाढविणें–शत्रूस जोरदार किंवा सबळ होऊं देणें.

पृष्ठ. शब्द. अर्थ.

७६ गनीमाची सलाबत खाणें–शत्रूची भीति बाळगणें, कच खाणें.

„ गनीमावर सलाबत चढविणें–शत्रूवर चढ करणें.

७७ नाचीज–निष्फल, निरर्थक.

„ पायेचा जमाव–पायदळ लोक.

„ ताबीन–अनुयायी, आज्ञाधारक.

„ मुलाहिजा–क्षमा.

„ दालीची शरम–तरवारीच्या पट्ट्याची शरम–ह्मणजे आपल्या शिपाईगिरीची शरम. शिपाईगिरीचें चिन्ह योद्ध्यानें आपल्या कमरेस लटकाविलेली तरवार व पट्टा हें होय.

„ साहेबकाम–यजमानाची नौकरी.

„ परिच्छिन्न–बेशक, निक्षून.

„ पळयाचें–पळणारांचें.

„ इरे–अभिमान.

„ जातिनसीं–स्वतः.

„ जमेतीनसीं–सैन्यानिशीं.

„ कस्त–मेहनत.

„ वारें घेणें–इरेस पेटणें, खवळून जाणें.

„ बलखुद–हालखुद (?)–जसा पाहिजे तसा. "यथावश्यं

पृष्ठ. शब्द. अर्थ.

तु हाल्खदम्" रा० व्य० को०. विनम्र असा भावार्थ.

७८ झीटपीट–झटापट, तोंडातोंडी.

७९ हुक्के–दारूचे गोळे.

,, गरनाळा–तोफा.

,, सोखी करून–छिद्र पाडून, फितुर करून?

८० हांवभरू–उछू, उतावळा.

,, ठेंचगा–अडथळा, शह.

,, दिलदिलासा–प्रोत्साहन.

८१ ताराज करून–धुळधाण करून.

८८ इजत–अब्रू, लौकिक.

,, हेत–हेतु, इच्छा.

८९ इस्तकबील–पुढें.

,, दरसदे–दर शेंकडा.

,, हरफ–शिक्का.

९३ जाग–जाग्रण.

९४ महालसहवर्तमान–राणीसहवर्तमान.

पृष्ठ. शब्द. अर्थ.

१०० रसोई–स्वयंपाक.

१०५ डाहणा–वाघाची जात.

११४ दिवाणचे–सरकारचे.

११५ भांडें मारलें–तोफ उडविली.

११७ तारांडी–आश्रय, मदत.

११८ बाजी–कीर्ति.

११९ निर्व्याकुल–निर्वेध.

१२४ तलाख–आईवरून दिलेली शिवी आहे.

१२५ मुबा–मुभा–कायदेशीर रीतीनें बक्षीस, किंवा माफ.

,, मुजाहिम–अडथळा.

१२९ अधिष्ठान–देवस्थान, पूजा अर्चा वगैरे.

,, देहायमजकुरास–नमूद केलेल्या गांवांस.

१३२ व्यासंगदुःख–वियोगदुःख.

१३४ तहकीक–जाहीर, मालूम, श्रुत.

## ब्रह्मेंद्रस्वामींचा पत्रव्यवहार.

लेखांक. शब्द. अर्थ.

१ रुबरु–समक्ष.
२ धारादत्त–उदकदत्त.
„ कुलबाब–सर्व बाबींसह.
„ कुलकानु–सर्व कायद्यांसह.
३ हरामजादगी–लबाडी, लुच्चेगिरी.
„ मसाला–दंड.
„ दत्त करून–दिलें असें तोंडानें उच्चारून.
४ कथला–ळा–भांडण, तंटा.
„ फर्मान–सनद, हुकूम.
९ सलुख–सलोखा, स्नेह.
„ जेर–जर्जर, हैराण.
१२ फलात्कार–यशप्राप्ति, यशसिद्धि.
१७ मुजरद–मुद्दाम.
१८ ह्याल–दाखल, रुजू.
„ कजिया–भांडण, तंटा, कज्जा.
„ महजर–निवाडपत्र.
२० पसमी–एक तऱ्हेचा रंग.
२७ कासिद–जासूद.
„ मजुरा–मंझूर(?)–संतुष्ट, खुष.
„ बरबात–बरबाद–नाश पावल्यानंतर, नष्ट केल्यानंतर.
„ महकूब–तहकूब.
„ बारांत गेलेला–तोफेच्या मारांत सांपडलेला.
„ चौकीर्द–चोहों बाजूंनीं.

लेखांक. शब्द. अर्थ.

२७ झांबडाझांबड–लुटालूट.
„ नायबबक्षिगिरी–दुय्यम सेनापतित्व.
„ हैरानपेरोसान–गोंधळ, दाणादाण.
„ शिरउपस्त–मुख्य कारण.
„ ताराज–लूट, नाश.
३१ कुवत–शक्ति, ताकद.
„ गुत्ता–गुंता, अडचण.
„ कोन–खण (?)
३२ मीन–मासा–माशासारखे लीन.
„ छिनणें–साल काढणें.
३३ मुकाबला–गांठ, नजरानजर, सामना.
„ आराबा–तोफखाना.
„ थडक–हातघाईचें युद्ध.
„ गजडा–गजनाल ह्मणून एक मोठा आवाज करणारी तोफ आहे. तिच्या वरून गजना–गजडा–असा अपभ्रंश झाला असावा. ह्याचा अर्थ तोफ असा दिसतो.
„ कुल–सर्व.
„ आवाई–हूल, आरोळी.
„ प्रास्थाई–पश्चात्तापांत.
„ इतबार–विश्वास, भरंवसा, पूज्यभाव.

लेखांक. शब्द. अर्थ.

३३ जाजती–जास्ती–अधिक.
,, बदवक्र–बेअब्रू, काळेंतोंड, नामुष्की. (हा शब्द 'बदवक्त' असा असेल तर वाईट प्रसंग असा अर्थ होईल.)
,, हातनाला–लहान बंदूक.
,, सुतरनाला–उंटावरची तोफ.
,, रेहेकले–तोफांच्या व सामानाच्या गाड्या.
,, तवकल करून–ईश्वरावर भरंवसा ठेवून, परमेश्वराचा धांवा करून.
,, या सायास–यासारखा, यासमान.
,, उस्तवारी–उपद्याप, त्रास.
,, मुजाका–पर्वा, जरूर, भीड.
३४ बंदगी–सेवा, गुलामगिरी, पारतंत्र्य.
,, दुमदारी–सैन्याची पिछाडी.
,, घाव केला–हल्ला केला.
३५ चौतर्फा–चोंही तर्फेनें, चोहीं बाजूंनीं.
,, काहिला–घाबरा.
,, तफावत–अंतर, फरक.
,, रजबदल–मध्यस्ती, तहाचें बोलणें.

लेखांक. शब्द. अर्थ.

३५ कमपेस–सर्व.
,, जानकुरान–(जानेकुरान) सरदार ओलीस देणें.
,, दस्कत–सही.
,, खासदस्तक–स्वदस्तुर लेख.
,, इरसाल–निरोप.
,, बुरंगे–बुणगे.
,, तग–उपासमार.
,, कश्यप–कपट.
,, जानरोटी–शपथ.
,, खता–चूक, गुन्हा.
३६ करोला–बंदुकवाले घोडेस्वार.
,, अर्गानर्गा–दाणादाण.
,, किलेबंद–किल्ल्याचा आश्रय करून.
३७ तांब्र–मोंगल, पठाण.
,, वारापाणी–निकाल.
,, विकल्पवासना–वाईट इच्छा.
,, रसद–साहित्य, दाणावैरण आणि पैसा.
,, कमाविस–मामलत.
४० बिलंद–बळकट, जबरदस्त.
४१ आंव–दम.
,, गारुड–कपट, लुचेगिरी.
,, दस्त–पदच्युत(?).
,, नबाबत–नबाबगिरी, नबाबाचें पद किंवा अधिकार.

लेखांक. शब्द. अर्थ.

४१ चकत्याची पातशाही–बाबरानें स्थापन केलेल्या पातशाहीस चकत्याची पातशाही ह्मणण्याची गेल्या शतकांत चाल असे. मोंगल लोकांत चकते ह्मणून एक कूळ असे. त्या कुळांत बाबराचा जन्म झाला. हिंदुस्थानांत आल्यावर बाबरानें तें आपलें आडनांव केलें. जसा अहमदशहा दुराणी, तसा बाबरशहा चकते. चकते हा शब्द भाऊसाहेबांच्या बखरीच्या ९४ पृष्ठावर आलेला आहे. ह्या शब्दाची मांडणी इंग्रजींत Chaghtai अशी करितात. (राजवाडेकृत म. इ. साधनें खंड १ ला. पृ० २७५).

,, खडी–तयार, तत्पर.

,, कसाला–प्रसंग, अडचण, संकट.

४८ बज्जिन्नस–अस्सल, जसें असेल तसें.

४९ मर्दामर्दी–पराक्रमानें, शौर्यानें.

,, धारकरी–तरवारीनें युद्ध करणारे लोक.

,, बरे वजेनें–शहाणपणानें, चांगल्या तऱ्हेनें.

लेखांक. शब्द. अर्थ.

४९ बांकोन घातलें–चालून गेलें.

,, हुजरात–हुजूरची फौज, खासी फौज.

,, तहकीक–चौकशी, तपास.

५२ त्यादारभ्य–तदनंतर.

,, धमधमे–मातीचे मोठमोठाले धक्के किंवा बुरूज.

,, निराकरणाचे मंत्र–दर्पोक्ति.

,, हाके (?)–हुक्के ह्मणजे बंदुका या अर्थी.

,, डोम–डोंबाळा, जाळ, ज्वाळा.

,, बरकंदाजी–बंदुकीचा मारा.

,, तोफजी–तोफांची मारगिरी.

,, सफेल–तटाची गच्ची.

,, लेश–खूण (?) चाल (?)

,, एलगार–हल्ला.

,, कसकरले–कचरले, मागें हटले.

,, रेजगिरी–दारूगोळ्याचा मार.

,, रंजक–दारू.

,, फत्या–पोत्यास?

,, तमा–भीति, पर्वा, धास्ती.

,, कौल–तह, तहाचीं कलमें.

,, कबिला–बायका मुलें.

,, खाजण–खारी जमीन.

,, सही न होती–सर न होती.

,, टोपीकर–फिरंगी, पोर्तुगीज.

५५ गुजरान–निभाव, निर्वाह.

लेखांक. शब्द. अर्थ.

५६ गुराबा—लहान गलबत.

५९ मुस्तेद—तयार, पूर्ण.

६७ विशदें—रागानें.

,, बादली—भरजरी.

७६ कच्चा धाग्याची—गरीब.

,, स्वल्प साहासें—स्वल्प सायासें—थोड्या श्रमानें.

,, कापड—लत्ताकपडा, चिरगुट-पांघरूण.

,, अडसेरी—अडशेरीभर धान्य.

१०० सरखेल—हा किताब आंग्रे ह्यांचा होता. सखील—निशाणांच्या समूहाचा अधिकारी.

१०२ महालतर्फेनें—वाड्यांतून, महालांतून, राण्यांच्या मार्फत.

११९ रोकडे—रोख.

१२१ इतराज—नाखुष.

१३२ मवासी—लुटारू लोक.

१३४ अहीर—उत्तरहिंदुस्थानांतील एक रजपूत जातीचे लोक.

१४० पाषाणा—एक प्रकारचा अजार.

१४६ परशरामपट्टी—परशुराम देवाकरितां एक कर.

१४८ मोईन—वर्षाची नेमणूक, ठोकळ रक्कम.

,, विशाद—मालमत्ता, चीजवस्त.

१५७ दारूच्या चिठ्ठ्या—बंदुकीच्या किंवा सुरुंगाच्या दारूच्या चिठ्ठ्या.

१६४ ढोक—ढोंग (?)

१६८ खामखा—खास, खचित.

१७५ मुलुखगिरी—प्रांत काबीज करणें.

१७९ तलाश—तपास, चौकशी.

१८७ बालपरवेशी—लढाईत मेलेल्या शिपायाच्या मुलास जी नेमणूक अथवा इनाम जमीन देतात ती.

२०७ लोभललिगतेकरून—लोभानें व लळ्यानें, लडिवाळपणानें.

२०८ देशचौगुलकी—एक प्रकारचें पाटिलकीचें वतन.

,, रोखापोखा—मागणेंचिठ्ठी, वरात.

,, पेशा—धंदा, संबंध.

२२६ पोताहून—पोत्यांतून, खजिन्यांतून.

२२९ फलादेश—फलात्कार, फलद्रूपता

२३१ गुजारत—मार्फत.

२३६ कामास आले—मृत्यु पावले.

२३८ कुडती—बंडी, आंगरखा.

,, मोजीब—प्रमाणें.

२४० हु—मराठी भाषेंतील "श्री" प्रमाणें एक शुभदायक चिन्ह.

,, आजम—बहुमानवाचक विशेषण.

,, अकरम—कृपाळू, कृपावान्.

लेखांक. शब्द. अर्थ.

२४० दामषफकतहु–नेहमीं दयादृष्टि ठेवो ह्या अर्थी फारशी भाषेंतला हा मायना आहे.

,, मुषफक–मुष्फिक-दयाळू,कृपाळू.

,, एन्तेजाद–कृपा.

,, अज–पासून.

,, एखलास–स्नेह, प्रेम, लोभ.

,, बादज–वारंवार, पुनः पुनः.

२४१ महफूज–सदैव स्मरणांत असलेले.

,, रफअत–अत्युच्च.

,, शहामतपनाह–राज्यरक्षक.

२४२ दुवा–आशीर्वाद.

,, खैरियत–समाचार.

,, भकलेले–भयभीत झालेले.

२४३ खैरसल्ला–खुषखबर, कुशल-समाचार.

,, मोहीब–हुजूर, सरकार.

२४४ चंदरोज–कांहीं दिवस.

,, खुषवक्तीं–संतोषसमयीं.

,, शादमानी–आनंद, समाधान.

,, ईजानेब–खाविंद.

,, निविस्ते–पत्र, लेख.

,, फरामोसी–हुकूम.

२४५ डावाडौल–भयभीत, परागंदा.

,, बुतपरस्ती–मूर्तिपूजा.

,, खिताबमोजिबः–कुराणाप्रमाणें.

,, तजावत–अंतर.

लेखांक. शब्द. अर्थ.

२४६ तफहूस–तपास, चौकशी.

२४७ हुजत–हिशोस, तपशीलवार यादी.

२४८ नेकवक्त–बरोबर, वेळेवर.

२४९ खफती–मूर्ख.

,, दिवाना–वेडा.

,, बेशौर–भित्रा, कर्तृत्वहीन.

२५० खैरआफियत–कुशलसमाचार.

२५१ मजमून–वृत्तांत, हकीकत.

,, मुफसल–सविस्तर, तपशीलवार.

,, चिल्ला–समाधि.

२५२ अव्वलफसल–वर सांगितल्या-प्रमाणें.

,, फौत झाले–मृत्यु पावले.

,, कदीम–जुनें, प्राचीन.

,, तफावत तजावत–अंतर.

,, हक्कामध्यें–परमेश्वरास स्मरून, खरेपणानें.

,, शुक्रगुजारी–कृतज्ञता, उपकार-बुद्धि.

२५३ दरींविला–दरीन्‌विला–हल्लीं, ह्या दिवसांत.

२६२ जागली–पहारेकरी, संरक्षक.

३५६ इतल्ला–संमति.

३६० निरवण–निरवानिरव.

३६३ ऊर्जा–निगा.

३६५ थडें–थडगें.

| लेखांक. | शब्द. | अर्थ. |
|---|---|---|
| ३७३ | असर्फी | मोहरा. |
| ३७५ | दिलपाक | शुद्ध अंतःकरणाचें. |
| ,, | दिलदर्या | उदारधी. |
| ,, | वाजिब | नीट, योग्य. |
| ,, | तकिया | गादी, संस्थान. |
| ,, | खुदाई | ईश्वरभक्त. |

| लेखांक. | शब्द. | अर्थ. |
|---|---|---|
| ३७५ | इनसानाचा | मनुष्यपणाचा, सभ्यपणाचा, भलेपणाचा. |
| ,, | इलाही | देव, ईश्वर. |
| ,, | कुदरत | सत्ता. |
| ,, | नीचे | घांटाखालीं, कोंकणांत. |
| ,, | करमेनें | कृपेनें. |
| ,, | जुदाही | दुजेपणाचा भाव. |

# शुद्धिपत्र.

## ब्रह्मेंद्र स्वामींचें चरित्र.

| पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| १८ | ११ | यांणीं | यांसी |
| २३ | १६ | मोहिब | मोहिबीं |
| ,, | ,, | खैरसलीं | खैरसला |
| ५५ | २५ | तवेलदार | बेलदार |
| ९५ | २७ | वर्शनास | दर्शनास |

---

## ब्रह्मेंद्र स्वामींचा पत्रव्यवहार.

| लेखांक. | पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|---|
| ४ | ४ | १५ | या······ | पादशाही |
| १० | ८ | ८ | प्राणवली | व धालवली |
| ,, | ,, | १५ | स्वामींची प्रकृति | स्वामींचीं बोटें दुखतात तीं |
| ,, | ,, | १९ | पै॥ छ १७ | पौ छ १ |
| ,, | ,, | टी०३ | सन १८३४ | सन १७३४ |
| १३ | १० | १८ | कांहीं | आह्मी |
| २९ | ३४ | २ | पांचनगें वतन दिल्हें. | पांच नगें वस्त्रें दिल्हीं. |
| ,, | ,, | १४ | आमची निष्ठा | आमची निष्ठा त्रिकर्णपुरस्सर |
| ,, | ३५ | ४ | आज्ञेपेक्षां अधिक | आज्ञेपेक्षा आह्मांस अधिक |
| ,, | ,, | ९ | पावणें | पाठवणें. |
| ,, | ,, | १० | त्याजवळ | त्याजवरून |
| ३० | ३६ | ७ | अंताजीपंताकडून | अंबाजीपंताकडून |
| ,, | ,, | ११ | करणें तें करावी | तो केला पाहिजे. आणि आ-ह्मांस काय आज्ञा करणें तें करावी. |
| ,, | ३७ | ८ | कालें | काळें |

| लेखांक. | पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|---|
| ३० | ३७ | १० | तुझें ह्मणविल्याचें | तुझें वाचविल्याचें |
| ,, | ,, | १२ | बिरित | बिरीद |
| ३१ | ३८ | १ | लवकर सातारि(यास आलों) | लेंकरें खरीं. त्यास |
| ,, | ,, | ४ | हे खास | एखादी |
| ३२ | ४१ | टी०८ | to facify | to pacify |
| ,, | ४२ | ७ | सालीं | सहा महिन्यांत |
| ,, | ,, | १३ | निर्मळता | त्रिकाळशांतता असें एका पत्रांत पाठांतर आहे. |
| ,, | ,, | २० | राहिलें | राहिलें साहिलें |
| ३३ | ४४ | ७ | दिडशें | शेंदीडशें |
| ,, | ४५ | २ | कोट | केवळ |
| ,, | ४७ | ५ | राणोजी | रघोजी |
| ,, | ,, | ६ | आमचे जाहले | उत्तम जाहलें. |
| ,, | ,, | १२ | राणोजी | रघोजी |
| ३४ | ४८ | १ | सबैनचें | साबानचें |
| ,, | ,, | २ | गीर | निंभोरें |
| ,, | ,, | १८ | संभाषण | परस्पर संभाषण |
| ३५ | ५१ | १० | भाड्याचे बैल | भाड्याचे गाड्याचे बैल |
| ,, | ५२ | ७ | मजकुरात द्यावे तेसी सिवत | जानकुरान द्यावें ऐसा सिद्धांत |
| ,, | ,, | १२ | याद करून दिली. | याद करून आणिली. नबाबांनीं मतलब माफिक याद करून दिली. |
| ,, | ५३ | १ | चालत उठावें | आराबेयावर चालत उठावें. |
| ,, | ,, | २ | धावयाविषें | धान्याविषें |
| ,, | ५४ | ३ | मनरोटी | जानरोटी |
| ,, | ,, | ,, | करतील ? | करतील; परंतु |